...री १९८४-१९८५

# हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास

भाग पहिला

## मुसलमानी रियासत.



( सुधारून वाढविलेली नवीन आवृत्ति ).

लेखक

गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए.,

शिक्षक, राजपुत्रविद्यालय,—बडोदें.

प्रकाशक

दामोदर सांवळाराम आणि मंडळी.

'इंदुप्रकाश' छापखाना मुंबई.

सन १९१०.

किंमत अडीच रुपये.

ं, तेव्हां त्याच
राठी वाचकांच्या
ण्याचाच आरंभी
काढण्याची इच्छा
फार केल्याशिवाय
टिश रियासतीचा
ड्या उद्योगाच्या
रील .मुसलमानी
नांचा धर्म, त्यांची
ा प्रश्नाकडे माझें
उत्पन्न झाली.
न वगैरे विविध
ले, त्यांचें सूक्ष्म
लें. अशा व्यापक
लून गेलें. मुसल-
ी तुलना करून,
बंधानें अधिकारी
ाधारभूत ग्रंथांची
ी कल्पना थोडी-
ं, पुष्कळ उद्योगी

# प्रस्तावना.

सुमारें पंधरा वर्षांपूर्वीं मीं इतिहासाचें काम हातीं घेतलें, तेव्हां त्याचा [illegible] शा प्रकारचा होईल ह्याची मला कल्पना नव्हती. मराठी वाचकांच्या व [illegible] शिक्षकांच्या उपयोगाची थोडीबहुत माहिती देण्याचाच आरंभीं माझा [illegible] होता; आणि मुसलमानी रियासतीची द्वितीयावृत्ति काढण्याची इच्छा प्रकाशकांनीं जेव्हां मला कळविली, तेव्हां तें काम विशेष फेरफार केल्याशिवाय तडीस जाईल, असें मला वाटलें होतें. परंतु दोन वर्षांपूर्वीं ब्रिटिश रियासतीचा पूर्वार्ध प्रसिद्ध झाला तेव्हांपासून, अनेक कारणांनीं माझ्या उद्योगाच्या स्वरूपांत पुष्कळच अंतर पडलें. गेल्या दोन वर्षांत पृथ्वीवरील मुसलमानी राष्ट्रांत जी चळवळ सुरू झाली आहे, तिच्या योगानें मुसलमानांचा धर्म, त्यांची राष्ट्रीय प्रगति व जगाच्या संस्कृतींत त्यांनीं केलेलें कार्य, ह्या प्रश्नाकडे माझें लक्ष लागलें, आणि त्यांच्या पूर्वेतिहासाविषयीं जिज्ञासा उत्पन्न झाली. आरब, तुर्क, मोगल, तसेच सॅरॅसिन, मूर, सेल्जुक, ऑटोमन वगैरे विविध जातींचें एक राष्ट्र बनून त्यांनीं भूतलावर जे प्रभाव गाजविले, त्यांचें सूक्ष्म निरीक्षण आपणांस अत्यंत बोधप्रद आहे असें दिसून आलें. अशा व्यापक दृष्टीनें विचार करूं लागल्यावर पुस्तकाचें मूळस्वरूप अगदीं बदलून गेलें. मुसलमानांची संस्कृति व हिंदुस्थानांतील प्राचीन आर्यसंस्कृति यांची तुलना करून, मुसलमानांच्या विजयाची मीमांसा करणें मला इष्ट वाटलें. ह्या संबंधानें अधिकारी विद्वानांनीं लिहिलेलें वाङ्मय पुष्कळच आहे. ह्या पुस्तकाला आधारभूत ग्रंथांची यादी सोबत जोडिली आहे, तिजवरून माझ्या या उद्योगाची कल्पना थोडी-बहुत करतां येईल. मासिक पुस्तकांतून व स्वतंत्र ग्रंथांच्या रूपानें, पुष्कळ उद्योगी

शोधकांनीं व विचारवंत विद्वानांनीं गेल्या पंधरावीस वर्षांत फारशी व इतर ग्रंथांतून
माहिती घेऊन, नाना प्रकारच्या प्रश्नांवर मार्मिक लेख लिहून, या विषयाच्या
ऐतिहासिक विवेचनांत पुष्कळच भर घातली आहे. तिचा समावेश या पुस्तकांत
केल्याशिवाय विषयाची पूर्तता होईना. विजयनगरचा इतिहास, व चंगीझखान,
तयमूरलंग इत्यादिकांविषयीं पुष्कळ नवीन मजकूर ह्या पुस्तकांत घातला
आहे. मोगल बादशहांसंबंधाचें पूर्वीचें विवेचन अगदींच बदलून गेलें आहे.
प्रत्येक बादशहाविषयीं घरगुती व राजकीय तपशील, त्याची योग्यता ठर-
विण्यास लागणारी माहिती, आणि निरनिराळ्या ठिकाणीं प्रसिद्ध झालेली चर्चा,
ह्या पुस्तकांत घेतली आहे. गेल्या पांचसात वर्षांत भूतलावर जी नवीन
जागृति उत्पन्न झाली आहे, तिजमुळें, व माझें स्वतःचें वाचन, विचार, प्रवास,
अनुभव, विद्वत्समागम व भाषा इत्यादि बाबतींनीं माझ्या मनावर झालेल्या
परिणामामुळेंही, पुस्तकाचें पहिलें स्वरूप पालटल्याशिवाय राहिलें नाहीं. सारांश,
हातीं घेतलेल्या विषयांत अगदीं प्रस्तुत कालापर्यंतची माहिती वाचकांस
पुरविण्याचा मीं यथामति प्रयत्न केला आहे. तो कसा काय साधला आहे हें
वाचकांनींच ठरविलें पाहिजे.

भूतलावरील राष्ट्रांची प्रगति आजकाल मोठ्या झपाट्यानें होत आहे. दळण-
वळणाचीं साधनें अधिकाधिक होत चालल्यामुळें एकमेकांची ओळख व ज्ञान
वाढत आहे. जे प्रकार घडण्यास पूर्वी शतकेंच्या शतकें लागत, त्यांस आज
दशकही लागत नाहींत. अशा स्थितींत शेंकडों वर्षें निकट सहवास असलेल्या
हिंदुमुसलमानांनीं एकमेकांचें हृद्गत समजून घेणें अवश्य झालें आहे. ह्यास्तव
हिंदुस्थानांतील मुसलमानी अंमदानींत ज्या घडामोडी झाल्या, त्यांचें मार्मिक व
विस्तृत विवेचन ह्या पुस्तकांत केलें आहे. त्यावरून राष्ट्रीय दृष्ट्या मुसलमानांच्या
ठिकाणीं पुष्कळ अनुकरणीय गुण असून, त्यांनीं जगाच्या इतिहासांत मोठी
कामगिरी बजाविली आहे, असें इतिहासाचें अध्ययन करणारांस दिसून येईल.

वर सांगितलेल्या कारणांमुळें पुस्तकाचा आकारही अतिशय वाढला.
पूर्वीच्या आवृत्तींत जाड्या टाइपांचीं ७६८ पानें होतीं, त्यांऐवजीं आतां
बारीक टाइपाचीं १०० पानें आणखी वाढलीं आहेत. ह्यापेक्षां ज्यास्त पानांचा
समावेश एका पुस्तकांत होणें शक्य नसल्यामुळें, व किंमतही पहिल्या आवृत्ती-
हून वाढवावयाची नाहीं असा संकल्प असल्यामुळें, औरंगजेबानंतरचा

म्हणजे अठराव्या शतकाचा भाग, अत्यंत महत्त्वाचा असूनही, त्याचें विवेचन पहिल्या आवृत्तीपेक्षां ज्यास्त तपशीलवार करण्यास अवकाश राहिला नाहीं. शिवाय अठराव्या शतकाशीं मराठ्यांचा निकट संबंध असल्या कारणानें, तें विवेचन मराठयांच्या भागांतच देणें प्रशस्त होय. मोगलबादशाहीचा इतिहास मात्र येथें होईल तितका कसोशीनें घेतला आहे. हल्लीं ह्या विषयाची जरूर कॉलेजांत सुद्धां असल्यामुळें, ह्या पुस्तकानें विद्यार्थ्यांचीही सोय होईल अशी आशा आहे.

पुस्तकांतील बराच भाग कोणत्या तरी सर्वमान्य ग्रंथांतून घेतला असून, एकंदर जुळवणी व व्यवस्था सर्वथैव माझी आहे. मूळग्रंथाचें नांव व संबंध बहुधा सर्वत्र दाखविला आहे. तसेंच वंशावळी व भरपूर सूची वगैरे देऊन, वाटेल तो मुद्दा हुडकून काढण्यास व नेहमींच्या वापरण्यास पुस्तक उपयोगी पडावें, अशी योजना केली आहे. प्रकरणाच्या आरंभीं क्रमवार कलमें दिलीं आहेत त्यांजवरून, विषयाची मांडणी कशी आहे व प्रकरणांत कोण-कोणत्या बाबतींचा विचार केलेला आहे, हें समजून येईल. एकंदरींत प्रस्तुतच्या प्रगतीच्या मनूंत विद्यार्थ्यांस, शिक्षकांस, व सामान्य वाचकांस जी ऐतिहासिक माहिती अवश्य असली पाहिजे ती देण्यांत मीं कसूर केली नाहीं.

पूर्वीच्या आवृत्तींत पुष्कळ भाग नीरस व कंटाळवाणे झाले होते, ते सर्व दुरुस्त करून, नवीन माहिती, ऐतिहासिक चर्चा, विषयाचें वर्गीकरण व सोपी भाषा, ह्यांच्या योगानें सर्व पुस्तक होईल तितकें मनोरंजक व बोधप्रद करण्याची खबरदारी घेतली आहे. इतकें करूनही पुस्तकांत अनेक दोष आहेत हें मी जाणून आहें. परंतु महाराष्ट्रवाचकांच्या उपयोगाचें असलें दुसरें पुस्तक मराठींत नसल्यानें ह्याचा त्यांस थोडाबहुत उपयोग झाल्याशिवाय राहणार नाहीं, अशी मला खात्री वाटते. ह्यांतील गुणदोष निर्भीडपणें कळवि-ण्याविषयीं सर्व वाचकांस माझी आग्रहाची व सप्रेम विनंति आहे.

मेहेरबान डायरेक्टर ऑफ् पब्लिक इन्स्ट्रक्शन, मुंबई, यांनीं प्रथमावृत्तीचें परीक्षण करून, लायब्ररी व बक्षिसांसाठीं पुस्तक मंजूर करून त्यास आश्रय दिला, याजबद्दल ग्रंथकर्ता व प्रकाशक त्यांचे अत्यंत आभारी आहेत. तसेंच शाळाखात्यांतील व इतर अनेक गृहस्थांनीं पुस्तक वाचून पुष्कळ उपयुक्त सूचना केल्या, त्यांचाही ह्या आवृत्तींत साभार स्वीकार केला आहे.

ज्या अनेक ग्रंथकारांच्या बहुमोल कृतींचा मीं ह्या पुस्तकास आधार घेतला आहे, त्यांचा मी सर्वथैव ऋणी आहें. तसेंच अनेक विद्वान् गृहस्थांनीं व मित्रांनीं, प्रत्यक्ष भेटीनें व पत्रद्वारा, आपला अमूल्य वेळ खर्चून मला साह्य केलें, ह्याबद्दल त्यांचे उपकार मानावे तितके थोडेच आहेत.

पाटणा येथील 'खुदाबक्ष लायब्ररी'तून व व्हिक्टोरिया मेमोरियलच्या ट्रस्टीं-कडून कित्येक अप्रसिद्ध व सुंदर चित्रें पैदा करून पुस्तकांत घातलीं आहेत. हीं चित्रें देणारांचे मोठे उपकार आहेत. अशा प्रकारचीं पुष्कळ चित्रें घालून व अन्य प्रकारांनीं पुस्तक मनोरम व सर्वांगसुंदर करावें, आणि पाश्चात्यांच्या सुंदर व स्पृहणीय पुस्तकांचा प्रकार आपणही वठवावा, अशी मोठी हौस मनांत येते. परंतु मराठी वाचकांची अल्पसंख्या आणि आपली एकंदर निर्धन स्थिति यांमुळें, मनांतले विचार मनांतच ठेवावे लागतात. पुस्तकांचा खप चांगला झाल्याशिवाय सुबक व सुंदर ग्रंथ स्वस्त किंमतींत देणें शक्य नाहीं. तथापि एवढ्या श्रमाचें व खर्चाचें हें पुस्तक अल्प किंमतीस वाचकांस देण्यांत प्रकाशकांनीं आपली अगदीं शिकस्त केली आहे, असें कोणासही वाटल्या शिवाय राहणार नाहीं.

अखेरीस ब्रिटिश रियासतीच्या प्रस्तावनेंत सांगितल्याप्रमाणें, विद्याप्रिय भूपति **श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड** ह्यांच्या संतोषकारक सेवेंत हा उद्योग करण्याचें मला सामर्थ्य प्राप्त झालें, आणि त्यांच्याच कृपा-प्रसादाचें हें फल होय, एवढें सांगून मी आपली ही कृति वाचकांपुढें ठेवितों.

बडोदें, राजपुत्र विद्यालय,<br>ता. १३ माहे नोव्हेंबर स.१९१०. } **गोविंद सखाराम सरदेसाई.**

# ह्या पुस्तकास आधारभूत ग्रंथांची यादी.


1 Amir-Ali's History of the Saracens.
2 Myer's History, Ancient and Modern.
3 Contributions to the History of Islamic Civilization, translated from German by S. Khudabux, Calcutta.
4 Sir R. Burton's Terminal Essey in Arabian Nights, Vol. 8.
5 Curtin's History of the Mogals, President Roosevelt's Preface.
6 Sewell's Forgotten Empire, History of Vijaynagar.
7 B. Surya Narain Row's History of Vijayanagar.
8 Imperial Gazetteer of India, Vol. 2, Historical.
9 Frazer's Literary History of India.
10 Abbè Dubois' Manners and Customs of the Hindus.
11 Alberuni's India ( Trubners ).
12 Stanley Lane-Poole's Medieval India, (Story of the Nations).
13 Meadows Taylor's Students' History of India.
14 Wheeler's History of India from the Earliest Times, Vols. 1-5
15 Sir H. Elliot's History of India, Vols. 1—8.
16 Holden's Mogal Emperors.
17 Caldcotte's Life of Baber.
18 Talbot's Memoirs of Baber.
19 Erskine's History of Baber and Humayun.
20 Major Stewart's Life of Humayun by Jowhar.
21 Malleson's Akbar, ( Rulers of India ).
22 Beveridge's articles on Akbar, the Indian World, 1905-6.
23 Jarret and Blochmann's Ain-i-Akbari, Vols. 1—3.
24 Rodger's Tuzuk-i-Jahangiri.
25 Price's Jahangir.
26 Prof. Sarkar's articles on Aurangzeb, War in Bengal, Daily Life of the Mogal Emperors, a Modern Heroine, &c. (in Modern Review ).
27 Sarkar's Revenue Regulations of & India under, Aurangzeb.
28 Lane-Poole's Aurangzeb ( Rulers of India ).
29 Vincent Smith's Oxford History of India.
30 Keene's Fall of the Mogal Empire.
31 Owen's India on the Eve of British Conquest.
32 Irevine's History of the Mogal Armies.
33 Jackson's History of India, Vol. 9, Account of Travellers.
34 Sir M. Durand's Nadirshah.
35 Prof. Modak's Histories of Bahamani Kingdoms in Marathi.

36 Wilson's Religious sects of the Hindus.
37 Aitchison's Treaties, Engagements & Sanads.
38 लोकहितवादीकृत गुजराथचा इतिहास व इतर ग्रंथ.
39 श्रीयुत पारसनीसकृत बुंदेलखंड प्रकरण.
40 Lane-Poole's Indian Coins.
41 *Reviews.* The Hindusthan, Modern, East and West, Calcutta, Indian World, Journal of the Moslem Institute, Proceedings A. S. Bengal, &c.

कारणपरत्वें उपयोग केलेल्या ग्रंथांची यादी.

1 Thomas' Revenue Resources of the Mogal Emperors.
2 Muir's Life of Mohammad.
3 Hughe's Life of Mohammad.
4 Hughe's Dictonary of Islam.
5 Ball's Tavernier.
6 William Irevine's Later Mogals, (Journal of A. S. Bengal).
7 Buchanan's Journey through Mysore and Southern India, 4 Vols. edited by Hamilton.
8 Montgomery Martin's Eastern India from the papers of Dr. Buchanan, 3 Vols.
9 Constable's Bernier.
10 Manucci's Story of the Mogors, 4 Vols., by Irevine.
11 Howorth's History of the Mogals.
12 Elias and Ross's History of the Mogals.
13 Mrs. Beveridge's Akbar translated from German of Count Noer.
14 Keene's History of Hindustan.
15 Keene's Turks in India.
16 Todd's Rajasthan.
17 Havel's Indian Art.
18 Brigg's Ferista.
19 Wilkes' Mysore.
20 Price's Inscriptions of Mysore.
21 Vaidya's Epic India.
22 Stewart's History of Bengal.
23 Akbar by Garbe.
24 Col. King's History of the Bahamani Kings.
25 Archaeological Survey Vols.

# अनुक्रमणिका.


प्रकरण. विषय. पृष्ठ.

**१ प्रस्ताव,-विषयमर्यादा.... १**

१ हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास.
२ मुसलमानी रियासत.
३ मराठी रियासत.
४ ब्रिटिश रियासत.
५ चार भाग.

**२ इस्लामाची स्थापना. ... ६**

१ मुसलमानांचें महत्त्व.
२ महंमद पैगंबर.
३ महंमदानें स्थापिलेला धर्म.
४ कुराण.
५ ताबुतांची उत्पत्ति, शिया व सुनी.

**३ आरबी खिलाफत. ... १८**

१ मदीनाची लोकसत्ताक खिलाफत.
२ जिझिया कर.
३ मुसलमानांचे अजब पराक्रम.
४ स्पेनचा पाडाव.
५ बगदादचे आब्बासी खलीफा.
६ फातिमईद वंश.
७ खिलाफतीचा ऱ्हास.
८ आरेबियन नाइट्सचे नायक.
९ जगाच्या संस्कृतींत आरबांचें कार्य

**४ इस्लामांत नवीन भर.... ३५**

१ मध्यआशिया,मानवजातीचें मूळ.
२ तुर्क लोक,-सेल्जुक व ऑटोमन.
३ मोगल लोक-उत्पत्ति, स्वभाव.
४ चंगीझखान व त्याचा वंश.
५ इस्लामाचे दोष व धार्मिक रहस्य.

प्रकरण. विषय. पृष्ठ.

**५ गज्नवी महंमूद. ... ... ५८**

१ महंमद कासीमची सिंधवर स्वारी
२ सामानी वंश.(स.८७४–९९९)
३ अलप्तगीन, (स. ९६७-९७६).
४ सबक्तगीन, (स. ९७७–९९७).
५ सुलतान महंमूद,त्याच्या स्वाऱ्या.
६ सोमनाथची स्वारी, (स.१०२४)
७ महंमुदाची योग्यता.

**६ गज्नवी-घोरी घराणीं.... ७७**

१ सुलतान मस्-ऊद, (१०३०).
२ मौदूदपासून ३रा मस्-ऊदपर्यंत.
३ सुलतान बहराम,(१११८-५२).
४ घोरींचा उदय, (स.११५७-९३)
५ तत्कालीन देशस्थिति,रजपूतराज्यें.
६ भाट लोक व त्यांची कामगिरी.
७ पृथ्वीराज चव्हाण,(११५९-९३)
८ महंमद घोरीच्या स्वाऱ्या,कार्कीर्द.
९ ह्या कालाचें पर्यालोचन.

**७ गुलाम वंश. ... ... ९७**

१ कुत्बुद्दीन, (स.१२०६-१२१०).
२ बंगालचा पाडाव, ( १२०२ ).
३ शम्सुद्दीन अल्तमश(१२१०-३५)
४ सुलताना रझिया वगैरे.
५ नासिरुद्दीन महंमूद, (१२४६).
६ बल्बन, ( सन १२६६–८६ ).
७ तुघ्रलचें बंड, शहाजाद्याचा मृत्यु.
८ कैकुबाद, ( स.१२८६–८८ ).
९ गुलामवंशाची कामगिरी.

प्रकरण. विषय. पृष्ठ.

८ खिलजी घराणें. ... ... ११७
  १ खिलजी वंश.
  २ जलालुद्दीन खिलजी. (१२८९).
  ३ मुसलमानांचा दक्षिणेंत प्र.प्रवेश.
  ४ अलाउद्दीनचें राज्यारोहण.
  ५ अलाउद्दीनचे पराक्रमः—
    (क) मोगल स्वाऱ्या.
    (ख) चितोड.
    (ग) गुजराथ.
    (घ) रतनभोर.
    (ङ) दक्षिणेची दुसरी स्वारी.
  ६ दक्षिण-हिंदुस्थानांतील राज्यें.
  ७ मलीक काफूरच्या स्वाऱ्या.
  ८ अलाउद्दीनचा मृत्यु, राज्यव्यवस्था.
  ९ अलाउद्दीनची करामत व योग्यता.
  १० मुबारिक खिलजी, (१३१६).
  ११ खुस्रूचा विक्षिप्तपणा.

९ तुघ्लख घराणें.... ... १५०
  १ ग्यास्-उद्दीन तुघ्लख. (१३२१).
  २ आफ्रिकेंतील प्रवासी इब्न-भतूता.
  ३ महंमद तुघ्लख व अडचणी.
  ४ बंड व मृत्यु, ( स. १३५१ ).
  ५ महंमद तुघ्लखची योग्यता.
  ६ फिरोज तुघ्लख व त्याचा वजीर.
  ७ जनहिताचीं कामें.
  ८ हिंदुधर्मावर वक्रदृष्टि.
  ९ मृत्यु व योग्यता, (स.१३८८).

प्रकरण. विषय. पृष्ठ.

१० तयमूरलंग, स्वारी.... १७२
  १ फिरोजशहानंतरच्या घालमेली.
  २ तयमूरचा पूर्ववृत्तान्त, (१३३५).
  ३ तयमूरची दिल्लीवर स्वारी
  ४ तयमूर-अवतारसमाप्ति, योग्यता.
  ५ सय्यदघराणें, (१४१६–५०).
  ६ लोदीघराणें, (१४५०-१५२६)
  ७ लोदीघराण्याची समाप्ति, (१५२६)

११ गुजराथ-इतिहास. ... १९४
  १ पूर्व-वृत्तान्त, (इ.स.९४२पर्यंत).
  २ चालुक्य–वंश, (९४२-१२१५).
  ३ वाघेल–वंश, (१२१५-१२९६).
  ४ अलाउद्दीन व राजा कर्ण, १२९७
  ५ दिल्लीच्या सुलतानांचा अंमल.
  ६ स्वतंत्र सुलतान, ( स.१३९६ ).
  ७ गुजराथ, इतिहासाचें पर्यालोचन.

१२ बहामनी राज्य.... ... २१६
  १ हिंदुमुसलमानांचे दक्षिणेंत कलह.
  २ दक्षिणेंतील बंडाचें अंतस्थ कारण.
  ३ हसनगंगू ऊर्फ अला-उद्दीन.
  ४ महंमदशहा, (१३५८-१३७५).
  ५ महंमदशहानंतर झालेले सुलतान.
  ६ फिरोजशहा, (१३९७-१४२२).
  ७ अहंमदशहा वली, ( १४२२ ).
  ८ अला-उद्दीनशहा, (स. १४३५).
  ९ हुमायूनशहा व निजामशहा.
  १० महंमदशहा, २ रा, (१४६३).
  ११ वजीर महंमद गवान.
  १२ महंमूदशहा, (१४८२-१५१८).
  १३ बहामनी राज्याचें समालोचन.

प्रकरण. विषय. पृष्ठ.

१३ निजामशाही वगैरे.... २४३

१ बेरीदशाही, (१४९२-१६५६).
२ इमादशाही, (१४८४-१५७२)
३ निजामशाही, (१४८९-१६३७)
४ चांदबिबी व मोगलांशीं युद्ध.
५ मलिकंबरचा कारभार, (१५४६)
६ निजामशाहीची अखेर (१६३३)
७ शहाजीची अखेरची धडपड.

१४ आदिलशाही. ... ... २६१

१ अबुल् मुजफर यूसुफ् आदिलशहा.
२ इस्माईल आदिलशहा, (१५१०)
३ इब्राहीम आदिलशहा, (पहिला).
४ अली आदिलशहा, ( १५५७ )
५ इब्राहीम आदिलशहा, (दुसरा).
६ महंमद आदिलशहा, (१६२६).
७ अली आदिलशहा, ( दुसरा ).
८ शिकंदर आदिलशहा, (१६७२).
९ आदिलशाहीचें समालोचन.

१५ कुत्बशाही. ... ... २८१

१ कुत्बशाही, प्रस्ताव, (१५१२).
२ कुली कुत्बशहा, ( १५१२ ).
३ जमशीद कुत्बशहा, (१५४३).
४ इब्राहीम कुत्बशहा, (१५५०).
५ महंमद कुली कुत्बशहा (१६११)
६ अब्दुल्ला हुसेन कुत्बशहा (१६११)
७ अबू-हसन कुत्बशहा (१६५८).

प्रकरण. विषय. पृष्ठ.

१६ विजयनगरचा इतिहास. २९२

१ विजयनगरचें महत्त्व.
२ विजयनगरची उत्पत्ति (१३३६).
३ पहिला वंश ( स. १३४४ ).
४ दुसरा वंश ( स. १४९० ).
५ तिसरा वंश, रामरायाचा उदय.
६ तालिकोटची लढाई (१५६५).
७ ह्या लढाईचे भयंकर परिणाम.
८ या हिंदु राज्याचें सिंहावलोकन.
(क) माधवाचार्यांची अपूर्वयोजना.
(ख) नीतिमत्तेचा अभाव.
(ग) संपत्तीची विपुलता.
(घ) प्रवाश्यांच्या हकीकती.
९ दक्षिणेतिहासाचें समालोचन.

१७ मुसलमानी राज्यें. ... ३१६

१ काश्मीर, ( इ. स. १३२६ ).
२ बंगाल, ( १३४१–१५२३ ).
३ माळवा, ( इ. स. १३८७).
४ खानदेश, ( १३७०–१५९९ ).
५ जोनपूरचें शर्की घराणें (१३९४)
६ मुलतान, ( १४४३–१५२४ ).
७ सिंध, (इ.स. १२१४-१५२३).

१८ रजपूत राज्यें.... ... ३३४

१ रजपुतांच्या इतिहासाचें स्वरूप.
२ मेवाड–राणासंगपर्यंत.
३ राणासंगपासून प्रतापसिंहपर्यंत.
४ प्रतापसिंहापासून आजतागाईत.
५ जयपूरचा इतिहास.
६ जोधपूरचा इतिहास.
७ रजपूत–इतिहासाचें समालोचन.

प्रकरण. विषय. पृष्ठ.

१९ गतकालाचें पर्यालोचन ३६४
१ राज्यव्यवस्था व लोकस्थिति.
२ दोनधर्मांचे एकमेकांवर परिणाम.
३ रजपुतांच्या पाडावाची मीमांसा.
(१) उत्पत्तीचा संघशक्तीलाविरोध.
(२) रजपूत बाण्याची बाधकता.
(३) उपाध्यायांचा राष्ट्रद्रोह.
(४) आनुवंशिक वैरभाव.
(५) वेडगळ धर्मसमजुती.
(६) युद्धकलेचें अज्ञान.
(७) प्रतिकूल सृष्टस्थिति.
(८) बाटलेल्या हिंदूंचा उत्साह.
(९) मुसलमान परिस्थितीचा पेंच.
(१०) 'लेन्पूल'नें केलेलें निदान.
४ स्वत्वरूपी भावनेचा अभाव.
५ आल्बेरूनीचें हिंदूविषयीं मत.
६ ग्रंथसंपत्ति, हिंदूंची बौद्धिक सरशी.
७ मध्यकालीन इमारतींचें बांधकाम.
८ आशियायूरोप, संस्कृतींची तुलना.

२० बाबर. ... ... ... ४०९
१ पूर्ववृत्त (ज. १४८३).
२ मध्यआशियांतील नशिबाचेखेळ.
३ पानपत लढाई, हिंदुस्थान कांबीज.
४ सिक्री लढाई, राणासंगचा पाडाव.
५ इतर शत्रूंचा पाडाव व मृत्यु.
६ बाबराची योग्यता.
७ बाबराचें आत्मचरित्र.

प्रकरण. विषय. पृष्ठ.

२१ हुमायून. ... ... ४४१
१ राज्यारोहण व चुका (१५३०)
२ गुजराथची स्वारी (१५३४).
३ शेरखानाचें बंड, पदच्युति.
४ शेरशहा सूर, (१५४०).
५ पुढील सूरवंशी सुलतान (१५४५)
६ हुमायूनचा वनवास (१५४०).
७ मृत्यु व योग्यता (स. १५५६).

२२ अकबर. ... ... ४६९
१ पूर्वचरित्र व राज्यारोहण.
२ सूरवंशी शत्रूंचा बंदोबस्त.
३ स्वकीय सरदारांचे बखेडे.
(अ) बह्रामखान (१५५९).
(आ) आदमखान वगैरे (१५६१).
(इ) खानजमान (१५६६).
(ई) महंमद हकीम मीर्झा १५६६
४ अकबरानें जिंकिलेले प्रदेश.
(अ) रजपूतराज्यें (१५६१).
(आ) गुजराथ (१५७२–७३).
(इ) बंगाल (१५७२–१५७५).
(ई) काबूल (१५७९).
(उ) काश्मीर (१५८७).
(ऊ) सिंधप्रांत (१५९२).
(ऋ) कंदाहार (१५९४).
(ॠ) महाराष्ट्र (१५९५-१६००).
५ सलीमचें दुर्वर्तन.
६ मृत्यु व बायकामुलें.

प्रकरण. विषय. पृष्ठ.

२३ अकबराची योग्यता. ५०२

१ नवीन धर्मसंस्थापना.
२ शरीर, स्वभाव व करामत.
३ राज्यकारभाराचें धोरण.
४ जमाबंदीची व्यवस्था.
५ अवांतर सुधारणा.
६ आग्रा–सिक्रीचीं बांधकामें.
७ परिस्थिति व तुलना.
८ वीव्हरिज्चा अकबरावर अभिप्राय
९ अकबराचा नवरत्न दरबार.
(क) अबुल्फज्ल् व फैजी.
(ख) राजा मानसिंग.
(ग) मुल्ला दोप्याजा.
(घ) राजा तोडरमल्ल.
(ङ) राजा बीरबल. (च) तानसेन.
(छ) हकीम हुमाम. (ज) बदाऊनी.

२४ जहांगीर. ... ... ५७१

१ राज्यारोहण.
२ जहांगीरचीं बायकामुलें, खुस्रू.
३ रजपुतांशीं युद्ध (स. १६०८).
४ नूर-जहान, इराणी वळण.
५ दक्षिणेंतील भानगडी.
६ जहांगीर बादशहा व इंग्रज लोक.
(अ) हॉकिन्स, (आ) सर टी रो.
७ अखेरच्या घालमेली (१६२३).
८ जहांगीरची योग्यता.
९ जहांगीरचा जीवनक्रम.
१० जहांगीरचीं धर्मसंबंधीं मतें.
११ जहांगीरची राज्यव्यवस्था.
१२ जहांगीरच्या स्वारीचा थाट.

प्रकरण. विषय. पृष्ठ.

२५ शहाजहान. ... ... ६२५

१ कार्किर्दींतील महत्त्वाच्या गोष्टीः–
(अ) राज्यारोहण.
(आ) खानजहान लोदी (१६२९).
(इ) निजामशाहीचा पाडाव.
(ई) रजपूत राजांशीं संबंध.
(उ) पोर्तुगीझांचा पाडाव १६३२
(ऊ) बल्क् कंदाहारच्या स्वाऱ्या.
२ शहाजहानचीं बायकामुलें.
३ औरंगजेबाचा पूर्वायुःक्रम.
४ राजपुत्रांचा झगडा.
५ योग्यता व राज्यव्यवस्था.
६ शिल्पकलेचा उत्कर्ष, ताजमहाल इ.

२६ औरंगजेब. ... ... ६८५

१ राज्यारोहण व परिस्थिति.
२ मीर जुम्ला (मृ. १६६३).
३ बुंदेले राजांशीं युद्ध.
४ जनानखान्यांतील मसलती.
५ कार्किर्दींतील कांहीं युद्धप्रसंग.
६ हिंदूंचा छळ व रजपुतांशीं युद्ध.
७ दक्षिणची स्वारी व मृत्यु.
८ औरंगजेबाची योग्यता.
९ औरंगजेबाची राज्यव्यवस्था.

प्रकरण. विषय. पृष्ठ.

२७ अंतरंग-परीक्षण. ... ७३८

१ बादशहांची दिनचर्या.
२ मोगलांचीं नाणीं.
३ फारसी इतिहास व हिंदुलोक.
४ राजघराण्याचें शिक्षण व विद्वत्ता.
५ राजाप्रजा, एकमेकांवर परिणाम.
(१) पेहराव.
(२) युद्धकला.
(३) बुद्धिप्रभाव.
(४) प्रवास.
(५) शिल्पकला.
(६) डांक.
(७) दळणवळण.
(८) कारागिरी.
६ गादीच्या वारसाविषयीं अनिश्चय
७ अनियंत्रित सत्तेचीं नियंत्रणें.
८ अधिकार विभागणी.
९ संतमंडळ व तत्कृत ग्रंथसंग्रह.

२८ प्रवाश्यांचे अभिप्राय. ७८९

१ पाश्चात्य प्रवासी, रे. टेरी.
२ पीट्रो डिला व्हेल.
३ जॉन ऑल्बर्ट द मंडेल्स्लो.
४ जॉन बॅप्टिटा टॅव्हार्नियर.
५ डॉ. जॉन फ्रायर.
६ थिवेनॉट, कॅ. हॅमिल्टन.
७ कार्स्टन नीबर.

प्रकरण. विषय. पृष्ठ.

२९ बादशाहीचा ऱ्हास. ८१३

१ बहादूरशहा (स.१७०७-१२).
२ शीखलोकांचा उदय.
३ जहांदरशहा, (स. १७१२).
४ फर्रुख्सेयर, (स.१७१३-१९).
५ सय्यदबंधूंचीं कारस्थानें.
६ महंमदशहा, (स.१७१९-४८).
७ निजामशाहीचा उदय.
८ नादिरशहाची स्वारी (१७३८).
९ प्रां. अंमलदारांचें स्वातंत्र्यधारण.

३० अखेर.... ... ... ८४५

१ अहंमदशहा व रोहिल्यांचें बंड.
२ दुसरा आलमगीर व नजीबखान.
३ अहंमदशहा अब्दालीच्या स्वाऱ्या.
४ अलीगौहर ऊ. शहाआलम.
५ नजीबखान, जाठ व मराठे.
६ शहाआलमची दिल्लीस स्थापना.
७ महादजी शिंद्याची मदत.
८ गुलामकादरचीं दुष्ट कृत्यें.
९ दिल्लीचा पाडाव, घराण्याचा शेवट.

| चित्रें. | पृष्ठ. |
|---|---|
| पृथ्वीराज चव्हाण. | ८९ |
| तयमूरचा जनानखाना. | १८१ |
| तयमूरचे शिरांचे मनोरे. | १८२ |
| तयमूरचा दरबार. | १८५ |
| हुमायूनचा आजार. | ४२७ |
| बाबरचा मृत्यु. | ४२७ |
| अकबराचा नवरत्न दरबार. | ५५४ |
| शहाजहानचा जनानखाना. | ६३५ |
| शहाजहानचें लग्न. | ६८७ |
| बाबा कबीर. | ६८७ |
| शाएस्तेखान. | ७०४ |

श्री.

# हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास

## भाग पहिला

# मुसलमानी रियासत.

## प्रकरण पहिलें,

## प्रस्ताव,—विषय–मर्यादा.

१. हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास. ३. मराठी रियासत.
२. मुसलमानी रियासत. ४. ब्रिटिश रियासत.
५. चार भाग.

**१. हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास.**—अखिल चराचर विश्वाच्या पूर्णनियामक जगदात्म्यानें निर्माण केलेल्या ह्या भूतलावर जीं राष्ट्रें ऐतिहासिक कालावधींत विज्ञात आहेत, त्या सर्वांत हिंदु लोकांचें राष्ट्र अत्यंत वृद्ध होय. ह्यापेक्षां ज्यास्त पुरातन राष्ट्रें पृथ्वीवर हयात नाहींत; व ज्या कित्येक राष्ट्रांचा मागमूस केवळ नवीन उपलब्ध खाणाखुणांवरून आज आपणांस लागतो, तीं तरी हिंदु राष्ट्रांपेक्षां जुनीं असलींच पाहिजेत असें म्हणण्यास आधार नाहीं. हिंदु लोकांचे जुने ग्रंथ आजतागाईत ह्या वृद्धावस्थेची साक्ष देत आहेत. वेद हा त्यांचा आद्यग्रंथ होय. हे सर्व वेद एकाच काळीं निर्माण झालेले नाहींत. ते निर्माण होऊं लागले त्यापूर्वींही हिंदु राष्ट्र अस्तित्वांत होतें. वेदांचा काळ इसवीसनापूर्वी चारहजार वर्षांपलीकडचा म्हणजे आजमितीपासून सुमारें सहाहजार वर्षांवरचा आहे, हें आतां अनेक विद्वानांनीं सप्रमाण सिद्ध केलें आहे. वेदांनंतर रामायण,

७९१-२०००

महाभारत व पुढें स्मृति, पुराणें, वगैरे ग्रंथ होऊन आर्यधर्माची वृद्धि होत गेली. उत्पत्ति, अभिवृद्धि व लय ह्या स्थितित्रयीच्या नियमास अनुसरून आर्य लोक व आर्यधर्म यांचा कालांतरानें क्षय होऊं लागला. अखेरीस परकीय परधर्मीयांच्या म्हणजे मुसलमानांच्या आगमनानें हिंदु लोकांच्या स्वराज्याचा क्षय झाला. असा प्रकार घडण्यांत जो कालावधि गेला, त्याचा इतिहास हा हिंदुस्थान देशाच्या इतिहासाचा पहिला भाग होय. ह्यास प्राचीन भाग असें नांव देतां येईल. ह्या भागांत सुमारें पांच-हजार वर्षांचा समावेश होतो. इसवी सनाच्या सहाव्या शतकाचे अखेरीस आरबस्तानांत मुसलमानी धर्माची स्थापना होऊन, आठव्या शतकांत त्या लोकांचा हिंदुस्थान देशांत प्रथम प्रवेश झाला, आणि पुढें तीनशें वर्षांच्या कालावधींत त्यांनीं ह्या देशांत राज्यस्थापनेच्या कामांत बरेंच यश संपादिलें. इसवी सन १००० चे सुमारास पराक्रमी मुसलमानी सुलतान गज़्नवी महंमूद हिंदुस्थानावर स्वाऱ्या करूं लागला, तेव्हांपासून ह्या देशाच्या अर्वाचीन इतिहासाचा आरंभ गणण्यास हरकत नाहीं. म्हणून प्राचीन भागाच्या दोन मर्यादा, वेदकाल व क्रिस्तसन १००० ह्या होत.

युरोपियन इतिहासकार ह्या भूगोलाच्या एकंदर ऐतिहासिक कालाचे तीन भाग करितात, प्राचीन, मध्य, व अर्वाचीन. रोम शहरीं नांदणाऱ्या रोमन बादशाहीचा शेवट इ. स. ४१० ह्या वर्षी झाला, तेव्हांपासून प्राचीन भागाची समाप्ति होऊन, मध्ययुगास आरंभ होतो. ह्या मध्य-युगाचा शेवट इ. स. १४९२ त कोलंबसानें अमेरिका खंडाचा शोध लाविला, तेव्हां झाला असें समजतात. त्यापुढें अर्वाचीन काळास सुरवात होते. म्हणजे ठोकळ मानानें पंधराव्या शतकाच्या अखेरीस मध्ययुग संपून अर्वाचीन युरोपियन प्रगति सुरू झाली, असें समजण्याचा प्रघात आहे. ह्यावरून मध्ययुगाची कालमर्यादा इ. स. ४१०–१४९२ पर्यंत सुमारें अकराशें वर्षांची आहे. ह्या अकराशें वर्षांच्या मध्ययुगाचे, अंधकारकाल ( Dark Ages ) व प्रबोधकाल ( Awakening ) असे दोन पोटभाग आहेत. पहिल्याची सीमा इ. स. ४००–१००० पर्यंत सहाशें वर्षें, व दुसऱ्याची सीमा इ. स. १०००–१५०० पर्यंत पांचशें वर्षें. वस्तुतः हिंदुस्थानचा इति-हास युरोपियन इतिहासाहून पुष्कळ भिन्न आहे, तथापि ऐतिहासिक

विवेचनाच्या सोयीसाठीं हिंदुस्थानच्या इतिहासांतही असे विभाग पाडतां येतील. इ. स. १५२६ त बाबरानें पानपतच्या समरांगणावर विजयी होऊन, मोगल बादशाहीची स्थापना केली, तेव्हां हिंदुस्थानच्या मध्ययुगाची समाप्ति होऊन अर्वाचीन इतिहासास आरंभ झाला, असें मानण्यास हरकत नाहीं. मात्र ह्या मध्ययुगाच्या कल्पनेनें हिंदुस्थानच्या इतिहासाध्ययनास विशेष मदत होत नाहीं; कारण अशा कालमर्यादा ठरविण्याइतकें आपल्या इतिहासाचें प्राचीन व मध्य कालांचें स्वरूप अद्यापि विशद झालेलें नाहीं.

**२. मुसलमानी रियासत.**—ह्या रियासतीचा कालारंभ वर क्रिस्ती सन १००० धरला आहे, तरी सर्व देशावर बादशाही अंमल स्थापन होण्यास पुढें बराच काल लागला; व नंतरही आसेतुहिमाचलपर्यंतचा सर्व हिंदुस्थान देश मुसलमान बादशाहीच्या एकछत्री अंमलाखालीं फारच थोडे दिवस होता. सहाशें वर्षांच्या अवकाशांत सर्व देश मुसलमानांनीं व्यापून टाकिला खरा, पण त्यांची ती सत्ता शंभर दीडशें वर्षांपेक्षां ज्यास्त टिकली नाहीं. दक्षिण हिंदुस्थानांत महाराष्ट्र म्हणून जो भाग आहे त्यांतील स्वदेशाभिमानी लोकांस मुसलमान बादशाही मोडून टाकण्याचा नवीन हुरूप आला. त्यांनीं अठराव्या शतकांत मुसलमान बादशाही पादाक्रांत करून स्वराज्य स्थापिलें. हे पराक्रमी लोक मराठे होत. एवंच क्रिस्ताच्या १००० वर्षांपासून पुढें सात साडेसातशें वर्षांचा जो काळ गेला, तो एकंदर इतिहासाचा दुसरा, किंवा ह्या अर्वाचीन इतिहासाचा पहिला भाग होय. ह्या कालांत ज्या निरनिराळ्या मुसलमानी वंशांनीं हिंदुस्थानावर आपला अंमल गाजविला, त्यांचें वर्णन द्यावयाचें आहे. मुसलमानांचें तरी सर्व हिंदुस्थानावर एकच राज्य होतें असें नाहीं. निरनिराळ्या ठिकाणीं भिन्न काळीं स्थापन झालेलीं भिन्न भिन्न राज्यें होतीं. हीं राज्यें कधीं, केव्हां व कशीं स्थापन झालीं, त्यांचा उत्कर्ष व लय कसा झाला, व त्यांचे एकंदर देशस्थितीवर काय परिणाम घडले, हें या भागांत सविस्तर सांगावयाचें आहे.

**३. मराठी रियासत.**—हिंदुस्थानामध्यें पाश्चात्य राष्ट्रांचा प्रवेश मुसलमानी रियासतींत व्यापारमिषानें झाला. मोगलबादशाहीचा अंत व ब्रिटिश राज्याची स्थापना यांमध्यें कालाचें अंतर फारसें नाहीं. ज्याप्रमाणें

प्राचीन काळीं आर्यांच्या सत्तेचा ऱ्हास होण्यास कित्येक शतकें लागलीं, त्याचप्रमाणें मुसलमानी सत्तेचा ऱ्हासही बरेच वर्षे घडून येत होता. एका सत्तेचा नाश व दुसरीचा उदय हे समकालीन असावयाचे खरे; तरी पण ते प्रकार घडतांना जर दुसऱ्या गोष्टी मध्यंतरीं घडल्या असतील, तर इतिहासकारास त्या लपवितां येणार नाहींत. मोगल बादशाहीवर मराठ्यांनीं मारक प्रहार केला, हें पुढें दाखविण्यांत येईलच. ह्या मराठ्यांची सत्ता जरी अल्पकालीन होती, तरी ती प्रत्येक महाराष्ट्रीयास मोठी अभिमानास्पद व वीर्यजनक अशी आहे. अल्प कालांत महाराष्ट्रवीरांनीं ह्या विस्तृत भरतभूमीच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत जे प्रताप गाजविले, ते इतिहासांत चिरस्मरणीय आहेत. त्यांजविषयीं भरंवसेलायक माहिती अजून उपलब्ध होत आहे. म्हणून मोगल बादशाहीच्या ऱ्हासकालीं जीं शेंपन्नास वर्षे गेलीं, त्यांस स्वराष्ट्रेतिहासांत स्वतंत्र स्थळ मिळणें वाजवी आहे. ह्यासच मराठी रियासत असें नांव दिलें आहे.

**४. ब्रिटिश रियासत.**--ब्रिटिश लोक व त्यांजसारखे दुसरे युरोपियन लोक ह्यांची पूर्वस्थिति कशी होती, ते हिंदुस्थानांत केव्हां व कशाकरितां आले, व पुढें त्यांनीं ह्या देशांत आपलें राज्य कोणत्या उपायांनीं स्थापन केलें, वगैरे प्रश्नांचा विचार ब्रिटिश रियासतीच्या भागांत येतो. ब्रिटिश लोकांचे मोठमोठे झगडे त्यांच्या पूर्वगामी मराठ्यांबरोबर झालेले आहेत. म्हणून मराठी सत्तेचा लय म्हणजेच ब्रिटिश सत्तेचा आरंभ असें म्हणण्यास हरकत नाहीं. ही गोष्ट एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं घडून आली. तेव्हांपासून प्रस्तुत काळापर्यंतचा इतिहास ह्या ग्रंथाचा शेवटचा भाग होय. ह्यास ब्रिटिश रिसायत असें नांव दिलें आहे.

**५. चार विभाग**—येणेंप्रमाणें, वरील विवेचनपद्धतीस अनुसरून, हिंदुस्थानच्या इतिहासाचे कालक्रमानुसार भाग होतात, ते असेः—

**भाग पहिला,—प्राचीन इतिहास**, हिंदुस्थानांत आर्यशाखेचा उत्कर्ष व ऱ्हास, इ. स. पूर्वी ५०००–इ. स. नंतर १००० पर्यंत.

**भाग दुसरा,—अर्वाचीन इतिहास, मुसलमानी रियासत;** इसवी सन १०००—१७००, किंवा विशेषेंकरून १७५०पर्यंत. ह्यांपैकीं स.१०००–१५०० पर्यंतच्या काळास मध्ययुग असें नांव देतां येईल.

**भाग तिसरा,—अर्वाचीन इतिहास, मराठी रियासत;** इसवी सन १६६४–१८००, किंवा विशेषेंकरून १८०३ पर्यंत.

**भाग चौथा,—अर्वाचीन इतिहास, ब्रिटिश रियासत;** इसवी सन १८०३ पासून प्रस्तुत कालापर्यंत.

पहिला भाग खेरीजकरून बाकीच्या तीन भागांचें म्हणजे फक्त अर्वाचीन इतिहासाचें विवेचन ह्या ग्रंथांत करावयाचें आहे.

वरील भागवारीवरून हिंदुस्थानांत आजपर्यंत अनेक वेळां राज्यक्रान्ती घडून आल्या आहेत, हें उघड होतें. ह्या राज्यक्रान्ती घडून येण्यास कालावधिही भिन्न प्रमाणानें लागला आहे. ज्ञानवृद्धीच्या योगानें जगांतील राष्ट्रांनीं आपली शक्ति जसजशी वाढविली, तसतसें वरील राज्यक्रान्ती घडविण्याचें काम त्यांस सुलभ झालें. आर्य लोकांची हिंदुस्थानांत चिरस्थायिकता होण्यास हजारों वर्षें लागलीं. उत्तरहिंदुस्थानांतून दक्षिणहिंदुस्थानांत येण्यासच त्यांस हजारों वर्षांचा काल लागला. परंतु मागील अनुभवानें शहाणे झाल्यामुळें, हिंदुस्थानांत प्रवेश करणें मुसलमानांस तितकें कठीण गेलें नाहीं. विंध्य, सातपुडा वगैरे पर्वत शेंकडों वर्षें आर्यांस दुर्गम झाले होते, ते अलाउद्दीनच्या फौजेनें तेव्हांच ओलांडिले. अगदीं अलीकडच्या काळाकडे पाहिलें, तर जो महासागर जगदुत्पत्तीपासून हिंदुस्थानची स्वभावसृष्ट दुर्गम मर्यादा होऊन बसला होता, तोच ह्या प्रतापी ‘ सागरपुत्रांस—’ ब्रिटिश लोकांस—ह्या आर्यभूमींत प्रवेश करून देण्यास कारण झाला. हा प्रभाव ज्ञानाचा होय. मुसलमानांच्या आगमनापर्यंत ही आर्यभूमि स्वभावसृष्ट मर्यादांनीं संरक्षित होती. उत्तर व अर्धी पश्चिम बाजू गगनचुंबित नगराजांनीं अडविलेली आहे. पश्चिमेचें द्वितीयार्ध व सर्व पूर्वभाग हे समुद्रवलयांकित असल्यामुळें, नौकानयनशास्त्राची प्रगति होण्यापूर्वी, दुर्भेद्य होते. वायव्य कोंपऱ्यांत एकच जबरदस्त खिंड आहे. तिचा मार्ग बहुतेक बर्फाच्छादित असतो. ह्याच निरुंद वाटेनें प्राचीन काळापासून नानाविध लोकांच्या झुंडी हिंदुस्थानावर आल्या. परंतु हल्लीं पाश्चात्यांच्या ज्ञानप्रभावामुळें हा देश पृथ्वीवरील सर्व लोकांस सुगम झाला आहे.

वर सांगितलेल्या भागांच्या कालमर्यादा केवळ ठोकळ मानानें दिल्या आहेत. सांगितलेला काल सुरू होण्यापूर्वीं पुष्कळ वर्षेंपर्यंत, राज्यक्रांती घ-

डवून आणण्याचे त्या त्या लोकांचे प्रयत्न चालू होते. म्हणून पुढील इतिहास समजण्याकरितां त्या लोकांच्या आद्येतिहासाकडे पाहणें जरूर पडेल. आपणांस मुसलमानांच्या हकीकतीस सुरुवात करावयाची आहे, त्याअर्थी हे मुसलमान कोण, त्यांचा उदय कसा झाला, इत्यादि आरंभाची हकीकत समजून घेणें अवश्य आहे.

---

## प्रकरण दुसरें.

## मुसलमानी धर्माची स्थापना.

### इ. स. ६३२.

१. मुसलमानांचें महत्त्व. २. महंमद पैगंबर.
३. महंमदानें स्थापिलेला धर्म. ४. कुराण.
५. तावुतांची उत्पत्ति, शिया व सुनी.

१. **मुसलमानांचें महत्त्व.**—इतिहास विषयाला शास्त्रीय स्वरूप अलीकडच्या विद्वान् युरोपियन पंडितांनीं दिलें आहे. यूरोप खंडाला प्रधानत्व देऊनच जगाच्या इतिहासाचा विचार ते करीत असतात. म्हणजे आज युरोपियन लोक भूतलावर प्रबल असल्यामुळें, एकंदर युरोपियन राष्ट्रांची प्रगति आजपावेतों कसकशी होत गेली, ह्या प्रश्नाच्या विचारांतच पृथ्वीवरील इतर राष्ट्रांच्या हालचाली इतिहासकार गोवून घेतात. अर्थात् यूरोपखंड केंद्र समजून त्या सभोंवतीं इतर राष्ट्रांना ते नाचवितात. शास्त्रीय दृष्टीनें हा प्रकार अपरिहार्य आहे. मात्र तो अनिष्ट आहे असें मानण्याचें कारण नाहीं. आजकाल ऐतिहासिक घडामोडींचें उच्चनीच स्वरूप ठरविण्याचें माप युरोपियन प्रगति आहे. ती प्रगति बाजूस ठेवून निराळ्याच दिशेनें ऐतिहासिक विवेचन करणें शक्य नाहीं. अशाच दृष्टीनें मुसलमानांच्या इतिहासाचें आपणांस अवलोकन करावयाचें आहे.

क्रिस्ताच्या पांचव्या शतकांत रोमची पुरातन व बलाढ्य बादशाही मोडून पडली, (स. ४१० ). पुढें तिचीच दुसरी शाखा पूर्वरोमनबादशाही ह्या नांवानें पंधराव्या शतकापर्यंत कान्स्टांटिनोपल येथें हयात होती.

ह्या पूर्वरोमन बादशाहीचे लचके तोडून, अखेरीस तिचा पुरा विध्वंस मुसलमानांनीं केला. ज्याप्रमाणें मुसलमानांनीं हिंदुस्थानांत येऊन हा देश काबीज केला, त्याचप्रमाणें आशिया खंडाचा सर्व पश्चिमभाग व यूरोप-आफ्रिकांचा बराच मोठा भाग त्यांनीं जिंकून तेथें मुसलमानी धर्माची व राज्याची स्थापना केली. एवढी मोठी शक्ति ह्या लोकांच्या अंगीं कशी आली हें कळण्याकरितां त्यांचा पूर्व इतिहास सांगितला पाहिजे.

जगाच्या उलाढालींत मुसलमानांस अनेक कारणांमुळें आजकाल प्रमुखत्व प्राप्त झालें आहे, आणि भावी इतिहासावरही त्याचा परिणाम विशेष होण्याचा संभव आहे. तेव्हां जगाच्या सुधारणेंत व अर्वाचीन प्रगतींत मुसलमानांनीं कोणती भर घातली, आणि ती किती हितकारक किंवा अहितकारक होती, हें ठोकळ मानानें समजून घेणें अत्यंत अवश्य आहे. अशा व्यापक दृष्टीनें विचार करावा तेव्हांच हिंदुस्थानच्या स्थितीवर मुसलमानी अंमलाचे बरेवाईट परिणाम काय झाले हें आपणास मार्मिकपणें ठरवितां येईल; आणि आपल्या मुसलमान बंधूसंबंधीं आपले अनेक मिथ्याग्रह आहेत ते दूर होतील.

आज हिंदुस्थानची एकंदर लोकसंख्या सुमारें तीस कोटी असून, त्यांपैकीं पांच कोटी मुसलमान आहेत. नउशें वर्षांपूर्वीं सिंधुनदीच्या अलीकडे एकही मुसलमान नव्हता, तेथें आज पांच कोटी आहेत. तुर्कस्तानचा सुलतान व इराणचा शहा ह्या दोघांच्या ताब्यांत आजसुद्धां अडीच कोटींहून ज्यास्त मुसलमान नाहींत. म्हणजे त्यांच्या दुप्पट मुसलमानांची वसती एड्वर्ड बादशहाच्या ताब्यांत आहे. पण हे सर्व मुसलमान हिंदुस्थानच्या बाहेरून येथें आले असें मात्र नाहीं. त्यांचा धर्म भिन्न असला तरी ते जवळ जवळ हिंदूंइतकेच एतद्देशीय आहेत. कारण आरंभीं आरंभीं मात्र परदेशांतून बरेच मुसलमान लोक इकडे आले. त्यांजबरोबर बायका तर फारशा आल्याच नाहींत. त्यांनीं येथील हिंदु स्त्रियांशीं लग्नें केलीं, तेव्हां त्यांची संख्या वाढत गेली. तसेंच केव्हां बळजबरीनें तर केव्हां आपखुषीनें पुष्कळ हिंदु लोक मुसलमान झाले. म्हणून आजकालचे येथील मुसलमान एतद्देशीयच म्हटले पाहिजेत.

आरब मुसलमान तर हिंदुस्थानांत फारसे आलेच नाहींत. आरबस्तानांतून ते चारही दिशांकडे भटकत गेले, पण हिंदुस्थानच्या पश्चिमे-

कडील बर्फाळ डोंगर ओलांडण्याची त्यांस छाती झाली नाहीं. सृष्टीचा अडथळा आल्याबरोबर त्यांस थांबावें लागलें. हिंदुस्थानांत मुख्यत्वेंकरून तुर्क व मोगल फार आले. इराणी अखाताच्या कांठांवर राहणारे आरब मात्र पूर्वीपासून व्यापारनिमित्तानें हिंदुस्थानांत येत असत. धर्माच्या अस्सलपणासंबंधानें पाहिलें तर आरब सर्व मुसलमानांत श्रेष्ठ होत.

ह्यावरून हिंदुस्थानांतले मुसलमान भिन्नधर्मी असले, म्हणून ते हिंदुस्थानांत परके नाहींत. जसे एतद्देशीय क्रिस्ती येथें आहेत, तसेच हे मुसलमान होत. हिंदुस्थान ही आपली जन्मभूमि आहे, असें समजण्याचा त्यांस हिंदूंइतकाच हक्क आहे.

**२. महंमद पैगंबर** स. ५७०–६३२.–हिंदुस्थानच्या पश्चिमेस आरबी समुद्रापलीकडे आरबस्तान म्हणून देश आहे. त्याच्या उत्तरेस सिरिया व तुर्कस्तान हे देश आहेत. त्यांस पूर्वीं 'शाम' अशी संज्ञा होती. युरोपांतील तुर्कस्तान हें रूम, व आशियांतील तुर्कस्तान हें शाम, अशीं हीं दोनही एकाच सुलतानाच्या अंमलाखालीं असल्यामुळें, त्या सुलतानास रूमशामचा बादशहा म्हणण्याचा प्रघात असे. ह्या पश्चिम आशिया खंडांत प्राचीन काळीं अनेक राष्ट्रें उदयास येऊन लय पावलीं. त्यांस सेमेटिक राष्ट्रें असें म्हणतात. ह्या सेमेटिक राष्ट्रांतच आरबांचा समावेश होतो. उत्तरेस सिरिया वगैरे प्रांतांत फिनिशियन व हिब्रू हे लोक प्राचीन काळीं उदय पावले, तसेच दक्षिणेस आरबस्तानांत आरब लोक पुढें उदयास आले. आरबस्तानच्या वालुकामय ओसाड प्रदेशांत हे आरब धनगरी पेशानें राहत असत. युरोपांत त्यांस 'सारासिन्स्' म्हणजे 'ओसाड प्रदेशाची संतति' ह्या नांवानें ओळखितात. आफ्रिकेचा उत्तरभाग व स्पेनदेश त्यांनीं जिंकला, तेथें त्यांस 'मूर' हें नांव मिळालें. मूळ आरबस्तानांत हे लोक मूर्तिपूजक होते. त्यांचें मुख्य मंदिर काबा नांवाचें असून तें मक्का येथें होतें. तें फार पुरातन असून त्यांत तीनशें साठ मूर्ति होत्या. आरबस्तानच्या सर्व भागांतून लोक ह्या काबाच्या दर्शनास येत असत.

मूर्तिपूजकांशिवाय दुसऱ्या पंथांचेही पुष्कळ लोक आरबस्तानांत होते. हिब्रू उर्फ ज्यू लोक पूर्वीं उत्तरेस सिरिया देशांत होते, तेथें रोमन लोकांनीं त्यांचा छळ केल्यामुळें ते दक्षिणेस आरबस्तानांत येऊन राहिले. देव एक आहे, ही कल्पना आरंभीं ह्या ज्यू लोकांनीं आरबांना शिक-

विली. पुष्कळ आरब क्रिस्ती झालेले होते, त्यांनींही क्रिस्ताची माहिती आपल्या देशबंधूंस दिली. ह्या कारणास्तव महंमदाचा धर्म म्हणजे क्रिस्त-धर्माची किंवा यहुदी धर्माची नवीन आवृत्ति असें म्हणतात. इतकें खरें कीं, महंमद नवीन धर्म शिकवूं लागला, तेव्हां आरब लोकांच्या धर्मविचारांत मोठी खळबळ उडून गेली होती, आणि मूर्तिपूजेचा प्राचीन प्रचार सुटून धर्माच्या नवीन उदात्त कल्पना लोकांच्या मनांत घोळूं लागल्या होत्या.

आरब लोकांत अनेक जाति होत्या. त्यांपैकीं खुरेश जातीच्या मंडळीकडे कावाच्या मंदिराची देखरेख होती. ह्याच जातींत मक्का शहरीं इ. स. ५७० ह्या वर्षी मुसलमान धर्माचा संस्थापक **महंमद पैगंबर** जन्मला. त्याची आई लहानपणीं वारल्यामुळें त्याचें संगोपन चुलता अबू तालिब ह्यानें केलें. तो मेंढ्या राखीत असे. पण मोठा झाल्यावर उंटांची कारवानें घेऊन तो व्यापार करूं लागला. त्याचें मन लहानपणापासून ईश्वरभक्तींत निमग्न असे. तो ध्यान, भजन, उपवास वगैरे पुष्कळ करी. पंचवीस वर्षांचा असतां तो एका व्यापारी कारखानाबरोबर सिरिया प्रांतांत गेला, तेव्हां तेथें त्यास येशूक्रिस्ताविषयीं कांहीं माहिती मिळाली. क्रिस्तांच्या देवत्रयीचा महंमदास अचंबा वाटून देव एकच आहे अशी त्याच्या मनाची प्रवृत्ति झाली. मक्केस परत आल्यावर त्यानें आपल्या वयाच्या २८ वे वर्षी खदीजा नामक एका विधवेशीं लग्न केलें. खदीजा त्याजपेक्षां पंधरा वर्षांनीं मोठी होती. त्याच्या डोक्यांत धर्मकल्पना एकसारख्या घोळत होत्या. त्यास पुढें एकदां साक्षात्कार झाला, कीं 'ईश्वराचा खरा धर्म लोकांत प्रसिद्ध करण्यासाठीं तुला नेमिलें आहे.' त्याप्रमाणें तो लोकांस उपदेश करूं लागला. बायको, चुलतभाऊ व जांवई हे महंमदाचे प्रथम शिष्य झाले. महंमदाचीं मतें मूर्तिपूजेच्या विरुद्ध होतीं. म्हणून कावाचे रक्षक जे खुरेष जातीचे लोक त्यांनीं महंमदाचा छळ सुरू केला. त्याच्या ५० वे वर्षी त्याची बायको खदीजा मरण पावली. तेव्हांपासून तर मक्केंत राहणें त्यास दुःसह झालें. म्हणून तो तें शहर सोडून उत्तरेस सुमारें अडीचशें मैलांवर मदीना नामक शहरीं जाऊन राहिला. जाण्यापूर्वी कित्येक लोकांनीं त्यास ठार मारण्याचा बेत केला होता. मारेकऱ्यांस चुकवून तो एका डोंगराच्या गुहेंत लपून बसला. मारेकरी निघून गेल्यावर तो मदिनेस पळून गेला. ही गोष्ट इ.

सन ६२२ त घडली. ह्या काळास हिजरा म्हणजे पळ असें म्हणतात. ह्या पळावरूनच महंमदानें चालू केलेल्या शकास 'हिजरी सन' ही संज्ञा आहे, व ह्याच वेळेपासून तो मोजला जातो. पुढें मक्केंतील अबूबकर म्हणून एक इभ्रतीचा गृहस्थ महंमदाचा अनुयायी झाला होता, त्याच्या आयेषा नामक मुलीशीं महंमदानें लग्न लाविलें. हिच्याशिवाय आणखी पुष्कळ बायका महंमदास होत्या; पण आयेषा हीच त्याची अखेरपर्यंत आवडती बायको होती.

मदीना शहर ह्या वेळीं अगदीं रानटी स्थितींत होतें. सर्वत्र बेबंदशाही माजून राहिली होती. ती बंद करण्याकरितां महंमदानें नवीन कायदे ठरविले, आणि त्याप्रमाणें लोकांच्या हरएक तंट्यांचा तो निकाल करूं लागला. पुढें जी आरब बादशाही स्थापन झाली, तिचा हा उगम होय. महंमद मक्केस फक्त धर्मोपदेशाचें काम करीत होता, पण मदीना येथें त्यानें राजाचें काम सुरू केलें. हा जो फेरफार त्यानें मदीना येथें केला, तो ध्यानांत ठेविला म्हणजे मुसलमानांचे पुढील उद्योग स्पष्टपणें कळून येतात.

मदीनेस पळून गेला तेव्हां महंमदाचें वय ५३ वर्षांचें होतें. तेथें त्याचें काम मोठ्या झपाट्यानें चाललें. पुष्कळ लोक त्याचे अनुयायी झाले. महंमदानें मदीना येथें एक मोठी मशीद बांधिली, तीस 'मशिद-उल्नबी' असें नांव आहे. ह्याच मशीदींत पुढें महंमदास पुरिलें.

महंमदाच्याच 'खुरेष' जातीच्या लोकांनीं त्याच्या धर्माचा अत्यंत छळ मांडिला,त्यामुळें त्याचे शिष्यांस त्रास पडूं लागला.म्हणून महंमदानें एक विलक्षण युक्ति योजिली. आजपर्यंत लोकांस उपदेश करण्याचें काम त्यानें शांतपणानें केलें होतें. धर्मस्थापनेच्या पलीकडे त्याची कांहींच इच्छा नव्हती. लोक छळ करूं लागले, त्यांचा प्रतीकार करण्यासाठीं त्यानें असा एक ईश्वराचा हुकूम प्रसिद्ध केला, कीं ' आजपर्यंत शांततेनें व नम्रतेनें धर्मोपदेश करण्यांत आला; पण लोक दुराग्रही फार, पूर्वीच्या पैगंबरांनीं धर्मोपदेश बहुत केला, तरी लोकांनीं त्यांचें ऐकिलें नाहीं. तर यापुढें मी सांगतों हा धर्म जे ऐकणार नाहींत, त्यांस तरवारीनें जिंकावें; लढाईंत यश आल्यास, शत्रूंची दौलत आपणांस मिळेल; व मृत्यु आल्यास,

महत्पुण्य लागून स्वर्गाचा दरवाजा आपणांस खुला होईल*." ह्या उपदेशाच्या योगानें महंमदाच्या अनुयायांचा शांततेचा धार्मिक बाणा सुटून, त्यांच्यांत लष्करी बाणा येत चालला. त्यांचें लष्कर जमलें, धर्मप्रसाराकरितां मोठमोठीं तुंबल युद्धें होऊन महंमदास फत्ते मिळूं लागली. लढाईत मिळालेली लूट सर्वांनीं सारखी वांटून घ्यावी, असा एक ईश्वरी हुकूम महंमदानें प्रसिद्ध केला. नंतर मदिनेंतून शेजारच्या प्रांतावर हल्ले करण्यास महंमद फौजा पाठवूं लागला. लुटीचा पैसा मिळून ह्या नवीन पंथाच्या लोकांत धर्मप्रसाराचें नवीन वारें शिरलें; आणि धर्माच्या नांवावर एक प्रकारचें नवीन राज्य स्थापन होऊन महंमद धर्मोपदेशक असतांही त्याचा अधिकार राजाप्रमाणें चालूं लागला. इराणचा बादशहा दुसरा खुस्रू, इस्तंबूल येथें राहणारा रूमचा बादशहा हिराक्लिटस व मिसर देशाचा राजा ह्या सर्वांकडे महंमदानें आपले वकील धर्म स्वीकारण्यासाठीं पत्रें देऊन रवाना केले. दोघांनीं त्याचे पत्राचा आदर केला, पण खुस्रूनें पत्र फाडून टाकिलें. तें महंमदास कळलें, तेव्हां तो म्हणाला, 'ह्या गर्विष्ठ बादशहानें जसे माझ्या पत्राचे तुकडे केले, तसेच आमचे धर्माभिमानी शूर अनुयायी त्याच्या राज्याचे फाडून तुकडे करतील.' नंतर एक मोठें लष्कर तयार करून त्यानें मक्का शहर काबीज केलें, व काबाच्या देवळांतील सर्व मूर्ती जमीनदोस्त करून तेथें नवीन धर्माची प्रार्थना सुरू केली. त्या वेळेपासून काबा हें मुसलमानांचें प्रार्थनामंदिर व सर्व जगांतील मुसलमान यात्रेकरूंचें पवित्र स्थान झालें.

मक्काचा पाडाव झाल्याबरोबर महंमदाचा जम चांगला बसला. सर्व जातींचे आरब त्यास भजूं लागले, आणि हा पैगंबर आहे असें कबूल करूं लागले. त्यास सभोंवारच्या सर्व प्रमुखांकडून करभार आला. अशा रीतीनें महंमदाच्या हाताखालीं आरबांचें एक राष्ट्र झालें, आणि पुढें अनेक पराक्रम करण्याची त्यांस शक्ति आली. अंदाधुंदीच्या विसकळीत लोकस्थितींत ऐक्याचा एवढा जोम इतक्या त्वरेनें उत्पन्न झाल्याचें दुसरें उदाहरण इतिहासांत आढळत नाहीं.

---

* याच मासल्याचें भगवद्गीतेंत वाक्य आहे,—"हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम्."

पुढें कांहीं दिवसांनीं आशिया खंडांतील रोमन बादशाहीच्या मुलखावर स्वाऱ्या करून त्यानें अनेक प्रांत काबीज केले. अशाच एका स्वारींत त्याची प्रकृति बिघडली व आपण मरणार असें त्यास वाटलें. त्या प्रसंगीं त्यानें सर्व मुसलमानांस जवळ बोलावून चांगला उपदेश केला, व पुढें तुम्ही मोठ्या पदास चढाल असें भविष्य सांगितलें. जवळचा सर्व खजिना त्यानें गोरगरीबांस वांटून दिला, व गुलामांस बंधमुक्त केलें. आरबस्तानांत एकही मूर्तिपूजक राहूं देऊं नये अशी शिष्यांस ताकीद देऊन, हा महंमद पैगंबर, मुसलमानांचा पहिला बादशहा, आयेषा बिबीच्या महालांत, तिच्या मांडीवर डोकें ठेवून, सन ६३२ त शुक्रवारीं मरण पावला. त्याचें प्रेत तीन दिवस लोकांस पाहण्यास ठेवून नंतर मदीना येथें पुरिलें. त्याची आवडती बायको आयेषा त्याच्या पाठीमागून ४७ वर्षें जिवंत होती. हा पुरुष महाबुद्धिमान्, शूर, बळकट, शांत, कधींही न डगमगणारा, व अत्यंत साधा असा होता. दागिने व रेशमी कपडे वापरण्यास त्याची सक्त मनाई असे. त्यास अनेक स्त्रिया होत्या, कोणी म्हणतात ९, कोणी म्हणतात १५. त्याची ईश्वरभक्ति निस्सीम होती. तो न्यायांत निष्टुर होता, तरी उदार व दयाळू असे. धर्मस्थापना करितांना त्यास अनेक संकटें भोगावीं लागलीं.

**३. महंमदानें स्थापिलेला धर्म.**—महंमदाचा उपदेश सुरू होण्यापूर्वीं रूमचे बादशहानें क्रिस्ती धर्म स्वीकारिला होता. तथापि त्या धर्मांतही अनेक पंथ निघून त्यांत व जुन्या यहुदी धर्मांत नानाप्रकारचा घोटाळा उत्पन्न झाला होता. (१) अशा प्रसंगीं हे तंटे मोडून त्यांस ऐक्याचें स्वरूप आणण्यास महंमदासारख्या पुरुषाची जरूर होती. (२) ईश्वराच्या कार्यार्थ जय मिळवावा, नाहीं तर त्याची थोरवी स्थापन करण्यांत प्राण खर्चीं घालावे, ह्या उदात्त उपदेशानें महंमदाच्या अनुयायांस प्रोत्साहन मिळालें. (३) राज्यपद प्राप्तीची आशा, लुटीचा लोभ, कीर्तीची आकांक्षा, स्वर्गसुखाची अपेक्षा, ह्या गोष्टी वरील प्रोत्साहनरूपी अग्नीस घृतवत् झाल्या. (४)आसपासच्या लोकांची धार्मिक व राजकीय स्थिति असावी तशी नसल्यामुळें ह्या आरब वीरांस आपले मनोरथ सहज सिद्धीस नेतां आले. ह्या कारणांस्तव महंमदाचे प्रयत्न सफळ होत चालले. तो लोकांस म्हणे, कीं "मी कांहीं नवीन धर्म तुम्हांस सांगत नाहीं. ईश्वराचा जो खरा धर्म मूळ-

पासून चालू आहे, त्यांत अनेकांनीं आपलीं मतें घुसडून तो बिघडविला आहे. तर इब्राहीम, इस्माईल, इझाक, याकूब, मुसा, व इसा (येशु)* यांनीं ज्या खऱ्या धर्माची पूर्वी स्थापना केली, त्या धर्माचाच मी जीर्णोद्धार करीत आहें. हें काम मी ईश्वर प्रेरणेनें करितों. ईश्वरप्रणीत ग्रंथ त्याचे दूत मला आणून देतात, तो त्याच्या आज्ञेनें मी प्रसिद्ध करीत आहें.' ह्या प्रमाणें 'कुराण' नांवाचा ग्रंथ ईश्वरानें आपणास दिला असें सांगून तो त्यानें लोकांत प्रसिद्ध केला. मुसलमान धर्म स्वीकारितांना खालील मंत्राचा उपयोग करण्यांत येतोः—' लाइलाह् इल्लाल्लाह्, महंमदुर्रसूलुल्लाह, ' म्हणजे ' ईश्वर एकच आहे आणि त्याचा प्रेषित महंमद आहे.' मुसलमानी धर्माचीं मुख्य तत्त्वें अशीं आहेतः—

( १ ) मनुष्यास पुनर्जन्म नाहीं.

( २ ) ईश्वर एक आहे; त्यावांचून दुसरा देव नाहीं.

( ३ ) पापपुण्याचें फळ ईश्वर सर्वांस देतो. माणसें मरतात त्या सर्वांचे जीव तूर्त पडून राहतात, व जगाची राहटी संपेल, तेव्हां ईश्वर एकदांच बसून सर्व मृतांचा न्याय करून, त्यांच्या पापपुण्यांशाप्रमाणें त्यांस नरक अगर स्वर्गवास देतो.

( ४ ) ह्या धर्माचें नांव इस्लाम म्हणजे ' तारणमार्ग ' असें आहे; त्याच्या अनुयायांस मुसलमान असें म्हणतात.

गरिबांस भिक्षादान, न्यायाचें व उदारपणाचें वर्तन, सर्व लोकांचा समान बंधुभाव, दुसऱ्याचें घेतलेलें कर्ज परत देणें, कपट न करणें, सत्य भाषण, सचोटीनें व्यापार करणें, गरिबांस उपद्रव न देणें, मद्यपाननिषेध, इत्यादि गोष्टींबद्दल कुराणांत सक्त ताकिदी आहेत. मूर्तिपूजेविषयीं निक्षून मनाई आहे. मक्केस यात्रा करण्याची पूर्वीची चाल कुराणांत कायम ठेविली आहे. हातपाय धुऊन जमिनीवर डोकें टेकून दररोज पांच वेळ परमेश्व-

---

* हिंदु व मुसलमान यांजमध्यें जसा विरोध आहे, तसा क्रिस्ती व मुसलमान यांजमध्यें नाहीं. यहुदी लोकांत मानिलेले हे वरील पैगंबर मुसलमानांसही कबूल आहेत. क्रिस्ती लोक महंमदास मात्र कबूल करीत नाहींत. क्रिस्ताचे अनुयायांनीं क्रिस्तास ईश्वराचा पुत्र ठरविलें व तीन देव मानिले, ही गोष्ट मुसलमानांस संमत नाहीं. हा ह्या दोन धर्मांतील मुख्य विरोध आहे.

राची प्रार्थना करावी असें टरविलेलें आहे. कुरणांतील अध्याय निरनिराळ्या वेळीं प्रसिद्ध झालेले अबूबकर ह्यानें एके ठिकाणीं केले. ह्या मुसलमानांच्या धर्मशास्त्रांत दोन प्रकरणें आहेत, एक इमाम व दुसरें दीन. पहिल्या प्रकरणांत सहा भाग आहेत, त्यांत वर दिलेल्या प्रकारचीं सहा धर्मतत्त्वें सांगितलीं आहेत. दुसऱ्यांत बहुतेक आचारमार्ग म्हणजे मुसलमान लोकांनीं कोणकोणत्या गोष्टी कराव्या, हें सांगितलें आहे. ईश्वर लोकांस धर्मोपदेश करण्यास मनुष्याची योजना करितो, त्यास पैगंबर असें म्हणतात. ह्याशिवाय कित्येक फिरस्ते ईश्वरदूत आहेत. ह्या दूतांत मिकाईल हा युद्धांत मदत करितो; अजराईल हा यमासारखा लोकांस दंड करितो; व अजाजिल हा देवाच्या शापानें सैतान होऊन लोकांस पापबुद्धि शिकवितो. सुंता करण्याची चाल यहुदी लोकांतून मुसलमानांनीं घेतली. कुराणांत सहा पैगंबरांचीं नांवें आहेत, ते हे:—आदम, नोहा, इब्राहीम, मूसा, ईसा, व महंमद. जंनत म्हणजे स्वर्ग व जहंनम् म्हणजे नरक हे मनुष्यांस कायमचे मिळतात, असें मुसलमान लोक मानितात. ह्या तत्त्वांविषयीं अनेक वादविवाद झालेले आहेत. तसेंच दैववादही त्यांस संमत आहे.

४. **कुराण.**—कुराणाचे सिपारे ( भाग ) ३० आहेत व ११४ सुरे ( अध्याय ) आहेत. हें पुस्तक उत्तम आरबी भाषेंत लिहिलेलें आहे. सुमारें ६००० श्लोक होतील इतकें तें मोठें आहे. त्यांत ७७६३९ शब्द व ३२३०१५ वर्ण आहेत. दारू, भांग, अफू वगैरे मादक पदार्थांचें सेवन व त्याचप्रमाणें जुगार व ज्योतिषावरून मुहूर्त व शकून पाहणें ह्या गोष्टी वर्ज्य म्हणून सांगितलेल्या आहेत. डुक्कर व मूर्तीस नैवेद्य दाखविलेलें अन्न हीं अभक्ष्य मानिलीं आहेत. महंमदाचे पूर्वी मुली लहान असतां त्यांस जिवंत पुरून टाकण्याची वहिवाट होती. कारण बायकांचे योगानें खर्च वाढून कुटुंबाची अब्रू जाते असें लोक समजत. अशा प्रकारें मुलींस मारल्यामुळें बायकांची संख्या कमी होई. ह्याकरितां पुष्कळ बंधूंत मिळून एकच बायको समाईक असे. ह्या दोन वाईट चाली व व्यभिचार ह्यांची महंमदानें सक्त बंदी केली, आणि असें करितांना एका पुरुषास पुष्कळ बायका करण्याची मोकळीक ठेविली. तरी एकानें चार पेक्षां ज्यास्त बायका करूं नयेत असा त्यानें निर्बंध ठरविला होता. कुराणांत व्यभिचारिणीस देहान्ताची शिक्षा व

व्यभिचारी पुरुषास फटक्यांची शिक्षा ठरविलेली आहे. लढाई व लूट ह्मं-विषयीं पुष्कळ नियम आहेत. मोहरम, रज्जब, जिल्काद, व जिल्हेज, हे चार पवित्र महिने गणिले आहेत. रम्जान हा उपवासाचा महिना आहे. कुराणाचे अर्थाविषयीं वाद पडून त्याच्या चार शाखा, व मुसलमानांचे सुनी व शिया असे दोन पंथ झाले. आरबांचे राज्यांत ग्रंथकारांस मोठें उत्तेजन मिळत असे, म्हणून त्या काळीं मोठमोठे पंडित उदयास आले. मुसलमान धर्माच्या मुख्य आचार्यास 'इमाम' असें म्हणतात, आणि पैगंबराच्या गादीवर जे पुरुष बसले त्यांस 'खलीफा' ह्म० अनुयायी असें म्हणतात. लष्करांतील मोठमोठे सरदारांस सरदार उह्ममोमिनीन् असें म्हणतात.

मुख्य कुराणाशिवाय महंमदाचीं भाषणें, त्याचीं कृत्यें, त्यानें ठरविलेले आचार व दिलेले निकाल, इत्यादि विषय महंमदाच्या मृत्यूनंतर शंभर वर्षांनीं एकत्र करण्यांत आले, त्यांस 'सुन्ना' असें म्हणतात. कुराणा-इतकीच ह्या सुन्नांची योग्यता असून त्यांचा इस्लामास मोठा आधार आहे. महंमदाच्या पश्चात् प्रथम तीन खलीफा होऊन पुढें त्याचा जांवई अली हा चवथा खलीफा झाला. त्याच्या मृत्यूनंतर खिलाफतीविषयीं तंटे लागले.

**५. ताबुतांची उत्पत्ति, शिया व सुनी.**—सहावा खलीफा मुआविया फार पराक्रमी पुरुष होता. त्यानें अलीचे मुलगे हसन व हुसेन ह्यांचा व त्याच्या विस्तृत वंशाचा क्रूरपणें नाश केला. पैगंबराच्या वंशाची ही मोठी क्रूर कत्तल मुसलमान लोक अद्यापि ताबुतांत दाखवितात. ताबुतांचा प्रचार हिंदुस्थानांत सार्वत्रिक असल्यामुळें, तो कसा उत्पन्न झाला त्याची मूळ हकीकत देणें जरूर आहे.

मुआवियाचा मुलगा यजीद ह्यानें हसनास विषप्रयोग करून ठार मारिलें (सन ६६९); आणि तो हुसेन ह्यास आग्रह करूं लागला, कीं मी (यजीद) खलीफा आहें अशी शपथपूर्वक कबुली दे. ती शपथ हुसेन घेईना. म्हणून यजीदनें त्याजवर फौज पाठविली. सकाळीं लढाईस प्रारंभ झाला. एका मागून एक हुसेनाचे सर्व सोबती तीर लागून मरून पडले. त्यांत सतरा जण तर फातिमाच्या औरस वंशांतील होते. हुसेनाचीं लहान लहान मुलेंही तीरांच्या जखमांनीं मेलीं. शेवटीं हुसेनही चौतीस जखमा लागून पडला. त्याचे अंगावर एकंदर

तीस तीर होते. ह्या कत्तलींतून हुसेनाची बहीण झैनाब, व अली आणि उमर असे दोन मुलगे इतकीं मात्र वांचलीं. हा लढाईचा प्रकार ताबुतांत मुसलमान लोक दाखवितात. शिया म्हणून पुढें मुसलमानांचा एक पंथ निघाला. ह्या पंथाचे लोक ह्या पैगंबराच्या वंशास भजतात. ते म्हणतात, पैगंबरानंतर जे तीन खलीफा झाले ते बरोबर नाहींत, कारण त्यांचा पैगंबराशीं शरीर-संबंध पोंचत नाहीं. परंतु त्यांचे प्रतिपक्षी सुनी असें म्हणतात, कीं मदीना येथील धर्मसभेनें निवडले असल्यामुळें सर्व खलीफा योग्य आहेत. हेच कलह पुढें माजले. ह्याप्रमाणें जरी निराळे पंथ झाले, तरी ताबुतांची चाल आरबस्तानांत नाहीं. ती फक्त हिंदुस्थानांतच आहे. तिचें कारण असें झालें, कीं मोगल बादशहा बाबर शियापंथी असून त्याचा असा नियम असे, कीं इराणांत करबेला येथें हुसेनाची कत्तल झाली होती, त्या ठिकाणी दरसाल जाऊन हुसेनाच्या कबरीचें दर्शन घ्यावयाचें. पुढें हिंदुस्थानांत आल्यावर राज्यकारभार सोडून बाबरास इतक्या लांब जातां येईना, तेव्हां मौलवी लोकांनीं कुराणांतील वचन काढून त्या धोरणावर त्यास सांगितलें, कीं 'करबेला येथें जी हुसेनाची कबर आहे, तिची प्रतिमा करून तिचें दर्शन तुम्ही घेत जा. पैगंबरालाही मक्केंतून पळाल्यावर अशी प्रतिमा करावी लागली होती.' ती गोष्ट बाबरानें मान्य करून त्यानें दहा दिवस हुसेनाच्या मरणाचा समारंभ करण्याचें सुरू केलें. बादशहानें हा प्रघात घातल्यामुळें तो सर्व सरदारांनीं व देशभर पसरलेल्या इतर सर्व मुसलमानांनीं उचलिला, तोच हल्लीं चालू आहे. हा प्रकार कालांतरानें फारच वाढून अनेक हिंदु लोक सुद्धां ताबूत करूं लागले. ईश्वराची प्रतिमा करून तिची पूजा करणें हें मुसलमानधर्मांत मोठें पाप गणलें असल्यामुळें, कितीएक जाणते मुसलमान आहेत ते ताबूत करीत नाहींत. ताबुतांचा प्रचार इतका वाढला आहे, कीं ठिकठिकाणीं भजन, पूजन चालून हिंदु लोकांच्या अनुकरणानें, त्यांस देवस्थानांचें महत्त्व आलें आहे. कित्येक पीरांस तर हिंदूंच्या देवांचीं नांवेंही मिळालीं आहेत. नगरचे पीरास विठोबा म्हणतात. अहंमदाबादेस मलीकसाहन याच्या कबरेस नरसोबा म्हणतात. शिंदे, होळकर, गायकवाड, हे पीरांचे भक्त होते. बाबामलंग म्हणून कल्याणाजवळ मलंगगड किल्ल्यांत एक पीर आहे. त्याचे मुजावर म्हणजे झाडलोट करणारे कल्याणचे केतकर हे चित्तपावन

ब्राह्मण आहेत. अशा पीरांजवळ व इतर ठिकाणीं ज्या जत्रा भरतात, त्यांस उरूस असें म्हणतात. अनेक हिंदु लोक मुसलमानांच्या पीरांस नवस करितात. मुसलमानांच्या कार्किर्दींत आपल्या अनेक जुन्या हिंदु शहरांचीं नांवें बदलून त्यांस मुसलमानी नांवें मिळालीं. उदाहरणार्थ;—प्रयाग—अलाहाबाद; भागानगर—हैद्राबाद; नाशीक—गुल्छनाबाद; रायगड–इस्लामगड; अवंती–अकबराबाद; धारानगरी–अहंमदाबाद; चंपावती–बऱ्हाणपूर; अनहिलपूर–अजिमाबाद (पट्टण); नागरकोट–फैजाबाद इ.

हिंदुलोकांशीं निकट संबंध आल्यामुळें व अनेक मुसलमान मूळचे बाटलेले हिंदु असल्यामुळें, त्यांचा आरंभींचा कडवा धर्मद्वेष शिथिल पडला, व अनेक बाबतींत ते हिंदूंचें अनुकरण करूं लागले. महाराष्ट्र-संतमंडळांत मुसलमान आहेत. कित्येक मुसलमान मांस खात नाहींत. सय्यदांचे वगैरे वंशांत कन्येचा पुनर्विवाह करीत नाहींत. शिवाय कित्येक ठिकाणीं त्यांमध्यें हिंदु लोकांसारख्याच जाति झाल्या आहेत. तांबोळी, नट, कुंजडे, महात, सारवान, नालबंद, तांबट, कागदी, दर्जी इत्यादि अनेक जातिभेद मुसलमानांत उत्पन्न होऊन ते आपापल्या जातींत मात्र बेटीव्यवहार करितात. मुसलमान हे महारांचे पाणवठ्यावर पाणी भरींत नाहींत. कित्येक ठिकाणीं त्यांच्या बायका हिंदूंसारख्या लुगडीं चोळ्या नेसतात, व पुरुष धोतरें व पागोटीं वापरितात. ठिकठिकाणीं त्यांच्या फकिरांचे मोठमोठे जमाव आहेत, त्यांपैकीं कोणीं भगवीं वस्त्रें नेसतात, व भस्म लावितात. कित्येक ठिकाणीं असे फकीर ब्रह्मचर्य पाळितात; तरी खरें म्हटलें असतां मुसलमानांत जातिभेद नाहीं. शिया व सुनी हे मूळचे दोन पंथ असून आरंभींचे हिंदुस्थानांत आलेले बहुतेक मुसलमान सुनी पंथाचे होते. सुफी म्हणून एक पंथ आहे, त्यांतील लोक साधुवृत्तीनें राहतात. वाहबी म्हणून नवीन पंथ निघाला असून त्यांतील लोक कडवे आहेत. असे पंथ पुष्कळ आहेत. शिवाय सय्यद, शेख, पठाण वगैरे निरनिराळे भेदही मुसलमानांत आहेत. पैगंबराचे वंशापासून झालेल्या मुसलमानांस सय्यद असें म्हणतात. अफगाण व तुर्क ह्यांना पठाण म्हणतात.

---

२–७९१–२०००

# प्रकरण तिसरें.

## आरबी खिलाफत.

इ. स. ६३२–१२५८.

१. मदीनाची लोकसत्ताक खिलाफत. २. जिझिया कर.
३. मुसलमानांचे अजब पराक्रम. ४. स्पेनचा पाडाव.
५. बगदादचे आब्बासी खलीफा. ६. फातिमईद वंश.
७. खिलाफतीचा ऱ्हास. ८. आरेबियन नाइट्स्चे नायक.
९. जगाच्या संस्कृतींत आरबांचें कार्य.

**१. मदीनाची लोकसत्ताक खिलाफत.**—मुसलमानांचा धर्म एक आहे, तरी सर्वांची जात किंवा कुळी एक नाहीं. म्हणून महंमदाचे मृत्यूनंतर मुसलमानांचा फैलाव कसकसा होत गेला हें समजणें जरूर आहे. अल्प काळांतच त्यांनीं आपला धर्म व राज्य पूर्वेस सिंधुनदीपासून पश्चिमेस अटलांटिक महासागरापर्यंत वाढविलें, आणि नाना जातींचे लोक आपल्या धर्मांत आणिले. मुसलमानांच्या ह्या पराक्रमांनीं जगाच्या इतिहासाचा ओघ संपूर्णपणें बदलून गेला. त्यांचा हिंदुस्थानच्या इतिहासाशीं जरी फारसा संबंध नाहीं, तरी जगाच्या संस्कृतींत मुसलमानांनीं भर घातली कीं तिचें नुकसान केलें, ह्या मुद्याचा विचार केल्याशिवाय हिंदुस्थानांतील मुसलमानांच्या इतिहासाचें रहस्य आपणांस चांगलेंसें कळणार नाहीं. प्रस्तुत प्रसंगींही मुसलमानांच्या हालचालींकडे सर्वांचें लक्ष विशेष वेधलें असल्यामुळें, महंमद पैगंबराच्या पश्चात् मुसलमानांचा जोर कसा वाढत गेला, ह्या प्रश्नाचा सूक्ष्म विचार करणें अवश्य आहे. हा विचार करितांना मुसलमानांचे मोठमोठे राजवंश कोणते झाले; आणि मध्यआशियांतील रानटी व धनगरी पेशाचे लोक मुसलमानांच्या संघांत कसे सामील झाले, हेंही पाहवें लागेल. ह्या कामीं खालील मुख्य कालखंड हें प्रकरण समजण्यास उपयोगी पडतील:—

१. महंमद पैगंबर, इ. स. ५७०—६३२, राजधानी मक्का.
२. आरब रिपब्लिक, (लोकसत्ताक राज्य), स. ६३२—६६१, मदीना.
३. उमईद वंश, इ. स. ६६१—७५०, राजधानी डमास्कस.
४. आब्बासी वंश, इ. स. ७५०—१२५८, राजधानी बगदाद.
५. स्पेनचा उमईद वंश, इ. स. ७५६—१०३१, राजधानी कोर्डोव्हा.
६. फातिमईद वंश, इ. स. ९०९—११७१, महदीया आफ्रिका.
७. इजिप्टचा आब्बासी वंश, स. १२४२—१४७९, राजधानी कैरो.

ह्यांशिवाय अवांतर वंश झाले, त्यांचा उल्लेख पुढें येईल. महंमदानें ठरविल्याप्रमाणें मदीना येथें खालील चार खलीफा एकामागून एक लोकांनीं निवडिले: खलीफ अबूबक्र ( स. ६३२—६३४ ); खलीफ उमर ( ६३४—६४४ ); खलीफ उस्मान ( ६४४—६५६ ); खलीफ अली ( स. ६५६—६६१ ).

ह्या चार खलीफांच्या कार्किर्दीस आरबांचें लोकसत्ताक राज्य म्हणतात. त्यांच्या वेळेस मुसलमानी धर्माचा प्रसार फार जारीनें झाला. दुसऱ्या कोणत्याही धर्माचा प्रसार इतका जलद झाला नाहीं. महंमदासारखा आवेशी उपदेशक प्राप्त झाल्याबरोबर आरब लोकांचा अडाणीपणा व आळस नाहींसा होऊन, त्यांजमध्यें ऐक्य व उत्साह उत्पन्न झाला. म्हणूनच महंमदाची गणना थोर पुरुषांत होत आहे. आरबांच्या फौजा प्रथम सिरिया देशावर महापुराप्रमाणें लोटत आल्या. मातबर शहरें त्यांनीं लुटून फस्त केलीं, व असंख्य लोकांस गुलाम करून नेलें. त्यांजपुढें सिरियांतील कवाइती रोमन फौजांचा कांहीं इलाज चालला नाहीं. पर्शियन लोकांचीही धूळधाण उडाली. आरब लोकांस हे सुधारलेले परकी लोक रानटी समजत व महंमदास तुच्छ लेखीत. पण ह्याच रानटी लोकांनीं अखेरीस सुधारलेल्या राष्ट्रांचा पाडाव केला. अबुबक्र, उमर, उस्मान व अली हे चार महंमदाचे सरदार होते. हे चार व महंमद पैगंबर मिळून मुसलमानांचें पंचायतन झालें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. पहिले दोघे महंमदाचे सासरे व दुसरे दोघे जांवई होते. महंमद मरण पावल्यावर त्याच्या शिष्यांनीं मदीना येथें एक सभा भरविली व सर्वानुमतें सर्वांत वृद्ध अबूबक्र ह्यास खलीफा नेमिलें. अबूबक्र

हा दीलदार पुरुष होता. त्याचा शूर सरदार खालेद ह्यानें त्या वेळचें धनवान शहर डमास्कस हें काबीज केलें. अबूबक्र पुष्कळ वृद्ध होता, व त्याचा कारभारही लवकर आटोपला.

आपले पश्चात् उमरास खिलाफत द्यावी, असें अबूबक्रनें मरणसमयीं ठरविलें होतें. उमरही फार चतुर होता. त्यानें सन ६३४ त सिरिया देश जिंकून जरुसलेम शहर काबीज केलें. ह्या शहरीं येशू क्रिस्ताचा अस्सल क्रूस होता, तो जरुसलेमचा पाडाव झाल्यावर रोमन बादशहा हिराक्लियस ह्यानें मोठ्या दुःखानें कान्स्टांटिनोपल येथें नेऊन ठेविला. क्रिस्ताची पवित्र भूमि मुसलमानांच्या हातांत पडल्यामुळें ( स. ६३४–६३७ ), ह्या दोन धर्मांच्या लोकांत पुढें पुष्कळ तंटे माजून तुंबळ रणकंदनें झालीं. अखेरीस जरुसलेमची मालकी मुसलमानांकडेच राहिली. उमरचे कार्किर्दींत इजिप्ट देश मुसलमानांनीं काबीज केला. सिरिया काबीज करणारा अमरू ह्यासच उमरनें इजिप्ट देश जिंकण्यास पाठविलें. तो देश पूर्वरोमन-बादशाहींत मोडत होता. पण तेथचे लोक रोमन अंमलास त्रासून गेले होते. अमरूनें त्यांस गोड गोड वचनें दिलीं, त्याबरोबर ते आरबांच्या बाजूस आले. इजिप्टची राजधानी अलेक्झांड्रिया येथें रोमन व आरब फौजांचा एक वर्ष संग्राम चालू होता. पुढें रोमन फौजा शहर सोडून चालत्या झाल्या. ही बातमी अमरूनें खलीफास कळवितांना लिहिलें, कीं 'येथें एक भव्य व पुरातन पुस्तकसंग्रह आहे त्याचें काय करावें?' उमरनें उत्तर पाठविलें, 'जर ते ग्रंथ कुराणाशीं मिळते असतील, तर त्यांची जरूरच नाहीं; आणि जर ते कुराणाच्या विरुद्ध असतील तर ते कायम ठेवणें इष्ट नाहीं; सबब तो ग्रंथसंग्रह जाळून टाकावा.' असें उत्तर आल्यावर अमरूनें तीं पुस्तकें आंघोळीचें पाणी तापविण्यासाठीं जाळून टाकिलीं. असें सांगतात, कीं अलेक्झांड्रियाच्या चारशें स्नानगृहांमध्यें सहा महिनेपर्यंत ह्या पुस्तकांवर पाणी तापत होतें, ( इ. स. ६४० ). गिबनच्या मतें ही गोष्ट खरी नाहीं. ती खरी असेल तर आरबांच्या योग्यतेस निःसंशय कमीपणा आणणारी आहे. इकडे आरब फौजा सिरिया देश जिंकीत असतांच दुसरी एक फौज इराणावर आली. इराणचें राज्य ऐषआरामांत दंग होतें, आणि रोमन बादशहांशीं लढून अगदीं खालावलें होतें. त्याचा अल्प काळांतच मुसलमानांनीं पाडाव

केला, (इ. स. ६३२–६४१). त्याचप्रमाणें इराण व सिरिया हे देश त्यांनीं संपूर्णपणें आपल्या ताब्यांत आणिले, तेव्हां कॉकेससपर्यंत त्यांची राज्यमर्यादा पोंचली. इराणांतून आणिलेल्या एका गुलामाचा न्याय करीत असतां त्या गुलामानें उमरास भोंसकून ठार मारिलें. आपल्या पश्चात् खिलाफतीवर योग्य मनुष्याची नेमणूक करण्यासाठीं उमरनें एक सभा नेमून ठेविली होती, तिनें उस्मान ह्यास खलीफा नेमिलें.

उस्मानानें मुसलमानांचें प्रचंड आरमार तयार केलें; त्या योगानें त्यांची सत्ता सर्व भूमध्यसमुद्रांत पसरली. माल्टा, ऱ्होड्स्, ग्रीस वगैरे देश मुसलमानांच्या ताब्यांत आले. आफ्रिकेचा उत्तरभाग जिंकण्याचें काम पुष्कळ वर्षे चाललें. तेथील एकामागून एक प्रांत जिंकून आरबांनीं आपल्या कबजांत आणिले, (स. ६४३–६८९). त्यांनीं पुरातन शहर कार्थेज जिंकून त्याचा विध्वंस केला. मुसलमानांनीं ह्या प्रदेशाचा पाडाव केल्यामुळें तेथील लोक पाश्चात्य सुधारणेस जे एकदांचे मुकले, त्यांतून अद्यापि त्यांचें डोकें वर निघालेलें नाहीं. उस्मानानें कुराणाची एक शुद्ध प्रत तयार करवून बाकीच्या सर्व जाळून टाकिल्या. हीच प्रत हल्लीं सर्वत्र चालू आहे. उस्मानाचे वेळेस मुसलमानांत द्वेष उत्पन्न झाले, व त्यांतच त्याचा खून झाला.

नंतर खिलाफतीवर अलीची नेमणूक झाली. अली हा महंमदाची मुलगी फातिमाबिबी इचा नवरा. हसन व हुसेन हे दोन तिचे मुलगे. ह्या मुलांच्या वंशजांस सय्यद म्हणजे पैगंबराच्या पोटचे असें नांव आहे. हे बहुशः हिरवें पागोटें बांधीत असून सर्व मुसलमानांत श्रेष्ठ गणिले जातात. फातिमेच्या वंशजांस 'सय्यद' आणि अलीच्या इतर बायकांपासून झालेल्या संततीस 'अलवी' अशीं नांवें आहेत.

अलीच्या कारकिर्दींत मुसलमानांतील तंटे विकोपास गेले. आपसांतील वैरानें खिलाफत क्षीण झाली. अलीचा खून होऊन त्याचे मुलगे इराणांत पळून गेले. मुआविया नामक एका पाणीदार गृहस्थानें मदीना येथील खिलाफत बळकावून ती डमास्कस येथें नेली. तेथें जे खलीफा झाले, त्यांच्या वंशास 'उमईद वंश' म्हणतात.

**२. जिझिया कर.**—परराष्ट्रांस जिंकिल्यावर हे खलीफा व त्यांचे सरदार जिंकिलेल्या लोकांना आपला धर्म स्वीकारण्याचा नेहमींच जुलूम

करीत असें नाहीं. अप्रत्यक्ष जुलूम मात्र फार होत असे. जिंकिलेल्या लोकांनीं मुसलमानी पेहराव करूं नये, शस्त्र धारण करून बाहेर फिरूं नये, घोड्यांवर खोगिरांचा उपयोग करूं नये, अशा प्रकारचे अनेक निर्बंध असत. परंतु सर्वांत जाचक प्रकार म्हणजे जिझिया कर होय. परधर्मी लोकांच्या संरक्षणार्थ त्यांजवर मुसलमानांनीं एक कायमचा कर बसविला, त्यास 'जिझिया' असें म्हणतात. दरसाल दर असामीस सोन्याचा एक दीनार द्यावा लागे. लेन्पूल म्हणतो, 'प्रत्येकाच्या दर्जाप्रमाणें, दरसाल, साठ, तीस व पंधरा रुपये कराची रक्कम बसे. ब्राह्मणांवर एक तृतीयांश आकारणी करीत. कित्येकांच्या मतें बायकामुलांस कराची माफी असे; आणि कित्येकांच्या मतें सर्वांसच सरसकट हा कर द्यावा लागे. साधु, निराश्रित व गुलाम अशा लोकांपासून हा कर घेऊं नये असा नियम होता. कराचे दोन प्रकार असत; एक स्वसंतोषाचा, व दुसरा जबरदस्तीचा. जबरदस्तीचा म्हणजे अलीकडील 'जादा पोलीस'च्या सारखा. स्वसंतोषाचा मतलब असा आहे. मुसलमानांच्या कर्तृत्वांत धर्म व राज्य ह्या

दोनही गोष्टी एकवटलेल्या होत्या. ह्या दोनही गोष्टी अन्योन्य-पोषक होत्या. धर्माच्या सबबीवर राज्य वाढे, आणि राज्याच्या सबबीवर धर्मप्रसार होई. मुसलमानांनीं स्वारी करून इराणसारखा एखादा नवीन देश जिंकिल्याबरोबर, पुढील व्यवस्थेची त्यांस तजवीज करावी लागे. ते जिंकलेल्या लोकांस सांगत, 'बाबांनो, तुमचा आम्हीं पाडाव केला आहे, आतां तुम्ही आमचे तावेदार आहां, तेव्हां तुम्हांस बंड वगैरे करूं न देतां, तुमचा सांभाळ करणें आमचें कर्तव्य आहे. हें कर्तव्य तडीस नेण्याचे दोन मार्ग आहेत, त्यांपैकीं कोणता तरी एक तुम्हीं पत्करिला पाहिजे. तुम्ही मुसलमानी धर्म स्वीकारा व आमच्यांमध्यें मिळून जा, म्हणजे आमचे सर्व अधिकार व हक्क तुम्हांस एकदम प्राप्त होतील. ही गोष्ट पत्करत नसेल, तर तुम्हीं प्रत्येकानें आम्हांस ठरीव कर दिला पाहिजे; म्हणजे ह्या कराच्या उत्पन्नावर तुमच्या संरक्षणाचें काम भागवितां येईल. मुसलमानी धर्म स्वीकारून एकंदर राज्याचे व ऐश्वर्याचे वांटेकरी व्हावें, नाहीं तर कर देऊन स्वस्थ बसावें; ह्यांपैकीं कोणता तरी एक पंथ तुह्मीं स्वीकारिला पाहिजे.' अशा रीतीनें विधर्मी लोकांवर मुसलमानांनीं जो कर बसविला, त्यास 'जिझिया' असें म्हणतात. सिरिया

वगैरे प्रांतांत क्रिस्ती लोक राहत होते, त्यांनीं हा कर देण्याचें कबूल के-ल्यावर, त्यांच्या वाटेस मुसलमान गेले नाहींत. उलट क्रिस्ती देवालयें व त्यांचीं उत्पन्नें मुसलमानांनीं पूर्वींप्रमाणें निर्वेध चालविलीं. पण इरा-णच्या लोकांनीं मुसलमानी धर्म स्वीकारिला, आणि जे स्वधर्माविषयीं विशेष अभिमान बाळगणारे होते, त्यांनीं देशत्याग केला. तेथून ते हिंदुस्थान-च्या पश्चिमकिनाऱ्यावर संजन, नवसरी वगैरे ठिकाणीं येऊन राहिले, ते हे पारशी होत. सारांश, जिझिया कर परधर्मी लोकांस दुःसह वाटे खरा, पण जे कोणी दुसरे देश जिंकितात, त्यांस परिस्थित्यनुरूप अशा प्रकारच्या युक्तीचा अवलंब करून आपला शह बसवावा लागतो. ह्या कामीं महंमद घोरी, अलाउद्दीन खिलजी, औरंगजेब, वगैरे पुरुषांनीं लोकांवर जुल्म केले असतील, तथापि जिझिया कराची मूळ कल्पना केवळ क्रूरपणामुळें निघाली होती असें नाहीं. अकबरानें मात्र जिझिया कर काढून, हिंदुमुस-लमानांचें ऐक्य करण्याचा प्रयत्न केला. मराठ्यांनींही हिंदुस्थानांत चौ-थाई व सरदेशमुखी ह्या करांच्या रूपानें आपला शह जिंकिलेल्या प्रांतावर बसविला होता. जिंकिलेल्या लोकांचीं हत्यारें काढून घेऊन त्यांस निःशस्त्र ठेवणें ही हल्लींची पद्धति सुद्धां शांतता राखण्याची एक युक्तिच आहे. जिझिया कर दिल्यानें परधर्मीयांचा बचाव मात्र होई; परंतु मुसलमानी धर्म स्वीकारिल्याबरोबर कोणाही इसमास, मग तो कोणत्याही रंगाचा किंवा जातीचा असला, तरी मुसलमानांच्या बरोबरीनें सर्व हक्क प्राप्त होऊन लुटीचा वांटा व लष्करांत मोठमोठ्या जागा मिळत.

केवळ धर्मभिन्न असल्यामुळें लोकांवर जिझिया कर बसविलेला नाहीं, हें वरील समर्थनांतील तत्त्व कायमचें टिकणें शक्य नाहीं. कोणताही देश प्रथम जिंकितांना असा कर बसविणें अपरिहार्य असतें. पण पुढें देशांत शांतता होऊन नवीन राजाचा अंमल लोकांनीं मान्य केला, आणि राजनिष्ठेनें त्याची नोकरी पत्करून त्याच्या जिवास जीव देण्यास ते तयार झाले, ह्मणजे मग कराची आवश्यकता राहत नाहीं. हें तत्त्व ओळखून अकबरानें हा कर माफ केला. केवळ धर्मभेदामुळें कर बसविल्यानें तो लोकांस किती दुःसह वाटला हें औरंगजेबाच्या वेळेस निदर्शनास आलें.

आरब लोकांस यशप्राप्ति होण्याचें दुसरें एक कारण ग्रंथकारांनीं असें दिलें आहे कीं, महंमदानें जागृत केलेला धर्माचा आवेश त्यांच्या स्त्रियांनीं

द्विगुणित वाढविला. आरब स्त्रिया आपल्या पतींबरोबर युद्धास जात; त्यांच्या श्रमाचा वांटा घेत; आपल्या मधुर गायनानें त्यांस उत्साह आणीत; आणि अशा अर्धांगींकडून शाबासकी मिळविण्यास लोकांस ईर्षा वाटे.

**३. उमईदवंश, मुसलमानांचे अजब पराक्रम.**—महंमद मरण पावल्यावर शंभर वर्षें झालीं नाहींत, तोंच मुसलमानांनीं चहूंकडे विलक्षण दिग्विजय संपादिले. त्यांनीं इराणदेश जिंकिल्यामुळें पारशी लोकांचें व पारशी धर्माचें हजारों वर्षें चालत आलेलें ऐतिहासिक महत्त्व नष्ट झालें. आशियामायनर व सिरियादेश हे मुसलमानांच्या कबजांत गेल्याबरोबर क्रिस्ताची चरित्रभूमि जरुसलेम शहर त्यांच्या ताब्यांत गेलें. आफ्रिकेचा उत्तर किनारा नुकताच कॉन्स्टांटिनोपलच्या बादशहांनीं व्हँडल्स् लोकांपासून जिंकून घेतला होता, तो सर्व इजिप्ट सुद्धां मुसलमानांच्या हातांत पडल्यानें त्याचा पुढील इतिहास अगदीं बदलून गेला. वास्तविक आफ्रिकेच्या ह्या भागाची पूर्वस्थिति अगदीं दक्षिणयुरोपासारखी होती, आणि मुसलमानांनीं तो भाग जिंकिला नसता, तर त्याची भावी सुधारणाही दक्षिणयुरोपासारखीच बनली असती. उत्तरआफ्रिका मुसलमानांनीं जिंकिल्यामुळेंच, तो भाग युरोपीय सुधारणेस मुकला, आणि अद्यापि निकृष्टावस्थेंत कुजत पडला आहे, असें इतिहासज्ञ समजतात.

आशियामायनर जिंकिल्याबरोबर आरबांनीं कॉन्स्टांटिनोपलला शह देऊन, युरोपांत शिरण्याचें पूर्वनाकें जी बॉस्फोरस सामुद्रधुनी ती काबीज करण्याचा प्रयत्न चालविला, ( स. ६७३–६७७ ). अनेक वेळां त्यांनीं निकराचे हल्ले केले, पण त्या वेळीं त्यांचा तो प्रयत्न सफल झाला नाहीं. पुनः चाळीस वर्षांनीं आरबांनीं आरमार व फौज ह्या दोहोंच्या साह्यानें कॉन्स्टांटिनोपलला वेढा घातला; परंतु तेथील बादशहा लिओ इसोरियन ह्याच्या शौर्यापुढें आरबांना यश मिळालें नाहीं, ( इ. स. ७१७–१८ ). आरबांच्या ह्या अपयशामुळें यूरोपचा भावी इतिहास साफ बदलून गेला. उमईद वंशांतला खलीफा दुसरा उमर ( स. ७०७–७२० ) ह्यास आरबांचा 'मार्कस ऑरेलियस' असें म्हणतात. रोमन बादशहांमध्यें मार्कस ऑरेलियस हा एक विख्यात साधु स्वभावाचा पुरुष होऊन गेला.

स. ६६१ पासून स. ७५० पर्यंत डमास्कस शहर उमईद खलिफांची राजधानी होतें. त्या अवधींत त्या शहराचें सौंदर्य अतिशय वाढलें. डमा-

स्कस त्या वेळीं सर्व पृथ्वीवर पहिल्या प्रतीचें शहर म्हणून वाखाणलें जात होतें. मोठमोठे वाडे, बागा, कारंजीं, दुकानें, इत्यादिकांनीं त्यास अप्रतिम शोभा आली होती. इमारती बांधण्याच्या कामांत मुसलमानांचा हात धरणारे दुसरे कोणी झालेच नाहींत असें म्हणावें लागतें. केवळ राज्यकर्तेच मोठमोठ्या इमारती बांधीत असें नाहीं, तर त्यांचें उदाहरण पाहून सर्व मोठमोठे सरदार व श्रीमंत लोक हरएक ठिकाणीं उत्तमोत्तम इमारती बांधूं लागले. दूर अंतरावरून नानातऱ्हेचे रंगीबेरंगी व चित्रविचित्र दगड मुद्दाम आणवून ते त्या इमारतींस लावीत. मोठमोठे रस्ते बांधून त्यांच्या दोहों बाजूंस झाडें लावणें, व कालवे बांधून शहरांत पाण्याचा पुरवठा करणें, हीं मुसलमानांचीं त्या वेळचीं कामें, त्यांच्या प्रचंड उद्योगाची आजतागाईत साक्ष देत आहेत.

डमास्कस शहरांतील नळाच्या पाण्याची व्यवस्था पाहून आजकालही तज्ज्ञ लोक थक्क होऊन जातात. अगदीं यःकश्चित् भिकाऱ्याच्या घरांत सुद्धां डमास्कस येथें आज नळ व कारंजें आहे. हें पाणी सात मोठे कालवे बांधून शहरांत आणलेलें आहे. त्यांस आज बाराशें वर्षें होऊन गेलीं आहेत, तरी ते नुकतेच बांधले असावे असें दिसतें. डमास्कस येथील खलीफांच्या राहत्या वाड्याची खरी कल्पना वाचकांस शब्दांनीं देणें शक्य नाहीं. शहरांत येण्यास सहा मोठमोठे दरवाजे होते, त्यांचे उंच मनोरे लांबूनच प्रवाशास डमास्कस शहराचें वैभव सुचवून देत. मुसलमानी बांधणींत कमानी, घुमट, मनोरे व स्तंभ हे भाग विशेष आहेत, ते हिंदुस्थानांतील मुसलमानी बांधणींत आजही आपणास स्पष्ट दिसतात.

मोआविया व यजीद हे दोघेही खलीफा प्रबल झाले. मोआविया वीस वर्षें खिलाफतीचा उपभोग घेऊन सन ६७९ त मरण पावला. त्यानें विद्येस चांगलें उत्तेजन दिलें. आजपर्यंत खलीफा नेमण्याचें काम लोकांकडे असे, तें त्यानें बंद करून खिलाफत स्वतःच्या वंशांत परंपरेनें चालावी असें ठरविलें. ही गोष्ट मुसलमानी रियासतीस फार घातुक झाली. लोकनियुक्तता नाहींशी झाल्यामुळें खलीफांची सत्ता अनियंत्रित झाली, आणि ते आपल्या कर्तव्याविषयीं बेफिकीर होऊन चैनी बनले. लगेच 'यथा राजा तथा प्रजा' अशी स्थिति झाली. मोआवियानंतर यजीद, त्यानंतर दुसरा मोआविया, नंतर मरवान असे खलीफा झाले. सन ६८४ त

अब्दुल मलीक हा दहावा खलीफा झाला. त्याच्या तरीक नांवाच्या सरदारानें स्पेनच्या दक्षिणटोंकावर किल्ला बांधून त्यास आपलें नांव दिलें, तें जिब्रॉल्टर ( जेबल् तरीक म्ह० तरीकनें बांधिलेला किल्ला ) म्हणून आजतागाईत चालत आहे. ह्या वेळेसच मुसलमानांनीं कार्थेज जाळिलें. त्यांचा सरदार अब्दुर्रहमान ह्यानें सन ७०५त स्पेनचा क्रिस्ती राजा रॉड्रिक यास जिंकून उत्तरेस पिरिनीज पर्वतापावेतों अंमल बसविला, आणि आफ्रिकेंत ट्यूनिसप्रांत घेऊन कैरो शहर वसविलें. बीजगणित ( आरबी भाषेंत अल्जबर ) हा विषय ह्या वेळेस आरब लोकांनीं स्पेन देशांत नेला. खलीफ अब्दुल मलीक सन ७०५त मरण पावला, आणि त्याचा मुलगा वलीद खलीफा झाला.

**४. स्पेनचा पाडाव ( स. ७११ ).**—उमईद खलीफांचें मोठें कृत्य म्हणजे त्यांनीं स्पेनचा पाडाव केला हें होय. पूर्वेच्या बाजूनें त्यांचा युरोपांत कांहीं कालपावेतों प्रवेश झाला नाहीं, तरी पश्चिमच्या बाजूनें जिब्रॉल्टरच्या सामुद्रधुनींतून स. ७११ त स्पेनदेश त्यांच्या हस्तगत झाला. अमीर किंवा सुलतान अशी पदवी धारण करून त्यांनीं तेथें आपला अंमल सुरू केला. सन ९२९त अब्दुर्रहमान तिसरा हा आपणास खलीफा म्हणवून घेऊं लागला. ह्यापुढें आठशें वर्षें पावेतों स्पेनचे उत्कृष्ट प्रांत मुसलमानांच्या ताब्यांत राहिल्यानें, त्यांत क्रिस्ती धर्माचा शिरकाव झाला नाहीं. आरबस्तान, सिरिया, उत्तरआफ्रिका वगैरे ठिकाणांहून अनेक मुसलमान लोक स्पेन देशांत येऊन वस्ती करून राहिले. त्यांनीं तेथें मेहनत करून शेती व दुसऱ्या कला चांगल्या ऊर्जित दशेस आणिल्या. तेणेंकरून सेव्हिल, कोर्डोव्हा, टोलेडो, ग्रनाडा वगैरे मोठमोठे प्रांतांत आरबी पेहेराव, आरबी आचार, आरबी भाषा व धर्म ह्यांचा प्रसार झाला. स्पेनदेश हस्तगत झाल्यानंतर चार पांच वर्षांतच पिरिनीज पर्वत ओलांडून आरबांनीं फ्रान्स देशांत प्रवेश केला. त्याबरोबर सर्व क्रिस्ती राष्ट्रांची पांचांवर धारण बसली. मुसलमान लोक सर्व यूरोपखंड आक्रमिणार असा सुमार दिसूं लागला. बास्फोरस सामुद्रधुनीपासून उत्तरआफ्रिकेच्या किनाऱ्यानें जिब्रॉल्टर पावेतों अर्धचंद्राकृति वर्तुळ अगोदरच बनलें होतें, त्याचा लवकरच संपूर्ण चंद्र बनणार असा सुमार दिसूं लागला होता, ( Draper ). नकाशा पाहिला असतां ही गोष्ट तत्काल लक्षांत येईल. ह्या अरिष्टाचा

निकाल स. ७३२ ह्या वर्षी लागला. फ्रान्सच्या मध्यभागीं पॉयटियर्स-नजीक टूर्स म्हणून एक गांव आहे, तेथें फ्रेंच सरदार चार्लस् मार्टेल ह्यानें मुसलमान फौजेचा संपूर्ण नाश केला, तेव्हां मुसलमान लोक पिरिनी-जच्या अलीकडे परत आले, ते पुनः त्यापलीकडे गेले नाहींत. जगाच्या प्रचंड क्रान्तिकारक लढायांत ह्या टूर्सच्या लढाईची गणना आहे. स्पेन-देश जिंकणारा मुसलमानांचा पराक्रमी पुरुष अब्दुर्रहमान ह्या टूर्सच्या लढाइंत पडला. ह्याप्रमाणें पैगंबराच्या मृत्यूनंतर शंभर वर्षांनीं यूरोपच्या पूर्वेस व पश्चिमेस दोनही दिशांस मुसलमानांस पुढें सरण्यास अटकाव होऊन, क्रिस्त्यांच्या बालसुधारणेस वृद्धि पावण्यास अवकाश मिळाला.

५. **बगदादचे आब्बासी खलीफा.**—टूर्सच्या लढाईस अठरा वर्षे झालीं नाहींत, तोंच इकडे खिलाफतींत एक मोठा फेरफार घडून आला. मोआवियानें स. ६६१त डमास्कस येथें खिलाफत स्थापन केली, तिचा शेवट स. ७५०त झाला. मोआवियाच्या वंशाचें व अलीच्या वंशाचें वांकडें होतें. मोआवियानें अलीच्या वंशाचा पाडाव केला, तथापि अलीच्या वंशानें स. ७५०त पुनः आपलें डोकें वर काढिलें. ह्या वंशाच्या मंडळीनें तैग्रीस नदीच्या कांठीं बगदाद नांवाचें नवीन शहर स्थापून तेथें खलीफांची गादी नेली. ह्या ठिकाणीं ह्या वंशाच्या खलीफांनीं पांचशें वर्षे राज्य केलें, (स. ७५०–१२५८). पैगंबराचा एक चुलता आब्बास म्हणून होता, त्याच्या नांवावरून बगदादच्या ह्या वंशास 'आब्बासी' असें म्हणतात. पहिलीं दीडशें वर्षे ह्या वंशाची अतिशय भरभराट असून, त्या काळास मुसलमानांचें 'सुवर्णयुग' असें नांव आहे. अल्मसूद (स. ७५४–७७५), हारून–अल्–रशीद (स. ७८६–८०९), मामून (स. ८१३–८३३), वगैरे कित्येक थोर व कर्ते पुरुष ह्या काळांत निपजले. त्यांनीं अनेक गहन विषयांत आपलें नांव अजरामर करून ठेविलें आहे.

शास्त्र, तत्त्वज्ञान, वाङ्मय इत्यादि बाबतींत आरब विद्वानांनीं खली-फांच्या पदरीं राहून अलौकिक कीर्ति मिळविली, आणि मोठमोठे उद्योग केले; त्यांजपुढें तत्कालीन क्रिस्ती राष्ट्रें अत्यंत हीनावस्थ व रानटी दिसतात. गिबन म्हणतो, 'मुसलमानांच्या पहिल्या शंभर दोनशें वर्षांत ऐश्वर्यानें व सत्तेनें खलीफांची बरोबरी करणारे दुसरे राजे पृथ्वीवर नव्हते. सिंधु, अमूदर्या, व टेगस ह्या तीनही नद्यांच्या कांठीं खलीफांचा शब्द झेलला

जात असे.' परंतु पुढें लवकरच अंतःकलहामुळें खिलाफतीचे तुकडे झाले; आणि बगदाद, कैरो, व कोर्डोव्हा ह्या तीन ठिकाणांहून खली-फांचे हुकूम सुटूं लागले. ह्याप्रमाणें राज्याचे जरी विभाग झाले, तरी तीनही ठिकाणचे मुसलमान पैगंबरास व कुराणास सर्व प्रकारें मान देत, आणि सर्व असामी मक्केकडे तोंड करून प्रार्थना करीत. हल्लीं तुर्कस्तानच्या सुलतानास सर्व मुसलमान आपला खलीफा समजतात.

**६. आरेबियन नाइट्सचे नायक हारून व मामून.**—आब्बासी खलीफांचें राज्य बगदाद येथें पांचशें वर्षें मोठ्या भरभराटींत होतें. त्यांचा सर्वांत मोठा बादशहा हारून–अल्–रशीद हा होय. त्यानें स. ७८६ पासून स. ८०९ पावेतों राज्य केलें. तेव्हांपासून आरब मुसलमानांच्या अमलांतील अत्यंत भरभराटीच्या काळास सुरवात झाली. हारून–अल्–रशीद हा रात्रीं वेष पालटून, राज्यांतील खबर काढून गरिबांचा व दुःखितांचा परामर्ष घेण्याकरितां बगदाद शहरांत फिरत असे. 'आरेबियन नाइट्स्' नांवाच्या ज्या गोष्टी प्रचलित आहेत, त्यांतील काल्पनिक भाग सोडून दिला, तरी त्यांत तत्कालीन अंतःस्थितीचें जें चित्र काढलेलें आहे, तें

वास्तविक व खरें आहे. भूतलावर जे महान् राज्यकर्ते होऊन गेले, त्यांत हारूनची गणना होत असते. तो मनाचा साधा होता तरी लोकांवर त्याची छाप चांगली होती. जसा शूर तसाच तो राज्यकारभारांतही कुशल होता. तो सदा सर्व राज्यांत फिरत असे. त्याच्या राज्यांत व्यापारी व प्रवासी लोक निर्भयपणें यथेच्छ संचार करीत असत. मशिदी, विद्यालयें, शाळा, दवाखाने, धर्मशाळा, रस्ते, पूल, कालवे, इत्यादि लोकोपयोगी कामें करून त्यानें रयतेची प्रीति संपादन केली. त्यानें विद्याकलांसही उत्तम आश्रय दिला.

हारूनचा दुसरा मुलगा अब्दुल्ला–अल्–मामून हा सन ८१३ त खलीफा झाला, आणि त्यानें वीस वर्षें राज्य केलें. त्याचा लौकिक बापापेक्षांही मोठा आहे. विशेषतः विद्येच्या कामांत ह्या वीस वर्षांत आरबांनीं उत्तम प्रावीण्य संपादिलें. गणितशास्त्र, भूगोल, खगोल, वैद्यक इत्यादि विषयांत त्या वेळच्या आरब विद्वानांचे उद्योग अद्यापपावेतों सर्वत्र मान्य होत आहेत. यूरोपच्या अर्वाचीन प्रगतीस ह्या आरब विद्वानांचे उद्योग बव्हंशीं कारण झाले आहेत. आपल्या लोकांनीं ज्ञान

संपादन करावें असें मामून ह्यास फार वाटे; ह्यासाठीं सर्व राज्यांत स्वतंत्र पाठशाळा स्थापून त्यांस त्यानें कायमच्या नेमणुका बांधून दिल्या; त्यांत सर्व प्रकारच्या लोकांसाठीं शिक्षणाची सोय केलेली होती. मामून ह्यास परधर्मांचा द्वेष वाटत नसे. सर्वांनीं आपापले धर्म पाळावे अशीच त्याची इच्छा होती. त्याच्या कार्किर्दीत क्रिस्ती, पारशी व ज्यू ह्या लोकांचीं मंदिरें पुष्कळ वाढलीं. मोठमोठे कवी, निरनिराळ्या शास्त्रांचे अध्यापक, व तत्त्ववेत्ते नेहमीं या मामूनच्या दरबारीं येऊन राहत असत. ग्रीक, संस्कृत, खाल्डी वगैरे भाषांतून उत्तमोत्तम ग्रंथ मिळवून मामूननें आरबी भाषेंत त्यांचीं भाषांतरें करविलीं. ज्योतिषांत तर पुष्कळ नवीन शोध लावण्यांत आले. फारशी भाषेसही मामूननें चांगलें उत्तेजन दिलें. दर मंगळवारीं विद्वान् मंडळीची मोठी सभा भरवून तेथें अनेक गहन विषयांवर बादशाहा वादविवाद करवीत असे.

बगदाद शहरच्या ह्या वेळच्या भरभराटीचें वर्णन अनेकांनीं केलें आहे. तें विद्या, कला, संपत्ति, वैभव इत्यादिकांचें माहेरघर होतें. तेथील लोकसंख्या जवळ जवळ वीस लाख होती. खलीफांचा विस्तीर्ण वाडा एका मोठ्या बागांत बांधिलेला असून हल्लींच्याप्रमाणेंच त्या बागांत निरनिराळ्या प्रकारचीं जनावरें व झाडें ठेविलेलीं होतीं. शहरचे रस्ते चाळीस हात रुंदीचे होते. शहरांत मोठमोठे कालवे आणून घरोघरीं हौद बांधून पाणी उत्तम प्रकारें खेळविलेलें होतें. पाठशाळा, मशिदी, दवाखाने, शिपायांच्या लैनी, इत्यादिकांनीं शहरास अवर्णनीय शोभा आलेली होती.

वरील दोघां खलीफांच्या कार्किर्दी सन ७८६ पासून सन ८३३पर्यंत चालल्या. त्यांच्या वेळेस आरब बादशाहीच्या भरभराटीचा कळस झाला. हेच खलीफा 'आरबी भाषेंतील सुरस गोष्टीं'चे नायक होत. युरोपांत त्यांचा समकालीन राजा पराक्रमी शार्लमेन होय, (स.७६८-८१४). ह्या खलीफांचा खर्च एवढा मोठा होता, कीं पहिल्या चारही खलिफांच्या सर्व उमरींतील खर्च ह्यांस एका दिवसास लागे. पूर्वींच्या कडक धर्मद्वेषाचा लोप होऊन ते परकीयांशीं स्नेहबुद्धीनें वागून त्यांच्या ग्रंथांतून ग्राह्य अंश स्वीकारूं लागले. शास्त्राभ्यासास त्यांनीं उत्तेजन दिलें. पुष्कळ विद्वान् ज्योतिषी, गणिती, तत्त्ववेत्ते व इतिहासकार त्यांच्या कारकीर्दींत निपजले. दरएक मशिदीला विद्यालय जोडलेलें असे,

आणि विद्यालय नाहीं असें एकही शहर नव्हतें. आरबी भाषा फार प्रौढ झाली. ह्याच भाषेचा अभ्यास शाळेंत चाले. ग्रीक वगैरे ग्रंथांचीं भाषांतरें फारशी भाषेंत न होतां आरबींत होऊं लागलीं. हारूनची सत्ता पश्चिमेस भूमध्यसमुद्रापासून पूर्वेस सिंधुनदीपर्यंत, व उत्तरेस मध्यआशियांतील मैदानांपासून दक्षिणेस हिंदीमहासागरापर्यंत पसरली. रोमच्या निसिफोरस बादशहाचा त्यानें पराजय करून त्यास खंडणी देण्यास लाविलें. क्रिस्ती राष्ट्रांत 'शाहणा ऐरन' असें त्याचें नांव प्रसिद्ध होतें.

**७. फातिमईद वंश (स. ९०९ ते ११७१).**—ह्या देशावर स. ६४१ पासून ८६८ पर्यंत आरब खलिफांचा ताबा होता. स. ८६८ ते स. ९०९ पर्यंत तेथील कारभारी स्वतंत्र होण्याची खटपट करीत होते. स. ९०९ ते फातिमईद खलीफांनीं तेथें आपलें स्वतंत्र राज्य सुरू केलें. ह्या खलिफांच्या ताब्यांत उत्तरआफ्रिकेचा एकंदर प्रांत होता. त्यांची राजधानी ट्यूनिस नजीक महदीया म्हणून होती. ह्या खलिफांचा जवान नांवाचा एक सरदार होता त्यानें 'काहिरा' नांवाचा एक किल्ला बांधला; त्याचें पुढें कैरो शहर बनलें. स. ११७१त सलादिननें ही फातिमईद खिलाफत मोडिली. हा सलादिन सिरियाच्या राज्यांत एक मोटा सरदार होता. 'धर्मयुद्धांत' ह्याचें नांव युरोपियन इतिहासांत विशेष प्रमुख आहे. ह्यानेंच सन ११८७ त जरुसलेम काबीज केल्यामुळें पुढें तिसरें धर्मयुद्ध झालें. त्यांत इंग्लंडचा राजा पहिला रिचर्ड प्रमुख होता, सलादिन ११९३ त मरण पावला.

मध्यंतरीं म्हणजे ११७१ पासून १५१७ पर्यंत मामलुक सरदारांच्या ताब्यांत इजिप्ट देश होता. कान्स्टांटिनोपलच्या पहिल्या सलीमनें तो देश सन १५१७ त जिंकिला, तेव्हांपासून तेथील कारभार करण्यास एक पाशा पाठविला जात असे, आणि त्याच्या मदतीस मामलुकांचें मंडळ असे. सन १७९८ त नेपोलिअननें हा देश जिंकिला. नंतर सन १८०५ त महंमदअली नांवाच्या तुर्क सेनापतीनें तेथें आपलें राज्य स्थापिलें. महंमदअलीच्या चवथ्या वंशजानें तुर्कस्तानच्या ताब्याखालीं खेदीव ही पदवी धारण केली.

**८. खिलाफतीचा ऱ्हास.**—अशी भरभराट चालू असतां त्याबरोबर उत्तरोत्तर ऐषआरामही वाढत होता. मुसलमानांची सत्ता जितक्या जोरानें

वाढली, तितक्याच वेगानें ती कमीही होत गेली. आरंभींची धर्मनिष्ठा नाहींशी होऊन ते चैनी बनले. उस्मान खलीफा तेलाचा खर्च वांचविण्यसाठीं आपला दिवा स्वत: मालवीत असे. उस्मानचे पश्चात् शंभर वर्षांचे आंतच अल्–महदी नामक खलिफा झाला, त्यास केवळ बर्फ वाहून नेण्याकरितां पांचशें उंट लागूं लागले. दूरदूरच्या प्रांतांचे सुभेदार बंडें करीत. दरबारांतही नानाप्रकारचे घोंटाळे चालत. आज एखाद्यास दिवाणाचें पद मिळालें, तर उद्यां त्याला फांशीची शिक्षा भोगण्याचा प्रसंग येई. विशेषतः आरब लोकांकडूनच फार जुलूम होऊं लागले. कोणी तरी भोंदू इसम पैगंबर म्हणून पुढें येई. खुरासानांत आरबी पैगंबराविरुद्ध उघड बंड झालें; तेथें सन ८२०त याकूब नांवाच्या इसमानें खलीफांचा अंमल झुगारून देऊन स्वतंत्र राज्य स्थापिलें. सन ८६१ पासून पुढें हळू हळू खलीफांच्या सत्तेचा ऱ्हास होत चालला. निरनिराळ्या प्रांतांतील त्यांचे सुभेदार स्वतंत्र झाले, आणि तेच मोठमोठे राजे होऊन बसले. स्पेनमधील त्यांच्या सत्तेचा अंत सन १०३३त झाला. आल्फांझो ह्यानें पुनरपि क्रिस्ती राज्याची तेथें स्थापना केली. पूर्वेकडील तुर्क मुसलमानांनीं मध्यआशियांत बुखारा वगैरेकडे एक स्वतंत्र राज्य उभारिलें. आफ्रिकेंतील सुभेदार स्वतंत्र होऊन ते इजिप्टमध्यें राज्य करूं लागले. सिरियाप्रांतही स्वतंत्र झाला. युरोपांत मुसलमानी सत्तेचा अवशेष तुर्कस्तानचा बादशहा एवढा मात्र आजमितीस राहिला आहे, आणि त्याच्याच ताब्यांत आशियांतील तुर्कस्तान वगैरे देश आहेत. अशा प्रकारें राज्याची फाटाफूट झाली. स. ९४५ च्या सुमागस बगदादची खिलाफत संपुष्टांत आली; त्यानंतर राज्य म्हणून फारसें नव्हतें, फक्त वाडा व दरबारचें अल्पस्वल्प वैभव स १२५८ पर्यंत चालू होतें. बगदाद येथें नामधारी खलीफा गादीवर असे, आणि ठिकठिकाणच्या प्रांतांत स्वतंत्र झालेले मुसलमान राजे आपआपल्या गादीचीं वस्त्रें ह्या खलीफांकडून आणविण्यांत मोठें भूषण मानीत.

९. **जगाच्या संस्कृतींत आरबांचें कार्य.**—आशिया व आफ्रिका खंडांतील पुष्कळसे प्रदेश आणि स्पेन वगैरे दूरचे देश आरबांनीं जिंकिले, तथापि त्यांच्या स्वभावांतील मूळचा आकुंचितपणा नाहींसा झाला नाहीं. एवढ्या मोठ्या विस्तृत राज्याची नवीन जबाबदारी संभाळण्याचें धाडस त्यांस कधीं झालें नाहीं. नको नको म्हणत असतां हे विजय त्यांच्या

अंगावर येऊन कोसळले. त्यांच्या पहिल्या कडव्या स्वभावाबरोबरच त्यांचे जातिद्वेष व अंतर्वैमनस्यें कायमच राहिलीं. ते कितीही दूर लढत गेले असले तरी त्यांस वाटे, कीं आपण आरबस्तानच्या वाळवंटांतच झगडत आहों. हे जातिद्वेष त्यांचे त्यांनाच अतिशय भोंवले. त्यांची भरभराट एकदम खुंटली. आरंभीं रोमन व जर्मन ह्या दोघां युरोपियन लोकांस त्यांनीं बहुतेक ग्रासून टाकिल्यामुळें त्या युरोपियन लोकांचा समूळ निःपात होऊन, सर्व युरोपखंड आरबांच्या हातांत जाण्याचा योग आला होता; पण आरब व तुर्क ह्यांच्या अंतःकलहांमुळें तो योग टळला; नाहीं तर जगाचा पुढील इतिहास अगदींच बदलून गेला असता. ( Amir Ali's History of the Saracens ). तुर्क व मोगल लोकांनीं पुढें जे विजय संपादिले, त्यांस आरबांनीं हातभार लाविला नाहीं, किंवा त्यांस आपली उच्च सुधारणा आरबांनीं दिली नाहीं, इतकेंच नव्हे, तर पुढें जरुसलेमविषयीं मुसलमान व क्रिस्ती या दोन धर्मांच्या लोकांमध्यें तंटे उपस्थित होऊन प्रचंड युद्धें झालीं, ज्यांस ' धर्मयुद्धें ' ही संज्ञा इतिहासकारांनीं दिली आहे, त्यांत सुद्धां आरबांनीं तुर्कांस साह्य केलें नाहीं. आरब व तुर्क हे सर्वथैव भिन्न होते. तुर्कांस ते आप्त समजत नसत.

जगाच्या संस्कृतींत आरबांनीं मोठीच भर घातली आहे. प्राचीन काळच्या प्राच्य सुधारणेंत जेवढें म्हणून चांगलें होतें, तेवढें सर्व ग्रहण करून, आणि त्यांत स्वतःची पुष्कळ भर घालून, त्यांनीं तो भाग क्रिस्ती युरोपास दिला, ( Myers' History ). आशियामायनर व स्पेन ह्या दोन देशांत तर मुसलमानांनीं हरएक विषयांत जें प्रावीण्य संपादिलें, तसें पृथ्वीवर त्यापूर्वी कोणींच संपादिलें नव्हतें. दरबारचा थाट, फौजेची रचना व राज्याची व्यवस्था ह्या बाबतींत आरबांनीं जुन्या इराणी लोकांचें व कान्स्टांटिनोपलच्या ग्रीक सुधारणेचें अनुकरण केलें. एका पुरुषाच्या हातांत अनियंत्रित राजसत्ता असावयाची, असाच आरबांचा प्रघात होता.

पण आरबांनीं स्वतः निर्माण केलेला विषय म्हणजे मुसलमानी कायदा होय. कायदेपंडित रोमन कायद्यास जो मान देतात त्याच्या खालोखाल तो मान ते आरबी कायद्यास देतात. आरब जेथें जेथें गेले, तेथें त्यांनीं

व्यापारास नवीन स्वरूप व उत्तेजन दिलें. फिनिशन लोकांनंतर व्यापारांत महत्त्व पावलेले लोक आरब होत. 'आरेबियन नाईट्स्' ह्या पुस्तकांत आरबांच्या व्यापारी उद्योगाचें प्रतिबिंब पडलेलें आहे.

वाङ्मयांत आरबांनीं फार चांगलें काम केलें. कादंबरीचें रचनाचातुर्य त्यांनीं इराणी लोकांपासून घेतलें. 'आरेबियन नाईट्स्' मध्यें आरबांच्या राहणीचें व बगदादच्या दरबारचें उत्कृष्ट चित्र वठलेलें असून, त्या पुस्तकानें एकंदर पृथ्वीवरील अमोल व अजरामर ग्रंथांत मोठीच भर घातली आहे. आरबांच्या कवित्वशक्तीचाही चांगला विकास झाला होता.

आरब विद्वानांनीं सृष्टिशास्त्रांत सुद्धां पुष्कळ उद्योग केले. दूरदूरचे प्रदेश जिंकण्याच्या व व्यापार वाढविण्याच्या नादांत त्यांना भूगोलशास्त्राचा अभ्यास करावा लागला. खगोल, भूमिति, अंकगणित, बीजगणित, वैद्यक, वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र वगैरे अनेक विषयांत पुरातन आर्यांचे व ग्रीक लोकांचे शोध स्वतः शिकून, त्यांनीं आपल्या बुद्धिसामर्थ्यानें त्या त्या विषयांची नवीन रचना केली. तिजवरच अर्वाचीन युरोपियन सुधारणेचा पाया रचलेला आहे. वैद्यक विषयास शास्त्राचें स्वरूप आरबांनीं आणिलें. गणितांतील दशांशपद्धति मूळ आरबांनीं शोधून काढिली, त्यामुळें पुढील शास्त्रज्ञांचें काम फार सुकर झालें.

अशा प्रकारचे उद्योग करून मोठमोठ्या पाठशाळा व पुस्तकालयें आरबांनीं निर्माण केलीं. युरोपांतील क्रिस्ती राष्ट्रें निद्रावस्थेंत घोरत पडलीं असतां, बगदाद, कैरो व कोर्डोव्हा येथील विद्यालयें सर्व जातींच्या व सर्व धर्मांच्या लोकांस ज्ञानामृत पाजून ज्ञानवृद्धि करीत होतीं. कैरो येथील आरबांचें पुरातन विश्वविद्यालय अद्यापि हयात आहे.

इमारती बांधण्यांत तर मुसलमानांनीं आपलें नांव सर्वत्र चिरंतन करून ठेविलें आहे. आरबांनीं नवीन बांधणी प्रचारांत आणिली. कोर्डोव्हा व ग्रनाडा येथील आरबी इमारतींच्या बांधणीची नक्कल अद्यापि यूरोपचे मोठमोठे चतुर शिल्पशास्त्रज्ञ ( एंजिनियर्स ) करीत असतात.

शास्त्रीय ज्ञानाच्या वृद्धीनें आरबांनीं ह्या पांचशें वर्षांत अनेक मोठमोठे शोध लाविले.त्यांनीं होकायंत्राचा उपयोग प्रचारांत आणिला,आणि पृथ्वीवरील

३–७९१–२०००

बहुतेक भागांत समुद्रप्रवास करून दूरदूरच्या ठिकठिकाणीं आपल्या वसाहती व व्यापार वाढविला. जमिनीवरूनही व्यापाराचे मोठमोठे नवीन हमरस्ते त्यांनीं प्रचारांत आणिले. इतिहासासही ते विसरले नाहींत. तसेंच ज्योतिष, कविता, व लेखनकला ह्या विषयांस त्यांनीं उत्तम चलन दिलें.

हिंदुस्थानचे पुष्कळ लोक बगदाद येथें येऊन राहत असत. चरक व सुश्रुत ह्या दोन आर्यवैद्यक ग्रंथांचे तर्जुमे आरबी भाषेंत दोघां ब्राह्मणांनीं केलेले आहेत. आरबांनीं महत्प्रयास करून मिळविलेलें ज्ञानभांडार पुढें तुर्कांनीं धुळीस मिळविलें. तुर्कांनीं पुस्तकसंग्रह जाळिले, शास्त्रीय हत्यारें मोडून टाकिलीं आणि विद्वानांचा शिरच्छेद केला, त्यामुळें आरब सुधारणा लयास गेली.

मुसलमानांचीं व क्रिस्त्यांचीं दोनशें वर्षें जीं धर्मयुद्धें चाललीं, त्यामुळें अवशिष्ट आरब सुधारणेचा समूळ नाश झाला. स्वसंरक्षणाकडे लक्ष लागल्यामुळें ज्ञानार्जनाचें काम बंद पडलें. हीं धर्मयुद्धें झालीं नसतीं तर प्राच्य सुधारणेचा पगडा युरोपियन सुधारणेवर बसला असता. ह्या युद्धांचें वर्णन ब्रिटिश रियासतींत आलें आहे.

डमास्कस व बगदाद ह्यांजप्रमाणें कैरो, कोर्डोव्हा व ग्रनाडा येथें कैक वर्षें आरबांच्या राजधान्या होत्या; तीं शहरेंही विद्या, कला व वैभव ह्यांसंबंधानें बगदादप्रमाणेंच नामांकित झालीं होतीं. कैरो व कोर्डोव्हा येथील नामांकित विद्यापीठांनीं मानवी प्रगतीस चांगलेंच उत्तेजन दिलें आहे. ग्रनाडा येथें तर मोठमोठ्या स्त्रियांनींही विद्येच्या कामांत लौकिक मिळविलेला आहे. स्पेनच्या बाजूनें युरोपास वरिष्ठ सुधारणा पोंचविण्याचें उच्च काम आरबांनीं केलें आहे. सभोंवार निबिड अज्ञानांधकार पसरला असतां, स्पेन देशांत आरबांनीं जी प्रचंड ज्ञानज्योत उजळिली, तीच यूरोपच्या भावी उदयास कारण झाली आहे. कैरोची भरभराटही अशाच प्रकारची होती.

सर रिचर्ड बर्टन नांवाचे प्रसिद्ध विद्वान् इंग्रज गृहस्थ निरनिराळ्या इस्लामी प्रदेशांत चाळीसपन्नास वर्षेंपर्यंत प्रवास करीत होते. सिंधुनदीपासून अटलांटिक महासागरापावेतों सर्व प्रदेशांत फिरून त्यांनीं मुसलमानांविषयीं हरएक प्रकारची माहिती मिळविली आहे. आरेबियन नाईट्स्चें सुरस

भाषांतर ह्याच रसिक गृहस्थांनीं इंग्रजींत केलें. ह्या भाषांतराचे मोठाले दहा भाग त्यांनीं छापिले असून, शेवटीं 'Terminal Essay' नांवाचा तीनशें पानांचा एक निबंध लिहून त्यांत त्यांनीं तत्कालीन स्थितीचें विवेचन केलें आहे. त्याशिवाय त्यांनीं निरनिराळ्या मुसलमान देशांचीं प्रवास वर्णनेंही लिहिलीं आहेत. आरबांचा स्वभाव, मुसलमानी धर्माची योग्यता, बगदादच्या खलीफांचें वैभव, आणि तत्कालीन लोकांचे आचार-विचार इत्यादि अनेक विषयांवर बर्टन यांनीं उपयुक्त माहिती दिली आहे. मुसलमानांचें स्वभावरहस्य व पश्चिमआशियांतील राष्ट्रांची मुसलमानी अमदानींतील स्थिति समजून घेण्यास बर्टनचे लेख उपयोगी पडतील.

---

## प्रकरण चवथें.

# इस्लामांत नवीन भर.

### इ. स. १००० नंतर.

१. मध्यआशिया—मानव जातीचें वारूळ. २. तुर्क लोक—सेल्जुक व ऑटोमन.
३. मोगल लोक—उत्पत्ति, स्वभाव वगैरे. ४. चंगीझखान व त्याचा वंश.
५. इस्लामाचे दोष व धार्मिक रहस्य.

**१. मध्यआशिया—मानव जातीचें वारूळ.**—मुसलमानी धर्माचा उदय झाल्यावर त्यांचीं अनेक राज्यें स्थापन झालीं. त्यांपैकीं मुख्य जी आरबांची खिलाफत तिचें व तिच्या शाखांचें वर्णन मागील प्रकरणांत आलें. नवव्या शतकापासून तुर्क, मोगल वगैरे मध्यआशियांतले दुसरे पुष्कळ लोक मुसलमानी गोटांत सामील झाले. त्यांचाही इतिहास मनोरंजक असून हिंदुस्थानच्या इतिहासाशीं त्याचा विशेष संबंध आहे. मुसलमानांत अनेक कुळांचें मिश्रण आहे; आणि प्रत्येकीचे स्वभावभेद पुढें त्यांच्या कर्तृत्वांत उतरलेले दिसतात. सर्व मुसलमानांत आरब श्रेष्ठ होत. तुर्क, मोगल, तार्तार वगैरे मध्यआशियांतले धनगरी पेशाचे लोक आरंभीं मुसलमान नव्हते. त्यांनीं पुढें मुसलमानी धर्म स्वीकारिला, आणि अनेक पराक्रम गाजविले. तथापि त्यांच्याकडून जगाच्या संस्कृतींत फारशी भर पडली नाहीं. त्यांचा स्वभाव

विध्वंसक होता. हे त्यांचे स्वभावभेद कळणें अत्यंत जरूर आहे. कारण पुढें हिंदुस्थानच्या इतिहासाशीं ह्या तुर्क-मोगलांचा विशेष संबंध आहे. सबब त्यांच्या मूळ कुळींची थोडीशी हकीगत दिली पाहिजे. मध्यआशियाखंड म्हणजे सर्व बाजूंनीं प्रचंड पर्वतांनीं वर उचलून धरिल्यासारखा मेजाच्या आकृतीचा एक विस्तृत प्रदेश आहे. मानवी उत्पत्तीचें मूळ ठिकाण येथेंच असावें असें म्हणतात. पृथ्वीवरील आजपर्यंतच्या प्रचंड घडामोडी ह्या प्रदेशांतील लोकांनींच केलेल्या आहेत. ह्या प्रदेशास मुंग्यांच्या वारुळाची उपमा शोभेल. वारुळाच्या अनेक बिळांतून बाहेर पडून मुंग्या जशा लांब पल्ल्यावर जातात, आणि तिकडेच आणखी नवीन वारुळें बांधितात, तशाच प्रकारची थोड्या बहुत फरकानें वरील प्रदेशांतील लोकांची स्थिति आहे. ह्या प्रदेशांतील लोकवस्तीची खरी माहिती आजच्या सुधारलेल्या काळांत जर बरोबर मिळत नाहीं, तर गेल्या हजार दोन हजार वर्षांचा कितीसा तपास लागणार! आर्य, सिथियन, हूण, यवन, शक, तुर्क, तार्तार, मोगल वगैरे अनेक जातींचे लोक येथून बाहेर पसरले; आणि त्यांनीं दक्षिणेस व पश्चिमेस अनेक भराऱ्या मारिल्या. इंग्रज सरकारानें हिंदुस्थानच्या वायव्य-

सरहद्दीचा हल्लीं बंदोबस्त केला असल्यामुळें, आपणांस ह्या परकीय हल्ल्यांची आज भीति वाटत नाहीं. पण पूर्वींचा प्रकार भिन्न होता. आरंभीं ह्या वारुळांतून बाहेर पडलेले लोक मूळचे कोण हें समजण्यास हल्लीं मार्ग नाहीं. पण पुढें त्यांचे पराक्रम इतिहासकार वर्णूं लागले, तेव्हां त्यांस त्यांनीं निरनिराळीं नांवें दिलीं.

आशियाखंडांत फार प्राचीन काळापासून तीन चार जातींचे लोक राहत असत. ह्या जातींचीं नांवें कशीं पडलीं, व त्यांत भेद काय, ह्यांविषयीं खात्रीलायक माहिती सांगणें कठीण आहे. निरनिराळ्या ग्रंथकारांत ह्यांसंबंधानें मतभेदही फार आहे. तुर्क, तार्तार, मोगल, मांचू ह्या सर्वांस सिथियन अशीही संज्ञा दिलेली आढळते. मांचू व मोगल हे बहुतेक एकच. बुखाऱ्याचे आसपास व पश्चिमेस जे राहत, ते बहुधा तुर्क होत. उत्तरभागीं सैबीरिया वगैरे प्रांतांत तार्तार राहत. पूर्वभागीं मोगल असत. ह्या सर्व लोकांची वहिवाट एक ठिकाणीं स्थायिक राहण्याची नव्हती. आपले गुरांचे कळप व तंबू बरोबर घेऊन ते मनास वाटेल तिकडे भटकत जात. मोगल हे विशेष शूर व धीट असत. मुसलमानी धर्म स्वीकारण्यापूर्वीं ते बुद्धधर्मी असून तिबेट-

च्या लामाचे अनुयायी होते. तातार लोकांनाच पुढें तुर्क अशी संज्ञा मिळाली असें मिल्ल् म्हणतो. इराणच्या प्राचीन राजांस या सर्व जातींच्या टोळधाडी नेहमी जर्जर करीत असत.

आरब, मोगल व तुर्क हे सर्व जरी आज मुसलमान खरे; तरी त्यांच्यांत विशेष साम्य नाहीं. मूळ अस्सल मुसलमान आरब होत. ह्यांस 'सॅरॅसिन' असेंही नांव आहे. त्यांची नीति व संस्कृति उच्च प्रतीची असून, त्यांजपासून जगाच्या संस्कृतींत कांहीं तरी भर पडली आहे. तसा प्रकार तुर्क व मोगल ह्यांचा नाहीं. ह्या दोघांचेंही मूळ ठिकाण मध्यआशिया होय. मनुष्य जातीच्या वर्गीकरणांत* ह्यांस तुराणी (तुरेनियन) असें नांव आहे. इराणांतले ते इराणी व तुराणांतले ते तुराणी. तुराण ह्मणजे इराणच्या उत्तरेकडील व सैबीरियाच्या दक्षिणेकडील प्रदेश,—ज्यास हल्लीं तुर्कस्थान म्हणतात तो. ह्याच प्रदेशापैकीं पश्चिमेच्या बाजूचे ते तुर्क व पूर्वेच्या बाजूचे ते मोगल. पूर्वेची बाजू म्हणजे चीनच्या उत्तरेकडील मोंगोलिया प्रांत. मोगलांच्या वस्तीचें ठिकाण तें मोंगोलिया. स्वभावानें व संस्कृतीनें मोगल व तुर्क जवळ जवळ सारखेच. दोघेही मूळचे रानटी व धनगरी पेशाचे. जाळपोळ, लढाई वगैरे करीत देशोदेशीं भटकण्याचा दोघांचाही परिपाठ. मोगलांच्या शरीररचनेंत थोडें चिनी मिश्रण होतें. हें वास्तविक तुर्क व मोगल ह्यांचें त्या वेळचें स्वरूप होय; हल्लींचें नव्हे. अलीकडच्या घडामोडींत त्यांचें मूळचें स्वरूप अगदीं बदलून गेलें आहे. राज्यव्यवस्था, इमारतींचें बांधकाम, रस्ते, कालवे इत्यादि सार्वजनिक कामें हिंदुस्थानांत व इतरत्र ह्या तुराणी मुसलमानांनीं केलीं, तीं त्यांनीं स्वयंस्फूर्तीनें केलेलीं नव्हत.

---

* पृथ्वीवरील एकंदर मानव जातीच्या मूळ कुळी व त्यांचे भेद ठोकळ मानानें समजणें प्रत्येकास जरूर असल्यामुळें, पुढील पानावर एक कोष्टक दिलें आहे. शरीर रचनेवरून एकंदर मानव जातीच्या तीन मूळ कुळी समजतात; त्यांचे पोटभेद भाषेवरून ठरविण्यांत आले आहेत. पुढील कोष्टकांत उजवीकडचे सर्व पोटभाग भाषांवरून ठरविण्यांत आले आहेत. हीब्रू, क्रिस्ती, व मुसलमान हे तीनही एकेश्वरी धर्म सेमेटिक राष्ट्रांत उत्पन्न झाले हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. मुसलमान किती मिश्र आहेत हें ह्या कोष्टकावरून ध्यानांत येईल. हें कोष्टक प्रो. मायर्सच्या पुस्तकांतून घेतलें आहे.

त्यांचा मूळचा स्वभाव क्रूर, विध्वंसक, परहिताविषयीं निष्ठुर व मानवी संस्कृतीला विरोधी असा होता. चंगीजखान, तयमूरलंग, नादीरशहा, इत्यादिकांच्या ठिकाणीं हा स्वभाव स्पष्ट दिसून येतो. बाकी मोगलांच्या व तुर्क सुलतानांच्या अमदानींत हिंदुस्थानांत जीं कांहीं लोकहिताचीं कामें झालीं, तीं त्या त्या ठिकाणच्या संसर्गानें व परिस्थितीच्या प्रभावामुळें झालीं.

**२. तुर्क लोक–सेल्जुक व ऑटोमन.**—त्या वेळच्या मुसलमानांविषयीं बोलतांना आपला बराच गैरसमज असतो. आरंभींचे खरे मुसलमान म्हणजे आरब. आरंभीं मुसलमानी धर्म व राज्य पृथ्वीवर चहूंकडे वाढविलें तें आरबांनीं वाढविलें. पण पहिल्या सिंध-

---

१ कृष्णवर्ण—( इथिओपियन अ० नीग्रो ) ह्यांचें मूलस्थान आफ्रिकेचा मध्य व दक्षिण भाग.

२ पीतवर्ण—( मोंगोलियन अ० तुराणी )—( १ ) चिनी, जपानी, व पूर्वआशियांतले दुसरे कित्येक लोक; ( २ ) मध्य व उत्तर-आशियांतले धनगरी पेशाचे कित्येक लोक ( उ० मोगल, तुराणी वगैरे ); ( ३ ) युरोपांत,–तुर्क, हंगेरियन मॅग्यार्स, फिन्स्, लॅप्स्, व बास्क्स् वगैरे.

३ गौरवर्ण ( कॉकेशन )—
- हॅमिटस्.
  - १ इजिप्शन्स्.
  - २ लिबियन्स्–उत्तर आफ्रिकेंतले हल्लींचे बर्बर्स.
- सेमिटस्.
  - १ बॅबिलोनियन्स्, २ आसीरियन्स्, ३ फिनिशियन्स्, ४ हीब्र्यूस्, ५ अरामियन्स्, ६ आरेबियन्स्.
- आर्य अगर इंडो-युरोपियन.
  - आशियांतले.–१ हिंदू, २ मीडीज, ३ पर्शियन्स्.
  - युरोपांतले जुने.—१ ग्रीक. २ रोमन.
  - सेल्ट्स्. १ गॉल्स्, २ ब्रिटन्स्, ३ स्कॉट्स्, ४ पिक्ट्स्.
  - ट्यूटन्स्. १ जर्मन्स्, २ इंग्लिश, ३ स्कांडिनेव्हियन्स्.
  - स्लाव्हज्.—१ रशियन्स्, २ पोल्स्, इ.

प्रांताच्या स्वारीशिवाय आरब लोक हिंदुस्थानांत आलेच नाहींत. इकडे आले ते मुख्यत्वें तुर्क होत. सिथियन्स, यवन, हूण, तुर्क, मोगल वगैरे लोकांनीं मध्यआशियांतील डोंगरसपाटीचा प्रदेश गजबजलेला असल्यामुळें लोकसंख्या फाजील वाढली, कीं त्यांच्या झुंडी पूर्वीपासून इकडे हिंदुस्थानांत व तिकडे युरोपांत पसरत. हिंदुस्थानच्या धर्मांत, भाषांत व आचारविचारांत ह्या लोकांच्या चालीरीतींचें मिश्रण दिसून येतें. सिथियन, यवन, व हूण हे ज्या वायव्यमार्गांनें हिंदुस्थानांत आले, त्याच मार्गानें तुर्क लोकांच्या झुंडी हिंदुस्थानावर आल्या, आणि शेवटीं त्यांनींच हा देश पादाक्रांत केला. बगदाद येथें आब्बासी वंशाचे खलीफा राज्य करीत असतां, त्यांच्या मूळच्या आरबी पेशांत इराणी व तुर्की वळणाचा मिलाफ झाला. इराणी लोकांचें महत्त्व हळूहळू वाढत गेलें आणि त्यांनींच ऑक्ससनदीच्या आसमंतात् सामानी वंशाचें राज्य स्थापिलें.

इराणी व आरब लोकांचे नेहमीं तंटे होत असल्यामुळें, बगदाद येथील खलीफांनीं स्वसंरक्षणार्थ आपल्याजवळ तरुण तुर्कांचा पाहरा नेमिला. ह्याप्रमाणें एकदां राज्यांत त्यांचा प्रवेश झाल्यावर, त्यांचें माहात्म्य वाढतां वाढतां, शेवटीं खलीफा सुद्धां त्यांच्या मुठींत आले; आणि लवकरच इजिप्टपासून समर्कंदपर्यंतच्या एकंदर टापूंतील राज्यकारभारांत व लष्करांत तुर्कांचाच विशेष भरणा झाला. पुढें मध्यआशियांतून तुर्कांचे आणखी आणखी थवे येऊन मुसलमान रियासतींत अमल गाजवूं लागले. समर्कंदच्या इराणी सामानी वंशाचा त्यांनीं पाडाव केला, आणि पुढें ते हिंदुस्थानांत शिरले. अलप्तगीन, सबक्तगीन, व महंमूद हे सर्व तुर्क होत.

अशा प्रकारें तुर्कांचें महत्त्व वाढलें. सामानी वंशांतील राजांनीं तुर्कांस आपल्या सत्तेखालीं आणून मुसलमान करून नोकरींत ठेविल्यावर, मुसलमानी धर्माचे ते कट्टे अभिमानी बनले. फौजेंत व खास रक्षणासाठीं सामानी सुलतान व बगदादचे खलीफा नोकरींत तुर्कांचा भरणा विशेष करीत. ह्यांनाच पुढें इजिप्टमध्यें मामलुक्स म्हणूं लागले. राज्याचीं कामें करूं लागतांच त्यांस आत्मप्रत्यय उत्पन्न झाला. लवकरच त्यांस आपलें महत्त्व कळून आलें. सामानी सुलतानांनीं खलीफांच्या पूर्वेकडील सत्तेचा नाश केला, त्याचप्रमाणें महत्त्वास चढलेल्या लष्करी बाण्याच्या ह्या तुर्क लोकांनीं

खलीफांचे पश्चिमेकडील प्रांत काबीज करून आपलें स्वतंत्र राज्य स्थापलें. आशियाखंडांत दोन तुर्कस्तान देश कां आहेत हें ह्या हकीकतीवरून समजणारें आहे. मध्यआशिया खंडांत मूळ तुर्कांची वस्ती होती, त्या देशास तुर्कस्तान हें नांव चालत आलें. पुढें खलीफांचें राज्य ह्यांनीं जिंकिलें, त्यासही तुर्कस्तान हें नांव मिळून, आज त्यास आशियाटिक टर्की म्हणतात. जरुसलेमच्या ' धर्मयुद्धांत ' ह्या तुर्क लोकांनींच आपलें नांव विशेष गाजविलें आहे. नामशेष झालेल्या खिलाफतीचा अंत सन १२५८त चंगीजखानाच्या वंशांतील मोगल लोकांकडून झाला.

तुर्कांच्या आरंभींच्या ह्या पराक्रमांशीं हिंदुस्थानचा संबंध नाहीं. पुढें जे मुसलमान योद्धे हिंदुस्थानांत आले, त्यांची मूळ हकीकत समजण्यास वरील हकीकत पुरे आहे. वर सांगितलेल्या जातींशिवाय अफगाण, बलुची, घोरी वगैरे अनेक जाती त्या त्या देशांच्या नांवावरून पुढें प्रसिद्धीस आल्या, त्यांची गणना तुर्कांतच करितात.

**सेल्जुक तुर्क,** (स. १०३७–१३००).—सेल्जुक तुर्कांचा प्रभाव मुसलमानांच्या इतिहासांत फार महत्त्वाचा आहे. त्यांचें प्रस्थ वाढलें, तेव्हां बगदादच्या खिलाफतीचा अस्तच झाला होता. शिया व सुनी यांचे तंटे विकोपास जाऊन सर्व मुसलमानांत दंगल उडून राहिली होती. अशा स्थितींत ताज्या दमाच्या रानटी तुर्क लोकांची भर इस्लामांत पडली. त्यांनीं मुसलमानी धर्म स्वीकारिला आणि दक्षिणेस व पश्चिमेस हल्ले सुरू केले. इराण, सिरिया, आशियामायनर इत्यादि ठिकाणीं जे निरनिराळे राजवंश अंमल करीत होते, त्यांचा त्यांनीं उच्छेद करून, अफगाणिस्तानपासून भूमध्यसमुद्रापर्यंतचे विसकळीत प्रदेश पुनरपि एका अमलाखालीं आणिले. कान्स्टांटिनोपलचे रोमन बादशहा पुनरपि आपले प्रांत परत घेऊं लागले होते, त्यांजला ह्या सेल्जुक तुर्कांनीं परत हटवून जरुसलेमसाठीं झगडणाऱ्या क्रिस्त्यांची खोड मोडली. क्रिस्तीमुसलमानांच्या प्रचंड धर्मयुद्धांत मुसलमानांचें नांव गाजविणारे हे सेल्जुक तुर्क होत.

तुर्कस्तानांत 'सेल्जुक' नांवाचा एक खान होता, त्याचेंच नांव पुढें त्याच्या अनुयासांस मिळालें. सेल्जुकनेंच प्रथम बुखाऱ्यास जाऊन मुसलमानी धर्म स्वीकारिला. सामानी मुसलमानांच्या वतीनें गज्नवी महंमुदाशीं झगडणारे सेल्जुक तुर्कच होत. तुघ्रलबेग हा सेल्जुक तुर्क. त्यानें व त्याचा

भाऊ चागरबेग ह्यांनीं गज्नीच्या ताब्यांतील तुर्कस्तानचा प्रदेश जिंकून तेथें आपलें स्वतंत्र राज्य स्थापिलें. सन १०५५त तुघ्रलबेगनें बगदाद शहरांत प्रवेश करून तेथें आपण सुलतान झाला. पुढें दुसऱ्या अनेक तुर्क टोळ्या त्यास सामील झाल्या, आणि स. १०७७त विस्तृत सेल्जुक राज्याची स्थापना झाली. तुघ्रलबेग ( स. १०३७–१०६३ ), नंतर आर्स्लान (स.१०६३–१०७२), व मलीकशहा (स.१०७२–१०९२), हे तीन पराक्रमी सुलतान सेल्जुकांचे झाले. पुढें त्यांचें राज्य फुटून, त्याचे अनेक विभाग झाले. सुलतान संजर हा शेवटचा मोठा सेल्जुक सुलतान होय, ( स. १११७–११५७ ). सेल्जुक सुलतानांच्या पदरीं कित्येक सरदार प्रसिद्धीस आले, त्यांस ' आटाबेग ' असें नांव होतें. ' आटाबेग ' ह्याचा अर्थ ' अल्पवयस्क राजाचे संरक्षक ' असा आहे. सेल्जुक सुलतानांच्या पदरीं मामलुक नांवाचे तुर्क गुलाम होते, हें वर सांगितलेंच आहे. हेच मामलुक पुढें बलवान झाले, आणि त्यांच्याशिवाय सुलतानांचें कांहींच चालेनासें झालें. हळू हळू तेच सुलतान बनले. ह्या सुलतानांस ' आटाबेग ' ह्या नांवानें ओळखितात. बाराव्या शतकांत सर्व सेल्जुक बादशाहीचा प्रांत अशा अनेक आटाबेग सुलतानांच्या ताब्यांत होता.

सिरिया देश सेल्जुक तुर्कांच्या हातांत जाण्याबरोबर तेथील क्रिस्ती लोकांचा छळ होऊं लागला. आरब खलीफा क्रिस्ती लोकांस त्रास देत नसत. पण ह्या तुर्कांचें पाणी कांहीं निराळेंच होतें. मोगलांसारखेच ते क्रूर व जाळपोळ करणारे होते. त्यांनीं जरुसलेम काबीज करून तेथील क्रिस्ती मंदिरें जमीनदोस्त केलीं, तेव्हां युरोपच्या क्रिस्ती लोकांनीं एक होऊन मुसलमानांशीं धर्मयुद्धें सुरू केलीं, (ब्रिटिश रियासत प्र० २, क०२). ह्या युद्धांत तुर्कांस आरबांची मदत मिळाली नाहीं. आरबांत व तुर्कांत वैरभाव होता. नीतीनें व आचारानें ते जसे अगदीं भिन्न होते, तसेच ते धर्माच्या बाबतींतही होते. त्या दोघांची एकी झाली नाहीं, म्हणूनच दोनशें वर्षेंपर्यंत क्रिस्ती लोक ह्या सेल्जुक तुर्कांशीं मोठमोठीं युद्धें लढूं शकले. आरब व तुर्क एक झाले असते, तर त्यांनीं पहिल्याच प्रथम क्रिस्त्यांचा संपूर्ण नाश करून एकंदर युरोपखंड खाऊन टाकिलें असतें. सेल्जुक तुर्कांनीं जें राज्य स्थापिलें, त्याच्यांत लवकरच पुष्कळ अव्यवस्था सुरू झाली, व त्याचे अनेक तुकडे झाले. ही अव्यवस्था चालू असतांच

क्रिस्त्यांशीं त्यांचीं युद्धें चालू होतीं. ह्या दोन गोष्टींचा फायदा युरोपच्या क्रिस्त्यांस मिळून मुसलमानांपासून युरोपचा बचाव झाला. बाराव्या शतकांत सेल्जुक तुर्कांस बास्फोरस ओलांडून कॉन्स्टांटिनोपल हस्तगत करितां आलें नाहीं, हें क्रिस्ती युरोपाचें सुदैव होय, (Myers).

**ऑटोमन तुर्क.**—युरोपांत ज्या तुर्कांचें आज राज्य आहे, त्यांस ऑटोमन तुर्क (Ottoman Turks) असें म्हणतात. हे मूळ खुरासान प्रांतांतले राहणारे. मोगलांनीं खुरासान प्रांत काबीज केला, तेव्हां हे तुर्क तेथून निघून आशियामायनरांत सेल्जुक तुर्कांच्या पदरीं येऊन राहिले. तेराव्या शतकांत आर्तोग्रल नांवाचा त्यांचा एक सरदार, एक हजार अनुयायांनिशीं भटकत भटकत अंगोरा शहरानजीक आला. त्या वेळीं तेथील सेल्जुक सुलतान एका शत्रूशीं लढत होता, त्यास आर्तोग्रलनें मदत करून जय मिळवून दिला. हे आर्तोग्रलचे उपकार स्मरून सेल्जुक सुलतानानें त्यास आपल्या शहरांत राहण्यास जागा दिली. आर्तोग्रलचा मुलगा उस्मान हा पुढें फार पराक्रमी निघाला. त्यानें आशियामायनरांतील सेल्जुक सुलतानांचें राज्य काबीज केलें. ह्या उस्मानच्या नांवावरून त्याच्या अनुयायांस 'उस्मानी तुर्क' असें म्हणूं लागले. पुढें 'उस्मान' शब्दाचा (उस्मान—ओस्मान—ओथमान—ओथोमान—ऑटोमन, अशा परंपरेनें,) युरोपियन भाषांत अपभ्रंश झाला. उस्मान स. १२५८ त जन्मला; आणि त्यानें स० १२८८ पासून १३२६ पर्यंत राज्य केलें. उस्मानचा मुलगा ओर्खान ह्यानें त्यांत आणखी भर घातली. हे सुल्तान नवीन प्रदेश जिंकीत, तेव्हां तेथील क्रिस्ती लोकांस गुलाम करून आपल्या नोकरीस लावीत. त्यांपैकीं तरुण व देखणे मुलगे निवडून त्यांची त्यांनीं एक नवीन पलटण बनविली, तीस त्यांनीं जॅनिझरी (Janizaries) (जाननिसारी=जीव संरक्षक,) असें नांव दिलें. पुढें लढाया बंद झाल्या, तरी जॅनिझरी पलटण कायम राहवी म्हणून दरसाल सर्व क्रिस्ती प्रांतांनीं मिळून दोन हजार तरुण क्रिस्ती मुलें सुलतानांचे नोकरीस द्यावीं, असा क्रिस्त्यांकडून ठराव करून घेतला. मुलें आठ वर्षांचीं असतांना निवडून घेत; आणि त्यांस उत्तम लष्करी शिक्षण देऊन तयार करीत. ही जॅनिझरी पलटण सुलतानाच्या खास शरीराचें व राज्याचें संरक्षण करण्यासाठीं

सदैव त्याच्या संनिध राहत असे. हा प्रघात तीनशें वर्षें चालला, आणि त्यामुळेंच आटोमन तुर्कांचें राज्य पुष्कळ दिवस टिकलें.

स. १३५८ त आटोमन तुर्कांनीं सुलतान मुरादचे हाताखालीं हेले-स्पांटची सामुद्रधुनी ओलांडून युरोपांत प्रवेश केला, तेव्हांपासून पुढील चाळीस वर्षांत सबंध बाल्कन-द्वीपकल्प त्यांचे ताब्यांत गेला. मुरादनें स. १३६० पासून स. १३८९ पर्यंत राज्य केलें. मुरादच्या नंतर बाय-जीद सुलतान झाला. त्यानें आणखी अनेक प्रांत काबीज करून बल्गे-रिया प्रांतांत निकोपोलिस येथें क्रिस्त्यांच्या अति मोठ्या जमावाचा पराभव करून हजारों लोकांस कापून काढिलें, (स. १३९६). त्याबरोबर युरोपांतील सर्व क्रिस्ती राष्ट्रांची पांचांवर धारण बसली. रोम जिंकून तेथें आपली राजधानी करावी असा बायजीदचा विचार होता. पण त्या अगोदर कॉन्स्टांटिनोपल जिंकण्याचा उद्योग त्यानें हातीं घेतला. इतक्यांत पूर्वेकडून तयमूरलंगानें त्याच्या राज्यावर स्वारी केली, आणि अंगोरा येथें बायजीदचा पराभव केला, तेणेंकरून यूरोपखंड जिंकण्याचें तुर्कांचें काम कांहीं दिवस बंद पडून कॉन्स्टांटिनोपलचा थोडा वेळ बचाव झाला. पुढें सुलतान पहिला महंमद व दुसरा मुराद ह्यांनीं पुनरपि विजय संपादून युरोपांत आपली सत्ता बसविली. दुसरा महंमद (स. १४५१-८०,) ह्यानें कॉन्स्टांटिनोपल शहरास वेढा घालून तें काबीज केलें. त्या योगें, सेंटसोफाया मंदिरावर क्रिस्त्यांचा क्रूस एक हजार वर्षें फडकत होता, तेथें मुसलमानांचा चांद फडकूं लागला, तो अजून तसाच फडकत आहे. पुरातन रोमन बादशाहीच्या प्रचंड वैभवाचें हें प्रसिद्ध शहर मुसलमानांच्या हातांत पडल्यानें (स. १४५३) जगाचा भावी इतिहास बदलून गेला. (ब्रिटिश रियासत, पृ० ६१ पहा.) स. १४७५त क्रिमियाचा द्वीप-कल्प तुर्कांचे हस्तगत झाला; आणि पुढें हळू हळू त्यांचा प्रवेश इटलींत सुद्धां झाला. सुलतान पहिला सलीम ह्यानें आठच वर्षें राज्य केलें, पण त्या आठ वर्षांत इराण, आरबस्तान, इजिप्ट वगैरे देश ऑटोमन तुर्कांच्या हस्तगत होऊन, पैगंबराच्या अस्थि व खिलाफतीचें पद सलीमास प्राप्त झालें, तें अद्यापि त्याच्या वंशांत चालू आहे. पुढें सुलतान सुलेमाननें आणखी विजय संपादिले, त्यांवरून त्यास 'धि ग्रेट' असें नांव मिळालें आहे, (सन १५२०-१५६५). स. १५२२त ऱ्होड्स् बेट व स. १५२६त

हंगेरी देश सुलेमानच्या हस्तगत झाले. हंगेरी देश पुढें दीडशें वर्षे तुर्कांच्या ताब्यांत होता. सुलेमानच्या वेळेस युरोपांत अनेक पराक्रमी राजे राज्य करीत होते, पण त्याजपुढें कोणाचाही निभाव लागला नाहीं. भूमध्य-समुद्रावरही त्यानें आपला ताबा बसविला. उत्तरेस हंगेरींत बुदापेस्त, दक्षिणेस नीलनदीवर आस्वान ( Assuan ), पश्चिमेस जिब्रॉल्टर, आणि पूर्वेस यूफ्रेटिसनदी एवढा टापू सुलेमानच्या ताब्यांत होता. त्या वेळीं सर्व यूरोपखंड पुनरपि इस्लाममय होण्याचा समय आला होता.

पण सुलेमानच्या पश्चात् तुर्कांच्या सत्तेस ओहोट लागली. सतराव्या शतकांत युरोपांतील बरेच प्रदेश त्यांच्या ताब्यांतून गेले. एकोणिसाव्या शतकांत ग्रीस, इजिप्ट, आल्जियर्स, ट्यूनिस हे प्रांत स्वतंत्र झाले. उत्तरेकडून रशियानें तुर्कांस खूब चेपलें, पण इतर राष्ट्रांनीं मध्यें पडून रशियाचा हात थांबविला. येणेंप्रमाणें गेल्या साडेचारशें वर्षांत तुर्कांचा उत्तरोत्तर ऱ्हास होऊन, आतां हें राज्य साफ बुडणार असा प्रसंग येऊन ठेपणार, इतक्यांत नुकतीच ( स. १९०८ त ) राज्यक्रांति होऊन, नवीन प्रजासत्ताक राज्यव्यवस्था सुरू झाली आहे. हा नवीन प्रयोग सर्व लोक मोठ्या उत्सुकतेनें पाहत आहेत. मक्केच्या आगगाडीनें मुसलमानांच्या एकीकरणास पुष्कळ मदत होणारी आहे.

**३. मोगल लोक,–उत्पत्ति स्वभाव वगैरे.**—हिंदुस्थानांत मोगल बादशाही पुढें स्थापन झाली, ती स्थापन करणारे कोण व त्यांच्या मूळ रीतिभाती काय हें समजणें जरूर आहे. हिंदुस्थानांत मोगल लोक नवीनच आले. मोगल बादशाही होण्यापूर्वीं कित्येक शतकेंपर्यंत हिंदुस्थानांत मोगल लोक स्वाऱ्या करीत होते. पण राज्य असें तुर्क अफगाणांचें होतें. मोगलांमध्यें व या इतर जातींमध्यें पुष्कळ भेद होता. ह्या मोगल लोकांच्या संसर्गापासून हिंदुस्थान, पश्चिमआशियाखंड व यूरोपचा कांहीं भाग इतक्यांवर नाना प्रकारचे चिरस्थायी परिणाम घडून आले आहेत. पूर्वीं चंगीझखान व तयमूर वगैरे पराक्रमी पुरुष होऊन गेले, ते मूळचे मोगलच होत.

मोगल हे प्रथमतः मुसलमान नव्हते. आरंभीं ते मूर्तिपूजक असावेत. कोणी म्हणतात ते तिबेटच्या लामाचे भक्त होते. त्यांच्या धर्मनिष्ठेंत कडवेपणा नव्हता. धर्मसंबंधांत ते संशयी, ढिले व बेपर्वा असत. मुसलमानी धर्म हें पातळ आवरण पुढें त्यांनीं केवळ बाहेरून आपल्या अंगावर

धारण केलें होतें, तें फाटून आंतला खरा प्रकार अनेक प्रसंगीं उघड दिसे. आर्य, बौद्ध, क्रिस्ती वगैरे धर्मांचें मिश्रण त्यांच्या अंतर्यामीं दिसून येतें. म्हणून कट्टे मुसलमान व सौम्य हिंदु यांच्या दरम्यान मोगल एक-प्रकारें नवीन घुसले.

मोगलांच्या इतिहासाचे किंवा जीवनकालाचे तीन भाग आहेत. ते तीन क्रम म्हटले तरी चालतील. प्रथमतः हे तातार किंवा तुराणी वळणाचे होते. नंतर तुर्कांच्या सहवासाचें त्यांच्यांत मिश्रण झालें, आणि सरशेवटीं हे इराणी वळणावर गेले. तीनही अवस्थांत त्यांचा बाह्य आकार बदलला, पण अंतर्यामींचा स्वभाव कायम राहिला.

चीनच्या उत्तरेकडील मोंगोलिया प्रांत हें त्यांचें राहण्याचें मूळ ठिकाण होय. तेथें त्यांचा आकार चिनी धरतीचा होता. नंतर चवदाव्या व पंधराव्या शतकांमध्यें ते मध्यआशिया खंडांत येऊन राहिले, व आपणास तुर्क म्हणवूं लागले. पुढें दक्षिणभागांतील स्त्रियांबरोबर त्यांनीं लग्नें केलीं, तेव्हां त्यांच्या संततींत फरक पडला. पूर्वीचा पिंगट रंग, उंच कपोलास्थी, पसरट नाकें, अरुंद व लांबोळे डोळे, मोठीं तोंडें, इत्यादि जुन्या मोगलांचे विशिष्ट अवयव बदलून गेले. चेहऱ्यावर लाली येऊन दिल्लीच्या तुर्क मुसलमानांप्रमाणें तो सुंदर व फुगीर झाला. मुसलमानांच्या मध्यवस्तींत राहिल्यामुळें ते मुसलमान झाले, किंवा आपण मुसलमान आहों असें सांगणें त्यांस भाग पडलें.

अमीर खुस्रू नांवाचा एक कवि बल्बनचा मुलगा महंमद ह्याच्या पदरीं होता, त्यानें मोगलांचें वर्णन फार चांगलें केलें आहे. 'लोहमय शरीर, विस्तवासारखे चेहरे, आंखूड मान, सुरकुतलेले गाल, केंसाळ व रुंद नाकपुड्या, अजगर तोंडें, राठ कातडी, व त्यांच्या अंगाची भयंकर दुर्गंध ह्यांच्या योगानें कोण मनुष्य भिऊन गर्भगळीत होणार नाहीं ! हीं भुतें पाहून लोक दूर पळून जात आणि म्हणत, देवानें हीं कशाचीं घडलीं कोण जाणे !'

स. १३९८त हिंदुस्थानावर स्वारी करणारा तयमूर हा मोगल होता. त्याच्या वेळेस सार्वजनिक समारंभांत पुरुषांबरोबर बायकाही मोठमोठ्या शामियान्यामध्यें उघड्या येऊन बसत. हिंदुस्थानांत मोगलांनीं आपला

अंमल स्थापन केल्यावर बायकांस पडद्यांत ठेवण्याची चाल पूर्वींच्या तुर्क मुसलमानांतून किंवा रजपूत हिंदूंपासून मोगलांनीं उचलली असावी, असा व्हीलरचा तर्क आहे. हुमायून बादशहाच्या वेळेपासून इराणी पाणी मोगलांत शिरूं लागलें. त्याचा मुलगा अकबर तर ज्यास्तच इराणी होता. तथापि या दोघांमध्यें पूर्वीचा मोगली स्वभाव स्पष्ट दिसत होता.

मोगल लोक रानभर भटकणारे होते. अज्ञातकाळापासून त्यांच्या टोळ्या उत्तरआशियांतील सपाट प्रदेशांत भटकत असत. त्यांची वस्ती स्थायिक नसे. गाड्यांवर झोंपड्या बांधून त्यांत ते राहत. त्या झोंपड्या वाटेल तेथें त्यांना नेतां येत. उन्हाळ्यांत एक ठिकाणीं तर हिंवाळ्यांत दुसऱ्या ठिकाणीं; ह्याप्रमाणें खेपा घालण्यांत त्यांचा सर्व काळ निघून जाई. पिढ्यानुपिढ्या ते आहेत तसे असत. त्यांचा जीवनक्रम कधीं बदलत नसे. एखादे वेळेस ते अवाढव्य तुफानाप्रमाणें एखाद्या देशांत घुसून त्याची दाणादाण करून सोडीत;आणि सर्व जगतास हालवून सोडणाऱ्या झंझावातासारखा चोहींकडे धुमाकूळ मांडीत. सर्वांवर वचक बसविणाऱ्या बुद्धिमान नायकांच्या हाताखालीं मोगल स्वारांचे जमाव देशभर हिंडत. ते सर्व प्रदेश लुटून फस्त करीत, तेव्हां हे निराळ्याच जगांतून नवीन राक्षसच आले आहेत कीं काय, असें लोकांस वाटे. किंचित् कालपर्यंत त्यांच्या नांवाच्या दराऱ्यानें सर्व लोकांस दहशत बसे. लगेच ते एकदम कोणीकडे गडप होत. विशाळ फौजा तयार करून ते राज्यें पादाक्रांत करीत. कांहीं काळपर्यंत सर्वांच्या अंगीं सारखा चेव जागृत राही. सर्व जग पाडाव केल्याप्रमाणें त्यांचें वैभव क्षणांत शिखरास पोंचे. नंतर चैन व विलास करण्यांत त्यांच्या शक्तीचा क्षय होई. पुनः पाहवें तों कोठें कांहीं नाहीं. ज्वालामुखी पर्वताचा स्फोट आटपून गेल्यावर जसें लोकांस त्याजविषयीं कांहीं भय वाटेनासें होतें, तशीच ह्या मोगल लोकांची स्थिति होती. एका क्षणांत ते सर्व पृथ्वीस कांपवीत, दुसऱ्या क्षणांत नाहींसे होत. ह्या रानटी लोकांची टोळधाड नाशकारक असे. धर्मोपदेश करण्यास त्यांजपाशीं धर्म नव्हता; सुधारणेचें आरोपण करण्यास यांजपाशीं बीज नव्हतें. धर्मस्वीकार केला किंवा खंडणी दिली म्हणजे मुसलमान लोक जिंकलेल्या लोकांस सोडून देत. पण हे मोगल लोक जेथें जेथें जात, तेथील लोकांची कत्तल करून त्यांचें सर्वस्वापहरण केल्याशिवाय परतत नसत. सर्व मुलुखाची नासाडी

हा मात्र त्यांच्या आगमनाची निशाणी मागें राही. तातार लोक अंतःकरणाचे फारच कठोर; त्यांना दयामाया म्हणजे काय हें ठाऊक नव्हतें. सर्व तातार लोकांपैकीं मोगल लोकांत ज्यास्त कुवत होती. चंगीझखान हा त्यांपैकीं वर सांगितलेल्या प्रकारचा एक तुफानी राक्षस होता. त्यानें व त्याच्या कित्येक अनुयायांनीं बादशाही पद भोगिलें. चंगीझ व त्याचे अनुयायी, कळप चारण्यासाठीं स्थलांतर करण्याचें काम सोडून देऊन, पूर्वेस चीनच्या समुद्रापासून पश्चिमेस काळ्या समुद्रापर्यंत, व उत्तरेस सैबीरियांतील सपाट प्रदेशापासून दक्षिणेस समर्कंद इस्पहानपर्यंत, देश जिंकीत गेले. त्यांच्या लष्करचे तळ म्हणजे मोठमोठीं शहरें होत. हे तळ देण्याची व त्यांत रस्ते वगैरे करून सर्व सोई करण्याची त्यांची शिस्त ठरलेली होती. आपला तंबु कोठें उभारावा व कोणचा तंबु कोठें सांपडेल, हें प्रत्येकास बरोबर ठाऊक असे. राजाचे तंबु म्हणजे मोठमोठे राजवाडेच असत. ते पुष्कळ द्रव्य खर्चून सुशोभित केलेले असत. त्यांजवर झाडांचीं व प्राण्यांचीं चित्रें काढिलेलीं असत. प्रत्येक खानास पुष्कळ बायका असत, व प्रत्येक बायकोचे तंबु व गाडे नेमिलेले असत.

मोगल हे मूळचे अज्ञानी पण स्वभावानें चौकस होते. ते उद्दाम व गर्विष्ठ असत. ते आपलीं कामें नोकरांकडून करवीत. हलकीं कामें करणें त्यांस आवडत नसे. त्यांचे नोकर म्हणजे लढाईंत पकडून गुलाम केलेले बायका व पुरुष. घरांतील सर्व व्यवस्था बायकांकडे सोंपलेली, व सर्व बाहेरचें काम नोकरांकडे सोंपलेलें असे. युद्ध किंवा शिकार हीं दोन कामें मात्र ते स्वतः करीत. खाण्यापिण्याची चैन म्हणजे त्यांच्या सुखाचा कळस. ते नाना प्रकारचीं मद्यें प्राशन करीत. नोकरांस सभोंवार नाचण्यास लावून बायकांशीं आपण खेळत बसत. ते स्वभावाचे मोकळे, परंतु संशयी व रागीट होते. त्यांच्या स्त्रिया व्यवस्थित व शुद्धाचरणी असत. त्यांच्यांत व्यभिचार हा अत्यंत भयंकर गुन्हा समजला जाई. त्या गुन्ह्यास चंगीझखानानें मरणाची शिक्षा ठरविली होती.

तेराव्या शतकांतील मोगलांचे धर्माचार हिंदूंच्या आचारांशीं बरेच मिळते होते. त्यांचा जो जुना धर्म होता, त्याचें आर्यधर्माशीं साम्य होतें. पंचमहाभूतांस ते आपल्या अन्नाचा अवशेष अर्पण करीत. प्रत्येक घरांत मूर्ति असे, तिची ते मनोभावानें पूजा करीत. आपल्या पेयाचा अंश ते

जमिनीवर व घोड्यांवर टाकीत. ब्राह्मणांसारखे त्यांच्यांत उपाध्याय होते, ते ज्योतिष पाहत, शकुन सांगत व ग्रहणें वर्तवीत. हिंदु योग्यांप्रमाणें त्यांच्यांतही अंगास राख फांसलेले साधु असत, ते आपल्या तपाच्या व पवित्राचरणाच्या बळावर पुष्कळ चमत्कार करून दाखवीत. ते अनेक देवांची पूजा करीत. क्षत्रियांप्रमाणें त्यांस मांस आवडे. पाहिजे त्या प्राण्याचें मांस ते खात, मग तो सहजगत्या मेलेला असला तरी हरकत नसे. त्यांचा लग्नविधि म्हणजे मुलगी पळवून नेणें होय. त्यांच्या बायकांस पडदा नसे. बायका सर्व समारंभांत उघडपणें बाहेर येत. विधवांनीं सती जाण्याची चाल त्यांच्यांत नव्हती. मेलेल्या भावाच्या बायकोशीं दुसरा भाऊ लग्न करी.

मोगल लोक आपला मूळचा धर्म जरी विसरले नाहींत, तरी ते दुसरा पाहिजे तो धर्म स्वीकारीत. असें धर्मांतर करण्यांत त्यांची खरी निष्ठा कितपत असे तें समजत नाहीं. नांवानें तरी बहुतेक मोगल पुढें मुसलमान झाले होते; कित्येक क्रिस्ती झाले व कांहीं बुद्धधर्मी झाले. ज्यांनीं आपला धर्म बदलला नाहीं, ते येशू, महंमद, मोझेस, किंवा बुद्ध ह्यांपैकीं कोणा तरी एकाचे ते अनुयायी होत. चंगीझखानाचा कायदाच असा होता, कीं जो गुरु परमेश्वर एक आहे असें शिकवील त्यास सर्वांनीं भजलें पाहिजे. मोगलांच्या ह्या स्वभावाचें उदाहरण त्यांच्या पुढील इतिहासांत दरएक ठिकाणीं आढळतें. स. १२००–१३०० च्या दरम्यान त्यांनीं मुसलमानी धर्म स्वीकारिला. ‘मोगल लोक हिंदूंप्रमाणें जुन्यासच चिकटून राहणारे नव्हते. दुसऱ्यांतलें चांगलें असेल तें घ्यावें व नवीन सुधारणा संपादन करावी अशी त्यांस हांव असे’.*

मोगल बादशहा धर्माच्या बाबतींत आग्रही नव्हते. लोकांस खूष ठेवण्याकरितां ते तसे वागत किंवा खरोखर ईश्वराविषयीं ते बेपर्वा होते, असें नाहीं. तर तो त्यांच्या अत्यंत लोभी स्वभावाचा परिणाम होय. जगामध्यें सर्वव्यापी लोक त्यांच्यासारखे दुसरे नाहींत. देशांतलि लोक कोणत्याही धर्माचे असले तरी त्याची त्यांस पर्वा नसे. ते वाटेल त्या देवाची पूजा करीत व बिकट प्रसंगीं वाटेल त्या साधूचा अनुग्रह मागत.

* The Moguls are progressive and assimilative and not exclusive like the Hindus.—Lane Poole.

इहलोकचीं सर्व प्रकारचीं संसारसुखें मिळण्यासाठीं ते एक किंवा अनेक देवांस भजत.

ऐतिहासिक कालांत युरोपावर तीन मोठे घाले आले. पहिला घाला यूरोपच्या उत्तरेकडून गॉथ वगैरे रानटी लोकांनीं घालून रोमन बादशाहीचा विध्वंस केला, ( स. ४१० ). ह्या घाल्यामुळें युरोपीय सुधारणेचें नुकसान न होतां, तिचा फायदाच झाला. रोमन बादशाहीच्या जीर्ण सुधारणेला, ह्या रानटी लोकांच्या ताज्या दमाची व प्रखर तेजाची नवीन पुष्टि मिळाली. दुसरा हल्ला आरब मुसलमानांनीं आठव्या शतकाच्या आरंभीं केला, त्यांत त्यांनीं पश्चिमेकडून स्पेन वगैरे प्रदेश जिंकिले. ह्या हल्ल्यामुळें युरोपीय सुधारणेचा कांहीं फायदा झाला व कांहीं नुकसान झालें. आरबांनीं बरेंच ज्ञान युरोपांत आणिलें, पण पुष्कळ गोष्टींचा नाशही केला. तिसरा हल्ला मध्यआशियांतील मोगल व तुर्क लोकांनीं केला. हा शेवटचा हल्ला सुमारें दोनशें वर्षें एकसारखा चालूच होता.

मोगलांच्या हल्ल्यानें यूरोपचें अतिशय नुकसान झालें. रशियावर स्वारी करून, तेथील बाल्यावस्थेंत असलेल्या सुधारणेचा चंगीझखान व त्याच्या मागून आलेले मोगल सरदार ह्यांनीं उच्छेद केला. रशियांत अनेक लहान लहान राज्यें होतीं. त्या सर्वांस मोगलांनीं जिंकिलें, आणि अडीचशें वर्षेंपर्यंत त्यांस आपल्या अंमलाखालीं ठेवून त्यांजपासून चोपून खंडणी घेतली. ह्या अडीचशें वर्षांच्या परचक्रांमुळें युरोपांत रशियन राष्ट्राचा भावी इतिहास बदलून गेला, आणि त्यास पुष्कळ वर्षे आपलें डोकें वर काढितां आलें नाहीं. अशीच स्थिति दक्षिणयुरोपांतील लोकांचीही झाली. ह्या कारणास्तव मोगलांच्या स्वारीचें एवढें महत्त्व आहे. मोगलांनंतर पुढें केव्हांही आशियाच्या लोकांनीं युरोपावर स्वारी करून तेथील लोकांवर आपला ताबा बसविलेला नाहीं.

आशियाखंडांत मोगल लोकांनीं भयंकर नुकसान केलें. मोठमोठ्या विस्तीर्ण प्रदेशांतील एकूणएक लोकसंख्या त्यांनीं नाहींशी केली, त्यामुळें ज्या अनेक राष्ट्रांचा निःपात झाला, त्यांच्या सुधारणेचा आज मागमूसही सांपडत नाहीं. आग्नेयीस यूरोपच्या तुर्कांचा प्रभाव व रशियांत मोगलांचा प्रभाव हे मात्र चिरकालीन राहिले.

४-७९१-२०००

परंतु वाइटापासून चांगलेंही निघत असतें. मोगलांच्या स्वाऱ्यांमुळें आशिया व यूरोप यांजमध्यें दळणवळणाचे मार्ग सुरू झाले. मोगलांनीं नवीन अफाट रस्ते बांधिले. सैबीरियन रेल्वे नुकतीच बांधण्यांत आली आहे; त्यापूर्वीं हे मोगलांचेच मार्ग दळणवळणासाठीं चालू होते. दोन खंडांमधील व्यापारी तांडे, निरनिराळ्या राष्ट्रांचे वकील, व एकंदर लोकांचें जाणेंयेणें ह्याच मार्गांनीं होत असे. अशा तऱ्हेचे हमरस्ते बांधण्याचें श्रेय प्रथम मोगलांनीं घेतलें. म्हणून मार्को पोलो सारख्यांचे प्रवास शक्य झाले. ह्या हमरस्त्यांमुळें प्राच्य लोकांचें ज्ञानभांडार, त्यांची संस्कृति, त्यांचे उदात्त विचार व त्यांच्या थोर कल्पना ह्यांचा लाभ युरोपास झाला; तेणेंकरून युरोपियन राष्ट्रांच्या ठायीं नवीन प्रगति उत्पन्न होण्याची सोय झाली.

**४. चंगीझखान व त्याचा वंश.**—उत्तरहिंदुस्थानांत तुर्क मुसलमान आपलें राज्य स्थापण्यांत गुंतले असतां, तिकडे मध्यआशियाखंडांत प्रचंड अनर्थपात चालला होता. वर सांगितलेल्या मोगल लोकांमध्यें चंगीझखान नामक एक महापराक्रमी पुरुष सन ११६३ सालीं जन्मला. वस्तुतः मोगलांचा खरा इतिहास ह्या चंगीझखानापासूनच सुरू होतो. गोबीच्या मैदानाच्या उत्तरेस ते आरंभीं राहत असत. मोगल हा शब्द दहाव्या शतकापर्यंत कोणासही ठाऊक नव्हता. आरंभीं एखाद्या पुरुषाच्या नांवावरून त्याच्या कुळीस मोगल हें नांव मिळालें असावें. त्यापूर्वीं चीनच्या राज्यांत त्यांचा अंतर्भाव होत असे. पहिल्यानें युझुगाई नांवाचा त्यांचा सरदार चीनपासून स्वतंत्र झाला. युझुगाई स. ११७५त मरण पावला. त्या वेळीं त्याचा मुलगा तेमुजिन हा तेरा वर्षांचा असून त्यानेंच पुढें पराक्रमी झाल्यावर सर्व सरदारांची एक मोठी सभा भरवून तींत चंगीझखान हें वडें नांव धारण केलें; ( स. १२०६ ). तो मोगल लोकांच्या एका टोळीचा लहानसा सरदार होता. त्यानें प्रथम भिन्न भिन्न तार्तार टोळ्यांस जिंकिलें; व अशा रीतीनें एक प्रचंड फौज जमा केली. ह्या फौजेस त्यानें कवाईत शिकवून युद्धकलेंत तरबेज केलें. पुढें तो देश जिंकीत चालला. त्यानें जेवढा मुलूख काबीज केला, तेवढा विस्तृत प्रदेश एकाच राजाच्या ताब्यांत आजपर्यंत कधींही आलेला नाहीं. त्याची बुद्धि तीव्र होती. त्याच्या लष्कराएवढें मोठें लष्कर पूर्वीं कोणाजवळही नव्हतें; आणि नंतरही

अद्यापपर्यंत कोणीं तसें बाळगिलें नाहीं. ह्या लष्करांत बहुतेक भरणा तुर्क लोकांचा होता. अशा तयारीनिशीं तो सर्व आशियाखंड जिंकीत चालला. सन १२१० पर्यंत पूर्वेस पूर्वसमुद्र, पश्चिमेस कास्पियनसमुद्र व उत्तरेस व्होल्गानदी इतका प्रदेश सहज रीतीनें त्यानें जिंकून फस्त केला. नंतर त्याची दृष्टि दक्षिणेकडे वळली; आणि बुखारा, काबूल, कंदाहार, खुरासान वगैरे प्रांत त्यानें काबीज केले. पुढें त्यानें इराणदेश हस्तगत केला. त्यावेळच्या त्याच्या राज्याचा विस्तार आजच्या हिंदुस्थानच्या चौपट होता. लढाया, वेढे, कत्तली आणि सर्वस्वाचा नाश ह्यांच्या हकीकतींनीं त्याचे पराक्रमांचा इतिहास भरलेला आहे. मोगल लोकांबरोबर टक्कर देण्यास समर्थ राष्ट्र, कायतें एकटें चीनचेंच होतें. त्या उभतांमध्यें घोर युद्धप्रसंग झाले. चीनचा दुर्घट व प्रचंड तट ओलांडून मोगल लोक चिनांत शिरले. पेकीन राजधानी काबीज करून चीनचा उत्तरभाग त्यांनीं आपल्या राज्यास जोडिला. युरोपखंडांत जर्मनीपर्यंत चंगीझची फौज गेली. अफगाणिस्तानांत खारिज्म् प्रांतावर सेल्जुक सुलतान महंमद राज्य करीत होता. ह्या सुलतानचे ताब्यांत आरबस्तानापासून तुर्कस्तान, इराण वगैरे सर्व प्रदेश मोडत असे. आपल्या राज्यांत बरीच सुधारणा व व्यवस्था असल्यामुळें वरील रानटी लोकांच्या टोळधाडींचा प्रभाव आपल्यावर चालणार नाहीं, अशी ह्यास घमेंड होती. चंगीझखानाच्या कित्येक लोकांस महंमदानें दुखविल्यामुळें नुकसान भरून मागण्यासाठीं चंगीझनें त्याजकडे आपले वकील पाठविले. त्यांचा शिरच्छेद केल्यामुळें ह्या मुसलमानी राज्यावर चंगीझची वक्रदृष्टि झाली. चंगीझखानाशीं टक्कर देण्यासाठीं एक लाख फौज बरोबर घेऊन महंमद सिरदर्यानदी उतरून पलीकडे गेला. परंतु ह्या एक लाख फौजेशीं झुंजण्यास चंगीझ आपल्या मुलांसह सात लाख फौज घेऊन आला. पहिल्याच झगड्यांत दीड लाख मुसलमान चीत झाले. तेव्हां आपले राज्यांत मोगलांचा प्रवेश न व्हावा, म्हणून सरहद्दीवरील ठाणीं संभाळून महंमद आपली फौज घेऊन परत सरहद्दीवर आला. पण चंगीझची गति कुंठित करणें शक्य नव्हतें. तो बराच मुलुख काबीज करून परत गेला. स्वतःची इच्छा हेंच चंगीझचें परब्रह्म, परमेश्वराची भीति ह्मणजे काय हें तो जाणत नव्हता. त्यानें आपल्या शेवटच्या वीस वर्षांत एक कोटी चाळीस लक्ष

माणसांची कत्तल केली, असें सांगतात. स्वतः इतका अडाणी होता, कीं तो विद्येचा व धर्माचा उपहास करी. आशियाखंडाच्या अत्युत्तम पुस्तकालयांतील ग्रंथसंग्रहाचा उपयोग त्यानें आपल्या घोड्यांना मऊ पथाऱ्या करण्याकडे केला. एकदां वायबलाची त्यानें होळी केली; बुखाऱ्याच्या मशीदींत कुराणही त्यानें घोड्यांकडून तुडविलें. एक वेळ ' अग्निप्रळय पुरवला, पण ह्या चंगीझखानाची धाड नको, ' असें लोकांस झालें होतें. त्यानें जिंकिलेल्या राज्याची लांबी साडेपांच हजार मैल असून रुंदी तीन हजार मैल होती. चंगीझखान कॅस्पियनसमुद्राच्या कांठीं सन १२२७त मरण पावला. मरणसमयीं त्याच्या राज्याची हद्द वायव्येस युरोपांत नीपर नदीपर्यंत, आग्नेयीस आशियांत सिंधुनदीपर्यंत व पूर्वेस पॅसिफिक महासागरापर्यंत पोंचली होती. म्हणजे त्याचें राज्य पिंवळ्या समुद्रापासून काळ्या समुद्रापर्यंत पसरलें होतें. तो मरण पावला तेव्हां चाळीस कुमारिका ठार मारण्यांत आल्या; कारण, चंगीझच्या आत्म्याच्या सेवेकरितां चाळीस कुमारिकांचे आत्मे पाहिजे होते. आजपर्यंत इतका दुष्ट व बलाढ्य पुरुष

निपजल्याचें दुसरें उदाहरण इतिहासांत आढळत नाहीं. चंगीझची स्वारी हिंदुस्थानच्या इतिहाससंबंधानें केवळ पुढील अनर्थाची सूचक होती. प्रत्यक्ष हिंदुस्थानाकडे लक्ष देण्यास चंगीझ यास सवड झाली नाहीं.

चंगीझखानानें मरणसमयीं आपलें राज्य ओक्ताईखान, तुलुंईखान, जूजीखान आणि झगताईखान ह्या चार मुलांस वांटून दिलें. त्याचा मुलगा ओक्ताईखान ह्यानें १२२७ पासून १२४१ पर्यंत राज्य केलें. हाही बापासारखाच पराक्रमी होता. त्यानें आपलें राज्य आणखी वाढविलें, व युरोपावर पुनः स्वारी केली. यूरोपच्या ह्या स्वारीचा मुख्य सरदार बातू म्हणून होता. हा बातू जूजीखानाचा मुलगा होय. त्यानें रशिया व हंगेरीदेश उद्‌ध्वस्त केले, आणि मास्को, कीव्ह, बुदापेस्त व दुसरीं पुष्कळ शहरें जाळून टाकिलीं, व तेथच्या सर्व लोकांची कत्तल केली. स. १२३८ पासून स. १२४१ पर्यंतच्या दोन तीन वर्षांत अर्धे यूरोपखंड जमीनदोस्त झालें; आणि राहिलेल्या अर्ध्या भागांतील लोक भीतीनें गर्भगळित झाले. त्या वेळीं युरोपीय राष्ट्रांत संघशक्ति नव्हती; आणि भूकंप वगैरे आघात होऊन मनुष्य संहार होतो तशाच प्रकारचा हा मोगलांचा आघात होय, असें समजून त्यांस स्वस्थ बसणें भाग पडलें.

यूरोपच्या सुदैवानें ओक्ताईखान स. १२४१त मरण पावला, आणि बातू युरोप सोडून परत गेला. ओक्ताईनंतर तुलुईखानाचा मुलगा कुब्लाईखान हा प्रसिद्धीस आला. त्यानें स. १२५७ पासून स. १२९४ पर्यंत राज्य करून कंबलू शहर आपली राजधानी केली. कंबलू म्हणजेच हल्लींचें पेकिन. पेकिनचें त्या वेळचें नांव खानबलीक (अपभ्रंश–कंब्लुक) असें होतें. कुब्लाईखानाच्या वंशास चीनच्या इतिहासांत 'युएनवंश' म्हणतात. ह्याचें वर्णन मार्को पोलोच्या वृत्तान्तांत आलें आहे. (ब्रि. रियासत–मार्को पोलो पहा). कंबलू शहरीं कुब्लाईखानाकडे पृथ्वीवरील सर्व मोठमोठ्या राष्ट्रांचे वकील येत असत. व्हेनिसचा प्रसिद्ध प्रवासी मार्को पोलो ह्याच कुब्लाईखानाच्या पदरीं पुष्कळ वर्षें होता. स. १३६८त चीन देशावरील मोगल बादशाहीचा अंत झाला.

चंगीझखानाचा नातू व तुलुईखानाचा मुलगा हुलाकूखान हाही भाऊ कुब्लाईखानाप्रमाणेंच पराक्रमी निपजला. त्याचें राज्य पश्चिम-आशियाखंडांत फार वाढलें, आणि पुढें शंभर वर्षें तें सारखें भर-भराटींत होतें. बातूचा भाऊ शयबान हाही मोठा पराक्रमी निघाला. बातूची राजधानी व्होल्गानदीवर सराई म्हणून होती. बातूच्या हाताखालीं मोगल थोडेच होते, तुर्कांचा भरणा विशेष होता.

बुखारा व खिवा येथें कांहीं थोडीं वर्षें ज्या खानांचा स्वतंत्र अंमल होता, त्यांची मूळ उत्पत्तिही चंगीझखानाचा नातू शयबान ह्याजपासून आहे. वरील दोन प्रांत अनुक्रमें स. १८६८ व १८७२त रशियानें जिंकिले. चंगीझचा धाकटा मुलगा झगताई ह्याच्या वंशानें कांहीं वर्षें बुखारा येथें राज्य केलें.

कुब्लाईखानाच्या मृत्यूनंतर त्याच्या राज्याचे अनेक तुकडे झाले. त्या तुकड्यांचा जोड पुढें तयमूरलंग ह्यानें केला. तार्तार मोगलांचा अंमल युरोपियन रशियावर स. १४७०पर्यंत होता. रशियाचा पहिला पराक्रमी बादशहा आयव्हन–धि–ग्रेट (स. १४६२–१५०५) ह्यानें तार्तार लोकांस रशियांतून हांकून दिलें, तेव्हांपासून रशियाच्या अर्वाचीन इतिहासास सुरुवात झाली.

**५. इस्लामाचे दोष व धार्मिक रहस्य.**—वर सांगितलेल्या मुसलमानी सुधारणेच्या माहात्म्यावरून वाचकांचा थोडासा गैरसमज होण्याचा

संभव आहे. ती सुधारणा कितीही उदात्त दिसली, तरी ती आर्यांच्या प्राच्य सुधारणेची व प्राचीन ग्रीक सुधारणेची केवळ नक्कल होय. सूर्य मावळत असतां, त्याजवर ढग येऊन, ते चकचकित दिसतात, पण ती चकाकी त्या ढगांची नव्हे, ती मूळ त्या सूर्याची होय. तोच प्रकार मुसलमानी सुधारणेचा आहे. प्राचीन आर्य व प्राचीन ग्रीक ह्यांजपासून उचललेलें सुधारणेचें भांडवल त्यांनीं कांहीं दिवस पोसून, तें अज्ञाननिद्रेंत घोरत पडलेल्या युरोपास आणून दिलें.

इस्लामाचीं कित्येक तत्त्वें व्यक्तीच्या व समाजाच्या प्रगतीस बाधक आहेत. बहुपत्नीत्वाचा प्रकार विकोपास गेल्यामुळें मुसलमानांत स्त्रिया अत्यंत हीनावस्थ राहिल्या. त्यांच्यांत संतति व कुळ शुद्ध राहिलें नाहीं. वाटेल त्याची विवाहित स्त्री पळवून आणावी; अनेक वेळां तिच्या नवऱ्यास व आप्तेष्टांस ठार मारून तिच्याशीं बळजबरीनें निका लावावा; असले दुराचार मुसलमानी अमदानींत पदोपदीं आढळतात. त्यांमुळें स्त्रीजातीची योग्यता पशुवत् झाली. हिंदु गृहस्थ व्यभिचारी असेल, पण बहुशः घराबाहेर जाऊन तो आपली वासना पूर्ण करील. एक विवाहित स्त्री घरांत असतां दुसऱ्या स्त्रियांस सहसा तो आपल्या घरांत आणणार नाहीं. ह्या कारणास्तव मुसलमानांत कुटुंबाची शुद्धता व पावित्र्य दुर्मीळ असे. मुसलमानांत बहुपत्नीत्व असल्यामुळें व एक पत्नी सोडून दुसरी करण्याची मुभा असल्यामुळें, कौटुंबिक जीवन पवित्र राहत नाहीं.

धर्मप्रसारासाठीं वाटेल त्या लोकांशीं युद्ध करून, त्यांजला गुलाम करण्याचा प्रघात मुसलमानांनीं घातल्यामुळें, त्यांचें राज्य जरी लवकर वाढत गेलें, तरी त्यामुळें गुलामगिरी स्थापित झाली. गुलामगिरीचें प्रस्थ मुसलमानी देशांत अद्यापि पुष्कळ आहे. धर्माच्या बाबतींत मुसलमान असहिष्णु होते, म्हणून परधर्मीयांस त्यांनीं आपल्या बरोबरीनें वागविलें नाहीं. तसेंच धर्म व राज्य ह्या दोहोंचे संपूर्ण अधिकार एकाच खलीफाच्या हातांत असल्यामुळें, लोकांच्या हातांत काडीइतकी सत्ता न राहतां राजे जुलमी बनले, आणि प्रजासत्ताक राजव्यवस्थेस थारा मिळाला नाहीं.

इस्लामी धर्माचें गुलामगिरीस पाठबळ आहे. हल्लीं सुद्धां गुलामगिरीचा अवशेष मुसलमानी देशांतच आहे, आणि पूर्वी तरी मुसलमानांतूनच तो

क्रिस्ती लोकांत शिरला. मुसलमानी धर्मांत धर्मस्वातंत्र्य नसल्यामुळें त्यांच्या अंमलाखालीं विधर्मी लोक नेहमीं हीन स्थितींत असत.

आणखी एक मोठा दोष असा आहे, कीं मुसलमानांचे कायदे प्रगतिशील नाहींत. महंमद पैगंबर व त्याच्या नंतर झालेले चार खलीफा ह्यांनीं केलेले नियम व निकाल सदैव अबाधित चालले पाहिजेत असें मुसलमान समजतात. धर्माच्या व इतर बाबतींत कायद्यानेंच कायम निर्बंध घालून दिल्यामुळें, परिस्थित्यनुरूप त्यांत बदल होण्यास अवकाश नाहीं. मुसलमानांचा समाज कैक शतकें आहे तसा आहे. क्रिस्ती समाजाप्रमाणें त्याची प्रगति झाली नाहीं. क्रिस्ती लोकांस परिस्थित्यनुरूप बदलणारा रोमन कायदा प्राप्त झाला, त्यामुळें त्यांची प्रगति झपाट्यानें झाली. ह्या बाबतींत हिंदु लोकांच्या कायद्याचे काय परिणाम झाले आहेत, हें विद्वानांनीं विचार करण्यासारखें आहे.

मुसलमानांचीं धार्मिक बंधनें जरी कायमचीं ठरलेलीं आहेत, तरी आज निरनिराळ्या ठिकाणीं चालू असलेला त्यांचा आचार मूळ महंमदानें घालून दिलेल्या किंवा कांहीं दिवस आरबांनीं चालविलेल्या आचारांहून अगदींच भिन्न आहे. पहिल्या शें दोनशें वर्षांतील ह्या धर्माचें उदात्त स्वरूप हल्लीं कायम नाहीं.

अशा प्रकारचे अनेक दोष इस्लामांत असूनही त्याची भरभराट झाली, ह्यावरून त्या धर्माचा अत्यंत व्यावहारिक कल सहज ध्यानांत येईल. वाटेल तिकडे भटकावें, वाटेल तें खावें प्यावें, वाटेल त्यास आपल्या धर्मांत ओढून आणावें, परजातींच्या स्त्रियांचा स्वीकार करून स्वधर्मी लोकांची संख्या वाढवावी, इत्यादि व्यावहारिक उपयोगाचे अनेक प्रकार इस्लामांत आहेत. अशा इस्लामाचा पगडा जरठ व धार्मिक बंधनांनीं जखडलेल्या हिंदुस्थानावर कसा बसला ह्या प्रश्नाचा उलगडा पुढें हळू हळू होत जाईल.

ऐतिहासिक विवेचनांत मुसलमानांतील निरनिराळ्या जातींचा वर सांगितलेला स्वभावभेद नीट ध्यानांत ठेविला म्हणजे जगांतील ठळक ठळक ऐतिहासिक घडामोडी कळून येतील. आज हिंदुस्थानांत जे मुसलमान आहेत, ते बहुतेक मिश्र आहेत. सिंधप्रांताशिवाय इतर ठिकाणीं आरब तर मुळीं आलेच नाहींत. मलबार वगैरेकडे आरबांची थोडी वस्ती आहे. पंजाबांत व

दिल्लीचे आसपास तुर्क व मोगल ह्यांची अल्पस्वल्प वस्ती आहे. पण आजची मुसलमानांची बहुतेक संख्या येथच्याच लोकांनीं धर्मांतर केल्यामुळें व बीजसंकरानें झालेली आहे. म्हणजे हिंदुस्थानांतील मुसलमानांची मुख्य संस्कृति आर्य तऱ्हेची आहे; तुराणी तऱ्हेची नाहीं. ह्यावरून मुसलमानांच्या धर्माचें सर्वव्यापकत्व, म्हणजे सर्व प्रकारच्या लोकांस आपल्या धर्मांत ओढून, धर्माच्या नांवाखालीं त्या सर्वांची एक जात बनविण्याचा गुण केवढा आहे हें कळून येईल. पूर्वी कितीही भिन्न असले, तथापि धर्मदीक्षा मिळाल्या बरोबर सर्व लोकांची एक जूट होते, सर्व लोक एकदिलानें नाना प्रकारचे पराक्रम गाजवून शेंकडों वर्षें मोठमोठ्या राज्यांचा उपभोग घेतात, आणि संघशक्तीच्या जोरावर, कसलींही संकटें आलीं तरी त्यांचा निरास करून आपलें नांव गाजवितात, हा प्रभाव त्या विशिष्ट धर्मपद्धतीचा होय. आरबांत सुद्धां प्रथम अनेक जाति होत्या, त्या महंमदानें मोडून आरबांचें एक राष्ट्र बनविलें. पुढें हे आरब धर्मप्रसाराकरितां स्वदेशाबाहेर हिंडूं लागले, तेव्हां जे जे भिन्नजातीय लोक त्यांस भेटले, त्या सर्वांस केव्हां जुलमानें, केव्हां लालुचीनें, व केव्हां युक्तीनें त्यांनीं ग्रासून आपल्या जुटींत आणिलें. इराणांतले इराणी, तुराणांतले तुराणी, मोंगोलियांतले मोगल, हिंदुस्थानांतले आर्य, आफ्रिकेंतील सीदी, वगैरे झाडून सारे ह्या नवीन धर्मांत शिरल्याबरोबर एक झाले. ते आपले मूळचे स्वभाव विसरले. आणि एक जुटीनें नवीन उद्योग करूं लागले. नुसता त्यांचा धर्म एक झाला इतकेंच नाहीं, तर कोणत्याही ठिकाणीं त्यांस उच्च संस्कृति दिसली कीं तींतील चांगलीं तत्त्वें त्यांनीं लगेच स्वीकारिलीं. आरब म्हणजे मूळचे नुसते मेंढ्या राखणारे धनगर, हजारों वर्षें आरबस्तानाच्या वालुकामय ओसाड प्रदेशांत वन्यावस्थेंत पडून होते. महंमदानें त्यांस नवीन स्फूर्ति आणिली, आणि महंमदानेंच त्यांच्या भावी उन्नतीची स्थापना केली. वास्तविक मुसलमानांनीं ह्या जगतीतलावर जो पराक्रम गाजविला, तो ख्रिस्त्यांनाही साधला नाहीं. धर्मसंस्थापकाच्या अंगीं किती कुशलता पाहिजे व किती दूरदृष्टि व धोरण पाहिजे, आणि, उलट पक्षीं, राष्ट्राच्या चिसकळीत स्थितींत महंमदासारखा एक कर्ता व अत्यंत व्यावहारिक पुरुष केवढें प्रचंड काम करूं शकतो, हें ह्या मुसलमानांच्या इतिहासावरून स्पष्ट निदर्शनास येतें.

राष्ट्रबंधनास धर्मांची आवश्यकता किती आहे ह्याचा विचार करितांना इस्लामाचें उदाहरण विशेष ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. भिन्न जातींच्या व भिन्न परंपरेच्या लोकांस इस्लामानें एक करून, त्यांजकरवीं मोठमोठें पराक्रम करविले. विद्युद्वेगानें तो धर्म चहूंकडे पसरला. ह्यावरून लोकांच्या अंगीं स्फुरण उत्पन्न करण्याची शक्ति त्यांत किती होती, हें दिसून येतें. इस्लामाचीं तत्त्वें व्यावहारिक सोयीचीं होतीं. सर्व लोकांस एकबंधुत्वाचें तत्त्व महंमदानें शिकविलें, आणि धर्माकरितां प्राणही खर्ची घालण्याकडे त्यानें लोकांची प्रवृत्ति केली. दरशुक्रवारीं प्रार्थना करण्यासाठीं सर्वांनीं मशीदींत एकत्र जमण्याचा प्रघात त्यानेंच पाडिला. हा सार्वजनिक प्रार्थनेचा प्रघात हिंदुधर्मांत नाहीं; बुद्धधर्मांत मात्र आहे. अशा प्रार्थनेंत हजारों लहान थोर मुसलमान लोक एक पोषाख करून, आपले सर्व भेदाभेद बाजूस ठेवून, एकत्र जमतात; प्रीतीनें व आदरानें एकमेकांस आलिंगन देतात; मक्केकडे तोंड करून एका गुरूचा उपदेश एकचित्तानें ऐकितात. पृथ्वीच्या कोणत्याही भागांत ते राहत असले, व कितीही भिन्न भाषा बोलत असले, तरी मक्केच्या यात्रेस जाण्यांत त्या सर्वांस पुरुषार्थ वाटतो. दिल्ली, आग्रा, लखनौ, लाहोर इत्यादि ठिकाणीं प्रार्थनेसाठीं मशीदींत जमलेल्या मुसलमानांचे प्रचंड जमाव पाहून, त्यांच्या संघशक्तीचें कौतुक वाटल्याशिवाय राहत नाहीं. मुसलमानी धर्मांत सर्व वर्णांचे व सर्व जातींतले लोक आहेत. स्वधर्माचा त्यांस विशेष अभिमान वाटतो. रानोमाळ भटकणाऱ्या रानटी धनगरांस इस्लामानें राज्यपदास चढविलें; हजारों वर्षांच्या अंधकारांतून त्यांस बाहेर उजेडांत आणिलें; आणि जगाच्या इतिहासांत कायमचें नांव करण्यास त्यांस सामर्थ्य दिलें. तत्कालीन वन्य लोकांची एवढी एकी कशानें झाली, त्यांच्यांत उत्साह कसा उत्पन्न झाला, आणि शास्त्रकलांत त्यांनीं एवढें प्रावीण्य कसें संपादन केलें, ह्याचा विचार करूं लागलें म्हणजे इस्लामाच्या करामतीचें आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाहीं. एक मुसलमान सात असामींस भारी झाला, असे अनेक युद्धप्रसंग इतिहासांत नमूद आहेत. नुसत्या तलवारीनेंच इस्लामाची वृद्धि झाली असें नाहीं, तर इस्लामाच्या शिकवणीनें मुसलमानांस तलवार गाजविण्याचें सामर्थ्य आलें; आणि त्यांची बुद्धि तीव्र झाली. अबुबक्र, उमर, उस्मान

व अली एवढे पहिले चारच पुरुष निर्माण होऊन इस्लामाची वाढ खुंटली असती, तरी त्या धर्माची योग्यता आहे अशीच थोर वाटली असती, इतकी त्या चार पुरुषांची करामत अप्रतिम असून, तींत सर्व इस्लामाचें संपूर्ण रहस्य सांचलेलें आहे.

---

## प्रकरण पांचवें.

---

## गज्नवी महंमूद.

### ( स. १०३० पावेतों ).

१. महंमद कासीमची सिंधप्रांतावर स्वारी. २. सामानी वंश, (स.८७४-९९९). ३. अलप्तगीन, ( स. ९६७-९७६ ). ४. सवक्तगीन, (स. ९७७-९९७). ५. सुलतान महंमूद, व त्याच्या स्वाऱ्या. ६. सोमनाथची स्वारी,(स. १०२४). ७. महंमुदाची योग्यता.

मागील दोन प्रकरणांतील विवेचन सामान्य आहे. पुढील हकीकतींत त्याचा उपयोग वारंवार लागेल, म्हणून तें एकदम एक टिकाणीं देणें जरूर वाटलें. आतां पुढें हिंदुस्थानांत मुसलमानांचा प्रवेश कसकसा होत गेला तें सांगण्यास आरंभ करूं.

१. **महंमद कासीमची सिंधप्रांतावर स्वारी,** (स. ७११).—सिंधप्रांतांत व हिंदुस्थानच्या इतर भागांत त्या वेळेस रजपूत राजे राज्य करीत होते. प्राचीन काळापासून हिंदुस्थानाशीं आरब लोकांचा व्यापार चालू होता. ह्या व्यापाराची हकीकत ब्रिटिश रियासतींत दिली आहे. इ. स. ६३७त खलीफ उमरच्या वेळेस आरबांची एक टोळी टाणें येथें आली होती. पुढें समुद्रमार्गानें इसवी सन ६६४त महलब नामक मुसलमान सरदार कांहीं फौजेनिशीं मुलतानपावेतों येऊन परत गेला. तथापि पुढें कांहीं दिवसपर्यंत मुसलमानांची दृष्टि हिंदुस्थानाकडे वळली नाहीं.

वलीद खलीफा बगदाद येथें आरबी खिलाफतीवर असतां, सिंधप्रांतांतील कांहीं भागावर दाहिर नांवाचा रजपूत राजा राज्य करीत होता. बकर किल्ल्या-

जवळ अरोड म्हणून शहर होतें, ती दाहिरची राजधानी. ह्या दाहिर राजाशीं प्रथम मुसलमानांचा तंटा लागला. सिंधदेशांत देवल नामक बंदरीं मुसलमानांचे एक हजार लोक रजपुतांनीं पकडून ठेविले. मुसलमानांनीं ते दाहिर राजापासून परत मागितले. परंतु देवलबंदर दाहिरच्या ताब्यांत नसल्यामुळें, ती मागणी त्यास कबूल करतां येईना. त्याची ती सबब न ऐकतां, त्याजवर बसरा प्रांतांतन मुसलमानी फौज चालून आली. महंमद कासीम नामक एक तरुण शूर सरदार ह्या फौजेचा मुख्य होता. कासीमनें देवल येथील देवालयावर प्रथम हल्ला करून तेथील निशाण कबजांत घेतलें; तेव्हां लोक घाबरून गेले व देवालय कासीमचे हस्तगत झालें. देवालयांत पुष्कळ ब्राह्मण होते; त्यांनीं सुंता करवून मुसलमान व्हावें असें कासीमनें बोलणें लाविलें. तें ब्राह्मणांनीं नाकबूल केल्यावर कासीमनें सतरा वर्षांवरील सर्व ब्राह्मणांची कत्तल करून इतरांस गुलाम करून स्वदेशीं पाठविलें. देवलबंदर काबीज केल्यावर कासीमनें दाहिरवर स्वारी केली. उभयतांची लढाई होऊन दाहिर समरांगणीं पडला, व त्याचा मुलगा पळून गेला; तरी तेथच्या शूर राणीनें सर्व फौज जमा करून पुनः एकवार निकराची लढाई केली, पण तिचा इलाज न चालून तिचे लोक मारले गेले, आणि क्रमाक्रमानें दाहिरचें सर्व राज्य कासीमचे हातीं आलें. दाहिरच्या प्रधानासच आपला कारभारी नेमून कासीमनें लोकांजवळून खंडणी वसूल केली. खंडणी देणाऱ्या लोकांचा छळ करूं नये असा कासीम ह्यास खलीफाचा हुकूम होता, तो त्यानें पाळिला.

दाहिर राजाच्या दोन मुली होत्या, त्यांस बंदिवान करून कासीमनें खलीफ वलीद यास नजर पाठविल्या. त्यांनीं कासीमचा सूड घेण्याची एक विलक्षण युक्ति केली. वडील मुलीवर खलीफाची मर्जी बसली, तेव्हां एके प्रसंगीं दीनवाणीनें ती मुलगी खलीफास म्हणाली, 'मजवर कासीमनें बलात्कार केला असल्यामुळें मी भ्रष्ट आहें.' कासीमचें हें दुष्कृत्य ऐकतांच खलीफास अत्यंत संताप झाला, आणि त्यास ठार मारून आणण्याची त्यानें आज्ञा केली. त्याप्रमाणें त्यास ठार मारून त्याचें प्रेत डमास्कस येथें आणविलें, तेव्हां त्या मुलीस मोठा आनंद झाला; आणि ती म्हणाली, 'माझ्या बापाचा घात करणाऱ्या दुष्टाचा चांगला सूड घ्यावा एवढ्याचसाठीं

मीं हा आरोप त्याजवर आणिला. मी भ्रष्ट नाहीं !' हें त्या मुलीचें भाषण ऐकून व तिचें खोटें वर्तन पाहून खलीफा क्रोधायमान झाला, आणि त्यानें तीस ठार मारिलें. खरा प्रकार सांगितल्यामुळें खलीफा आपणावर रागावेल आणि त्या रागाच्या आवेशांत देहान्तशासन करण्यास तो चुकणार नाहीं, हें त्या मुलीस ठाऊक होतें. परंतु पातिव्रत्यभंगापेक्षां मरण पत्करलें असल्या निर्धाराची ती होती, म्हणून कासीमचा सूड व सत्त्वसंरक्षण अशा दोनही गोष्टी तिनें साधिल्या. सिंधप्रांतावरची ही स्वारी सन ७११चे सुमारास झाली.

ह्या स्वारीनें मुसलमानांचा पाय हिंदुस्थानांत कायम झाला असें नाहीं. तीस वर्षांच्या आंत मुसलमानांस रजपुतांनीं हांकून लाविलें. सिंधप्रांतांत धर्माच्या बाबतींत हिंदु लोकांवर मुसलमानांनीं अतोनात जुलूम केले, ते हिंदूंस सहन झाले नाहींत. सिंधप्रांतावरील ह्या मुसलमानी स्वारीसंबंधानें लेन पूल म्हणतो, 'हिंदुस्थानच्या इतिहासावर ह्या स्वारीपासून म्हणण्यासारखा परिणाम झाला नाहीं; आणि मुसलमानांसही कांहीं फायदा झाला नाहीं. सिंधप्रांत विस्तारानें इंग्लंडएवढा आहे, पण तो वालुकामय आहे. हिंदुस्थानांतील उच्च प्रतीच्या सुधारणेपुढें मुसलमानांच्या तीव्र वेगाचा उपाय हरला. ह्याचें कारण असें दिसतें, कीं एक तर ते भलत्याच ठिकाणीं हिंदुस्थानांत शिरले. दुसरें, रजपूत राजांची जमात त्या वेळीं जोरांत होती, आणि त्या सर्वांस जिंकिण्यास पुरेइतकी मुसलमानी फौज खलीफांनीं पाठविली नाहीं. महंमद कासीमचा पराभव झाल्यावरही त्याची अरब फौज इकडील दूरच्या प्रदेशांत संकटानें दिवस कंठीत होती. खलीफांस ह्या प्रांताचा विशेष उपयोग वाटला नाहीं. सिंधप्रांतांत आलेल्या आरबांनीं मुल्तान व इतर ठिकाणीं आपल्या वसाहती स्थापिल्या. त्यांचा व हिंदूंचा लवकरच स्नेहभाव जुळला, आणि दोघेही एकमेकांशीं गुण्यागोविंदानें नांदूं लागले. शें दोनशें वर्षेपर्यंत सिंधप्रांतांत खालपासून वरपर्यंत पैगंबराच्या खुरेश जातीचे आरब निरनिराळ्या ठिकाणीं अंमल गाजवीत होते. त्यांनीं हिंदूंचीं पुरातन बांधकामें तोडून त्यांचे दगड व सामान आपल्या नवीन इमारतींस लाविलें. हल्लींही आरबांनीं केलेला नाश ठिकठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येतो.

२. सामानी वंश.—(स.८७४–९९९).–इराणांत मुसलमानांचे अनेक राजवंश झाले, त्यांत नवव्या शतकांत सामानी नांवाचा एक वंश उदयास आला. इराणांत त्या वेळीं उत्तरेकडील अमूदर्यानदीपर्यंतच्या प्रदेशाचा समावेश होत असे. ‘ सामान ’ नांवाचा एक इराणी सरदार होता. त्याजकडे खुरासान प्रांताचा कारभार होता. त्याचा मूळधर्म फारशी असून, त्यानें मुसलमानी धर्म स्वीकारिला होता. सामानचा एक मुलगा होता, त्यास त्यानें मुसलमानी धर्माची दीक्षा देऊन त्याचें नांव आसदखान ठेविलें. आसदचे चार मुलगे मामून खलीफाच्या पदरीं उदयास आले, आणि त्यांस चार निरनिराळ्या प्रांतांचे कारभार मिळाले, (स. ८१९). त्यांपैकीं फरघाना प्रांताचा कारभार अहंमद यास मिळाला. हा अहंमद कांहीं दिवसांनीं स्वतंत्र झाला आणि इतर भावांचे प्रांत काबीज करून त्यानें आपलें राज्य वाढविलें. त्याची राजधानी बुखारा त्याचा मुलगा इस्मईल ह्यानें आणखी पराक्रम करून आपलें राज्य सिंधुनदीपासून बगदादपर्यंत, व इराणच्या आखातापासून आरलसमुद्रापर्यंत वाढविलें. त्याच्या कारकिर्दींत बुखारा व समर्कंद हीं शहरें प्रसिद्धीस आलीं; आणि बगदादच्या सारखीच त्यांची अनेक बाबतींत भरभराट झाली. ही भरभराट पन्नासएक वर्षें टिकली. पुढील राजे दुर्बळ निघाले; आणि त्यांचें राज्य मोडकळीस आलें. सामानी सुलतानांच्या पदरीं पुष्कळ तुर्क गुलाम मोठमोठ्या कामांवर होते, तेच पुढें बलवान झाले. त्या गुलामांत अलप्तगीन म्हणून एक तुर्क होता, त्यानें गज्नी येथें नवीन राज्य स्थापिलें. पुढें ह्या गज्नीच्या सुलतानांनींच स. ९९४त सामानी राज्य बुडवून त्याचे सर्व प्रांत गज्नीखालीं आणिले. सामानी वंशाचा शेवटचा सुलतान ९९९त मरण पावला. सामानी वंश स. ८००–१००० पावेतों सुमारें दोनशें वर्षें कसाबसा टिकला. सामानी सुल्तानांची न्यायप्रियता, व विद्वत्ता फारसी ग्रंथकारांनीं फार वाखाणिली आहे. त्या वेळेपासून इराणांत फारशी भाषेचें पुनरुज्जीवन होऊन, आरबी भाषा मागें पडली, तिचा पुनः तेथें शिरकाव झाला नाहीं.

३. अलप्तगीन, (सन ९६७–९७६).—वर सामानी राज्याची हकीगत दिली. त्याच्या पडत्या काळांत तुर्क लोकांनीं आपलें महत्त्व पूर्वेकडे वाढविलें. त्या वंशाचा पांचवा सुलतान अब्दुल् मलीक ह्याजवळ अलप्तगीन नांवा–

चा एक तुर्क गुलाम होता. त्याजवर राजाची मर्जी बसून त्यास सन ९६७त खुरासान प्रांताची सुभेदारी मिळाली. सन ९६७त अब्दुल मलीक मरण पावल्यानंतर, त्याचा मुलगा मनसूर ह्यास, बुखारा येथील गादी मिळूं नये अशी अलप्तगीननें खटपट चालविली. त्यावरून मनसूरनें अलप्तगीनास खुरासानचे सुभेदारीवरून दूर केलें, तेव्हां तो पळून काबुलाकडे गेला; आणि कांहीं फौज जमवून त्यानें गज्नी येथें एका स्वतंत्र राज्याची स्थापना केली. तेव्हां ह्या राज्याची पूर्वसरहद्द पंजाबप्रांतास मिळाली. पंजाबांत जयपाळ नामक रजपूत राजा राज्य करीत होता. सिंधुनदी ही ह्या दोन राज्यांची हद्द होती. लवकरच ह्या दोघांमध्यें कलह उत्पन्न झाले, तरी अलप्तगीनचे कार्किर्दींत युद्धप्रसंग घडला नाहीं. अलप्तगीन सन ९७६त मरण पावला.

४. सबक्तगीन, (सन ९७७–९९७).—अलप्तगीनजवळ सबक्तगीन हाही एक तुर्क गुलाम असून पुढें त्याच्या मर्जीतला झाला होता. अलप्तगीननें त्यास आपली मुलगी देऊन आपल्या पाठीमागें राज्याचा वारस नेमिलें. सबक्तगीनची अशी एक गोष्ट सांगतात, कीं पूर्वीं स्वाराची नोकरी करीत असतां त्यानें एक हरिणीचें पाडस पकडिलें. तें घेऊन जात असतां त्या बच्चाची आई हरिणी पाठीमागून धांवत येत आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. तेव्हां त्याच्या पोटांत दया येऊन त्या पाडसास त्यानें सोडून दिलें. रात्रीं त्यास स्वप्न पडलें, त्यांत महंमद पैगंबर स्वप्नांत येऊन बोलला, कीं ' आज जें तूं सत्कृत्य केलेंस, तें परमेश्वरापाशीं रुजू आहे, त्याजबद्दल तुला तो राज्यपद देईल.'

राज्यपद मिळाल्यावर सबक्तगीनास फार दिवस स्वस्थ बसतां आलें नाहीं. आरबांनीं सिंधप्रांतांत काय अनर्थ केले होते हें सर्व हिंदु लोक जाणत होते. शेजारीं मुसलमानी राज्य स्थापन झालें ही गोष्ट हिंदुस्थानांतील पश्चिमभागच्या रजपूत राजांस बरी वाटली नाहीं. पुढें आपल्यावर हल्ला येणार, त्याचा आपण अगोदरच प्रतिकार करावा ह्या उद्देशानें कित्येक रजपूत राजे एकत्र मिळाले. त्यांत लाहोरचा जयपाळ राजा प्रमुख होता. पुढें सिंधुनदी उतरून रजपूत फौज सबक्तगीनचे मुलखांत शिरली. तेव्हां सबक्तगीन आपला मुलगा महंमूद ह्यास बरोबर घेऊन रजपुतांशीं टक्कर देण्यास आला. दोनही फौजा नजीक आल्यावर उघड

लढाई जुंपणार, त्याच्या आदले दिवशीं जोराचा वारा सुटून तुफान झालें; त्यामुळें दोनही फौजांची दुर्दशा उडाली. मुसलमानांपेक्षां रजपूत लोक ज्यास्त भयभीत झाले. जयपाळ तह करून परत येण्याचे विचारांत होता; परंतु महंमुदाचे मनांत रजपुतांचा खरपूस समाचार घ्यावयाचा आहे असें ऐकून, सर्वस्वाचा नाश करून व मुलांबाळांस ठार मारून समरांगणीं लढून मरूं, असें जयपाळानें निकराचें उत्तर दिलें. तें ऐकिल्यावर सबक्तगीननें कांहीं हत्ती व द्रव्य जयपाळापासून घेतलें, आणि दरसाल खंडणी पाठवीत जाण्याचें त्याजकडून कबूल करवून, व ह्या शर्ती पाळण्याबद्दल कांहीं असामी ओलीस घेऊन, त्यानें रजपूत फौजेस परत जाऊं दिलें.

जयपाळास ह्या कृत्याची फार लाज वाटली. सबक्तगीनचे लोक खंडणी मागावयास आले, त्यांस त्यानें कैदेंत टाकिलें व खंडणी पाठविली नाहीं. तेव्हां सबक्तगीन चवताळून जयपाळावर आला. जयपाळ स्वस्थ बसला नव्हता. सबक्तगीन काय सूड घेईल ह्याची त्यास कल्पना होती. सबब बहुतेक रजपूत राजांचा त्यानें एकोपा केला. दिल्ली, अजमीर, कनोज, कलिंजर येथील व दुसरे रजपुत राजे त्यास येऊन मिळाले. एकंदर एक लाख फौजेनिशीं जयपाळ सबक्तगीनवर चालून गेला. परंतु लढाईत जयपाळास जय मिळाला नाहीं. सबक्तगीननें पांचपांचशें लोकांच्या टोळ्या करून हिंदूंस जेरीस आणिलें. तेव्हां रजपूत फौजेंत गोंधळ उडून सर्व लोक पळून गेले, आणि सबक्तगीनास पुष्कळ लूट प्राप्त झाली. पुढें सरहद्दीच्या बंदोबस्तास खैबर घांटाच्या तोंडावर दहा हजार फौज कायमची ठेवून, सबक्तगीन परत गेला.

सबक्तगीन सन ९९७ त मरण पावला. त्यानें मोठ्या शहाणपणानें व न्यायानें वीस वर्षें राज्य केलें. मरणसमयीं त्यानें आपला मुलगा इस्मईल यास आपला वारस नेमिलें. दुसरा मुलगा महंमूद हा पराक्रमी, पण दासीपुत्र होता. सबक्तगीन मरण पावल्यावर महंमुदानें इस्मईलास पकडून कैदेंत ठेविलें, आणि आपण राज्यपद बळकावून 'सुलतान' ही पदवी धारण केली, (सन ९९९). हा वेळपर्यंत कोणींही तुर्क राजानें सुलतान हें पद धारण केलें नव्हतें. हिंदुस्थानच्या सरहद्दीवर या तुर्क बादशाहीच्या स्थापनेमुळें मुसलमान व हिंदु या दोन धर्मांचा झगडा सुरू झाला.

**५. सुलतान महंमूद, व त्याच्या स्वाऱ्या.**—महंमूद तालीमबाज होता. त्याचें शरीर घटलेलें होतें. जसा शूर तसाच तो जबरदस्त महत्त्वाकांक्षीही होता. पहिल्या एकदोन वर्षांत त्यानें पश्चिमेकडे युद्धप्रसंग केले, आणि खुरासान वगैरे प्रांत घेऊन बुखाऱ्याच्या सामानी राजवंशास बुडविलें. पुढें महत्त्वाकांक्षेस दुसरीकडे जागा उरली नाहीं, तेव्हां त्याची दृष्टि हिंदुस्थानाकडे वळली. त्याचीं विशेष कारणें खालीं लिहिल्याप्रमाणें झालीं.

( १ ) पूर्वीच्या मुसलमानांनीं मोठमोठे पराक्रम करून धर्मवृद्धि केली आणि नांवलौकिक मिळविला; त्याप्रमाणें हिंदुस्थानावर स्वारी करून तेथें धर्मवृद्धि करण्याची त्यास जबरदस्त इच्छा उत्पन्न झाली. ह्या कामांत त्यास अपयश येण्याची भीति वाटली नाहीं. कारण, हिंदुस्थानांत लहान लहान अनेक राज्यें असून, त्यांमध्यें स्नेहभाव नव्हता, हें त्यास माहीत होतें.

( २ ) हिंदुस्थान हें केवळ संपत्तीचें घर आहे, असें त्यास ऐकून, व बापाबरोबरील स्वाऱ्यांत हजर असल्यामुळें प्रत्यक्ष पाहून ठाऊक होतें. तेव्हां अपार संपत्तीचा लाभ व साधल्यास आपल्या राज्याची वृद्धि हिंदुस्थानांत होईल असें त्यास वाटलें.

( ३ ) त्याजपाशीं फौज पुष्कळ होती. तिला रिकामी ठेवून पगार देण्यापेक्षां लढाईत उपयोग केल्यास लूट वगैरे मिळून ती खुश राहील असें त्यानें ताडिलें. फौजेला तो फार प्रिय होता, आणि स्वराज्यांत त्यानें सर्व प्रकारची स्वस्थता केली होती. तेव्हां हिंदुस्थानावर स्वाऱ्या करण्यास त्यास चांगलें फावलें.

हे हेतु मनांत धरून त्यानें प्रथम इ. स. १००१ ह्या वर्षीं हिंदुस्थानावर पहिली स्वारी केली; आणि हा क्रम एकदां सुरू झाल्यावर त्यानें हिंदुस्थानावर लहान मोठ्या सतरा स्वाऱ्या केल्या, त्यांतील खालील बारा विशेष प्रसिद्ध आहेत.

**महंमुदाच्या स्वाऱ्या,—पहिली, ( इसवी सन १००१ ).**—नोव्हेंबर महिन्यांत दहा हजार स्वार घेऊन महंमुदानें गज्नी सोडून पेशावरच्या मैदानांत तळ दिला. तेव्हां लाहोरचा राजा जयपाळ सिंधुनदी उतरून त्याजवर गेला. त्याचें सैन्य अफाट होतें, पण त्यांत शिस्त नव्हती. ता० २७ नोव्हेंबर रोजीं दोनप्रहरपर्यंत निकराची लढाई होऊन जयपाळ

व त्याचे सरदार महंमुदाचे हातांत सांपडले. जयपाळाचें सर्व जडजवाहीरही महंमुदास मिळालें. पुढें मोठा दंड भरून जयपाळानें आपली सुटका करून घेतली, आणि दरसाल महंमदास खंडणी पाठविण्याचें कबूल केलें. महंमूद, लाहोरनजीक असलेलें भाटिंदा शहर लुटून, गज्नीस परत गेला. बंदींतून सुटून आल्यानंतर जयपाळ राजानें आपला मुलगा अनंगपाळ यास आपल्या गादीवर बसविलें, आणि एकामागून एक संकटें कोसळून अप्रतिष्ठा झाली ती त्याला सहन न होऊन, त्यानें अग्निप्रवेश केला.

**दुसरी स्वारी,** ( सन १००४ ).—बापानें महंमुदाशीं केलेल्या कराराप्रमाणें चालण्यास अनंगपाळ कबूल होता. पण त्याचा पोटहिस्सेदार भाट्याचा राजा विजयराय आपल्या वांटणीची खंडणी महंमुदास देईना, व महंमुदाशीं द्वेषभावानें वागूं लागला. तेव्हां महंमूद सिंधुनदी उतरून मुलतानच्या बाजूनें भाट्याच्या राज्यांत शिरला. रजपुतांनीं मोठ्या निकरानें त्याशीं युद्ध करून अनेक झगड्यांत त्यास हटविलें. तेव्हां महंमुदानें आपल्या फौजेसमोर मक्केकडे तोंड करून जमिनीवर गुडघे टेंकून परमेश्वराची आराधना केली, आणि उठून आपल्या फौजेस बोलला, ' गड्यांनो, परमेश्वरानें आज आपणांस फत्ते दिली आहे; भिऊं नका. ' त्यासरशी त्याची फौज आवेशानें रजपुतांवर चालून गेली. तेव्हां विजयराय किल्ल्याचे आश्रयास गेला. पुढें मुसलमानांनीं तो किल्ला घेतल्यावर विजयरायानें सिंधुनदीच्या रानांत पळून जाऊन जीव दिला. या प्रसंगीं महंमुदास अपार लूट मिळाली. भाट्याचें राज्य त्यानें आपले राज्यास जोडिलें.

**तिसरी स्वारी,** (सन १००५).—अब्दुल फत्ते लोदी ह्या गृहस्थास महंमुदानें मुलतानचा सुभेदार नेमिलें होतें. तो अनंगपाळास सामील होऊन महंमुदास विचारीनासा झाला. तेव्हां महंमुदानें पुनः पेशावराकडून पंजाबप्रांतावर स्वारी केली. अनंगपाळ पराभव पावून काश्मिराकडे पळाला. मुलतान महंमुदानें घेतलें. अब्दुल फत्ते लोदी शरण आला. तिकडे अफगाणिस्तानांत इलीकखान नामक सरदारानें खुरासान प्रांतावर हल्ला केल्यामुळें, पंजाबचा कसाबसा बंदोबस्त करून महंमूद परत गेला. परत गेल्यावर इलीकखानाचा पराभव करून त्यास महंमुदानें हांकून लाविलें.

५-७९१-२०००

**चौथी स्वारी,** ( सन १००५–६ ).—महंमूद परत जातांच इकडे अनंगपाळानें सर्व रजपूत लोकांशीं एकोपा करून महंमुदाशीं लढण्याची जंगी तयारी केली. धर्माचा पाडाव व देवालयांचा विध्वंस ह्यांचे योगानें सर्व रजपुतांस मुसलमानांविषयीं विशेष त्वेष चढला होता. इतकें अपार सैन्य समरांगणीं पूर्वी कधींही आलें नव्हतें. महंमुदास ही बातमी समजतांच तो दबत दबतच पुढें आला. ह्या प्रसंगीं हिंदु स्त्रियांनीं आपलें जवाहीर व दागिने विकून ह्या धर्मयुद्धाकरितां दूरदूरच्या देशांतून सामग्री पाठविली. डोंगराळ प्रदेशांतील गक्कर व दुसरे लढाऊ लोक हिंदूंच्या पक्षास मिळाले. आरंभीं हिंदूंची सरशी होती. महंमूद सोयकर संधीची वाट पाहत होता. पुढें अनंगपाळ निकरानें लढत असतां त्याचा हत्ती तीर व गोळे लागून घाबरून रणभूमीवरून पळत सुटला. त्याबरोबर आपला अधिपति पळाला असें वाटून हिंदु फौजेचा जोर खचला. ते युद्ध सोडून पळून गेले. महंमुदास विजय प्राप्त झाला, आणि द्रव्यलोभाची उत्कट इच्छा तृप्त करण्याची त्याला संधि मिळाली. हिमालयाच्या दक्षिणउतरणीवर नगर-कोट येथें एक देवस्थान होतें. तेथें ज्वालामुखी पर्वत असल्यामुळें तें फार पवित्र मानिलें जात असे. आसपासच्या राजेरजवाड्यांनीं तेथील देवास विपुल देणग्या दिल्यामुळें, तेथें अपार संपत्ति जमली होती. समरांगणीं सर्व फौज आल्यामुळें देवालयाजवळ कांहींच बंदोबस्त नव्हता. ही संधि साधून महमुदानें एकाएकीं येऊन तेथची सर्व संपत्ति लुटून गज्नीस प्रयाण केलें. 'ह्या प्रसंगीं सात लक्ष सुवर्ण दिनार,* सातशें मण सोन्याचांदीचे दागिने, दोनशें मण सोन्याच्या लगडी, दोन हजार मण चांदी; मोत्यें, हिरे वगैरे वीस मण जवाहीर, इतकें द्रव्य महंमुदास मिळालें.' असें फेरिस्ता म्हणतो.

ह्या दिव्य विजयाच्या सन्मानार्थ महंमुदानें गज्नीस एक मोठा समारंभ केला. या समारंभामध्यें सोन्याचीं सिंहासनें व मेजें तयार करून त्यावर

---

* दिनार हें मुसलमानांचें सोन्याचें नाणें होतें. त्याच्या किंमतीचें प्रमाण सर्वत्र सारखें नाहीं. आरब दिनार वजनानें अर्ध्या गिनी एवढा होता; म्हणजे हल्लींच्या भावानें त्याचे जवळ जवळ आठ रुपये होतात. हिंदुस्थानचा मण ८० शेरांचा, इराणी मण ११ शेरांचा, व आरबी मण २ शेरांचा आहे. आरबी मण धरिला तरी वरील संपत्तीची किंमत पुष्कळ होते.

हिंदुस्थानांतील सर्व लूट व्यवस्थितपणें मांडून लोकांस दाखविली; तसेंच अनेक मेजवान्या देऊन, आणि गोरगरिबांस दानधर्म, व थोर पदवीच्या गृहस्थांस व साधूंस नजराणे करून, महंमुदानें सर्वांस संतुष्ट केलें.

**महंमद सूरचा पराभव.**—हिरातच्या पूर्वेस घोर म्हणून एक डोंगराळ प्रांत आहे. सन ७३३ च्या सुमारास हा प्रांत खलीफांच्या ताब्यांत जाऊन तेथील सूर जातीच्या अफगाण लोकांनीं मुसलमानी धर्म स्वीकारिला होता. सन १०१० मध्यें महंमुदानें तेथील शूर सरदार महंमद याचा पराजय करून तो प्रांत जिंकिला. ह्याच सूरवंशी सरदारांनीं गज्नी येथील महंमुदाच्या वंशाचा पुढें नाश केला.

**पांचवी स्वारी,** (सन १०१०).—महंमुदानें पंजाबांत येऊन मुलतान घेतलें, आणि फत्ते लोदी यास कैद करून गज्नीस नेलें.

महंमुदानें **सहावी स्वारी** १०११त केली, आणि स्थानेश्वर येथील मातबर देवालय लुटलें; तेथील मूर्ती फोडिल्या आणि मुख्य देवाची मूर्ति गज्नीस नेली. अनंगपाळानें महंमुदास अडविण्याचे प्रयत्न केले, पण ते सिद्धीस गेले नाहींत. सन १०१३ व १४ ह्या वर्षी महंमुदानें काश्मीरप्रांतावर **दोन स्वाऱ्या** केल्या, पण त्या फारशा महत्त्वाच्या नाहींत. पुढील दोन तीन वर्षांत त्यानें मध्यआशियांत मोहिमा करून, समर्कंद, बुखारा वगैरे प्रांत जिंकिले; आणि कास्पियनसमुद्रापर्यंत आपल्या राज्याची मर्यादा वाढविली.

**नववी स्वारी,** ( सन १०१७ ).—ही स्वारी महत्त्वाची आहे. आजपर्यंत महंमुदानें पंजाबप्रांतापलीकडे आपला प्रवेश केला नव्हता; पण त्याला लुटीची चव लागून गंगानदीच्या कांठीं मोठमोठीं मातबर शहरें आहेत हें त्यास समजल्यामुळें, त्यानें फौजेचा वगैरे चांगला बंदोबस्त करून हिंदुस्थानावर स्वारी करण्याचा बेत केला. ह्या वेळीं त्याची फौज एक लाख स्वार व वीस हजार पायदळ इतकी होती. तो हिमालयाच्या लगत्यानें थोडथोड्या मजला करीत एकदम कनोजशहरावर आला. कनोजशहर आग्र्याचे पूर्वेस व कानपूरच्या वायव्येस गंगेपासून कांहीं मैलांच्या अंतरावर असून त्या वेळेस तें फार नामांकित व संपत्तिमान होतें. कनोजचा रजपूत राजा कुवरराय ह्यास महंमुदाच्या येण्याची कल्पना नव्हती. महंमुदापुढें आपला उपाय चालणार नाहीं हें जाणून, कुवरराय त्यास एकदम शरण गेला. कुवररायास उपद्रव न देतां महंमूद मथुरेस

गेला. तेथील कृष्णाचीं भव्य मंदिरें लुटून, मूर्ती वगैरे वितळवून, सांपड-लेली संपत्ति बरोबर घेऊन तो स्वदेशीं निघून गेला. हिंदुस्थानांतील सुंदर इमारती पाहून गज्नी शहरांत महंमुदानें त्या मासल्याच्या पुष्कळ इमारती व एक भव्य मशीद बांधिली. त्याच्या दरबारच्या लोकांनींही त्याचें या बाबतीत चांगलें अनुकरण केलें.*

**दहावी व अकरावी स्वारी,** ( सन १०२१–१०२३ ).–कनोजचा राजा महंमुदास शरण गेला, म्हणून त्याजविरुद्ध इतर रजपुतांनीं कट केला. बुंदेलखंडांतील कलिंजरच्या नंदराजानें कनोजवर स्वारी केली. कनो-जचे राजानें महंमुदाची मदत मागितली. महंमूद धांवत आला. पण तो येऊन पोंचण्यापूर्वीच कनोजच्या राजास कलिंजरचे राजानें ठार मारिलें होतें. महंमुदानें कलिंजरवर हल्ला केला, पण तेथें विशेष फायदा न होतां त्यास परत जावें लागलें. लाहोरचा राजा अनंगपाळ व त्याचा मुलगा जयपाळ हे रजपुतांचे कटांत सामील झाले होते; म्हणून लाहोरप्रांत महंमुदानें जिंकून आपले राज्यास जोडिला, आणि त्याचे संरक्षणार्थ सिंधुनदाचे पूर्वेस कायमची फौज ठेवून दिली. हाच हिंदुस्थानांतील मुसलमानी राज्याचा पाया होय. अकराव्या स्वारींत महंमुदानें कलिंजरचा नंदराज व ग्वालेरचा राजा यांस जिंकिलें, आणि त्यांजपासून दंड घेऊन महंमुदानें त्यांचीं राज्यें त्यांस परत दिलीं.

**५. सोमनाथची स्वारी,** ( सन १०२४ ).—ही स्वारी सर्वांत मोठी व महत्त्वाची आहे. स्वारी करावी तर सोमनाथच्या सारखी करावी असें मुसलमान लोक अद्यापि म्हणतात. काठेवाड द्वीपकल्पास पूर्वी सौराष्ट्र असें नांव होतें. त्याचे दक्षिणटोंकाजवळ लहानशा द्वीपकल्पावर सोमनाथाचें एक पवित्र व प्रख्यात देवालय होतें. ' सौराष्ट्र सोमनाथ ' ह्या शब्दांचा अपभ्रंश होऊन ह्या देवालयास सोरटीसोमनाथ म्हणत. गज्नी येथून

---

* हिंदुस्थानांतील इमारतींविषयीं महंमुदानें खालील मजकुराचें पत्र गज्नी येथील आपल्या कारभाऱ्यास पाठविलें. ' या ठिकाणीं हजारों मजबूद इमारती आहेत; बहुतेक आरसपानाच्या आहेत. देवालयें तर असंख्य आहेत. ह्या कनोजशहरास प्रस्तुत वैभव प्राप्त होण्यास कोट्यवधि दिनारांचा खर्च लागला असेल यांत संशय नाहीं. दोनशें वर्षांच्या काळांत सुद्धां असल्या इमारती बांधणें अशक्य आहे.

हें एक हजार मैल दूर आहे. दरसाल या क्षेत्रीं असंख्य यात्रा जमे. सोमनाथाइतकें विख्यात व श्रीमान देवस्थान सर्व हिंदुस्थानांत नव्हतें. सोमनाथाचे मूर्तीस समुद्रलाटा स्नान घालीत. त्याच्या पूजेस एक हजार ब्राह्मण नेमिलेले होते. सोमनाथाची इतर देवांवर वक्रदृष्टि झाल्यामुळें, महंमुदानें त्यांचीं देवळें जमीनदोस्त केलीं, पण सोमनाथ त्यास जिंकितां येणार नाहीं असा ह्या देवालयाविषयीं लोकांचा ग्रह होता. हा लोकांचा समज ऐकून महंमुदास त्वेष चढला. सोमनाथाचा विध्वंस केल्याची कीर्ति मिळविण्याची, आणि तेथची अपार संपत्ति हरण करण्याची त्यास जबर इच्छा उत्पन्न झाली. गज्नीहून सोमनाथाकडे येण्याचे दोन मार्ग आहेत. एक सिंधदेशांतून हल्लींच्या बोलन व खोजाक घाटांनीं, आणि दुसरा खैबर घाटानें पेशावर, मुलतान व अजमीर ह्या प्रांतांतून. सिंधप्रांतांतील मार्ग अवघड व वाळवंटांतून असल्यामुळें महंमुदानें दुसरा मार्ग स्वीकारिला, आणि तीस हजार स्वार, आणि तीस हजार उंट, पाणी व धान्य यांनीं लादलेले बरोबर घेतले. स. १०२४ च्या ऑक्टोबर महिन्यांत तो मुलतानास पोंचला आणि तेथून सर्व तयारीनिशीं अजमिरावर आला. तेथें रजपूत राजांची कांहींच तयारी नव्हती. महंमूद येतांच अजमीरचा राजा पळून गेला. गुजराथेंत त्या वेळेस चालुक्य नांवाचे राजे अनहिलवाडा ऊर्फ अनहिलपट्टण येथें राज्य करीत होते. अजमिराहून महंमूद अनहिलवाड्यास आला. तेथचा राजाही पळून गेला होता. तेव्हां अनहिलपट्टण घेण्याचे नादास न पडतां महंमूद थेट सोमनाथावर आला.

देवालयाच्या सभोंवार भक्कम तट असून त्यावर मजबूद पहारा होता. 'सोमनाथ तुम्हा सर्वांचा संहार करील.' असें एका दूतानें येऊन महंमुदास कळविलें. दुसऱ्या दिवशीं शुक्रवार होता. सकाळींच महंमुदानें 'अल्ला हो अकबर', अशी आरोळी ठोकून किल्ल्यावर हल्ला सुरू केला. तीन दिवस निकराचें युद्ध झालें. इतक्या अवधींत आसपासचे रजपूत राजे व अनहिलवाड्याचा राजा हे देवालयाचे संरक्षणास धांवत आले. मुसलमानांचे प्रयत्न निष्फळ होऊं लागले. तेव्हां महंमुदानें गुढघे टेंकून प्रार्थना केली आणि ईश्वराचा कौल मिळाल्याप्रमाणें एकदम उठून तो रजपुतांवर उलटला. अशा अधिपतीपुढें पळून जाणें लांच्छन होय असें समजून त्याचे मागोमाग त्याची फौजही घुसली. हा निकराचा हल्ला सहन न

होऊन रजपूत लोक वाट फुटेल तिकडे पळाले. कित्येक तर होड्यांत बसून निघून गेले. तेव्हां महंमुदाचा देवालयांत प्रवेश झाला. ब्राह्मणांच्या गर्दीतून महंमूद कांहीं अनुयायांसह देवालयांत शिरला. देवालयांत एकच दिवा असून तें भयाण दिसत होतें. मंडपाच्या खांबावर नानातऱ्हेचीं चित्रें खोदलेलीं होतीं. सोन्याच्या सांखळ्यांनीं बांधिलेल्या अनेक घंटा लोंबत होत्या. महंमूद थेट गाभाऱ्यांत गेला. मूर्ति नऊ फूट उंच होती. ब्राह्मणांनीं नानातऱ्हेच्या विनवण्या करून सांगितलें, 'तुम्ही मूर्तीस हात न लावाल, तर सोन्याच्या राशी देण्यास आम्ही तयार आहों.' महंमूद बोलला, 'मूर्ति विकणारा ( बुत्फरोश् ) अशा कीर्तीपेक्षां, ती फोडल्याची ( बुत्शिकन् ) कीर्ति मला ज्यास्त प्रिय आहे.' नंतर आपला सोटा मारून त्यानें ती मूर्ति फोडिली. तत्क्षणीं हिरेमाणकांचे ढीग त्या मूर्तीतून खालीं पडले. हें द्रव्य ब्राह्मण देत होते त्यापेक्षां अनेकपट ज्यास्त होतें.

इराण, आरबस्तान वगैरे देशांतून अनेक प्रवासी हिंदुस्थानांत येत, त्यांजपासून प्रत्यक्ष माहिती मिळवून झकेरिया कझीनी नांवाच्या पर्शियन

गृहस्थानें स. १२६३त लिहिलेली हकीगत उपलब्ध आहे; तींत सोमनाथाविषयीं खालील मजकूर आहे.

'सोमनाथाच्या मंदिरास छप्पन्न सागाचे खांब होते. मूर्तीच्या गाभाऱ्यांत गुडुप अंधार होता; पण तेथें रत्नखचित झुंबरांचा लखलखाट पडत असे. चंद्रग्रहणप्रसंगीं लाखों यात्रा दर्शनास जमे. भरतीच्या वेळेस मूर्तीला समुद्रस्नान होई. मंदिराच्या खर्चास दहा हजार गांवांचें उत्पन्न लावून दिलेलें होतें. शिवाय हजारों वर्षें भाविक लोकांनीं देवास अर्पिलेल्या नानाविध देणग्यांच्या योगानें मंदिरांत अपार संपत्तीचा संचय झाला होता. देवाच्या स्नानास दररोज काशीहून गंगोदकाची कावड येत असे. देवाच्या पूजेस एक हजार ब्राह्मणांची नेमणूक होती, आणि पांचशें कलावंतिणी होत्या. मुख्य मूर्तीशिवाय सभोंवार सोन्याचांदीच्या आणखी शेंकडों मूर्ती होत्या. देवाच्या पूजेस मौल्यवान उपकरणीं होतीं, त्यांची तर गणतीच नाहीं. ह्या सर्व संपत्तीचा अंदाज दोन कोटी पौंड म्हणजे आजच्या भावानें तीस कोटी रुपये होतो.

सोमनाथाची मूर्ति सामान्य मनुष्याच्या आकाराची होती. हातांच्या मुठी वळून त्या गुडघ्यांवर टेंकिलेल्या होत्या. मूर्तीचा वर्ण रक्तकृष्ण असून,

डोळ्यांत हिरे बसविलेले होते, ते नेहमीं चमकत असत. मूर्तीस खालीं किंवा वर आधार कांहीं एक नव्हता. ती अंतराळीं लटकत होती. गज्नवी महंमूद हा चमत्कार पाहून थक्क झाला. खालीं वर कांहीं तरी अदृश्य आधार मूर्तीला असेल असें वाटून, भाल्यानें त्यानें सर्व बाजू तपासून पाहिल्या. पुढें विचार करितां एकानें कल्पना काढिली, कीं मूर्ति लोखंडाची असून डोक्यावरील छत्रास लोहचुंबक बसविलेला असावा, आणि त्याच्या आकर्षणानें मूर्ति अंतराळीं लटकत असावी. कांहींना ही कल्पना पटली; कांहींना ती खरी वाटेना. तेव्हां वरील छत्राचे एक दोन तुकडे काढून मूर्तीचा तोल बिघडतो कीं काय हें पाहण्यास महंमुदानें आज्ञा केली; त्याप्रमाणें वरचे दगड काढितांच मूर्ति डळमळूं लागली; आणखी ज्यास्त दगड काढिल्याबरोबर ती हळू हळू खालीं जमिनीवर बसली.'* (काय हें कसब, काय ही संपत्ति, व काय तिचा विनियोग !!)

सोमनाथ येथें थोडे दिवस राहून महंमूद परत निघाला. अनहिलवाड्याचा राजा भीमदेव गुंदाव किल्ल्याचा आश्रय करून राहिला होता. तो किल्ला घेऊन आणि तेथचें द्रव्य हरण करून महंमूद अनहिलवाड्यास गेला. तेथें त्यानें बराच मुक्काम केला. गुजराथेंतील बागबगीचे, हिरवीगार शेतें, व फलपुष्पांचे आल्हाददायक मळे पाहून तेथेंच राजधानी स्थापन करून राहवें असा त्याचा मनोदय होता. गुजराथेंत सोन्याच्या खाणी आहेत असेंही त्यास समजलें होतें. परंतु त्याचे सल्लागार हिंदुस्थानांत राहण्याच्या विचारास अनुकूल नव्हते. म्हणून तो बेत रहित करून गुजराथेंत एकंदर वर्षभर मुक्काम झाल्यावर तेथच्या राज्यावर एका इसमाची स्थापना करून तो स्वदेशीं निघाला. राजा भीमदेव व इतर रजपूत राजे त्याच्या अजमीरच्या वाटेवर त्यास अडविण्याकरितां टपून बसले होते. हें त्यास कळतांच सिंधच्या वाळवंटांतील नवीन मार्गानें तो गज्नीकडे जाऊं लागला. ह्या वाटेंत

---

* कित्येकांच्या मतें सोमनाथाची मूर्ति मुळींच नव्हती, फक्त एक लिंग होतें. सोमनाथाचें स्थान बारा ज्योतिर्लिंगांपैकीं एक आहे. महंमुदान गज्नीस जीं छकलें नेलीं तीं ह्या लिंगाचीं असलीं पाहिजेत. मूर्तीची हकीगत फेरिस्त्यानें दिलेली झूट आहे असें लेन पूल म्हणतो. तथापि मूर्ति व लिंग हीं दोनही असण्याचाही संभव आहे.

उन्हाच्या तापानें व नानातऱ्हेच्या रोगांनीं त्याच्या फौजेवर पुष्कळ अनर्थ गुदरले. वाटाड्यांनीं भलतेच रस्ते काढून त्यांस फसविलें; आणि सोमनाथावरील अरिष्टाचा थोडाबहुत सूड घेतला. सिंधुनदीस पायउतार नव्हता. महंमुदानें बरोबर होड्या ठेविल्या होत्या. त्यांत बसून सिंधप्रांतांतून लोकांशीं एकसारखे झगडे करीत, मोठ्या कष्टानें तो मुलतानास पोंचला व तेथून स्वदेशीं गेला. सोमनाथाच्या मूर्तीचीं छकलें व देवालयाचे दोन नकशी काम केलेले मोठे चंदनी दरवाजे त्यानें गज्नीस नेले. मूर्तीचें एक छकल त्यानें गज्नीच्या मशीदीस लाविलें, आणि दुसऱ्याचे दोन तुकडे करून ते मक्केस व मदिनेस पाठवून दिले. महंमुदाच्या मुलानें सोमनाथाचे दरवाजे बापाच्या कबरेस लाविले. आठशें वर्षांनीं म्हणजे सन १८४२त हे दरवाजे इंग्रजांनीं मोठ्या समारंभानें मिरवीत आग्र्यापर्यंत परत आणिले. तेथच्या किल्ल्यांतील एका कोठडींत ते हल्लीं पडून आहेत, असें म्हणतात.*

ह्यापुढें महंमुदानें हिंदुस्थानावर स्वारी केली नाहीं. इराणावर त्यानें एक स्वारी करून तिकडील बराच प्रदेश जिंकिला. पुढें महंमुदास मधुमेहाचा विकार जडला, आणि त्याच योगानें तो आपल्या वयाच्या त्रेसष्टावे वर्षी सन १०३० ह्या सालीं ता. ३० एप्रिल रोजीं मरण पावला. हिंदुस्थानावर स्वाऱ्या करण्याचा जो त्यानें एकसारखा पंचवीस वर्षें उद्योग केला, त्यामुळें हिंदुस्थानांत येण्याची मुसलमानांची वाट चांगली मळून गेली, पंजाबप्रांत त्यांच्या हस्तगत झाल्यानें पुढील राज्यस्थापनेस त्याचा पायासारखा त्यांस उपयोग होऊं लागला, आणि आपणांस हिंदुस्थान जिंकितां येईल, अशी आत्मप्रतीति मुसलमानांच्या ठिकाणीं उत्पन्न झाली.

---

* सोमनाथाचे चंदनी दरवाजे इंग्रजांनीं स. १८४२ त परत आणिले ही गोष्ट सांगून, मेडोज टेलर म्हणतो, गज्नीहून आणिलेले दरवाजे सोमनाथाचेच कशावरून ? सोमनाथाचे नसल्यामुळेंच ते आग्र्यास पडून राहिले. सोमनाथ गायकवाडच्या ताब्यांत असल्यामुळें, त्यांनीं ते आपल्या ताब्यांत घ्यावे असें इंग्रजसरकारानें गायकवाड दरबारास कळविलें. त्याप्रमाणें गायकवाडांनीं ते आणिले नाहींत असें दिसतें. ते सोमनाथाचे नव्हत अशाबद्दलचा पुरावा टेलरनें दिलेला नाहीं.

**६. महंमुदाची योग्यता.**—गज्नीच्या महंमुदाचें नांव आजतागाईत हिंदुस्थानांत प्रसिद्ध आहे. मुसलमान ग्रंथकार त्याची अतिशय तारीफ करितात. तो पैशाचा फार लोभी होता. मरणापूर्वी त्यानें आपली सर्व दौलत एके-ठिकाणीं आणवून तिची शेवटची भेट घेतली; तेव्हां आपण आतां तीस मुकणार असें मनांत येऊन, त्यास रडूं आलें. तरी तीपैकीं त्यानें कोणास कांहीं दिलें नाहीं. हा महान पराक्रमी, चंचल, साहसी व व्यवहारचतुर होता. निष्पक्षपातानें तो सर्वांस सारखा न्याय देई. राज्याच्या अंतर्व्य-वस्थेंत त्यानें फारसें लक्ष घातल्याचें दिसत नाहीं. त्यास विद्येची अभि-रुचि फार होती. त्यानें गज्नी येथें एक मोठी पाठशाळा व पदार्थसंग्रहालय स्थापिलें हा कवींचा मोठा भोक्ता होता. अन्सारी, व फिर्दोसी हे प्रसिद्ध कवि त्याच्या पदरीं उदयास आले. त्यानें शिल्पकलेसही चांगलें उत्तेजन दिलें. हिंदुस्थानांतील कारागीर आणवून त्यानें गज्नी शहरांत नानातऱ्हेच्या इमारती वगैरे सुंदर कामें करविलीं. तो अंतःकरणाचा क्रूर नव्हता. धर्मप्रसा-राच्या कामांत किंवा त्यानें केलेल्या अनेक स्वाऱ्यांत,समजून उमजून त्यानें क्रौर्य किंवा जुलूम केलेला आढळत नाहीं. मुसलमानी धर्मावर त्याची पक्की निष्ठा होती. तरी त्या बाबतींत लोकांवर त्यानें जुलूम केला नाहीं, म्हणून कित्येक मुसलमान ग्रंथकार त्यास दोष देतात. त्याची लष्करी शिस्त फार सक्तीची असे. युद्धकौशल्य त्याचे अंगीं विशेष असावें असें दिसतें. शत्रूंनीं आपला रस्ता अडविला आहे, व त्यांची संख्या अगणित आहे, असें समजून आल्यावर आपल्या लहानशा फौजेची व्यवस्था चतुराईनें करून, भलत्याच मार्गानें जाऊन शत्रूंस फसवावें व हटकून जय मिळवावा, हें सामान्य कसब नव्हे. युद्धकलेच्या इतिहासांत त्याचें नांव चिरस्थायी होण्यास योग्य आहे. महंमूद जरी खर्चिक नव्हता, तरी दरबारचें वैभव व डामडौल कायम राखण्यांत तो आपला हात आखडीत नसे. गज्नी शहर सुशोभित करण्यास त्यानें पुष्कळ खर्च व अत्यंत परिश्रम केले. त्याच्या अनेक स्वाऱ्यांत धरून आणिलेले लोक इतके पुष्कळ झाले होते, कीं दर एकास अडीच रुपये देऊनही त्यांस कोणी खरीद करीत नसे. महंमुदाची कायमची फौज पन्नास-साठ हजार होती. शिवाय लढाईच्या प्रसंगीं कांहीं हंगामी फौजही तो ठेवी.

हिंदुस्थानांत आपलें राज्य स्थापन करण्याची त्यास इच्छा होती असें दिसत नाहीं. गुजराथचें राज्य त्याच्या स्वाधीन झालें असूनही त्याजवर

त्यानें एक हिंदु राजा बसविला. पंजाबप्रांत मात्र त्यानें गज्नीच्या ताब्यांत आणिला. त्याजवर महंमूद आपल्या तर्फेचे सुभेदार नेमून पाठवी. तरी तेवढ्यावरून तो हिंदुस्थानचा राजा होता असें म्हणतां येत नाहीं. हिंदुस्थानांत निरनिराळीं हिंदु राज्यें होतीं, त्यांपैकीं कित्येक महंमुदानें जिंकिलीं; त्यांजवर आपल्या पसंतीचे राजे बसविले, आणि कित्येकांपासून फक्त खंडण्या घेतल्या. तथापि तो स्वदेशास गेल्यावर हे राजे तह मोडीत, त्यामुळें महंमुदास पुनः स्वाऱ्या करणें भाग पडे. महंमुदाचा उद्देश राज्यवृद्धीचा नव्हता. धर्मप्रसार करणें व लूट मिळविणें ह्यांपलीकडे त्याला कांहीं आवडत नव्हतें. महंमुदाचे मागून जे राजे गज्नीच्या तख्तावर बसले, त्यांपैकीं कित्येकांनीं हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या. एकानें तर कांहीं दिवस लाहोर शहर आपली राजधानी केली होती. पण एकंदरींत महंमुदाच्या वंशानें हिंदुस्थानावर राज्य केलें असें म्हणतां येत नाहीं. राज्यस्थापना झाली नाहीं, त्याप्रमाणें मुसलमानी धर्माचा प्रसारही हिंदुस्थानांत झाला नाहीं. आरबस्तानांतील अस्सल मुसलमानांप्रमाणें जुलुमानें लोकांस बाटविणें किंवा त्यांच्या पाठीमागें जिझिया कराचें शुक्लकाष्ठ लावणें, ह्या गोष्टी महंमुदानें केल्या नाहींत. ह्या सर्व प्रकारांवरून पाहतां महंमूद सज्जन होता असें दिसतें. त्याच्या वेळच्या इतर राजांशीं तुलना केली असतां महंमुदाची योग्यता फार मोठी दिसेल हें निर्विवाद आहे. वरचेवर स्वाऱ्या करून त्यानें मूर्ती फोडिल्या व देवालयें हस्तगत केलीं, त्यांत पैशाचा लोभच त्याचा मुख्य हेतु होता.

महंमुदानें आपल्या दरबारचा थाट पुष्कळ वाढविला. तो विद्येचा भोक्ता होता. मोठमोठ्या स्वाऱ्या संपवून परत आल्यावर तो आपल्या सभोंवतीं कवि व विद्वान् मंडळी जमवून त्यांच्या समागमांत कालक्रमणा करी. त्यानें निरनिराळ्या देशांतून कवि व कुशल कारागीर गज्नीस आणिले. सामानी राज्य बुडाल्यावर तेथें जे विद्वान् लोक होते, तेही गज्नीस येऊन राहिले. अल्बेरुनी नांवाचा प्रसिद्ध विद्वान् पुरुष मोठा ज्योतिषी असून तो संस्कृत शिकला होता. तो हिंदुस्थानांत पुष्कळ फिरला. त्याचें प्रवासवृत्त आरबी भाषेंतून इंग्रजींत उतरलेलें प्रत्येकानें अवश्य वाचण्यालायक आहे. फराबी हा विद्वान् साधु होता; उत्बी म्हणून एक इतिहासकार होता, तोच महंमुदाचा सेक्रेटरी होय. बैहाकी नांवाचा दुसरा एक प्रसिद्ध इति-

हासकार महंमुदाजवळ होता. अन्सुरी, फर्रुखी, अस्जूडी, हे फारशींतले अव्वल कवि होत. फिर्दौसी तर सर्वांहून श्रेष्ठ झाला; त्याचा 'शहानामा' ग्रंथ अजरामर झाला आहे. ह्या सर्व विद्वानांचा महंमुदानें परामर्ष घेतला; आणि उलट त्यांनीं सुलतानाची कीर्ति भूतलावर पसरिली.

विद्वानांचा परामर्ष घेण्यांत जरी महंमुदानें कसूर केली नाहीं, तरी द्रव्यलोभाचा आरोप त्याजवर आलेला आहेच. त्याजबद्दल अनेकांनीं अनेक आख्यायिका लिहून ठेविल्या आहेत. त्या खऱ्या असल्या, तरी सत्कार्याकडे द्रव्य खर्चण्यास त्यानें कमी केलें नाहीं. दरसाल विद्वान् मंडळीच्या उत्तेजनार्थ त्याचा खर्च तीस लाख रुपये नेमिलेला होता. त्यानें गज्नीस एक मोठी पाठशाळा स्थापून, तिच्यांत पुस्तकालय, पदार्थसंग्रहालय विद्वान् शिक्षक, व शिष्यवृत्ती वगैरेंची तर्तूद केली. त्याची स्वतःची मशीद आरसपानाची असून, सोन्याचांदीच्या दिव्यांनीं व उत्कृष्ट बिछाइतींनीं शृंगारिलेली होती. गज्नी शहरांत त्यानें कालवे आणून हौद व कारंजीं बांधिलीं त्याचा कित्ता त्याच्या सरदारांनीं उचलिला. गज्नी शहर म्हणजे यःकश्चित् मातीच्या झोंपड्यांचें खेडें होतें, तें त्यानें टोलेजंग इमारती उठवून शृंगारिलें. एवढ्या कर्तबगारीचा मनुष्य रानटी होता असें म्हणतां येणार नाहीं. राज्यावर आला तेव्हां गज्नीच्या आसपास थोडासा डोंगराळ प्रदेश त्याच्या ताब्यांत होता; पण मरणसमयीं उत्तरेस आरल व कास्पियन समुद्र, पश्चिमेस तैग्रिस नदी, पूर्वेस हिंदुस्थानचा वायव्यभाग, एवढ्या विस्तृत प्रदेशावर त्याचा ताबा होता. एवढें अफाट राज्य कमावणारा व वरच्या प्रमाणें अनेक लोकोपयोगी कामें करणारा पुरुष सामान्य नव्हे. शूर व धाडसी शिपाई खरा, तसेंच शारीरिक व मानसिक श्रमांतही असामान्य खरा, पण तो मुत्सद्दी नव्हता. आपलें राज्य चिरस्थायी करण्याचे उपाय त्यानें केले नाहींत. तो मरण पावल्याबरोबर त्याचें राज्य विसकळित झालें. न्यायी, उदार, विद्वद्भोक्ता व शिपाई या चार शब्दांत महंमुदाची सर्व कर्तबगारी येते.

महंमुदाच्या वेळची हिंदुस्थानची स्थिति मात्र शोचनीय दिसते. अनेक प्रसंगीं रजपूत राजे एकत्र होऊन महंमुदाशीं लढण्यास आले. त्यांच्या फौजेची संख्या अतोनात होती. असें असतां एकाही प्रसंगीं त्यांस यश मिळालें नाहीं. युद्धाची शिस्त आगाऊ ठरवून ठेवणें हें जें

युद्धकलेचें पहिलें महत्तत्व तें हिंदु लोकांनीं कधींही पाळिलें नाहीं. अनेक प्रसंगीं अगदीं जयप्राप्ति होण्याच्या ऐन गर्दीत, सेनापति पडला, अगर त्यास हत्ती घेऊन पळाला, किंवा निशाण दिसेनासें झालें, कीं हिंदु फौज भयभीत होऊन समर सोडून पळून जाई. महंमुदानें परमेश्वराची आराधना करावी म्हणजे जय ठेवलेला, असें त्याचे लोकांस वाटे. पण शौर्यवीर्यादि गुणांमध्यें पुरातनकाळापासून नांवाजलेल्या रजपूत लोकांच्या हातून महंमुदाच्या यःकश्चित् फौजेचा मोड एकदांही होऊं नये हें मोठें नवल आहे. एकंदरींत हिंदु राज्यांचा वृद्धापकाळ झाला होता. लोकांचे शौर्याचे व पराक्रमाचे दिवस गेले होते. कोण आला व कोण गेला ह्याची त्यांस चाड राहिलेली नव्हती. अंगांतील सत्त्व निघून गेल्यामुळें जुलमास्तव हातपाय हालवावे, अशांतली त्यांची स्थिति झाली होती. ह्याच्या उलट महंमुदाची स्थिति होती. महंमुदाचे राज्यास नुकता आरंभ झालेला; मुसलमानी धर्माची भरज्वानी; परदेशीं गेल्याशिवाय स्वदेशीं राहून काम भागणारें नव्हतें. तेव्हां अर्थात्च मुसलमानांचा तीव्र वेग वृद्ध हिंदूंस सहन झाला नाहीं.

महंमुदाच्या अनेक स्वाऱ्यांत त्याचे जे साथीदार होते, त्यांपैकीं कोणाच्याही मनांत हिंदुस्थानांत कायमची वस्ती करून राहण्याचें नव्हतें. हिंदुस्थानांत एक राज्य नव्हतें. अनेक लहान लहान राज्यें असून त्यांजमध्यें वैमनस्यें होतीं. ह्या कारणास्तव महंमुदास सुलभ विजय प्राप्त झाले. पण त्याच कारणामुळें हिंदुस्थानांत कायमचें राज्य स्थापणें त्यास अशक्य झालें. कारण एक राज्य जिंकावें, तों दुसरें लढण्यास तयार आहेच; असा प्रकार असल्यामुळें, हिंदुस्थान देश मुसलमानांच्या ताब्यांत एकदम येणें शक्य नव्हतें. शिवाय मध्यआशियांतील डोंगराळ मुलखांत राहण्याची संवय झालेले तुर्क हिंदुस्थानांत राहण्यास कबूल नव्हते. महंमुदानें उत्तरेस व पश्चिमेस आपल्या राज्याचा विस्तार पुष्कळ केला होता, आणि त्यांतच तुर्क लोक संतुष्ट होते.

अबुल् आब्बास व अहंमद मैमंदी म्हणून महंमुदाचे दोन प्रख्यात वजीर होते. त्यानें सोन्याचांदीचीं नाणीं पाडिलीं, त्यांपैकीं कांहींचा

संग्रह लंडनच्या ब्रिटिश म्यूझियममध्यें आहे. महंमुदाच्या मागून जे सुलतान गज्नीच्या तख्तावर बसले, त्यांचा हिंदुस्थानच्या इतिहासाशीं फारसा संबंध नाहीं; आणि पुढें त्या वंशांत पराक्रमी पुरुष फारसे झाले नाहींत. त्यांचें वर्णन पुढील प्रकरणीं येईल.

## प्रकरण सहावें.

## गज्नवी व घोरी घराणीं.

### सन १०३०–१२०६.

१. सुलतान मस्-ऊद, (स. १०३०–४०). २. मौदूदपासून तिसरा मस्-ऊदपर्यंत. ३. सुलतान बहराम, (स. १११८–५२). ४. घोरींचा उदय, (स. ११५७-९३). ५. तत्कालीन देशस्थिति,-रजपूत राज्यें. ६. भाट लोक व त्यांची कामगिरी. ७. पृथ्वीराज चव्हाण, (स. ११५९–९३). ८. महंमद घोरीच्या स्वाऱ्या व कारकीर्द. ९. ह्या कालाचें प्रत्यालोचन.

महंमुदाचे पश्चात् जे सुलतान गज्नी येथें झाले, त्यांनीं हिंदुस्थानांत ज्यास्त प्रदेश जिंकिला नाहीं. उलट महंमुदाच्या वेळचा बराच प्रदेश त्यांच्या हातांतून गेला. बहुतेक राजे दुर्बल होते. कित्येक तर गज्नीचें राज्य गेल्यावर लाहोर येथेंच येऊन राहिले.

**१. सुलतान मस्-ऊद (सन १०३०–१०४०).**–महंमुदास दोन जुळे मुलगे होते. एक महंमद व दुसरा मस्-ऊद. आपल्या पाठीमागें महंमदानें गादीवर बसावें असें महंमुदानें ठरविलें होतें. महंमुदाच्या मरणसमयीं दोघेही जवळ नव्हते. मस्-ऊद इस्पहान येथें कारभारावर होता. तेव्हां महंमद गादीवर बसला. ‘ इराणांतील मुलुख माझ्याकडे तोडून दिल्यास मी एकंदर राज्यावरचा हक्क सोडितों, ’ असें मस्-ऊदनें महंमदास कळविलें. तें न आवडून महंमद फौज घेऊन इराण प्रांत काबीज करण्याकरितां निघाला. लोकांची व विशेषतः फौजेची भक्ति मस्-ऊदवर ज्यास्त होती. तोही तिकडून महंमुदावर चाल करून आला. कित्येक दिवसपर्यंत दोघांमध्यें युद्धप्रसंग होऊन महंमद मस्-ऊदचे हातांत सांपडला. लगेच

मस्-ऊदनें महंमदाचे डोळे काढून त्यास कैदेंत टाकिलें, व गज्नीचें राज्य बळकाविलें. मस्-ऊद शरीरानें बळकट व शूर होता. आडदांड स्वभावामुळें तो बापास फारसा आवडत नसे. हिंदुस्थानच्या संबंधानें मस्-ऊदची कार्कीर्द फारशी महत्त्वाची नाहीं; तरी त्यानें इकडे एक दोन स्वाऱ्या केल्या. सन १०३३त काश्मीरच्या डोंगरांतील सरस्वती किल्ला त्यानें सर केला. पुढील दोन वर्षांमध्यें त्यानें गज्नी येथें एक सुंदर वाडा बांधिला, आणि एक सुंदर रत्नजडित सिंहासन तयार केलें. सन १०३९त त्यानें हिंदुस्थानावर दुसरी स्वारी केली आणि शिवालिक पहाडांतील हंसी नामक बिकट किल्ला सर केला. हा किल्ला अवघड असल्यामुळें मुसलमानांस घेतां येणार नाहीं असा हिंदु लोकांचा समज होता. हंसी घेऊन मस्-ऊद सोनपतास आला. तेथून परत फिरून लाहोर येथें आपला मुलगा मौदूद यास ठेवून तो गज्नीस परत गेला.

गज्नवी राज्यावर हात मारण्यास ह्याच वेळेस सेल्जुक तुर्क पुढें सरसावले. महंमुदासारखेच हे मध्यआशियांतले तुर्क होत. महंमुदाचेंच अनुकरण त्यांनीं केलें. मध्यआशियांत अमूदर्या नदीच्या कांठीं मेंढ्या राखण्याचें काम सोडून देऊन, त्यांनीं दक्षिणेस चाल केली; आणि खुरासान प्रांत बळकाविला. त्यांचा सरदार तुघ्रलबेग स. १०३८ त खुरासान प्रांताचा स्वतंत्र कारभार करूं लागला. हा प्रांत परत घेण्याकरितां मस्-ऊदनें तुघ्रलच्या उत्तरेकडील प्रदेशावर स्वारी केली. तेव्हां तुघ्रल व मस्-ऊद ह्या दोघांची मर्व्हनजीक निकराची लढाई होऊन, मस्-ऊद पराभव पावला. तेथून परत गज्नीस आल्यावर तेथेंही बंडावा सुरू झाला, तेव्हां तो हिंदुस्थानांत आला. इकडेही त्याची फौज त्याजवर उठली. आंधळा महंमद बरोबर होताच. पुढें मस्-ऊदला पदच्युत करून महंमदाला लोकांनीं राज्यपद दिलें; आणि महंमदाचा मुलगा अहंमद कारभार पाहूं लागला. ह्या अहंमदानें मस्-ऊदला ठार मारिलें ( स. १०४० ).

ख्वाजा अहंमद हसन मैमंदी हा मस्-ऊदचा वजीर मोठा कर्तृत्ववान असून महंमुदाच्या तालमींत कसलेला होता. त्यानें मस्-ऊदची बाजू चांगली संभाळिली. त्यास वजिरीचें पद देतांना सुलतानानें दरबार भरवून त्याचा मोठा सत्कार केला. त्या दिवशीं गज्नीस वजिराच्या पुढें नानाप्रकारच्या नजराण्यांचे व देणग्यांचे ढीग पडले. ते सर्व त्या राजनिष्ठ वज़िरानें

आपल्या धन्यास अर्पण केले. मैमंदी यास वजिरी देतांना, जुना वजीर हसनाक याचा सुलतानानें शिरच्छेद करविला, त्या वेळीं हसनाकची आई तेथें हजर होती, ती म्हणाली, 'महंमुदासारख्या थोर पुरुषानें माझ्या मुलास इहलोकची सत्ता दिली, तर त्याचा मुलगा मस्-ऊद ह्यानें त्यास परलोकची सत्ता दिली !'

मस्-ऊद भाग्यहीन होता असेंच म्हणावें लागतें ! तो पराक्रमानें कांहीं कमी नव्हता. औदार्यानें अलीची व शौर्यानें रुस्तमची त्यास उपमा देतात. त्याची शक्ति प्रचंड होती. तो हत्तीसही जेर करीत असे. त्यास विद्येचा व इमारतींचा विशेष शोक होता. त्यानें गज्नी येथें अनेक नवीन इमारती बांधिल्या. बैहाकी नांवाच्या मुसलमान गृहस्थानें मस्-ऊदची हकीकत स्वतः पाहिलेली लिहून ठेविली आहे. राज्यकारभाराच्या प्रत्येक बाबतींत मस्-ऊद स्वतः मन घालून काम करीत असे. पण भरंवशाचे म्हणून जे कामगार निरनिराळ्या प्रांतांवर तो नेमी, तेच स्वतंत्र होण्याच्या इच्छेनें त्याजवर उठत. पंजाबचे दोन अधिकारी त्यानें काढून टाकिले. शेवटीं 'तिलक' नांवाचा एक विद्वान् हिंदु गृहस्थ त्यानें पंजाबच्या कारभारावर नेमिला होता. पंजाब प्रांत महंमुदाच्या राज्यांत मोडत होता, म्हणून त्याच्या वंशानें बराच टिकाव धरिला. नाहीं तर, तुर्क लोकांनीं पश्चिमेकडचे बहुतेक डोंगराळ प्रदेश हिसकून घेतले असते.

मस्-ऊदच्या दरबारीं मद्यप्राशनाचा मोठा सपाटा चालत असे. मद्यप्राशनप्रसंगांचीं अनेक वर्णनें बैहाकीनें दिलीं आहेत. स्वतः अमीर, आणि दरबारची व लष्करांतली मंडळी मुद्दाम सुट्या घेऊन चैन करीत. गज्नजिवळ फिरोजबाग म्हणून एक आरामाची जागा होती, तेथें फौजेची परेड झाल्यावर मग मद्यप्राशनाचा समारंभ सुरू होई. गज्नवी महंमूदसुद्धां मद्यप्राशन करी, पण मस्-ऊदचा तडाखा फारच चाले.

२. सुलतान मौदूद (स. १०४१–१०४९).—अहंमदानें आपल्या बापाचा वध केला हें वर्तमान मौदूद यास बल्क प्रांतांत समजलें. लगेच तो उतावळीनें फौज घेऊन निघाला. अफगाणिस्तानांतील सर्व मुलुख त्याचे कबजांत आला. तेथून तो थेट लाहोरास गेला. लाहोर येथें आंधळा महंमद होता. दंतुर गांवीं उभयतांची लढाई होऊन मौदूदनें महंमदास पकडून ठार मारिलें, आणि आपण परत गेला. सन १०४३ त

मुसलमानांच्या विरुद्ध उत्तरहिंदुस्थानांतील रजपूत राजांनीं पुनः जमाव केला. हंसी, स्थानेश्वर, नगरकोट वगैरे किल्ले त्यांनीं परत घेतले, आणि लाहोरास वेढा घातला. तेथील मुसलमान लष्करानें जिवावर उदार होऊन आपला बचाव केला. शेवटीं निरुपाय होऊन उपासमार होऊं लागल्यामुळें मुसलमानांनीं वेढा घालणाऱ्या लोकांवर निकराचा हल्ला केला. त्यासरसे हिंदु लोक मागें हटले आणि मुसलमानांची सत्ता कायम राहिली. मौदूद सन १०४९ त मरण पावला.

सन १०४९पासून सन १०९८ पर्यंतच्या पन्नास वर्षांत राज्यांत पुष्कळ घालमेली झाल्या. राजघराण्यांत तंटे होऊन अनेक खून झाले. मौदूदनंतर त्याचा चार वर्षांचा मुलगा मस्-ऊद हा गादीवर आला, पण त्यास मौदूदचा भाऊ अबूल-हसन ह्यानें पदच्युत करून गादी बळकाविली. पंजाब व सिंधप्रांत गज्नवी सुलतानांच्या ताब्यांतून गेले होते, ते त्यानें परत मिळविले. सुलतान महंमुदाचा अबूल-रशीद म्हणून एक मुलगा होता, त्यानें अबूल-हसनापासून सन १०५१त गज्नीचें तख्त बळकाविलें. पण एकाच वर्षानें रशीद यासही मस्-ऊदचा मुलगा फर्रुखजाद यानें पदच्युत केलें. तो सहा वर्षें राज्य करून १०५८त मरण पावला. नंतर त्याचा भाऊ इब्राहीम गादीवर बसला. त्यानें सन १०९८ पर्यंत गज्नी येथें शांतपणें राज्य केलें. ह्याच्या कारकीर्दीत विशेष गोष्टी कांहीं घडल्या नाहींत. सन १०७९ त इब्राहीमनें पंजाबप्रांतावर स्वारी केली होती. इब्राहीम फार धार्मिक असे. त्यानें कुराणाचें भाषांतर केलें. त्यास चाळीस मुलगे व छत्तीस मुली होत्या.

हा बापापेक्षां ज्यास्त शूर व शहाणा होता. त्यानें सर्व कायद्यांचें एकीकरण केलें. तो स्वतः हिंदुस्थानांत आला नाहीं, तरी त्याच्या सरदारांनीं गंगानदीपर्यंत चाल करून पुष्कळ लूट आणिली. ह्याच्या कार्किर्दीत तुर्कांनीं गज्नीचा प्रदेश बहुतेक बळकाविला, तेव्हां गज्नीचे सुलतान पंजाबांत लाहोर येथें येऊन राहूं लागले. मस्-ऊदचा मुलगा अर्स्लान हा आपल्या भावांस कैदेंत टाकून गादीवर बसला, पण सेल्जुक तुर्कांशीं झगडण्याची शक्ति त्याच्यांत नव्हती; म्हणून त्यांचाच आश्रय स्वीकारून तो स्वसंरक्षण करूं लागला. सेल्जुक सुलतान संजर ह्याची बहीण मस्-ऊद ह्यास दिलेली होती, तिचाच मुलगा अर्स्लान. अर्स्लानचें

व त्याच्या भावाचें बांकडें आलें, तेव्हां त्या इतर भावांनीं आपला मामा सुलतान संजर ह्यास आपल्या कुमकेस बोलाविलें. तेव्हां संजर व अर्स्लान ह्यांचें तुंबळ युद्ध होऊन, अर्स्लान गज्नी सोडून पळाला; परंतु पुनः संजरशीं लढाईस उभा राहिला असतां पराभव पावून मारला गेला. संजरनें अर्स्लानचा भाऊ बह्‌राम ह्यास गादीवर बसविलें.

३. सुलतान बह्‌राम ( स. १११८–११५२ ).––बह्‌रामनें पुष्कळ वर्षें राज्य केलें. पण त्याच्या कारकिर्दींत तंटे सुरू झाले; त्यांतच ह्या गज्नवी वंशाचा शेवट झाला. पंजाबच्या रजपुतांची व इराणच्या सेल्जुक तुर्कांची गज्नवी सुलतानांस नेहमींच मोठी दहशत वाटत असे. परंतु गज्नवी वंशाचा नाश अखेरीस तिसऱ्याच शत्रूकडून झाला. गज्नी व हिरात ह्यांजमधील डोंगराळ प्रदेशांत घोर म्हणून एक प्रांत आहे. हाच प्रांत अफगाणांचें मूळ ठिकाण होय. आरबांनीं हा प्रांत जिंकून तेथील लोकांस मुसलमानी धर्माची दीक्षा दिली. पुढें आरबांचा पाडाव करून घोरचे अफगाण स्वतंत्र झाले. त्या प्रांतांत फिरोज-कोह् ( उदय-गिरि ) नांवाचा किल्ला असून, तेथेंच त्यांनीं आपली राजधानी केली. हा किल्ला स. १०१०त महंमुदानें जिंकिला होता. त्यानें राज्याचा कायमचा नाश न करितां, तेथील लोकांस मात्र आपल्या नोकरींत घेतलें. पण महंमुदाच्या पश्चात् घोरचे अफगाण शिरजोर झाले आणि आपणांस स्वतंत्र समजूं लागले. घोरचा त्या वेळचा अंमलदार कुत्-बुद्दीन सूर यास गज्नीच्या बह्‌रामची मुलगी दिलेली होती. परंतु त्या दोघांत स्नेहभाव बिलकुल नव्हता. उभयतांत कांहीं वैर उत्पन्न झालें, आणि बह्‌राम यानें आपला जांवई कुत्-बुद्दीन ह्यास पकडून ठार मारिलें. बह्‌रामची फार न्यायी व दयाशील अशी ख्याति आहे; अशा पुरुषानें प्रत्यक्ष जांवयाचा वध केला. त्याच्या घराण्याचा सर्वस्वी नाश व्हावयास येथूनच आरंभ झाला.

सैफ-उद्दीन व अला-उद्दीन असे कुत्-बुद्दीनचे दोघे भाऊ होते. त्यांनीं भावाचा सूड उगविण्याकरितां हातीं शस्त्र धरिलें. ते गज्नीवर चाल करून आले, तों इकडे बह्‌राम कर्मानचे डोंगरांत पळून गेला. सैफ-उद्दीन गज्नीस राहिला आणि त्यानें अला-उद्दिनास घोरची राजधानी फिरोज-कोह् येथें फौजेसह परत पाठविलें. बह्‌रामावर लोकांची विशेष भक्ति होती. हिंवाळ्यांत बर्फ पडून गज्नी व फिरोज़-कोह् यांजमधील

दळणवळण बंद पडल्याबरोबर, त्यांनीं बह्राम ह्यास परत आणिलें, आणि इकडे थाप देऊन सैफ-उद्दिनास बह्रामाबरोबर लढण्याची भर दिली. लढाई सुरू होतांच सर्व लोक सैफ-उद्दिनास सोडून बह्रामास जाऊन मिळाले. तरी कांहीं वेळपर्यंत सैफ-उद्दीन मोठ्या हिंमतीनें लढला. शेवटीं निरुपाय होऊन बह्रामाच्या हातीं सैफ-उद्दीन सांपडला. ह्या वेळीं सैफ-उद्दिनास बह्राम गौरवानें वागविता, तर कदाचित् तंटा मिटला असता; पण तसें त्यानें केलें नाहीं. सैफ-उद्दिनाची सर्व शहरभर धिंड काढून त्याची त्यानें नानाप्रकारें विटंबना केली, आणि शेवटीं हालहाल करून त्यास ठार मारिलें. ह्या योगानें अला-उद्दिनास त्वेष आला. या कृत्याचा पुरेपूर सूड घेण्याची त्यानें प्रतिज्ञा केली. बह्रामास काय वाटलें असेल तें असो; त्यानें युद्धाच्या आधींच तहाचें बोलणें लाविलें. अला-उद्दीन तें कबूल करीना. तेव्हां मग अर्थात् लढाई जुंपली. बह्रामाकडे लोक पुष्कळ असतां-ही कांहीं वेळ सुद्धां त्यानें टिकाव धरिला नाहीं. समरांगणांत उभें राहण्या-इतकेंही त्याला धैर्य नव्हतें. तो लढाई सुरू होतांच पळत सुटला. अर्थात् अला-उद्दिनास जय मिळाला आणि मोठ्या विजयोत्सवानें तो गज्नींत शिरला.

गज्नीची शंभर वर्षें भरलीं. तीन दिवसपर्यंत अला-उद्दीन यानें शहरभर तलवार व अग्नि यांचा प्रळय साजविला. सुलतानांचें वैभव, संपत्ति व सत्ता ह्यांचें दर्शक जेवढें म्हणून त्या विस्तीर्ण शहरांत होतें, त्या सर्वांचा त्या वेळीं संहार झाला. विद्वान् व निरुपद्रवी माणसांची सुद्धां कत्तल झाली. गज्नवी वंशांतील सुलतानांच्या कबरी देखील अला-उद्दीननें उकरून काढिल्या, आणि आंतील हाडें कुत्र्यांस खावयास दिलीं. फक्त महंमुदाची कबर व दोन उंच मनोरे त्यानें होते तसे राहूं दिले. एवढेंच कायतें त्या वेळच्या गज्नीचें स्मारक आजतागाईत हयात आहे. मनोऱ्यांवर महंमु-दाच्या सर्व पदव्या कोरींव अक्षरांत लिहिलेल्या आहेत. ह्या आपत्तींतून त्या राजधानीनें आपलें डोकें आजतागाईत वर काढिलें नाहीं. या कृत्या-वरून अला-उद्दिनास ‘ जहान सोझ् ’ म्हणजे ‘जग जाळणारा ’ असें अन्वर्थक नांव मिळालें आहे. ह्या गोष्टींचा हिंदुस्थानचे इतिहासाशीं फारसा संबंध नाहीं, तरी घोरी घराण्याचे सुलतानांनीं हिंदुस्थान देशां-तहीं पुढें असाच कहर मांडिला. आपल्याला कोठें आश्रय मिळतो कीं

काय हें पाहत बह्‌राम हिंदुस्थानाकडे वळला, पण नानाप्रकारच्या संकटांनीं व दुःखानें रस्त्यांतच तो मरण पावला.

गज्नी शहर हातचें गेलें तेव्हां खुस्रूनें लाहोरास राजधानी केली. तेथील लोकांनींही त्यास आनंदानें आपला राजा कबूल केलें. सेल्जुक सुलतानाच्या मदतीनें गज्नी परत घेण्याची त्यानें पुष्कळ खटपट केली, पण ती सिद्धीस गेली नाहीं. गज्नी शहर धुळीस मिळून सर्व लोक घोर सुलतानास सामील झाले होते. तेव्हां खुस्रू हिंदुस्थानांतच राहिला, व सात वर्षे शांततेनें राज्य करून सन ११६० त मरण पावला. खुस्रूचा मुलगा खुस्रू मलीक हा सबक्तगीनच्या वंशाचा शेवटचा सुलतान होय; पुढें घोरच्या अफगाण सुलतानांनीं त्याचें राज्य घेतलें.

एकंदरींत गज्नवी सुलतानांनीं महंमुदाच्या पश्चात् दीडशें वर्षे राज्य केलें, तरी त्यांची भरभराट म्हणून झाली नाहीं. ह्या वंशांतील बहुतेक पुरुष धार्मिक व उदार होते. इब्राहीम व बह्‌राम यांनीं अनुक्रमें चाळीस व पस्तीस वर्षे राज्य केलें, ह्यावरून त्यांचा राज्यकारभार व्यवस्थित असला पाहिजे असें दिसतें. इब्राहीमनें लोककल्याणाच्या अनेक गोष्टी केल्या. हिंदुस्थानांत जीं मुसलमानी राज्यें पुढें स्थापन झालीं, त्यांनीं गज्नीच्या राज्याची नक्कल केलेली आहे. पुढील नकलांचें अस्सल स्वरूप समजण्यास गज्नीचा वृत्तान्त उपयोगी पडतो.

**४. घोरींचा उदय ( ११५७–११९१ ).**—गज्नी घेतल्यावर अला-उद्दीन फिरोज-कोह येथें परत गेला व ख्यालीखुशालींत निमग्न राहिला. इतक्यांत उत्तरेकडून सेल्जुक सुलतान संजर यानें गज्नी प्रांत जिंकून अला-उद्दिनास कैद केलें. पण पुढें लवकरच त्याची सुटका होऊन त्याचें राज्य त्यास मिळालें. तें त्यानें ११५६ पर्यंत उपभोगिलें. अला-उद्दिनास सैफ-उद्दीन म्हणून एक मुलगा आणि ग्यास्-उद्दीन व शहाबुद्दीन असे दोन पुतण्ये होते. सैफ-उद्दिनास राज्य मिळावें ह्मणून अला-उद्दिनानें पुतण्यांस कैदेंत टाकिलें. सैफ-उद्दिनानें त्यांस कैदेंतून सोडविलें. पण सन ११५७त सैफ-उद्दिनाचा खून होऊन हे दोघे पुतणे राज्यकारभार चालवूं लागले. दोघां राजांनीं एकमतानें राज्यकारभार चालविल्याचें हें मुसलमानांच्या इतिहासांत एकच उदाहरण आहे. पश्चिमेकडील प्रांतांचा कारभार ग्यास-उद्दीन पाही. व पूर्वेकडील

प्रांतांचा शहाबुद्दीन पाही. त्यांत हिंदुस्थान जिंकिण्याकडे शहाबुद्दीनचें सर्वस्वी लक्ष होतें. शहाबुद्दीन यानेंच पुढें महंमद असें नांव धारण केलें. कित्येकांच्या मतें शहाबुद्दीन यानें स्वतंत्र असें नांव धारण न करितां सुलतान ग्यास्-उद्दीनचा दुय्यम ह्मणून कारभार केला. ग्यास्-उद्दिनानें हिंदुस्थानचे कारभारांत लक्ष घातलें नाहीं. तो गज्नी, हिरात, फिरोज-कोह् इत्यादि ठिकाणीं आळीपाळीनें राहत असे. हिरात येथें त्यानें एक भव्य मशीद बांधिली, तिची तारीफ लोक अद्यापि करितात. ग्यास्-उद्दीन सन १२०२ त मरण पावला व शहाबुद्दीन ऊर्फ महंमद हाच सर्व राज्याचा मालक झाला.

**पहिली स्वारी,** ( स. ११७६ ).—गज्नवी महंमुदानें ज्याप्रमाणें एकसारख्या तीस वर्षें हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या, त्याचप्रमाणें घोरी महंमदानेंही तीस वर्षें हिंदुस्थानांत धुमाकूळ उडवून दिला, ( सन ११७६–१२०६ ). महंमदानें प्रथम मुलतान हस्तगत करून पंचनद व सिंधुनद ह्यांचे संगमावर ऊचा म्हणून एक मजबूद किल्ला आहे तो सर केला. तेथील राणीनें नवऱ्यास ठार मारून आपल्या मुलीचें लग्न महंमदाशीं करून दिलें. ही आपली नवीन बायको घेऊन महंमद गज्नीस परत गेला. सन १७८८ सालीं त्यानें हिंदु-स्थानावर दुसरी स्वारी केली, तींत सुलतान खुस्रू मलीक ह्याचा पाडाव करून त्याच्या मुलास बळजोरीनें ओलीस घेतलें, आणि महंमद स्वदेशीं निघून गेला. पुढच्या वर्षी म्हणजे सन ११७९त त्यानें सिंधप्रांतावर स्वारी करून तो प्रांत समुद्रकिनाऱ्यापर्यंत लुटला. परत येतांना त्यानें खुस्रू मलीक याजबरोबर पुनः लढाई केली. इकडे मलीकही शेजारच्या गक्कर लोकांशीं स्नेह संपादून महंमदाचा खरपूस समाचार घेण्याच्या तजविजींत होताच. हे गक्कर लोक पंजाबच्या पलीकडील हद्दीवर फार दिवसांपासून राहत असत. त्यांच्या मदतीनें मलीक मोठ्या जोरांत होता. त्यानें महंमदाचा एक किल्ला सुद्धां काबीज केला. अशा बिकट प्रसंगीं कपट केल्याशिवाय निभाव लागत नाहीं असें पाहून, महंमदानें पश्चिमे-कडून आपणावर शत्रु येत आहे व त्याजशीं सामना करण्यास आपणास मलीकशीं तह करून खुरासानांत जावयाचें आहे, असें कळविलें, व ह्या वचनाच्या प्रचीतीसाठीं, मलीकचा मुलगा ओलीस ठेविलेला होता

त्यास सोडून दिलें. हा सर्व प्रकार सत्य समजून मलीक बेसावधपणानें आपला मुलगा येत आहे असें समजून त्याचे भेटीस गेला. पण खरी बातमी फुटूं न देतां, शहाबुद्दीन आडवाटेनें त्याजवर चालून गेला व रातोरात त्यानें मलीकच्या छावणीस वेढून मलीक ह्यास कैद करून कुटुंबसुद्धां ग्यासुद्दीनकडे पाठवून दिलें. तेथें कांहीं दिवस कैद भोगिल्यावर त्याचा शिरच्छेद झाला, ( सन ११८६ ). इकडे महंमदानें गज्नवी वंशाचे सर्व राज्य जिंकून घेतलें.

**५. तत्कालीन देशस्थिति, रजपूत राज्यें.**—हिंदुस्थान देशांत मुसलमानांचा प्रवेश वायव्येकडून झाला. दक्षिण हिंदुस्थानांत त्यांचा प्रवेश होण्यास पुष्कळ काळ लागला. आरंभीं त्यांच्या स्वाऱ्या उत्तर हिंदुस्थानांतच होत असत. उत्तर हिंदुस्थान व गुजराथ वगैरे प्रांत रजपुतांच्या ताब्यांत होते. म्हणून शहाबुद्दिनाच्या वेळेस हिंदुस्थान देश कशा स्थितींत होता हें समजण्याकरितां रजपुतांचें वर्णन दिलें पाहिजे.

रजपूत लोक हे हिंदुस्थानचे पुरातनचे क्षत्रिय होत. प्राचीन काळीं चंद्र व सूर्य ह्या दोन वंशांतील क्षत्रिय राजे हिंदुस्थानांत राज्य करीत होते. अयोध्येच्या रामचंद्राची उत्पत्ति सूर्यवंशांत असून हस्तिनापुरचे कौरव-पांडव आणि यदुवंशी कृष्ण व बलराम हे चंद्रवंशी होते. हिंदुस्थानचे अर्वाचीन रजपूत राजे वरील कोणत्या तरी वंशांतून आपली उत्पत्ति झाली आहे असें समजतात. राजांचे पुत्र ते रजपूत. जन्मतः रजपुतांचा बाणा शिपाईगिरीचा होता. त्यांचीं निरनिराळीं पथकें तोडलेलीं असून त्यांजवर वंशपरपरेचे सरदार असत. देशाचे विभाग पाडून ते या सरदारांमध्यें वांटलेले असत. राजे व रयत यांजमध्यें विशेष प्रीतिभाव असून त्यांस आपल्या थोर कुलाचा अभिमान वाटे. ते जिवावर उदार होऊन आपल्या कुलपरंपरेच्या अधिकाराचें व हक्कांचें संरक्षण करीत. त्यांच्या अंगीं अप्रतिम शौर्यतेज वसत होतें. तत्कालीन पाश्चिमात्य सरदारांच्या ठायीं ज्याप्रमाणें स्त्रीवर्गाविषयीं पूज्यबुद्धि व औदार्य वसत असे, त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतील रजपूत सरदारांच्या अंगींही ते गुण वसत होते. रजपूत राजांचा दिलदारपणा, धीरोदात्त स्वभाव व कदर यांची बरोबरी होणें नाहीं. रजपुतांतील बहुतेक रणसंग्राम स्त्रियांची अब्रू बचावण्याकरितां घडून आलेले आहेत. रजपुतांच्या स्त्रियांकडे वांकड्या नज-

रेनें पाहण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती. मध्यकालीन इतिहासांत अनेक रजपूत साध्वी पतिव्रतांचीं नांवें अजरामर झालेलीं आहेत. अनेकांनीं स्त्रियांची अब्रू बचाविण्याकरितां सर्वस्वाचा नाश करून घेतला आहे. समरांगणांतून अपयश घेऊन परत येणें ते अत्यंत निंद्य समजत. अपयश जोडून जिवंत राहिल्यानें सर्व कुलास नरकवास घडतो अशी त्यांची दृढ समजूत असल्यामुळें, पराजयाचें चिन्ह दिसतांच रजपूत लोक आपल्या बायकामुलांस स्वहस्तानें ठार मारून संग्रामांत घुसून वीरपुरुषांस शोभणारा प्राणत्याग करून घेत. युद्ध करण्याचेही त्यांच्यांत निर्बंध ठरलेले असत. ते जो तोडील, त्याची अपकीर्ति होई. अशा शूर बाण्याचे लोक मुसलमानांच्या रस्त्याचें नाकें धरून बसले असतांही मुसलमानांचा प्रवेश हिंदुस्थानांत झाला, ही आश्चर्याची गोष्ट आहे. मात्र केवळ आश्चर्य मानून स्वस्थ न बसतां, त्यांच्या अधःपाताची योग्य मीमांसा करणें हेंच इतिहासाध्ययनाचें काम आहे. विशेषतः आपसांतील कलहच या गोष्टीस कारण झाले हें खरें, तरी रजपुतांचा स्वभाव फार भोळा असे. कपटानें विश्वासघात करणें ते निंद्य समजत. जशास तसें वर्तन करून संकट निवारण करण्यांत जें एक प्रकारचें व्यवहारचातुर्य लागत असतें, तें त्यांच्यांत नव्हतें. ह्मणून त्यांच्यापेक्षां क्षुद्र लोकांचा कपटाच्या योगानें त्यांजवर पगडा सहज बसे.

भारत, रामायणादि ग्रंथ आमचे पुरातन इतिहास आहेत; त्याचप्रमाणें रजपुतांच्या आख्यायिका वर्णन करणारे अनेक काव्यग्रंथ त्या त्या भाषांत उपलब्ध आहेत. ह्या ग्रंथांची चाळणी करून त्यांतील ऐतिहासिक अंश निराळा काढिल्यानें तत्कालीन रजपुतांची स्थिति कळून येईल. 'पृथ्वीराज रासा' ह्या नांवाचा एक काव्यग्रंथ चंदवरदाई नामक भाटानें चारणी भाषेंत शहाबुद्दिनाच्या वेळेस लिहिलेला आहे. 'रासमाला' हा ग्रंथही त्याच मासल्याचा असून तत्कालीन इतिहास समजण्यास तो फार उपयोगी पडेल.

शहाबुद्दीन घोरी हिंदुस्थानावर स्वाऱ्या करूं लागला, त्या वेळेस मोठमोठीं रजपूत राज्यें येथें अनेक होतीं. अजमीर येथें चव्हाणवंशी सोमेश्वर, दिल्ली येथें तुवरवंशी अनंगपाळ, कनोज* येथें राठोडवंशी जयचंद, चितोडगडावर

* कनोज हें आग्र्याचे पूर्वेस गंगेपासून थोड्या मैलांच्या अंतरावर आहे.

मेवाडांत घेलोटवंशी समरसिंह, जसलमीर येथें भोजदेव, अबूगडावर जैत परमार व अन्हिलपूर (पट्टण) येथें चालुक्यवंशी गुर्जराधिपति भोळा भीम, असे राजे राज्य करीत होते. ह्यांशिवाय प्रत्येकाचे हाताखालीं अनेक लहान लहान मांडलीक राजे होते. बहुतेक मध्य व उत्तर-हिंदुस्थान ह्या राजांच्या ताब्यांत होतें. कनोजची हद्द उत्तरेस शुभ्र हिमाचलास व पूर्वेस काशीस लागली होती. 'मेवाड' ह्याचा मूळ अर्थ 'मध्यवाड' म्हणजे 'रजपुतान्याचा मध्यभाग,' असा असून, त्याची पूर्वींची राजधानी चितोडगड व हल्लीं उदेपूर आहे. ह्या सर्व रजपूत राजांमध्यें कांहींना कांहीं युद्धप्रसंग हमेश चालू असत. चव्हाण आणि घेलोट मित्रभावानें वागत. परंतु राठोड आणि तुवर ह्यांजमध्यें कायमचें वैर होतें. ह्या दोघांमध्यें कालिंदी म्हणजे यमुनानदीची हद्द होती. तिचें काळें पाणी ते आपल्या रक्तपातांनीं अनेक वेळां लाल करीत. तथापि दोनही घराण्यांत शरीरसंबंध घडल्यानें हें वैर पुष्कळ वेळां तात्पुरतें मिटत असे. एखादा मुसाफर जर त्या वेळच्या युरोपांतील सर्व दरबारांत फिरून, तुर्क लोकांनीं व तयमूरलंगानें ज्या मार्गानें पुढें स्वाऱ्या केल्या, त्या मार्गानें येऊन गज्नी व हिंदुस्थानांतील वरील रजपूत राज्यें ह्यांचें अवलोकन करिता, तर कलाकौशल्य, विद्या, कला, ऐश्वर्य वगैरे अनेक बाबतींत रजपूत राजांची थोरवी त्यास अपूर्व वाटली असती, ह्यांत संशय नाहीं. त्या काळीं यूरोप व आशिया ह्या दोनही खंडांत जमीनदारांच्या मार्फत राज्याचा बंदोबस्त राहत असे. ह्या जमीनदारी पद्धतीचे दोहोंकडे भिन्न परिणाम झाले. युरोपांत जमीनदारांचें वजन कमी होऊन सामान्य लोकांचें हळू हळू वाढलें. परंतु हिंदुस्थानांत खालचा वर्ग नेहमीं खालींच राहिला. जमीनदारांचे तंटे संपले नाहींत आणि त्यांतच सर्व राज्यांचा अंत होऊन गेला. घोरप्रांताचा राजा शहाबुद्दीन ह्यानें सन ११९३त दिल्ली व कनोज ह्या राज्यांचा पाडाव केला, तेव्हांपासून मुसलमानांची सत्ता वाढत गेली.

त्या वेळच्या रजपुतांच्या इतिहासावरून असें समजतें, कीं त्यांजमध्यें त्या वेळेस भोळेपणा व अज्ञान फार माजलें होतें. शैव व शाक्तपंथ जोरांत असून सती जाण्याचा संप्रदाय प्रचलित होता. जैनधर्माचा प्रसारही विशेष होता. कित्येक राजे उन्मत्त, अविचारी व विलासमग्न असत,

मुसलमानांविषयीं ते गैरमाहीत व बेफिकीर होते. मुसलमानांचे शौर्य, निश्चय, कडवेपणा व विजय पाहून रजपुतांस चमत्कार वाटे. त्यांजवर ईश्वरी कृपा आहे असें समजून ते स्वस्थ बसत. पराजित लोकांस विजयी लोकांविषयीं अशी भावना होणें साहजिक आहे. इंग्रजांविषयींही अशाच कल्पना आपल्या इकडेही चालू होत्या व आहेत. मीरासाहेब व ख्वाजा पीरसाहेब ह्या दोघां मुसलमानांनीं दैविक चमत्कार दाखवून अजमिरास आपलें ठाणें दिलें. त्यांचा मान इतका वाढला कीं, अजून हिंदु लोक त्यांच्या कबरेस भजतात व उरूस होतात तेव्हां त्यांस नवस करितात.

**६. भाट लोक, व त्यांची कामगिरी.**—भाटांविषयीं थोडी माहिती येथें सांगणें जरूर आहे. अलीकडच्या चालीप्रमाणें इतिहास लिहून ठेवण्याची वहिवाट पूर्वी नव्हती; तरी राजवंशांच्या हकीकती व त्यांचे पराक्रम कविताबद्ध करून ते राजांस श्रवण करवावे असा प्रघात असे. भाट लोक हीं कवनें दरबारांत म्हणून दाखवीत. भाट याचा शब्दशः अर्थ बंदी. बंदीजनांनीं राजचरित्रें गावीं असा त्यांचा धंदा वर्णिलेला आहे. गुजराथ, काठेवाड, रजपुताना, माळवा वगैरे ठिकाणीं भाटांच्या पुष्कळ जाति आहेत. क्षत्रियवंशांचा पडता काळ आला तशी भाटांची दुर्दशा होत गेली. भाटांस विश्वासु व प्रामाणिक असें समजत. त्यांस राज्यांतून मोठमोठ्या देणग्या व मानमरातब मिळत. कर्जाच्या फेडीसाठीं अगर वचन पाळण्यासाठीं भाट लोक जामीन राहत. त्यांची जामीनगिरी सर्व लोक कबूल करीत. मुली व स्त्रिया यांजबरोबर पाठविण्यास योग्य व विश्वासु मनुष्य म्हणजे भाटच. ते राजांचे संन्निध सदैव राहून सत्कर्म, औदार्य, शौर्य इत्यादि गुणांकडे राजांची प्रवृत्ति व्हावी, म्हणून पूर्वजांच्या पराक्रमांचीं व कीर्तीचीं रसभरित कवनें गाऊन हे भाट लोक हरप्रसंगीं राजांस व वीरांस प्रोत्साहन देत. राजवंशाची कीर्ति किंवा अपकीर्ति प्रसिद्ध करणें बऱ्याच अंशीं ह्या भाटांच्या हातीं असे. म्हणून त्यांस दुखविण्यास कोणी धजत नसत. पूर्वी मोठमोठ्या युद्धांतून भाट हे राजांबरोबर हजर राहून अनेक प्रसंगीं दोन दरबारांमधील वकिलीचें काम करीत. यांस कोणत्याही दरबारीं जाण्यास अटकाव नसे, आणि लढा-ईतसुद्धां त्यांच्या जिवास धोका नसे. हल्लीं भाटांची एक जातच झालेली आहे; व त्यांतही पुष्कळ पोटभेद आहेत. कौरव-पांडवांच्या वेळेपासून

अनेक नामांकित भाटांचीं नांवें प्रसिद्ध आहेत. कित्येकांचीं कवनें फारच रसभरित व चित्तवेधक आहेत. भाटांस मोठमोठीं उत्पन्नें तोडून दिलेलीं असत. अजमीरचा राजा पृथ्वीराज चव्हाण याजपाशीं चंदभाट, अकबर बादशहाजवळ गंगभाट, शिवाजीजवळ भूषणभाट, असे भाट होते. पृथ्वीराजाचा भाट चंदवरदाई ह्यानें 'पृथ्वीराजरासा' म्हणजे पृथ्वीराजाचा इतिहास म्हणून जो कविताबद्ध ग्रंथ लिहिला आहे, तो एकलक्ष श्लोक होतील इतका मोठा असून, त्याचीं ६९ पर्वें आहेत. यांत अतिशयोक्त व निव्वळ स्तुतिपर वर्णनें पुष्कळ आहेत; तरी ऐतिहासिक अंशही कांहीं थोडा नाहीं. गुजराथ व रजपुताना ह्यांचे इंग्रजी इतिहास अशाच ग्रंथांच्या आधारानें लिहिलेले आहेत. गुजराथेंतील हल्लींचे बारोट लोक हे पूर्वींचे तेथचे भाट होत.

७. **पृथ्वीराज चव्हाण, (स. ११५९–९३).**—मुसलमानांचा प्रवेश प्रथम हिंदुस्थानांत झाल्यापासून हा देश त्यांच्या ताब्यांत जाणार अशीं चिन्हें जिकडे तिकडे दिसूं लागलीं होतीं. रजपुतांचे आपसांतले तंटे चालूच होते. गुजराथचा राजा भोळा भीमदेव हा फार पराक्रमी होता. त्याचे ताब्यांत पुष्कळ किल्ले असून अनेक विद्वान पंडितांचा तो आश्रयदाता होता. प्रसिद्ध ' अमरकोशा ' चा कर्ता जैनपंडित अमरसिंह हा त्याचेच दरबारीं असे. त्याचा समकालीन अबू येथें जैत परमार राजा राज्य करीत होता. ह्या परमारास इच्छनीकुमारी नांवाची एक लावण्यवती मुलगी होती. 'आपली मुलगी आम्हांस द्यावी, नाहीं तर युद्धास सिद्ध व्हावें,' असा निरोप अमरसिंहाबरोबर भीमदेवानें परमारास पाठविला. परमारानें भीमाची मागणी कबूल न करितां युद्धाची तयारी केली, आणि पृथ्वीराजापाशीं मदत मागितली. पृथ्वीराजाचा बाप सोमेश्वर यास भीमदेवानें पूर्वी लढाईत पकडून ठार मारिलें होतें, तें वैर साधण्यास्तव परमाराची मागणी त्यानें मोठ्या हौसेनें कबूल केली. युद्धाची सिद्धता झाल्यावर साबरमतीच्या कांठीं लढाई होऊन भीमदेवाचा पुरा मोड झाला. पुढें इच्छनीकुमारीचें पाणिग्रहण करून पृथ्वीराज दिल्लीस गेला. नंतर पृथ्वीराजानें अनेक युद्धें केलीं व त्याची दिवसेंदिवस भरभराट होत गेली. पुढें कनोजचा राजा जयचंद ह्यानें राजसूययज्ञ करण्याचें मनांत आणिलें. त्या प्रसंगीं बहुतेक राजे जमा झाले, पण पृथ्वीराजानें यज्ञास

हरकत केली. संयुक्ता नांवाची जयचंदाची एक रूपवती मुलगी होती. तिचा मानस पृथ्वीराजास वरण्याचा असल्यामुळें जयचंदानें तीस बंदींत ठेविलें. इकडे पृथ्वीराजाचे हातून राज्यकारभारांत ह्या वेळेस अनेक चुका झाल्या. चामुंडराय नांवाच्या पराक्रमी सरदारास त्यानें अपराध नसतां कैदेंत टाकिलें; तसेंच कयमाष नांवाचा त्याचा शहाणा राजहित-दक्ष प्रधान होता, त्यास अविचारानें ठार मारिलें. पुढें कनोज येथें गुप्त रूपानें जाऊन पृथ्वीराजानें संयुक्तेचें हरण केलें. त्यामुळें उभय राजांमध्यें अनेक युद्धप्रसंग होऊन शेवटीं निरुपायास्तव जयचंदानें मुलीचें लग्न पृथ्वीराजाबरोबर लाविलें. संयुक्तेशीं लग्न लाविल्यापासून पृथ्वीराज सदा ऐषआरामांत दंग राहून राज्यकारभाराकडे अगदीं दुर्लक्ष करूं लागला. ह्या योगानें पृथ्वीराजाविषयीं अनेक सरदारांस संताप उत्पन्न झाला. शहाबुद्दीन घोरी दिल्लीवर स्वारी करण्याची संधि पाहत बसलाच होता. पृथ्वीराजाचे कांहीं सरदार फितुरी करून गज्नीस शहाबुद्दीनकडे गेले आणि त्यांनीं त्यास दिल्लीस बोलाविलें. ह्या बातम्या पृथ्वीराजास पोंचल्या नाहींत. तो आपल्या विलासांत दंग होता.

**८. महंमद घोरीच्या स्वाऱ्या व कारकीर्द, (सन ११९१–१२०६). चवथी स्वारी.**—मुसलमान शत्रूंचा पाडाव केल्यावर महंमद हिंदूं-कडे वळला. गज्नवी वंशाचे सुलतान सत्त्वहीन झाल्यामुळें हिंदूंशीं असलेलें त्यांचें पहिलें वैर नाहीसें होऊन, गेल्या पांचपन्नास वर्षांत हिंदु-मुसलमानांचें ऐक्य होत चाललें होतें. मुसलमानांची सर्व भिस्त हिंदूंवरच होती. पण घोरी महंमदानें कडवा मुसलमानी बाणा पुनरपि सुरू केला. त्याच्या फौजेंत मुख्यतः अफगाणांची भरती असून कांहीं तुर्कही होते. ‘ ह्या काकमुखी हिंदूंस नरकयातना भोगण्यास लावूं’, अशा प्रतिज्ञेनें महंमद घोरीचे लोक हिंदुस्थानांत घुसले. तुवरवंशीय विक्रमादित्यानें दिल्लीचें राज्य घेतल्यावर तें त्या वंशाकडे एकुणीस पिढ्यांपर्यंत चाललें. एकुणिसावा राजा अनंगपाळ ह्यास दोन मुली होत्या. पहिली कमलादेवी ही अजमीरच्या सोमेश्वर राजास दिली होती; आणि दुसरी कनोजचा राजा विजयपाळ ह्यास दिलेली होती. ह्या दोघींचे मुलगे अनुक्रमें पृथ्वीराज चव्हाण व जयचंद राठोड असे होते. अनंगपाळानें वृद्धापकाळ झाल्यामुळें आपलें राज्य पृथ्वीराजाचे स्वाधीन करून आपण वानप्रस्थाश्रम पत्करिला. पृथ्वीराजाचा जन्म

सन ११५९त झाला. वरील व्यवस्थेनें अजमीर व दिल्ली हीं दोनही राज्यें एका पृथ्वीराजाकडे गेलीं. ह्याबद्दल कनोजच्या जयचंद राजास वैषम्य वाटलें. आपणही नातू असतां अनंगपाळानें एकट्या पृथ्वीराजास सर्व राज्य दिलें यामुळें त्यास फार दु:ख झालें. येणेंप्रमाणें राठोड व चव्हाण यांजमध्यें कलहाग्नि माजून त्यांत रजपुतांच्या स्वातंत्र्याची आहुति पडली. कनोज व पट्टण येथील राजांनीं चव्हाण राजास नष्टप्रभ करण्या-करितां शहाबुद्दीन घोरी यास वकील पाठवून मदतीस बोलाविलें. आपसांतील भांडणाचा सूड उगविण्यासाठीं परक्या शत्रूस घरांत घेण्यानें केवढें नुकसान होतें हें आमच्या लोकांस कळलें नाहीं. अशा मार्गाचें अवलंबन केल्यानें दोघांचा घात आणि तिसऱ्याचा फायदा ह्या सिद्धांताची आवृत्ति हिंदु-स्थानच्या इतिहासांत वारंवार झालेली आहे. पण प्रसंग जाणून पृथ्वीराजानें आपला मेहुणा चितोडचा राजा समरसिंह रावळ ह्याच्या मदतीनें शहाबु-द्दिनाचे फौजेचा संपूर्ण पराजय करून त्यास कैद केलें, व त्याजपासून आठ हजार घोडे खंडणी घेऊन त्यास सोडून दिलें.* ह्या प्रसंगीं रज-पुतांचें खरें क्षात्रतेज व युद्धकौशल्य मुसलमानांस कळून आलें. पराजया-मुळें शहाबुद्दिनास अत्यंत दु:ख होऊन तो त्वरेनें सिंधुनदी उतरून गज्नीस गेला. तेथें बाह्यात्कारीं ख्यालीखुशालींत राहून हिंदुस्थानाबद्दल आपण पर्वा करीत नाहीं असें तो दाखवूं लागला. पण अंतर्यामीं तो अत्यंत जळफळत असे. त्यानें एकदां आपल्या प्रधानास सांगितलें, कीं मला 'स्वस्थ निद्रा कधींही येत नाहीं. निजलों किंवा जागा असलों तरी काळजी व दु:ख यांचा माझ्या सभोंवती गराडा असतो.' वर सांगितलेली पृथ्वीराजाची व घोरीची लढाई पानिपत येथें झाली. त्या ठिकाणीं आपल्या फौजेच्या लहान लहान टोळ्या करून शत्रूंस जेरीस आणण्याचा नेहमींचा मुसलमानांचा कावा, हिंदूंनीं एकदम हल्ला केल्या-मुळें, साधला नाहीं. ह्या लढाईस पानिपतची पहिली लढाई म्हणतात. ही सन ११९१ त पानपतच्या जवळ कर्नालच्या उत्तरेस दहा मैलां-

---

* ह्या प्रसंगीं शहाबुद्दीन घोरी यास पृथ्वीराजानें पकडल्याचें मुसलमान इतिहासकार कबूल करीत नाहींत. वरील हकीकत 'लोकहितवादी' च्या पुस्तकांत आहे.

वर, नारायणगांवीं झाली. मुसलमानांचा हिंदूंनीं पराभव केला असा हा पहिलाच प्रसंग होय. रासाग्रंथांत ह्या लढाईस तलवारीची लढाई म्हणतात. ह्या लढाईनें पृथ्वीराजाचें वर्चस्व वाढलें तें जयचंदास सहन झालें नाहीं. पृथ्वीराजाचा नाश कसा होईल ह्या उद्योगास तो लागला. हातांत सांपडलेल्या शत्रूस जीवदान दिल्याचे उपकार घोरीनें पुढें कसे फेडिले तें लवकरच कळेल.

**पांचवी स्वारी,** (सन ११९३).—पराभव होऊन स्वदेशीं गेल्यावर शहाबुद्दीन स्वस्थ बसला नाहीं. वरील पराजयाचा सूड घेण्याकरितां ह्या खेपेस विशेष तयारी करून तो हिंदुस्थानांत आला. जयचंद राठोड वगैरेशीं त्यानें आंतून संधान बांधिलें. त्याजबरोबर सामना करण्यासाठीं समरसिंह रावळ वगैरे एकंदर दीडशें रजपुत राजे एकत्र झाले. गंगोदक हातांत घेऊन त्यांनीं शपथा घेतल्या होत्या कीं शत्रूंस जिंकूं नाहीं तर स्वधर्मरक्षणार्थ देहत्याग करूं. स्थानेश्वर येथें उभय सैन्यांचा तळ पडला. इकडे पृथ्वीराजानें मात्र मुसलमानांच्या हालचालींची बिलकुल बातमी राखिली नाहीं. शत्रूंच्या हालचालींवर नजर न ठेवणें हा एक राष्ट्रीय दोषच हिंदुस्थानांत अनेक प्रसंगीं दिसून आलेला आहे. ह्या युद्धांत हिंदूंची संख्या अफाट असून त्याजवर एकदम चालून जाण्याची शहाबुद्दीनची छाती नव्हती. लढाई सुरू झाल्यावर शहाबुद्दीनचा मोड होऊन हिंदु फौज त्याच्या पाठीस लागली. इतक्यांत ते निर्धास्तपणें फांकले आहेत असें पाहून एकदम शहाबुद्दीन त्यांजवर परत फिरला. त्याबरोबर रजपूत सेनेची वाताहत झाली. दिल्लीचा सेनापति चामुंडराय, हमीर हाडा व दुसरे पुष्कळ रजपूत राजे समरंगणीं पडले. पृथ्वीराज शत्रूंचे हातीं सांपडला, त्यास त्यांनीं ठार मारिलें. ह्या लढाईत रजपुतांचा जेवढा जमाव झाला होता, तेवढा पूर्वीं कधींही झाला नसून, मुसलमानांस मागें हटविण्याचा रजपुतांनीं केलेला शेवटचा जोराचा प्रयत्न हाच होय. आजपर्यंत मुसलमानांचा शिरकाव हिंदुस्थानांत होतो कीं नाहीं याची शंका होती. पण त्या शंकेचें निरसन ह्या स्थानेश्वरच्या लढाईनें झालें.

पृथ्वीराजाच्या मृत्यूविषयीं एक चमत्कारिक गोष्ट चंदभाटानें आपल्या रासेंत लिहिली आहे. पृथ्वीराजास पकडल्यावर त्याचे डोळे काढून घोरीनें

त्यास गज्नीस नेऊन कैदेंत टाकिलें. त्याचा बालपणापासूनचा सोबती चंदभाट आपला ग्रंथ लिहून पृथ्वीराजाचे शोधास गज्नीस गेला. त्या ठिकाणीं मोठ्या कुशलतेनें त्यानें प्रत्यक्ष शहाबुद्दीनचा खून पृथ्वीराजाकडून करविला. पृथ्वीराज केवळ शब्दवेधानें निशाण मारणारा होता. त्याचें कौशल्य पाहवें असें चंदभाटानें शहाबुद्दिनास सांगितलें. पुढें शहाबुद्दीनच्या समोर खेळ चालला असतां तो 'शाबास शाबास' असे शब्द मोठ्यानें बोलला. त्या शब्दांच्या संधानावर पृथ्वीराजानें एकदम बाण मारून दरबारांतच शहाबुद्दिनास ठार केलें. चंदभाट तेथें होताच. तो व पृथ्वीराज ह्यांनीं पुढें एकमेकांस मारून घेतलें. ह्या गोष्टींत विसंगतपणा बराच आहे. चंदभाट स्थानेश्वरची लढाई होण्यापूर्वी एकांतस्थळीं जाऊन आपला रासाग्रंथ लिहीत होता. तेथून बाहेर आल्यावर त्यास लढाईचा परिणाम कळला. तेव्हां आपल्या धन्याच्या हातानें शत्रूचा सूड घेण्याची युक्ति मनांत ठरवून तो गज्नीस गेला असावा. तेथें पूर्वी ठरवून ठेविल्याप्रमाणें त्यानें पुढील सर्व बेत सिद्धीस नेला असेल. चंदभाटास देवी प्रसन्न होती, आणि तिच्या प्रसादानेंच त्यास पुढील गोष्टी कळत. शिवाजीच्याही अशाच गोष्टी वर्णिलेल्या आहेत. तेव्हां ह्या हकीकतींतील तथ्य शोधीत बसण्यांत फारसा अर्थ नाहीं.

महंमद घोरीनें लगेच अजमीर घेऊन तेथील निरपराधी लोकांची कत्तल केली; आणि अजमीरच्या गादीवर आपल्या पसंतीच्या एका इसमास बसविलें. तसेंच हिंदूंचीं देवळें फोडून तेथें मुसलमानांच्या मशिदी बांधिल्या. ऐबक नांवाचा एक हुशार गुलाम त्याजपाशीं फार दिवस लष्करांत नोकरी करीत होता, त्यास त्यानें हिंदुस्थानांत आपला सुभेदार नेमून स्वतः गज्नीस कूच केलें. इकडे ऐबकनें दिल्ली, चितोड वगैरे ठिकाणें घेतलीं.

**सहावी स्वारी, (सन ११९४).**—ह्या स्वारींत कुत्ब्-उद्दीन ऐबक ह्यास घेऊन महंमदानें कनोजच्या जयचंद राजाचा पाडाव केला; आणि पुरातन काळचें धनाढ्य शहर कनोज लुटून फस्त केलें. पुढें चाल करून घोरी काशीवर आला. त्या ठिकाणच्या देवळांतील सर्व मूर्ती नाहींशा करून अपरंपार लूट जमा केली. येणेंप्रमाणें मुसलमानांची मजल बहार प्रांतांत जाऊन पोंचली. कनोज शहर मुसलमानांचे हातीं गेल्यावर तेथील कित्येक राठोडवंशी रजपूत लोक मारवाडांत येऊन

राहिले; आणि जोधपूर येथें त्यांनीं नवीन राज्यस्थापना केली. तेंच हल्लींचें जोधपूरचें राज्य होय. ऐबकनें गुजराथ प्रांतावर स्वारी करून राजा भीमदेवाचा पराजय केला. तें राज्य खालसा करण्याचा त्याचा विचार होता, परंतु तो तडीस नेण्यापूर्वींच त्यास दिल्लीस परत यावें लागलें.

महंमदानें हिंदुस्थानांतील सर्व काम ऐबक याजकडे सोपविलें व आपण परत गेला. ऐबकनें त्वरा करून ग्वालेरचा मजबूत किल्ला सर केला. लगेच गुजराथचा व दुसरे कित्येक राजे अजमीरावर येत होते, त्यांजशीं सामना करण्याकरितां ऐबक गेला. त्याची व रजपुतांची निकराची लढाई झाली. हिंदूंचे पंनास हजार लोक समरांगणीं पडले, वीस हजार कैद झाले, आणि अगणित लूट मुसलमानांस मिळाली. येणेंप्रमाणें रजपुतांचा पराभव करून अन्हिलपूर राजधानी व दुसरे मुलूख काबीज करून ऐबक दिल्लीस गेला. पुढच्या वर्षीं बुंदेलखंडांतील काल्पी व कलिंजर हे किल्ले त्यानें घेतले. इकडे बखत्यार खिलजी नांवाच्या दुसऱ्या सरदारानें उत्तरबहार, अयोध्या व बंगाल हे प्रांत जिंकिले, आणि बंगालची तत्कालीन राजधानी गौड उर्फ लखनौती काबीज केली.

गज्नी येथें ग्यासुद्दीन मरण पावल्यावर, शहाबुद्दीन हा महंमद हें नांव धारण करून गज्नीच्या तख्तावर बसला. पुढें खारिज़म् म्हणजे खिवाच्या शहाशीं तक्रारी होऊन त्याशीं लढाई जुंपली, तींत महंमदाचा पराजय होऊन जिवावर प्रसंग आला. त्यांतून तो दंड भरून मोठ्या संकटानें सुटला. महंमदाचे शेवटचे दिवस एकंदरींत फारसे सुखाचे गेले नाहींत. गकर म्हणून जे पंजाबच्या पलीकडे रानटी लोक होते, त्यांनीं पंजाबप्रांतावर स्वारी करून धुमाकूळ मांडिला आणि लाहोर शहर घेतलें. त्यांचा बंदोबस्त करण्याकरितां महंमद पंजाबप्रांतांत आला, आणि गकर लोकांचा बंदोबस्त करून त्यांस त्यानें मुसलमानी धर्मांत आणिलें. नंतर पुढें जाण्याच्या इराद्यानें सिंधुनदाचे कांठीं रोहतक गांवीं छावणी देऊन उतरला असतां, हवा येण्याकरितां त्यानें आपले सर्व तंबू उघडे केले. हें पाहून त्याचा सूड घेण्याकरितां टपून बसलेल्या कांहीं गकर लोकांनीं नदींतून पोहून येऊन पाहरेकऱ्यांस कापून सुलतानाचा प्राण घेतला. त्याचें शव गज्नीस नेऊन पुरण्यांत आलें. महंमद घोरीस मूलबाळ नव्हतें. त्याचे पश्चात् ग्यासुद्दीनचा मुलगा महंमद हा गज्नी येथें तख्तनशीन झाला.

शहाबुद्दीन ऊर्फ महंमद घोरी हा शूर शिपाई होता, पण सुलतान महंमुदासारखें शहाणपण अगर चतुरस्रपणा त्याजमध्यें नव्हता. महंमूद विद्वान् व विद्येचा भोक्ता होता, म्हणून त्याचें नांव गाजत आहे. पण शहाबुद्दीन ह्यानें लढाई व धामधूम ह्यांपलीकडे कांहींच केलें नाहीं; किंवा त्याच्या पदरीं कवि किंवा इतिहासकार निपजले नाहींत. त्याची कीर्ति पाठीमागें फार दिवस राहिली नाहीं. तथापि हिंदुस्थानचे संबंधानें पाहिलें, तर शहाबुद्दीन ह्यानें या देशांत मुसलमानी राज्याचा पाया घातला असें म्हणण्यास हरकत नाहीं. सुल्तान महंमुदाचें लक्ष विशेषतः लुटीकडे होतें. मुसलमान आपलीं राज्यें हिसकून घेतात, अशी भीति महंमुदाच्या वेळेस रजपूत राजांस पडली नव्हती. म्हणून सुलतान महंमुदास त्यांजकडून फारसा अडथळा झाला नाहीं. पण महंमद घोरीच्या वेळेस रजपूत राजांनीं आपलें स्वातंत्र्य कायम राखण्यासाठीं हरप्रयत्न केले. आपसांतील तंटे थोडे बहुत कायम होते, तरी तिऱ्हाईत शत्रूशीं सामना करण्यास सर्व एक दिलानें झटले. त्यांस जिंकून नुसती लूट मिळवून शहाबुद्दीन परत गेला नाहीं; तर जिंकिलेले प्रदेश ताब्यांत घेऊन, त्यांजवर आपले कामगार नेमून त्यानें राज्याची व्यवस्था केली. हा ज्यास्त दिवस वांचता तर स्वतःच हिंदुस्थानचा पहिला बादशहा झाला असता. पण तसा योग घडून आला नाहीं. शहाबुद्दीनचे मरणकाळीं माळवा व त्याजवळचे कांहीं प्रांत खेरीजकरून, सर्व उत्तरहिंदुस्थान थोडें बहुत मुसलमानांचे ताब्यांत होतें. सिंध व बंगाल हे प्रांत पुरेपूर त्याच्या अमलाखालीं आले होते. गुजराथेंत राजधानी मात्र त्याचे हातांत आली होती. ह्या सर्व प्रांतांवर घोरीनें आपले स्वतःचे अंमलदार नेमिले. बाकीच्या प्रांतांतील राजेरजवाडे त्यास खंडण्या देत, किंवा अन्य तऱ्हेनें त्याचा ताबा कबूल करीत. त्याचे सरदार न जिंकिलेले प्रांत त्वरेनें जिंकीत चालले होते. सारांश महंमद घोरीच्या वेळेपासून स. १८५७च्या बंडापर्यंत दिल्लीच्या तख्तावर मुसलमान शहाचें वास्तव्य होतें.

महंमदाचा पुतण्या महंमूद मरण पावल्यावर खारिज्मच्या शहांनीं गज्नीचें राज्य घेतलें. फिरोज कोह् हें शहरही त्यांनीं अगोदरच काबीज केलें होतें. हिंदुस्थानांतील मुसलमानांचें राज्य महंमदाचा गुलाम कुत्ब्-उद्दीन ऐबक ह्याजकडे राहिलें, त्याची हकिकत पुढील प्रकरणीं येईल. घोरवंशाची

समाप्ति हिंदुस्थानांत सन १२०६त व गज्नी येथें सन १२१५त झाली.
( वंशावळ परिशिष्टांत दिली आहे. )

**९. ह्या कालाचें प्रत्यालोचन.**—ह्या काळीं आमच्या रजपूत क्षत्रियांची कशी दुर्दशा झाली होती, हें समजण्यास तत्कालीन रासाग्रंथ फार उपयोगी पडतील. विशेषत: चंदभाटाचा ग्रंथ विस्तृत व वाचनीय आहे. निरनिराळ्या राजघराण्यांतील परस्पर वैमनस्यें, पैशाच्या लोभानें मुसलमान शत्रूंस बातमी पोंचविणाऱ्या राष्ट्रद्रोही लोकांचा सुळसुळाट, रजपूत फौजांची अव्यवस्थित रचना, शत्रूंकडील बातमी मिळविण्याविषयीं आमच्या वीरपुरुषांनीं केलेली हयगय, जातिभेदाच्या व्यवस्थेमुळें एकट्या क्षत्रियांवरच पडलेला युद्धाचा सर्व बोजा, आणि इतर वर्गांच्या ठिकाणीं असलेली स्वदेशसंरक्षणाविषयीं अनास्था इत्यादि कारणांमुळेंच इतक्या दूर अंतरावरून मुसलमानांचा रिघाव हिंदुस्थानांत कसकसा झाला त्याची उमज ह्या रासाग्रंथावरून पडणारी आहे. येथील शेतकरी व कामकरी वर्ग इतक्या निकृष्टावस्थेंत पडला होता, कीं ब्राह्मणांस व क्षत्रियांस ते शत्रुसमान समजत, आणि त्यांच्या जाचणुकींतून सुटका होईल तर बरी असें त्यांस होऊन गेलें होतें. अशा स्थितींत मुसलमानांशीं लढण्याची सर्व भिस्त केवळ एका वर्गावर पडली, आणि ब्राह्मण, वैश्य व शूद्र हे अगदीं अलिप्त राहिले. त्यांस युद्धशिक्षण व शस्त्रास्त्रांचा उपयोगही ठाऊक नव्हता. ‘ देशाचें कांहीं कां होईना, कसा तरी आपला बचाव झाला म्हणजे बस,’ एवढीच भावना ब्राह्मणांच्या ठिकाणीं राहिली होती; वैश्यांनीं द्रव्यर्जनाच्या नादीं राहून, आपला धनसंचय राष्ट्रकार्यास दिला नाहीं. शूद्रांस तर परशत्रूच्या आगमनानें आनंदच वाटला. सारांश, मुसलमानांच्या स्वाऱ्यांची भरपूर हकीकत रासाग्रंथांत आहे.

आपसांतील वैमनस्याचा सूड घेण्याकरितां जयचंद राठोड वगैरे कित्येक राजांचें पाठबळ मुसलमानांस होतें. कनोजच्या फौजेंत मुसलमानांचा भरणा होता. पृथ्वीराजाच्या हालचालींची खडानखडा बातमी महंमद घोरीस जयचंदाकडून समजत होती.

पृथ्वीराजरासा हा ग्रंथ महाभारतासारखा मोठा आहे. त्यांत एक लाख कविता आहे. हें पुस्तक अजून छापलेलें नाहीं. किंवा त्याचें भाषांतरही झालेलें नाहीं.

---

# प्रकरण सातवें.

## गुलाम वंश.

### सन १२०६–१२८८.

१. कुत्बुद्दीन, (स.१२०६–१२१०). २. बंगालचा पाडाव, (१२०२).
३. शम्सुद्दीन अल्तमश,(स.१२१०–३५)४. सुलताना रझिया वगैरे.
५. नासिरुद्दीन महंमूद,(स.१२४६–६६) ६. बल्बन,(स.१२६६–८६).
७. तुघ्रलचें बंड व शहाजाद्याचा मृत्यु. ८. कैकुबाद, (स. १२८६–८८).
९. गुलाम वंशाची कामगिरी.

**१. ऐबक ऊर्फ कुत्बू-उद्दीन,** (स. १२०६–१२१०).—ऐबक लहान असतां त्यास कोणी एकानें पळवून खुरासानची राजधानी निशापूर येथें आणिलें. तेथें एका श्रीमान गृहस्थानें त्यास विकत घेऊन विद्या शिकविली. तो गृहस्थ मरण पावल्यावर एका व्यापाऱ्यानें त्यास विकत घेऊन शहाबुद्दीन घोरीस नजर केलें. त्याजवर शहाबुद्दीनची मर्जी इतकी बसली, कीं तो त्याजबरोबर संपूर्ण विश्वासानें व स्नेहानें वागूं लागला. प्रामाणिकपणा व युद्धचातुर्य या गुणांनीं शहाबुद्दीनच्या सर्व सरदारांमध्यें तो अत्यंत श्रेष्ठता पावला. अखेरीस त्यास शहाबुद्दीननें हिंदुस्थानांत आपला प्रतिनिधि नेमिलें. त्यानें दिल्ली शहर आपलें मुख्य ठाणें केलें; तें साडे सहाशें वर्षें पावेतों येथील मुसलमान बादशहांची राजधानी होऊन उत्तरोत्तर भरभराटीस चढलें. गज्नीस महंमद घोरी मरण पावल्यावर कुत्बू-उद्दीन दिल्ली येथें आपणास स्वतंत्र सुलतान म्हणवूं लागला. त्यानें आपल्या नांवानें खुत्बा वाचविला आणि नाणीं पाडिलीं. महंमद घोरीचे दुसरे मुसलमान सरदार होते, त्यांजबरोबर त्यानें शरीरसंबंध जोडिले. त्याच्याच बरोबरीचा गज्नीचा सुभेदार एल्डोझ याच्या मुलीशीं त्यानें स्वतः लग्न केलें. नासिरुद्दीन कुबाचा म्हणून सिंध प्रांताचा सुभेदार होता, त्यास त्यानें आपली बहीण दिली. अल्तमश म्हणून एक दुसरा हुशार सरदार होता, त्यास त्यानें आपली मुलगी दिली. मीरत, दिल्ली, बनारस, कलिंजर, काल्पी, बिना, ग्वालेर वगैरे ठिकाणें

कुत्व्-उद्दीननें काबीज केलें. महंमद घोरी मेल्यावर कुत्व्-उद्दीनकडून हिंदुस्थानचा कारभार घेण्याकरितां गझ्नीचा सुभेदार एल्डोझ यानें त्याजवर स्वारी केली. तेव्हां कुत्व्नें एल्डोझचा पराभव करून गझ्नीपर्यंतचा प्रदेश काबीज केला. गझ्नी येथें कुत्व्-उद्दीन स्वस्थ आहे असें समजतांच एल्डोझनें पुनः त्याजवर चाल केली, तेव्हां कुत्बचा पराभव होऊन तो हिंदुस्थानांत आला. नंतर त्यानें गझ्नीकडे पुनः लक्ष दिलें नाहीं. हिंदुस्थानांतही त्यानें नवीन मुलूख जिंकिला नाहीं. जिंकिलेल्या मुलखाचा बंदोबस्त करून न्यायानें व सौम्यतेनें त्यानें राज्य केलें. कुत्व्-उद्दीन सन १२१०त घोड्यावरून पडून मरण पावला. मुसलमान इतिहासकार त्याच्या औदार्याची व सौजन्याची फार तारीफ करितात. हसन निजामी नांवाचा गृहस्थ कुत्बुद्दीनजवळ दिल्लीस होता, त्यानें कुत्बुद्दीनची हकीकत लिहून ठेविली आहे. तो म्हणतो, कुत्बुद्दीन मोठा न्यायी होता; आणि त्याच्या राज्यांत लोक सुख पावले. त्याच्या अप्रतिम औदार्यावरून त्यास 'लखबक्ष' म्हणजे 'लक्ष दान देणारा' असें नांव मिळालें होतें. दिल्लीची जुम्मामशीद प्रथम त्यानें बांधिली; तसेंच दिल्लीजवळ त्यानें एक प्रचंड विजयस्तंभ बांधिला, त्यास कुत्व्मिनार म्हणतात. तो लाल दगडांचा प्रचंड मनोरा अद्यापि नुकताच बांधिल्यासारखा नवीन दिसतो. त्याची उंची अडीचशें फूट असून पृथ्वीवर इतका उंच दगडी मनोरा दुसरा नाहीं. त्याच्या पहिल्या दोन मजल्यांवर सभोंवार कुराणांतलीं वाक्यें आरबी भाषेंत लिहिलेलीं आहेत. प्रत्येकानें हा मनोरा एकवार अवश्य पाहण्याजोगा आहे. मशिदींना जे दगड लाविलेले आहेत, ते हिंदु देवळें पाडून त्यांतले आणलेले आहेत.

**२. बंगालचा पाडाव, ( सन १२०२ ).**—महंमद घोरी स्वतः ग्वालेर व बनारसच्या पुढें गेला नाहीं. पण त्याचा सरदार महंमद बखत्यार खिलजी ह्यानें बंगाल व बहार हे प्रांत जिंकिले, म्हणून मागें सांगितलें आहे. त्याची गोष्ट जरा चमत्कारिक आहे. बखत्यार हा शूर व धाडसी होता, पण तो अत्यंत कुरूप म्हणून त्याजला महंमद घोरीनें थोरपदास चढविलें नाहीं. तेव्हां तो स्वपराक्रमानें दूरदूरचे प्रदेश जिंकण्याच्या उद्योगास लागला. प्रथमतः लुटालुटीचा धंदा आरंभून त्यानें कांहीं लोक जवळ जमविले. बहार प्रांतांत ब्राह्मणांचें एक प्रसिद्ध विद्यापीठ होतें, तें त्यानें धुळीस मिळविलें आणि ब्राह्मणांची कत्तल केली.

नंतर सौदागरांचीं सोंगें घेतलेल्या अठरा लोकांनिशीं तो बंगालची तत्कालीन राजधानी नादिया येथें गेला. बंगाल्यांत त्या वेळीं लक्ष्मणसेन नांवाचा ऐशीं वर्षांचा वृद्ध पालवंशी राजा राज्य करीत होता. त्या चोरट्यांस कोणीही अटकाव केला नाहीं. सांपडेल त्यास ठार मारीत ते थेट राजवाड्यांत गेले. मागून त्याची फौज शहरांत जमूं लागली. राजा भोजनास बसला असतां त्यानें चौकांत कांहीं गडबड ऐकिली, त्या योगानें तो घाबरून मागच्या दरवाज्यानें नदीवर गेला. तेथून बायकामुलांची पर्वा न करितां लक्ष्मणसेन गलबतांत बसून जगन्नाथास गेला. तेथें देवसेवेंत त्यानें आपलें राहिलेलें आयुष्य घालविलें. इकडे मुसलमानांनीं त्याचा सर्व मुलूख काबीज केला, आणि गौड ऊर्फ लखनौती ही त्यांनीं आपली राजधानी केली, ( स. १२०२ ).

ह्या विजयामुळें उत्तरहिंदुस्थानांत समकालीन दोन मुसलमानी राज्यें अस्तित्वांत आलीं; एक दिल्लीचें व दुसरें गौडबंगालचें. अलाहबादच्या पश्चिमेकडील मुलुख दिल्लीखालीं मोडत होता; आणि तेथून पूर्वेस ब्रह्मपुत्रा नदीपर्यंतचा सर्व प्रदेश गौडखालीं मोडत होता. हीं दोनही राज्यें नेहमीं निराळींच असत असें नाहीं. दिल्लीचा राजा पराक्रमी झाल्यास तो गौडचे अंमलदारास आपला अंकित समजे. अर्थात् गौडचे सुभेदारास दिल्लीच्या अधिपतीचें स्वामित्व केव्हां केव्हां कबूल करावें लागे. तथापि गौडचे राज्याची व्यवस्था अकबराचे वेळेपर्यंत स्वतंत्रच होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. एकदां तर शीरखान नामक गौडच्या सुभेदारानें मोगल बादशहा हुमायून यास पदच्युत करून दिल्ली, पंजाब वगैरे सर्व प्रांतांचें राज्य एकट्यानें बळकाविलें. इतक्या दूरचें राज्य दिल्लीचे राजांस सांभाळितां येत नसे आणि तिकडे काय अंधार चाले तें त्यांस कळत नसे. म्हणून ' गौडबंगाल ' म्हणजे कोडें असा शब्द प्रचारांत आला आहे. बंगाल व बहार हे प्रांत सहज हस्तगत झाल्यामुळें, बखत्यार खिलजीस आणखी देश जिंकिण्याची इच्छा उत्पन्न झाली. आसाम देशास त्या वेळेस कामरूप अशी संज्ञा होती. तो देश व उत्तरेकडील तिबेट देश जिंकण्यासाठीं बखत्यार निघाला. दहा हजार स्वारांनिशीं तो ब्रह्मपुत्रेच्या थडींतून वर गेला. एका ठिकाणीं नदीवर वीस कमानींचा दगडी पूल होता; त्यावरून नदी उतरून त्यानें पुढें पंधरा दिवसांची मजल केली.

ह्या ठिकाणीं कामरूपचे राजानें त्याजवर हल्ला केला. कामरूपचे फौजे-जवळ लांब भाले व धनुष्यबाण असून बांबूच्या कामट्या रेशमाच्या धाग्यांत गुंतवून त्यांच्या ढाली केल्या होत्या. उभय फौजांची निकराची लढाई झाली. बखत्यारचे बहुतेक लोक पडले; आणि दुसरी मोठी फौज आपणावर येत आहे असें त्यास कळलें, म्हणून तो परत फिरला. परत येतांना त्याचे नानातऱ्हेचे हाल झाले. शत्रूच्या लोकांनीं सर्व दाणा-वैरण जाळून टाकिली. कामरूपच्या राजानें पुलाच्या दोन कमानी पाडून सर्व होड्या नाहींशा केल्या होत्या. म्हणून बखत्यारचा कांहीं उपाय चालेना. तेव्हां आपला घोडा तसाच पाण्यांत घालून पोहत तो अलीकडे आला. त्याजबरोबरच्या लोकांपैकीं फक्त शंभर असामी बचावून अलीकडे आले. ह्या अपयशामुळें उद्विग्न होऊन बखत्यार पुढें लवकरच मरण पावला. त्याच्या मागून जे गौडचे कारभारी झाले, त्यांची हकीकत विशेष महत्त्वाची नाहीं. वेळ येईल त्याप्रमाणें कधीं ते स्वतंत्र होत आणि कधीं दिल्लीचे ताब्यांत जात. बखत्यार ज्या पुलावरून उतरून गेला, तो मोडका पूल गौहट्टीपासून वीस मैलांवर अद्यापि दिसतो. नदीचा प्रवाह हल्लीं तेथून वीस मैल दूर गेला आहे. ब्रह्मपुत्रानदीवर इतका जुना पूल दुसरा नाहीं.

कुत्ब्-उद्दीन हा हिंदुस्थानांतला पहिला मुसलमान सुलतान होय. हा तुर्क जातीचा गुलाम होता. त्याचे बरेच अनुयायी त्याच्यासारखेच मूळ गुलाम असून स्वपराक्रमानें मोठ्या योग्यतेस चढले. ह्या कारणास्तव कुत्ब्-उद्दीनचे वंशास गुलामवंश म्हणण्याचा प्रघात आहे. या घराण्यांतील पुरुषांनीं हिंदुस्थानांत ऐशीं वर्षांवर राज्य केलें. ह्या वंशाची हकीकत मुसलमान इतिहासकारांनीं भरपूर दिली आहे. या वेळेस नाना-प्रकारचे दंगेधोपे व बंडें चालू होतीं, आणि मुलखांत फारसें स्वास्थ्य नव्हतें.

**३. शम्स्-उद्दीन अल्तमश, (सन १२१०–१२३५).**–कुत्ब्-उद्दीन यास आरम म्हणून एक मुलगा होता; तो बापाच्या पाठीमागून तख्त-नशीन झाला. परंतु प्रबळ सुभेदारांच्या हाताखालीं असलेलें एवढें अफाट राज्य चालविण्याची त्यास शक्ति नव्हती. नासिर-उद्दीन कुबाचा हा सिंध व मुलतान हे प्रांत बळकावून स्वतंत्रतेनें कारभार करूं लागला. महंमद बख्त्यार खिलजी बंगाल व बहार प्रांत बळकावून बसला होताच.

एल्डोज हा गज्नीकडून लाहोर जिंकण्याच्या बेतांत होता. अशा स्थितींत दिल्लीच्या प्रमुख दरबारी मंडळीनें कुत्बूचा जांवई अल्तमश, बदाऊन प्रांताचा अंमलदार, ह्यास दिल्लीस येऊन राज्यकारभार हातीं घेण्याविषयीं विनंति केली. त्याप्रमाणें त्यानें येऊन दिल्लीनजीक आरमचा मोड करून तख्त बळकाविलें. अल्तमश यासही चोहोंकडून शत्रु होते, पण त्या सर्वांचा त्यानें हळूहळू बंदोबस्त केला. गज्नीचा सुलतान ताज्-उद्दीन एल्डोझ ह्यानें दिल्लीचे प्रांत घेण्याकरितां स्वारी केली, पण कुरुक्षेत्रावर त्याचाच पराजय होऊन मरेपर्यंत त्यास कारागृहवास पत्करावा लागला. अल्तमश हा थोर कुळांतला होता, तरी भावानें द्वेषबुद्धीनें त्यास विकून टाकिल्यामुळें, कुत्बूप्रमाणेंच तोही एक तुर्की गुलाम झाला. स्वरूपानें देखणा असल्यामुळें त्याच्या धन्यानें त्यास चांगलें शिक्षण दिलें, आणि पुष्कळ किंमत घेऊन कुत्ब्-उद्दीनला विकिलें. त्यानें त्यास प्रथम शिकारखान्यांत नेमिलें; आणि सन ११९६त त्यास ग्वालेरचा कारभार सांगितला. उत्तरोत्तर त्याजवर कुत्बूची मर्जी बसली. पुढें आपली मुलगी त्यास देऊन कुत्ब् त्यास मुलाप्रमाणें वागवूं लागला. राज्यपदारूढ झाल्यावर त्याला फारशी स्वस्थता मिळाली नाहीं. नासिर-उद्दीन कुबाचा यास आपल्या ताब्यांत आणण्यासाठीं त्यानें १२१७त सिंध व मुलतान प्रांतांवर स्वारी केली; पण तींत त्यास यश आलें नाहीं. सन १२२४ त अल्तमशानें सिंधप्रांतावर पुनः स्वारी करून नासिर-उद्दीनचा समूळ नाश केला. पुढें उत्तरेकडील मुलतान वगैरे प्रांत अल्तमशाच्या स्वाधीन करून दक्षिण भागांत जलमार्गानें पळून येत असतां, नासिरुद्दीन आपल्या सर्व कुटुंबासह तुफानांत सांपडून बुडून मरण पावला, ( सन १२३० ). नासिर-उद्दीननें सुमारें बावीस वर्षें स्वतंत्रतेनें कारभार केला होता. त्याचा सर्व मुलूख अल्तमश ह्यानें दिल्लीचे राज्याखालीं आणिला. ही गोष्ट सिंधचे केवळ उत्तरभागास लागू आहे. दक्षिणभाग सुमेर नांवाच्या रजपुत लोकांच्या ताब्यांत होता. ह्याच सुमेर रजपुतांनीं महंमद कासीमनें सिंधप्रांतांत स्थापिलेल्या मुसलमानी अंमलाचा शेवट करून हिंदु राज्य स्थापिलें. उत्तरभाग घोरच्या महंमदानें जिंकून नासिर-उद्दीनचे ताब्यांत दिला होता. सर्व सिंधप्रांत मुसलमानी अंमलाखालीं येण्यास पुष्कळ काळ लागला.

स. १२२६त अल्तमश ह्यानें माळवाप्रांतावर हल्ला करून मांडवगडचा प्रसिद्ध मजबूत किल्ला घेतला. ग्वालेरचा किल्ला पुनः हिंदु लोकांनीं परत घेतला होता, तो स. १२३१त ह्यानें लढून परत मिळविला. ह्याच समयीं पुरातन काळचें मातबर शहर विक्रमादित्याची राजधानी उज्जनी अल्तमशनें घेऊन तेथील सर्व देवालयांचा विध्वंस केला. पुढें बंगालप्रांताचाही कांहीं भाग त्यास मिळाला. सारांश, मरणसमयीं सिंधूपासून भागीरथीपर्यंत बहुतेक उत्तरहिंदुस्थान अल्तमश ह्यानें मुसलमानी अमलाखालीं आणिलें. हिंदु लोकांची अवशिष्ट सत्ता दरएक ठिकाणीं नष्ट होत गेली. खंडणी भरून राहणारे रजपूत राजे आतां थोडेच शिल्लक राहिले. अल्तमशनें स्वपराक्रमानें आपली योग्यता वाढवून राज्यपद मिळविलें. त्याच्या कार्किर्दींत मोगल लोकांचा हिंदुस्थानांत प्रथम शिरकाव झाला. खारिज्म्‌चा सुलतान महंमद चंगीझखानापासून पराभव पावून कास्पियन समुद्रांतील एका बेटावर हालअपेष्टेंत मरण पावला. त्याचा मुलगा जलालुद्दीन हा कांहीं दिवस चंगीझशीं झगडून टिकाव न लागल्यामुळें, जीव बचावण्यासाटीं सिंधुनदींतून पोहून अलीकडे आला, ( सन १२२१ ). त्याच्या पूर्वीं गज्नीचा सुलतान एल्डोज हाही मोगलांस भिऊन हिंदुस्थानांत आला होता, त्यास अल्तमशनें कैदेंत ठेविलें तेथेंच तो मरण पावला. मोगल लोक जलालुद्दीनच्या पाठीवर होतेच. तेव्हां जलाल-ऊद्दीननें दिल्लीस जाऊन अल्तमशजवळ आश्रय मागितला. पण चंगीझशीं टक्कर देण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें अल्तमशनें ती मदत कबूल केली नाहीं. तेव्हां जलाल-उद्दीन सिंध प्रांतांत जाऊन नासिर-उद्दीन कुबाचा यास जाऊन मिळाला. तेथें कांहीं दिवस मोगलांचा व त्यांचा झगडा होऊन जलाल-उद्दीन हिंदुस्थान सोडून इराणकडे गेला. तेव्हां मोगलांच्या टोळधाडीपासून हिंदुस्थानचा तूर्त बचाव झाला. जलालुद्दीनच्या वनवासाची हकीकत अत्यंत हृदयद्रावक, कल्पित कादंबरीलाही मागें टाकील अशी आहे. या मोगलांचे हल्ले पुढें वेळोवेळीं होऊन अखेरीस त्यांच्याच ताब्यांत हिंदुस्थानचें स्वामित्व गेलें, ती हकीकत पुढें यावयाची आहे.

अल्तमशनें दिल्ली शहर आपली राजधानी केली. मुसलमान लोक राज्यें कमावीत कोठेंही गेले, तरी मूळ इस्लामाचेच आपण अंश आहों

असें दाखविण्यास ते फार उत्सुक असत. म्हणून अल्तमशनें बगदा-दच्या खलीफाकडून स्वतःसाठीं बादशाही वस्त्रें आणविलीं. स. १२२९त खलीफाचे वकील पोषाख घेऊन दिल्लीस आले; आणि त्यांनीं खलीफाच्या हुकमानें अल्तमश ह्यास हिंदुस्थानचा स्वतंत्र सुलतान नेमिलें. त्यावरून अल्तमशनें अनेक नवीन किताब आपल्या नांवाला जोडिले, आणि नवीन नाणीं पाडून त्यांजवर आरबी भाषेंत ते किताब खोदविले. स. १२३६त अल्तमश मरण पावला.

४. **सुलताना रझिया,** (स. १२३६–१२३९).—अल्तमशच्या मृत्यू-नंतर दहा वर्षें राज्यांत पुष्कळ अंदाधुंदी माजली. रुक्न्-उद्दीन म्हणून अल्तमशचा वडील मुलगा होता, तो बापाच्यामागें फिरोजशहा हें नांव धारण करून तख्तनशीन झाला. परंतु तो अत्यंत दुर्वृत्त व विलासी निघाला. त्याच्या आईच्या हातीं सगळा कारभार असे. तीही दुष्ट होती. दरबारच्या लोकांस त्या दोघांचा इतका कंटाळा आला, कीं अल्त-मशची वडील मुलगी रझिया हिलाच त्यांनीं सर्व राज्यकारभार देऊन तिजकडून रुक्न्-उद्दीन यास कैदेंत ठेवविलें. तिनें 'रझियातुद्दीन' म्हणजे 'धर्मभक्त' असा किताब घेतला. रझिया बापाची लाडकी व पराक्रमी होती. बाप दूर असतां ती दिल्लीस राहून सर्व कारभार पाहत असे. राजाला अवश्य लागणारे गुण तिच्या अंगीं होते. ती मोठी बुद्धिवान व धीट होती. बायको असूनही पुरुषाच्या अंगचे अनेक गुण तिच्यांत होते. ती स्वरूपानें सुंदर होती. आपल्या पश्चात् हिनेंच राज्य करावें अशी बापाची इच्छा होती. तिची कर्तृत्वशक्ति, न्यायचातुर्य व उद्योग अचाट होते. ती मर्दानी पोषाख करून दररोज सिंहासनावर येऊन बसे. प्रत्येक काम स्वतः पाहून त्याचा निकाल करी. पूर्वीच्या वाईट चाली तिनें बंद केल्या. कायद्यांची दुरुस्ती केली आणि उमराव लोकांस तिनें संतुष्ट राखिलें. ती इतकी व्यवहारदक्ष असतांही एका गोष्टींत फसली. एका हबसी गु-लामावर तिचें मन बसलें, आणि सगळा कारभार तिनें त्याच्या हातीं दिला. हें पाहून दरबारच्या लोकांनीं बंड केलें. तेव्हां पुढ झगडा होऊन त्यांत तो हबसी मारला गेला. पुढें तिला लोकांनीं आल्टूनिया नामक सरदाराच्या बंदोबस्तांत ठेविलें. लोकांचा रोष शमविण्याकरितां तिनें ह्या आल्टूनियाशींच लग्न लाविलें. पुढें ह्या दोघां नवराबायकोच्या व इतर

सरदारांच्या दोन निकराच्या लढाया होऊन ती पकडली गेली; आणि लोकांनीं तिला व तिच्या नवऱ्यास ठार मारिलें. वास्तविक राज्यकारभार चालविण्यास ती समर्थ होती. पण बायकोनें राज्य करावें, ही कल्पनाच तुर्की लोकांस खपली नाहीं. त्यामुळें तिचा नाश झाला. आजपर्यंत मुसलमानी अमदानींत तीन बायकांनीं राज्यपद भोगिलें आहे. एक ही रझिया, दुसरी शजारुद्दर ही स. १२५० त इजिप्टची राणी होती. हिनें धर्मयुद्धांत फ्रान्सचा नववा लुई ( सेंट लुई ) ह्याचा पराभव केला. तिसरी आबिश ( Abish ) ही इराणांत तेराव्या शतकांत राज्य करीत होती. वरील युद्धांत रझियाचा भाऊ शहाजादा बहराम तिजविरुद्ध लढत होता. त्यासच लोकांनीं राज्यपद दिलें. दिल्लीच्या तख्तावर बसलेली पहिली राणी रझिया आणि दुसरी महाराणी व्हिक्टोरिया होय.

**मोइझ्-उद्दीन-बहराम, (स.१२३९–१२४१).**—बहराम राज्य करण्यास लायक नव्हता. ज्यांनीं त्यास राज्यपद मिळवून दिलें, तेच त्याच्यावर उठले. तेव्हां कित्येकांस त्यानें कपटानें ठार मारिलें, म्हणून त्याजविरुद्ध दरबारी लोकांचे कट होऊं लागले. सन १२४१ त गज्नीहून मोगल लोक लाहोरावर आले, आणि त्यांनीं सभोंवारच्या मुलखांत अनर्थ मांडिला. पंजाबचा मुसलमान सुभेदार पळून गेला. बहराम ह्यानें यख्त्यार-उद्दीन नामक दिवाणास फौज देऊन लाहोरास पाठविलें. त्यानें मोगलांस घालवून देऊन परत दिल्लीस येऊन, सुलतानास कैद करून ठार मारिलें.

**अलाउद्दीन-मसूऊद, (स. १२४२–१२४६).**—हा रुक्नुद्दीनचा मुलगा. ह्याची कारकीर्दही वरच्यासारखीच घालमेलींत गेली. हा क्रूर व विलासी असून राज्यकारभारांत मन घालीत नसे. दरबारच्या लोकांनीं ह्यास पदच्युत करून त्याचा चुलता नासिरुद्दीन यास बोलावून राज्यपद दिलें. मसूऊद मरेपर्यंत कैदेंत होता. त्याच्या कारकिर्दींत मोगल लोकांचे दोन हल्ले हिंदुस्थानावर आले, एक तिबेटच्या बाजूनें बंगालप्रांतावर व दुसरा पश्चिमेकडून पंजाबावर. दोनही ठिकाणीं तेथच्या सुभेदारांनीं त्यांस परतून लाविलें.

**५. नासिरुद्दीन महंमूद, (स.१२४६–१२६६).**—नासिरुद्दीन महंमूद हा अल्तमशचा मुलगा. त्याची कारकीर्द बरीच सुखावह झाली. लहान

असतांच बापानें त्यास बंगालच्या कारभारावर नेमिलें होतें. परंतु त्यास त्याच्या सावत्र आईनें बंदींत ठेविलें. पुढें मसूऊदनें त्यास सोडून बैराकच्या सुभेदारीवर नेमिलें. तें काम त्यानें फार चांगल्या रीतीनें केलें. त्याची राहणी अगदीं साधी असे. बंदींत असतां तो कुराणाच्या नकला करून त्या विकून आपला निर्वाह करी. हा धंदा त्यानें अखेरपर्यंत चालविला. त्या वेळीं अनेक बायका करण्याचा प्रघात असतांही त्यानें एकपत्नीव्रत पाळिलें. त्याची बायको घरचीं सर्व कामें स्वतः करी. एके दिवशीं भाकर करितांना तिचीं बोटें भाजलीं, तेव्हां स्वयंपाकासाठीं एक बाई ठेविण्याबद्दल तिनें नवऱ्यास विनंती केली. महंमुदानें ती विनंती ऐकिली नाहीं. तो बोलला, 'मी राज्याचा केवळ संरक्षक आहें, मालक नव्हें. मी आपल्या स्वतःच्या खर्चाचा भार राज्यावर लादणें ठीक नाहीं. तूं शांत मनानें आपलें काम करीत जा, म्हणजे ईश्वर तुला चांगलें बक्षीस देईल.' त्याचें भोजन वनवासी साधूच्यासारखें असे. स्वतःच्या श्रमानें मिळेल तेवढ्यावर तो आपला निर्वाह करी. आरंभापासूनच त्याच्या हातांत राज्यकारभार असता, तर कदाचित् त्यानें आपला छांदिष्टपणा अशा थरास नेला नसता. तथापि एकंदरींत त्याचे कार्कीर्दींत प्रजेचें कल्याण झालें. हरएक बाबतींत त्याची वागणूक तारीफ करण्याजोगी होती. कित्येक बंडखोर जुने सरदार होते, त्यांस कामांवरून काढून त्यानें चांगलीं लायक माणसें नेमिलीं. वायव्यदिशेकडे मोगलांच्या रस्त्यावर लष्कराचा चांगला बंदोबस्त ठेविला. यमुनानदीच्या आसपास कित्येक लहान राज्यें स्वतंत्र होतीं, तीं त्यानें जिंकून आपल्या राज्यास जोडिलीं. माळवा प्रांत पूर्णपणें ताब्यांत आणिला. बुंदेलखंडांत नरवारचा राजा मोठी फौज घेऊन नासिरुद्दीनशीं लढण्यास आला, त्याचा त्यानें पराभव करून सर्व प्रदेश दिल्लीचे ताब्यांत आणिला. शीरखान नामक त्याच्या पंजाबच्या सुभेदारानें सन १२५० सालीं मोगलांस मागें हटवून गज्नी शहरही काबीज केलें. सन १२५८त मेवाडी व इतर रजपुतांनीं राज्यांत पुष्कळ निकराचीं बंडें केलीं, तीं रक्तपात होऊन मोडलीं. ग्यास्-उद्दीन बल्बन म्हणून त्याचा हुशार वजीर होता. त्याजवर राज्याचा सर्व कारभार त्यानें सोंपविला होता. इराणांत चंगीझखानाचा नातू हुलाकू राज्य करीत होता, त्याजकडून एक वकील दिल्लीस आला. त्याचा

सत्कार सुलतानानें उत्तम केला. कित्येक दिवसपर्यंत त्याच्या सन्मानार्थ समारंभ चालले होते. त्यासाठीं सुलतानानें दिल्लीस दरबार भरविला, त्यास हिंदुस्थानचे पुष्कळ मांडलिक राजे हजर होते. त्याचप्रमाणें चंगीझखानाच्या त्रासास कंटाळून दिल्लीस येऊन राहिलेले असे मध्यआशियांतील सुमारें पंचवीस राजे दिल्लीच्या दरबारीं होते. वीस वर्षे राज्यकारभार पाहून सुलतान नासिरुद्दीन अंगीं खिळलेल्या फार दिवसांच्या आजारानें स. १२६६ त मरण पावला. तो स्वभावाचा शांत व एकलकोंडा असल्यामुळें सामान्य गृहस्थ या दृष्टीनें पाहिलें तर योग्य होता. पण राज्यकारभार पाहणाऱ्याला इतका स्वार्थत्याग हितावह होत नसतो, असें इतिहासकार लिहितात.

६. **बल्बन, (स. १२६६–१२८६ ).**—नासिरुदीन महंमूद यास मूल नसल्यामुळें त्याचा फार दिवस काम केलेला वजीर बल्बन यास अनायासें तें राज्य प्राप्त झालें. बल्बन हा एका तुर्क सरदाराचा मुलगा असून, लहानपणींच मोगल लोकांनीं त्यास पळवून आणून एका व्यापाऱ्यास विकिलें होतें. त्या व्यापाऱ्यानें त्यास बगदाद येथें आणिलें असतां, बसऱ्याच्या एका गृहस्थानें त्याला विकत घेतलें. अल्तमश दिल्लीस राज्य करीत होता, त्याची व बल्बनची उत्पत्ति एकाच घराण्यांत झालेली आहे, असें त्या गृहस्थास समजल्यावरून, त्यानें त्यास दिल्लीस अल्तमशकडे आणिलें. त्या वेळची अशी आख्यायिका सांगतात, कीं बल्बन ठेंगू व कुरूप होता, म्हणून अल्तमश त्यास विकत घेईना. हें पाहून बल्बन अल्तमश ह्यास म्हणाला, ‘ महाराज, हे सर्व लोक आपण कशासाठीं विकत घेतले ? ’ बादशहा म्हणाला, ‘ ते माझ्या उपयोगी पडतील म्हणून. ’ ‘ तर मग मलाही घ्या, मीही आपल्या उपयोगी पडल्याशिवाय राहणार नाहीं. ’ हे शब्द ऐकून बादशहा खुष झाला, आणि त्यानें त्यास विकत घेतलें. पुढें लवकरच हिंदूंचीं बंडें मोडण्यांत तो प्रसिद्धीस आला. रुक्न्-उद्दीनच्या वेळेस तो पंजाबच्या कामगिरीवर होता. सुलताना रझियाच्या विरुद्ध कट झाला, त्यांत हा सामील असल्यामुळें कैदेंत पडला. कांहीं दिवसांनीं सुटका झाल्यावर बहरामच्या कार्कीर्दीत हंसी व रेवारी या दोन प्रांतांचा कारभार त्याजकडे होता. त्या वेळेस त्यानें मीरतच्या आसपास उद्भवलेलीं बंडें मोडण्यामध्यें चांगलें नांव मिळविलें. अलाउद्दीन मसूऊदच्या कार्कि-

दींत अमीर हज्जीबचें काम त्याजकडे होतें, आणि नासिरुद्दीनच्या वेळेस, नांवानें प्राधनकीचें, पण वस्तुतः राजाचें काम तोच पाहत होता. त्यानें आरंभीं दहशत बसण्याकरितां कांहीं कडकपणा गाजविला, पण पुढें न्याय व शहाणपणा यांजबद्दल त्याची ख्याति झाली. अपराधास कडक शिक्षा व चांगल्या कामगिरीस बक्षीस देण्यास तो तत्पर असे. तथापि स्वजातीकडे त्याचें लक्ष विशेष होतें. भरंवशाच्या किंवा अधिकाराच्या जागेवर कोणाही हिंदूची नेमणूक करूं नये, असा त्यानें सक्त नियम केला होता. त्याजकडून मुसलमानी विद्येस चांगलें उत्तेजन मिळत असल्यामुळें, मोठमोठे विद्वान् पंडित त्याच्या दरबारीं असत. त्याचा दरबार अत्यंत शिस्तीचा व भपकेदार होता. त्याचाच कित्ता इतर दरबारी लोकांनीं उचलिला. दिल्ली शहरांत निरनिराळ्या तऱ्हेच्या संस्था स्थापन झाल्या, त्यांत सुलतानाच्या विद्याभिरुचीबरोबर त्याच्या डामडौली स्वभावाचेंही त्यांनीं अनुकरण केलें. ह्या दरबारच्या भपक्याचें व शिस्तीचें वर्णन फेरिस्त्यानें केलें आहे. राजदर्शनास कोणास जाणें असल्यास त्यास अशी कांहीं कवाईत करावी लागे, कीं त्यामुळें त्याच्या मनांत आश्चर्य व दहशत उत्पन्न होई. बल्बनची स्वारी मोठी थाटाची निघे. त्याचे स्वारीचे हत्ती एकजात सुवर्णमय कपड्यांनीं मढविलेले असत. त्याचा खाजगी लवाजमा हजार तार्तार स्वारांचा होता. त्यांचीं शस्त्रास्त्रें मोटीं लखलखीत व मौल्यवान असत. इराण व आरबस्तान येथून मुद्दाम घोडे आणून तो स्वारांना देई. स्वारीपुढें पांचशें हलकारे नागव्या तलवारींनिशीं चालत असत. इतर सरदार लोक आपापल्या मिसलीप्रमाणें स्वारीबरोबर जात. मद्यपान कोणास न करूं देण्याबद्दल त्याचें विशेष लक्ष होतें. जवळच्या एका मोठ्या सरदाराच्या मुलानें मद्यपानाच्या निशेंत आपल्या एका नोकरास ठार मारल्याची फिर्याद, मयताच्या बायकोनें सुलतानाकडे नेली. तेव्हां त्यानें त्या गृहस्थास ताबडतोब बोलावून त्याजवर काम चालविलें, आणि देहान्त शिक्षा देऊन ती लगेच भरदरबारांत अमलांत आणिली. त्याचप्रमाणें अयोध्येचा सुभेदार अशाच गुन्ह्यास पात्र झाला असतां, सर्वांच्या देखत पांचशें फटके मारून, गुलाम म्हणून त्यास मयताच्या बायकोच्या स्वाधीन केलें. अशीं उदाहरणें हरहंमेश घडत. मद्यपान करणारांना त्यानें अत्यंत कडक शिक्षा ठरवून दिल्या होत्या. त्यास डामडौल प्रिय असे, तरी अनेक वेळां

राज्याचा खर्च कमी करण्याकरितां अगदीं लहान गोष्टींत सुद्धां तो मन घालीत असे. इ.स. १२७० मध्यें पंजाबप्रांताचा सुभेदार मरण पावला, तेव्हां तिकडील प्रांत उघडे पडून मोगल लोकांपासून जबरदस्त उपद्रव होऊं लागला; आणि त्यांत खालचे अधिकारी मोगलांस मिळून आहेत असेंही त्यास दिसून आलें. तेव्हां बल्बननें आपला पराक्रमी पुत्र महंमूद ह्यास मोगलांच्या बंदोबस्तास पंजाबांत पाठविलें; आणि त्यानेंच आपल्या पाठीमागून गादीवर बसावें असेंही त्याच वेळीं ठरवून ठेविलें.

**७. बंगाल्यांत तुघ्रलखानाचें बंड, (स. १२७८-१२८३).**–सुलतान बल्बन यानें अतिदूरची स्वारी केली, ती बंगालची होय. बंगालप्रांत दूर असल्यामुळें तेथचे अधिकारी व लोक दिल्लीच्या सुलतानास मोजीत नसत. बल्बनच्या कार्किर्दीचा वृत्तान्त ‘बराणी’ ह्यानें लिहिला आहे. त्यानें बंगाली लोकांस पुळपुळित म्हटलें आहे. तथापि बल्बनचा अधिकार त्यांनीं निमूटपणें सहन केला नाहीं. महंमद घोरीचा सरदार बखत्यार खिलजी ह्यानें बंगालप्रांत जिंकिल्यापासून बल्बनपावेतों पंधरा कारभारी बंगाल्यांत झाले. बल्बननें तुघ्रलखान नामक आपल्या मर्जीतला एक इसम बंगालच्या कारभारावर नेमिला होता. तो गोड स्वभावाचा व उदार असल्यामुळें बंगालच्या लोकांस फार प्रिय झाला. प्रजाजन व फौज त्याच्या अगदीं भजनीं लागली.

तुघ्रलखानाची ही लोकप्रियता सुलतानास आवडली नाहीं. शिवाय सुलतान वृद्ध झाला आहे अशी संधि पाहून, तो स्वतंत्र होण्याच्या नादीं होता, इतक्यांत स.१२७९मध्यें बल्बन आजारी पडून मरण पावला अशी एक बातमी उठली. ही बातमी तुघ्रलखानास समजतांच तो बंगाल्यांत स्वतंत्र कारभार करूं लागला. तेव्हां तुघ्रलखानास जिंकण्यासासाठीं बल्बननें अयोध्येचा सुभेदार अलतगीन ह्यास ‘अमीरखान’ असा किताब देऊन पाठविलें, आणि त्याच्या मदतीस दुसरी मोठी फौज रवाना केली. अलतगीन व तुघ्रलखान यांचें गोग्रा नदीच्या पलीकडे युद्ध होऊन त्यांत बल्बनचे फौजेचा संपूर्ण पराभव झाला. अलतगीन हात हलवीत परत आलेला पाहून त्यास बल्बननें अयोध्येच्या वेशीवर फांशीं दिलें. त्यानंतर बादशहानें बंगाल्यावर दुसरी फौज पाठविली. तिचाही तुघ्रलखानानें पराभव केला. तेव्हां बल्बन मोठी फौज गोळा करून स्वतः उतावळीनें भर पावसाळ्यांत बंगाल्यांत

गेला. बादशहा आला असें पाहून तुघ्रलखान दूर कोठें पळाला, तो समोरा-समोर येईना, आणि बादशहास त्याचा पत्ताही लागेना. अशा रीतीनें पुष्कळ दिवस गेले. अखेरीस कोल प्रांताचा सुभेदार मलिक-मुकदम हा लहानशी टोळी घेऊन तुघ्रलखानाच्या शोधार्थ निघाला. जवळच त्यास खानाची छावणी दिसली. चाळीस लोक बरोबर घेऊन तो थेट त्याच्या तंबूवर गेला. तुघ्रलच्या लोकांस हा परकी आहे असें वाटलें नाहीं. जवळ जाऊन मलीक मोठ्यानें ओरडला. त्याबरोबर एकदम उडी मारून जवळच एक बिनखोगिराचा घोडा होता, त्याजवर चढून तुघ्रलखान नदीकडे पळाला. मलीक त्याच्या पाठीस लागला. नदींतून पोहून जात असतां मलीकचा बाण तुघ्रलास लागून तो घायाळ झाला. मलीकनें तशीच लगट करून तुघ्रलचें शीर कापून घेतलें, आणि धड तसेंच नदींत वहात जाऊं दिलें. ह्या साहसाच्या कृत्यावरून मलीक ह्यास 'तुघ्रलकुश' म्हणजे 'तुघ्रल ह्यास मारणारा' असें टोपण नांव मिळालें. दुसऱ्या दिवशीं बल्बन ह्यानें तुघ्रलच्या सर्व मुलांबाळांस ठार मारिलें. तसेंच अनेक वधस्तंभ ओळीनें उभे करून त्यांजवर हजारों लोकांस फांशीं दिलें. बराणी म्हणतो, गौड येथें बल्बननें जसा क्रूरपणा दाखविला, तसा हिंदुस्थानांत पूर्वीं कोणीं पाहिला नव्हता. त्यानें आपला मुलगा बोग्राखान ह्यास बंगाल प्रांताचा सर्व कारभार सांगितला. ह्या स्वारीस एकंदर तीन वर्षें लागलीं, (स. १२८०–१२८३). बोग्राखानास त्यानें सांगितलें, कीं "'सर्व बंगालप्रांत काबीज करून त्याजवर अंमल करीन,' अशी शपथ घे, समजलास." त्याजवर बोग्राखान कांहींच बोलेना. बापानें पुनः विचारिलें, 'समजलास ?' तरी तो बोलेना. त्यावर तो वृद्ध सुलतान म्हणाला, 'आज बाजारांत लोकांस कशा शिक्षा दिल्या, त्या तूं पाहिल्याच आहेत. जर वाईट लोकांच्या नादीं लागून इकडेच स्वतंत्र होण्याचा विचार मनांत आणशील, तर तुझी काय दशा होईल, ध्यानांत ठेव. सिंध, माळवा, गुजराथ, लखनौती, सोनारगांव, इत्यादि ठिकाणीं जर कोणी दिल्लीच्या सुलतानाशीं पुनरपि बेइमान करून शस्त्र उचलील, तर त्यांची व त्यांच्या बायकामुलांची दशा तुघ्रलखानासारखी होईल.' येथचे एकेक प्रांत जिंकून मुसलमानी राज्याखालीं आणण्यास ह्या तुर्कांनीं केवढे अकटोविकट प्रयत्न केले, हें ह्यावरून दिसून येतें.

**शहाजादा महंमूद याचा मृत्यु, (स. १२८५).**—एकंदरींत बल्बनचें सर्व आयुष्य धामधुमींत व युद्धप्रसंगांत खर्च झालें. नासिरुद्दीनच्या कारकिर्दींत वजीर म्हणून वीस वर्षें व स्वतः वीस वर्षें मिळून त्यानें चाळीस वर्षें राज्यकारभार केला. पहिल्या वीस वर्षांत हिंदूंस पादाक्रान्त करून मोगलांचा बंदोबस्त करणें हीं दोन मुख्य कामें त्यास करावीं लागलीं. पहिलें तडीस गेलें, पण दुसरें मात्र गेलें नाहीं. त्यानें सरहद्दीच्या बंदोबस्तासाठीं अनेक योजना केल्या, पण त्यांचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. राज्यावर आल्यावरही त्यानें आपला पूर्वीचा कडक व कठोर बाणा तसाच चालू ठेविला. दिल्लीच्या आसपास नेहमींच बंडावे होत असत, ते मोडण्यांत त्यानें एक लाख लोक ठार मारिले, तेव्हां शांतता झाली. मुसलमान इतिहासकार अशा शांततेचे गोडवे गातात. मुसलमानांस येथें आपलें कायमचें राज्य स्थापन करावयाचें होतें, तेव्हां अशा क्रूरपणाची त्यांनीं तारीफ करावी हें योग्यच आहे. पण ' जिकडे तिकडे रक्ताच्या नद्या वाहूं लागल्या, प्रत्येक गांवाजवळ प्रेतांचे प्रचंड ढीग जमा झाले, आणि त्यांच्या दुर्गंधीनें सर्व देश व्यापून गेला, ' अशीं वर्णनें वाचलीं म्हणजे बल्बनची तारीफ करणें अशक्य वाटूं लागतें. तुर्क लोक बंड करीत, तेव्हां त्यांचाही त्यानें अशाच क्रूरपणानें बंदोबस्त केला.

बंगालच्या स्वारींतून परत आल्यावर, मुलतानवर मोगलांनीं हल्ला केला होता, त्यांचा बंदोबस्त करण्याकरितां आपला आवडता मुलगा महंमूद यास सुलतानानें रवाना केलें, त्या वेळीं बल्बनचें वय ऐशीं वर्षांचे झालें होतें, म्हणून आपला आतां भरंवसा नाहीं असें वाटून त्यानें मुलास सदाचरणाचा चांगला बोध केला, तो प्रत्येकानें ध्यानांत ठेवण्याजोगा आहे, सबब तो फेरिस्त्यानें लिहिल्याप्रमाणेंच शब्दशः येथें देतों.

' माझें सर्व आयुष्य राज्यकारभार करण्यामध्यें गेलें; आतां मला लौकरच मरण येणार. करितां मला जो अनुभव प्राप्त झाला आहे, तो तुझ्या उपयोगी पडेल, म्हणून तुला सांगतों.

' तख्तनशीन झालास म्हणजे मी ईश्वराचा प्रतिनिधि आहें असें समजून वागत जा. आपणांवर केवढी जबाबदारी आहे हें अगोदर चांगलें ओळखून ठेव. हलकट वर्तनानें आपल्या थोरपदास काळिमा लागूं देऊं नको, इतकेंच नव्हे, तर हलकट व लोभी माणसांवर तूं मोहबत धरूं

नको आणि त्यांचा राज्यकारभारांत कदापि शिरकाव होऊं देऊं नको, हें पक्कें ध्यानांत असूं दे.

' आपल्या मनोविकारांस विवेकाच्या लगामीं ठेव; क्रोधाच्या तावडींत सांपडावयाचें नाहीं अशी खबरदारी बाळग. क्रोध हा मनुष्यमात्राचा दुष्मन तर खराच, पण त्यांतूनही राजांच्या घाताचें तो मुख्य कारण होय.

' सारासार विचार करून व सत्कृत्य करण्यामध्यें दक्ष राहून सद्बुद्धि ठेवून वाग; आणि शहाणपणानें काटकसर करून सढळ औदार्याच्या कामीं, तूं आपल्या द्रव्याचा व्यय करीत जा.

' आपल्या आचरणानें ईश्वरभक्तीचा ठसा लोकांच्या मनावर उटीव. दुर्वर्तन व नास्तिकपणा यांचें योग्य शासन केल्याशिवाय राहूं नको.

' दरबारच्या कामांत चांगलें लक्ष घालीत जा. म्हणजे खटपटी व ढोंगी कारभाऱ्यांचे हातून तूं फसणार नाहींस.

' तुला आपला राज्यकारभार कामदारांमार्फत चालविला पाहिजे, म्हणून यत्किंचितूही हयगय किंवा कसूर न होतां हुकुमाची तामिली बजाविली जाते किंवा नाहीं, हें तूं मोठ्या काळजीनें पाहत जा.

' सद्गुणी व लायक असे न्यायाधीश निवडून त्यांजकरवीं न्यायाचा प्रकाश सर्व राज्यांत निरंतर पाडीत रहा.

' राजपुरुषाच्या नांवाला हीनत्व आणणारें कोणतेंही खासगी किंवा दरबारी कृत्य तुझ्या हातून घडणार नाहीं अशी खबरदारी ठेव. तुझी सर्व व्यवस्था इतकी चोख व नियमित असूं दे, कीं तेणेंकरून प्रजेमध्यें तुजसंबंधानें पूज्यबुद्धि व दरारा आपोआप उत्पन्न व्हावा. तुझ्यासंबंधानें प्रजेच्या ठिकाणीं पुज्यबुद्धि व दरारा असेल, तरच तुझी थोरवी वाढून तुझ्या हुकुमाची तारीफ व अंमलबजावणी होत जाईल.

' बुद्धि, विद्वत्ता व धैर्य यांहीं युक्त अशीं माणसें शोधून काढण्याच्या कामीं तूं बिलकुल कसूर करूं नको. हलक्या माणसाला एकदम थोरपदाला चढवूं नको, कारण हलकट मनुष्य थोरपणास चढला, म्हणजे तो स्वतःला विसरतो, आणि खऱ्या योग्यतेच्या माणसांच्या डोळ्यांत नेहमीं सलत राहतो.'

' अगदीं अडलेंच असें झाल्याशिवाय कोणत्याही कामाला हात घालूं नको. त्याचप्रमाणें आपले हातून अखेरपर्यंत मजल मारवेल अशाच

कामाला हात घाल. अमुक एक काम हातीं घ्यावयाचें असें ठरलें, म्हणजे मग तो निश्चय बिलकूल ढळूं देऊं नको, किंवा त्यांतून मन काढून घेऊं नको. राजानें दुराग्रह दाखविणें पतकरेल, पण धरसोड किंवा नेभळे-पणा अगदीं कामाचा नाहीं. आग्रही वर्तन एखादे वेळेस तरी बरोबर असण्याचा संभव असतो, पण धरसोडींत चुकण्याचीच खात्री आहे. धर-सोडीच्या वर्तनानें राजाच्या मनाचें दौर्बल्य जितकें बाहेर व्यक्त होतें, तितकें दुसरें कशानेंही होत नाहीं. '

असा उपदेश करून शहाजाद्यास सुलतानानें मोगलांच्या बंदोबस्ता-करितां पाठविलें.

चंगीझखानाचा नातू हुलाकू यानें इराण देश जिंकिला, म्हणून मागें सांगितलें आहे. ह्या हुलाकूचा मुलगा अर्घूनखान हा बल्बनच्या वेळेस इराणांत राज्य करीत होता. चंगीझखानाचा तयमूरशहा नांवाचा दुसरा एक वंशज खुरासानपासून सिंधुनदीपर्यंतच्या प्रदेशावर राज्य करीत होता. सन १२८३मध्यें तयमूरशहानें बल्बनचे मुलखावर हल्ला केला. तेव्हां वृद्धापकाळामध्यें आपल्या आवडत्या मुलास लढाईवर पाठविणें बल्बनच्या जिवावर आलें. तरी त्यानें महंमुदास पाठविलें. त्यानें जाऊन मोग-लांचा पूर्ण मोड करून आपला गेलेला सर्व मुलूख परत घेतला. सन १२८५त दीपलपूर येथें मोठ्या निकराची लढाई झाली. शहाजादा महंमूद यास जय मिळाला; पण मागून पाठलाग करीत असतां, तो दूर आला असें पाहून, मोगल एकदम परत फिरून त्याजवर उलटले. त्या झटापटींत हा शूर व उदार राजपुत्र मारला गेला. त्याचे सर्व शिपाई विजयोत्साहांत निमग्न असतां त्यांस एकाएकीं ही आकाशाची कुऱ्हाड पडल्यासारखें वाटलें. ह्या आघातानें सर्व लहानथोरांच्या डोळ्यांत अश्रु आले. दिल्लीस सुलतानास ही हकीकत समजल्यावर जो आकांत उडाला त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. पुत्राच्या मरणाची बातमी ऐकिल्यावर रोजच्याप्रमाणें दरबारचें वगैरे काम करून त्यानें दिवस कसाबसा लोटला; पण सायंकाळीं त्यानें आकांत करून डोक्यांत धूळ फेंकून घेतली. त्याच धक्क्या-नें आजारी पडून पुढें तो लवकरच मरण पावला, (स. १२८७). हिंदुस्थानांत राज्य राखणें झाल्यास तें कसें राखावें हें त्याच्या इतकें दुसऱ्या कोणास समजत नव्हतें. भपकेबाज दरबार भरवून व थाट

करून तो लोकांवर छाप बसवी. त्याची स्वारी पाहण्यास दूरदूरचे लोक येत. त्याचे खासगी नोकर सुद्धां त्याजवळ मोठ्या थाटानें व अदबीनें वागत. त्याजसमोर हंसणें, खेळणें, थट्टा करणें, वगैरे सर्व प्रकार मना असत. लहानपणीं त्यास मद्यप्राशनाचा नाद होता, पण राज्यकारभार हातीं येतांच त्यानें आपले सर्व छंद टाकून दिले. चाळीस वर्षांत त्यानें अयोग्य माणसाशीं सलगी केली नाहीं, कीं हलकट माणसांस जवळ थारा दिला नाहीं. तो गुलामगिरींतून वाढला होता. प्रथम मिस्त्री, मग शिकारी, मग सेनापति व मुत्सद्दी, आणि सरशेवटीं सुलतान अशा रीतीनें तो चढत गेला. दिल्लीच्या प्रमुख सुलतानांत त्याची गणना आहे.

एकंदरींत त्या वेळच्या मानानें बल्बनची कारकीर्द फार नांवाजण्यासारखी झाली. दिल्लीच्या आसपास बंडखोर व लुटारू लोकांचा उपद्रव फार होत असे, तो त्यानें बंद करून, जंगलें वगैरे तोडून, शेतीची व वसाहतीची सोय केली. शहाजादा महंमूद जगता, तर तो फार चांगला झाला असता, असें म्हणतात. अनेक देशचे थोर थोर विद्वान् गृहस्थ बल्बनच्या दरबारीं येऊन राहिले होते. शेखसादी कवीच्या मनांत दिल्लीस जाऊन त्याला भेटावें असें होतें, पण तें घडलें नाहीं. अमीर खुस्रु म्हणून दुसरा एक विद्वान् कवि महंमुदाजवळ नेहमीं असे. मोगल लोकांस बल्बनचा फार वचक असून त्यांनीं त्याचा स्नेह संपादिला होता.

८. कैकुबाद, (स. १२८६–१२८८).—बल्बन यास बोगराखान म्हणून दुसरा मुलगा होता. तुघ्रलखानास मारल्यावर हा बंगालच्या कारभारावर होता. त्यानें मरणसमयीं बापाजवळ येऊन राहण्याची पर्वा केली नाहीं, म्हणून महंमुदाच्या मुलास आपल्या पाठीमागें राज्यावर बसवावें, असें बल्बननें मरणसमयीं ठरवून ठेविलें होतें. परंतु बल्बन मरण पावल्यावर उमरावांनीं बोगराखानाचा मुलगा कैकुबाद यासच दिल्लीचे तख्तावर कायम केलें. कैकुबाद देखणा व सौम्य होता. सतरा वर्षें आजानें त्यास कडक बंदोबस्तांत ठेवून हरएक प्रकारचें शिक्षण दिलें होतें. त्या अवधींत दारूची बाटली अगर सुंदर स्त्री कशी ती त्याच्या दृष्टीस सुद्धां पडली नव्हती. अशा मुलाच्या हातांत एकदम सर्व राज्याची दौलत व हुकमत आल्याबरोबर मग काय विचारावयाचें ? तो नानाप्रकारच्या विलासांत निमग्न राहूं लागला. यमुना नदीच्या कांठीं एक विलासमंदीर

बांधून तेथें तो सदासर्वकाळ चैन करीत असे. निजाम-उद्दीन म्हणून कैकुबादचा मुख्य कारभारी होता, त्याचे हातांत सर्व सत्ता होती. कैकुबादास काढून आपण राज्य बळकवावें असा ह्या निजाम-उद्दीनचा घाट होता. पंजाबप्रांतांत कैखुस्रू होता, तोही मोगलांच्या साह्यानें दिल्लीचें राज्य घेण्यास पाहत होता; पण ह्या कामांत त्यास यश न येऊन, तो दिल्लीस आला असतां, निजाम-उद्दीननें त्यास ठार मारविलें. नंतर बल्बनच्या वेळच्या सर्व हुशार कामगारांस निजामानें हळू हळू काढून लाविलें. मोगल लोकांस वश करून त्यांचा उपयोग करून घेतल्यास, त्यांचा उपद्रव बंद होईल, अशा समजुतीनें बल्बननें पुष्कळ मोगल लोक आपल्या फौजेंत नोकरीस ठेविले होते. परंतु निजामानें ह्या मोगल लोकां-विषयीं कैकुबादचे मनांत वांकडेपणा भरवून सर्वांस ठार मारिलें. तथापि कैकुबादचा बाप बोगराखान जिवंत होता. त्यानें आपल्या मुलास उप-देशपर पत्रें पाठवून, राज्यावर संकटें काय काय आलीं आहेत तें स्पष्ट कळविलें. पण निजामाच्या खटपटीनें कैकुबाद यास तीं पत्रें पोंचलीं नाहींत. शेवटीं बोगराखान मोठ्या प्रयासानें दिल्लीस येऊन आपल्या पुत्रास भेटला. तेव्हां पितापुत्रांच्या प्रेमानें भेटी होऊन निजामाचें सर्व कपट बाहेर पडलें. तेव्हां आतां आपल्यावर बेततें असें पाहून त्यानें विष घेऊन आत्महत्या केली.

नंतर कांहीं वेळपर्यंत कैकुबाद शुद्धीवर होता. पण एकवार लागलेली वाईट संवय जाणार कशी ? लवकरच जिकडे तिकडे पुनः अंदाधुंदी सुरू झाली. व्यसनांनीं कैकुबादची प्रकृति बिघडून त्यास अर्धांगवायु झाला. तेव्हां दरबारामध्यें खिलजी व मोगल असे दोन पक्ष झाले. खिलजीच्या पक्षांत मलीक जलालुद्दीन फिरोज हा मुख्य होता. दुसऱ्या पक्षाकडे मोगल लोक कैकुबादच्या लहान मुलास राज्यपद देण्याविषयीं झटत होते. ह्या दोन पक्षांचीं भांडणें विकोपास जाऊन शेवटीं जलालुद्दीन ह्यानें, कैकुबाद विलासमंदिरांत मरणोन्मुख पडला असतां त्यास ठार मारून, त्याच्या अवयवांची कपड्यांत मोट बांधून ती खालीं यमुनानदींत फेंकून दिली, आणि त्याच्या मुलासही मारून दिल्लीचें राज्य आपण बळकाविलें. येणेंप्रमाणें गुलामवंशाचा शेवट झाला, (इसवी सन १२८८ ). ह्या वंशास ' घोरच्या सुलतानांचे गुलाम ' अशी संज्ञा मुसलमान इतिहासकार देतात.

९. **गुलामवंशाची कामगिरी.**—सबक्तगीन व महंमूद ह्यांनीं हिंदुस्थानांत प्रवेश केल्यास तीनशें वर्षे होऊन गेलीं. एवढ्या कालांत देश जिंकण्यापलीकडे विशेष गोष्ट त्यांच्या हातून घडली नाहीं. गुलामवंशी सुलतानांनींच हिंदूंचीं पराक्रमी राज्यें पादाक्रांत केलीं. मुसलमान राजे मूर्ति फोडणें व मशीदी बांधणें वगैरे कामें झपाट्यानें करीत चालले. हिंदूंची मदत घेतल्याशिवाय मुसलमानांनीं स्वतःच्या बळावर हिंदूंस पादाक्रांत केलें. दक्षिणहिंदुस्थानांतील लोक व राजे, उत्तरेस काय होत आहे हें पहात स्वस्थ बसले होते. आपण उत्तरेच्या लोकांस मदत द्यावी व मुसलमानांस पुढें येऊं देऊं नये, असें त्यांच्या मनांत आलें नाहीं. ह्या वेळची एकंदर लोकस्थिति कशी होती हें समजण्यास मार्ग नाहीं. मुसलमान इतिहासकार युद्धें व झगडे ह्यांपलीकडे फारसें वर्णन देत नाहींत. तथापि नर्मदेच्या उत्तरेकडील सर्व देश पाडाव करण्याचें मोठें काम गुलामवंशानें केलें आहे.

‘ गुलाम ’ ह्या शब्दांत हल्लीं तिरस्करणीय अर्थ आहे. गुलाम म्हणजे धन्याचा बंदा नोकर; त्यास स्वतंत्रता नाहीं व धन्याच्या मर्जीपलीकडे स्वतःचें जीवन नाहीं. धन्याच्या जंगम मिळकतीचाच तो एक भाग होय. अर्थात् मनुष्यपणाचे जे नैसर्गिक हक्क आहेत, ते त्यास मिळावयाचे नाहींत. अशा अर्थानें गुलामरूपी संस्थेचा उदय फार प्राचीन काळीं झाला. तथापि पूर्वेकडील राष्ट्रांपेक्षां पाश्चात्य राष्ट्रांतच गुलामगिरीचें हिडिस स्वरूप परमावधीस पोंचलें. ग्रीक व रोमन लोकांमध्यें गुलाम होते. बहुधा लढाईंत पाडाव करून आणिलेल्या लोकांचा भरणा ह्या गुलामांत होत असे. मुसलमानांच्या वेळेस ह्यागुलामगिरीचें प्रस्थ फार वाढलें, आणि मध्यकालीन क्रिस्ती राजांनीं तर ह्या कामीं अमानुषपणाची कमाल केली. एखाद्या ठिकाणच्या लोकांस जबरीनें पकडून त्यांस दुसऱ्या देशांत नेऊन कामास लावणें, किंवा त्यांचा क्रयविक्रय करणें हे निंद्य प्रकार युरोपियनांनीं सुरू केले, ( ब्रि. रियासत पृ. २१३ पहा. ) पण मुसलमानांचा प्रकार ह्याहून भिन्न होता. मुसलमानांचा संचार जेव्हां पॅसिफिक महासागरापासून अटलांटिक महासागरापर्यंत होऊं लागला, तेव्हां मार्गांतील अनेक लोकांचा पाडाव होऊन, त्यांच्या झुंडीच्या झुंडी मुसलमान सरदारांच्या पदरीं जमत चालल्या; आणि त्यांस मुसलमानी धर्माची दीक्षा मिळाली. अशा पाडाव

झालेल्या लोकांनीं दंगा वगैरे करूं नये म्हणून पुष्कळदां त्यांची एकजात कत्तल करण्यांत येई, आणि कित्येकदां तयमूरलंगसारखे धाडसी व क्रूर पुरुष, पाडाव केलेल्या लोकांचा शिरच्छेद करून त्यांच्या शिरांचे मनोरे बांधीत, आणि अशा रीतीनें लोकांवर आपली दहशत बसवीत.

पण मुसलमानी धर्म व राज्य ह्यांचा विस्तार करण्यास ह्या गुलामांचाच उपयोग विशेष झाला आहे. तुर्क अफगाणांच्या अमदानींत तर गुलामांची ही संस्था म्हणजे नांवलौकिक व पराक्रम गाजविण्याची एक उपयुक्त शाळाच बनली. एखाद्या सरदाराच्या लगामीं राहून आणि त्याचें अनुकरण करून नशिबाची परीक्षा पाहणें हा एक धंदाच झाला. सेल्जुक तुर्कांच्या राज्यांत गुलामांचा उदय झपाट्यानें झाला. सेल्जुक सुलतान मलीकशहा ह्याच्या लष्करांतून अनेक पुरुष पुढें निरनिराळ्या प्रांतांच्या कारभारावर राहून भरभराटीस चढले. त्यांस मलीकशहाचा गुलाम म्हणवून घेण्यांत मोठी धन्यता वाटे. जन्मानें मनुष्य कितीही हलका असला, तरी त्यास इतरांच्या बरोबरीनें नांव काढण्याची सारखी संधि ह्या गुलामगिरींत मिळत असे. कित्येक सुलतानांची भक्ति प्रत्यक्ष मुलांपेक्षां गुलामांवर ज्यास्त असे. एकवार गुलामगिरींतून वर जाऊन उदय झाल्यावर, दरएक पुरुष पुन: आपल्याजवळ नवीन गुलामांचा भरणा करी; आणि अशा योगानें ही गुलामांची संस्था नेहमीं वाढत जाऊन ती मुसलमानी राज्यास फारच उपयोगाची झाली. तेराव्या शतकांत इजिप्ट देश जिंकणारे मामेलूक नांवाचे तुर्क सुलतान आरंभीं अशा गुलामांतूनच वाढलेले होते. महंमद घोरी व कुत्ब्-उद्दीन ह्यांना गुलामांचें महत्त्व विशेष वाटत असे. एकदां महंमद घोरी आपल्या एका सोबत्याशीं गोष्टी करीत बसला असतां, तो सोबती म्हणाला, ‘ काय हो, आपणांस मूल नाहीं ही केवढी दु:खाची गोष्ट. मूल असतें तर आपल्या वंशाचें नांव तरी पाठीमागें राहिलें असतें. ’ त्यावर घोरी सुलतानानें उत्तर दिलें, ‘ काय मला मूल नाहीं म्हणतां? माझीं मुलें हजारों आहेत. हे तुर्की गुलाम माझ्या पदरीं जमले आहेत, हे माझीं मुलें नाहींत तर कोण? हे माझ्याहूनही ज्यास्त पराक्रम करून माझें राज्य व कीर्ति वाढविणार नाहींत काय? ’ ही गोष्ट खरी ठरली. जी गोष्ट मुलांस साध्य होणें शक्य नव्हतें, ती ह्या गुलामांनीं सिद्धीस नेली. मुलगा झाला तरी बापासारखा शहाणा व पराक्रमी

निघतोच असें नाहीं. पुष्कळदां बापाचे पराक्रमामुळें घरांत श्रीमंती व ऐषआराम वाढून मुलें ऐदी व निःसत्त्वच बनतात. तीं मुलें वाईट निपजलीं तरी त्यांसच पुढें राज्यावर बसवावें लागतें. त्यांस दूर सारण्याचें साधन राहत नाहीं. बाप सुद्धां आपल्या एखाद्या पराक्रमी सरदारास राज्य न देतां, आपल्या ऐदी मुलानें आपल्या मागें राज्यावर बसावें, ह्यासाठीं हपापलेला असतो. पण गुलामगिरी म्हणजे पराक्रमाची शाळा. त्या शाळें-तून निभावून बाहेर येण्यास अंगची योग्यताच पाहिजे. योग्यता नसल्यास तो नाहींसा व्हावयाचा. अशा प्रकारें नशिबाच्या चाळणींतून गाळून निघाल्यावर जो निभावला (survival of the fittest) तो गुलाम. मुसल-मानांच्या वृद्धीस ही संस्था आशियाखंडांत फारच उपयोगी पडली; आणि अफगाण सुलतानांस तर तिजपासून चांगलाच फायदा झाला. महंमदघोरीचे चार मुख्य सरदार ह्या गुलामांतून पुढें आले : अफगा-णिस्तानांत एल्डोझ, सिंधप्रांतांत कुबाचा, बंगाल्यांत बख्त्यार खिलजी, आणि दिल्लीस कुत्बुद्दीन. आरंभीं गुलामांतून वर आले, म्हणून त्यांचें कुळ नेहमींच हीन असें नाहीं. सारांश, गुलामगिरीच्या पेशाला, पाश्चात्य लोकांत जो निंद्य अर्थ आहे, तो पूर्वेकडच्या ह्या मुसलमानीं अमदानींत नव्हता, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

---

# प्रकरण आठवें.

## खिलजी घराणें.

### स. १२८९–१३२०.

१. खिलजी लोकांची कुळी. २. जलालुद्दीन खिलजी, (स १२८९-९५.) ३. मुसलमानांचा दक्षिणेंत प्रथम प्रवेश. ४. अलाउद्दीनचें राज्यारोहण. ५. अलाउद्दीनचे पराक्रमः— (क) मोगलांच्या स्वाऱ्या. (ख) चितोड. (ग) गुजराथ. (घ) रतनभोर. (ङ) दक्षिणची दुसरी स्वारी. ६. दक्षिणहिंदुस्थानांतील राज्यें. ७. मलीक काफूरच्या स्वाऱ्या. ८. अलाउद्दीनचा मृत्यु व राज्यव्यवस्था. ९. अलाउद्दीनची करामत व योग्यता. १०. मुबारिक खिलजी, (स. १३१६-२०.) ११. खुस्रूचा विक्षिप्तपणा.

**१. खिलजी लोकांची कुळी.**—गुलामवंशाच्या अंमलांत राज्यांतील सर्व मोठमोठ्या जागा तुर्क लोकांनीं पटकाविल्या होत्या. तरी तुर्कांशिवाय दुसरेही कित्येक लोक इकडे आलेले होते. ते साधारणतः अफगाण किंवा पठाण ह्या नांवाखालीं मोडतात. पुढें जसे मोगल प्रसिद्धीस आले, तसेच हे पठाणही ह्या वेळीं प्रसिद्धीस आले. वायव्येकडील डोंगराळ प्रदेशांतून आलेले गौरवर्ण लोक, इतकाच वास्तविक पठाण शब्दाचा अर्थ आहे. खिलजी हें पठाणच होत. अफगाणिस्तानांत खल्ज् नांवाचें एक ठिकाण आहे, तेथचे हे मूळचे राहणारे म्हणून त्यांस खिलजी हें नांव प्राप्त झालें. हे बहुतकरून लुटालूट करीत फिरत, अथवा कोणी चाकरीस ठेविल्यास त्याजवळ राहत. ह्या जातीचे पुष्कळ लोक बल्बनच्या फौजेंत नोकर होते. पूर्वीं हे तुर्कस्तानांत राहणारे असून अलीकडे ते हिंदुस्थानच्या सरहद्दीवर येऊन राहिले. त्यांपैकीं कित्येक लोक गझनीच्या सुलतानाचे नोकरींत असत. मलीक म्हणून एक खिलजी सरदार स्वपराक्रमानें बल्बनच्या नोकरींत मोठ्या प्रसिद्धीस आला. त्यास समाराप्रांताची सुभेदारी मिळाली. त्याचा मुलगा जलालुद्दीन फिरोज. त्यांचें व तुर्कांचें हाडवैर असे. खिलजींनींच प्रथम बंगालप्रांत जिंकून तेथील कारभार केला. जलालुद्दीन फिरोज नांवाचा त्यांचा एक सरदार होता, त्याच्या हाताखालीं ते गुलामवंशाचे अखेरीस शिरजोर झाले. कैकुबादचा वजीर निजामुद्दीन हा तुर्क होता, आणि तुर्कांच्या जाचास लोक त्रासले होते, म्हणून जलालुद्दीन ह्यासच त्यांनीं मदत केली. कैकुबाद आजारी असतां ह्या जबरदस्त उमरावानें आपलें प्रस्थ अतोनात वाढविलें, तें इतकें कीं सन १२८९त त्यानें दिल्लीची बादशाही सुद्धां बळकाविली. त्या वेळीं त्याचें वय सत्तर वर्षांचें होतें. खिलजी वंशाकडे हें जें दिल्लीचें तख्त गेलें तें तीस वर्षें त्याजकडे चाललें. ह्या तीस वर्षांत लहानमोठे सहा राजे झाले, पण त्यांत एकाचें नांव विशेष प्रमुख आहे. तो अला-उद्दीन होय. त्यानें वीस वर्षें कारभार करून बहुतेक सर्व देश आपल्या ताब्यांत आणिला.

**२. जलालुद्दीन खिलजी, (स. १२८९–१२९५).**—जलालुद्दीननें रक्तपात करून तख्त मिळविलें होतें, तरी लागलीच सात्त्विक वृत्ति धारण केली. एवढ्या मोठ्या अधिकारास आपण लायक नाहीं असें तो दाखवी. तख्तावर बसण्याचें सोडून दरबारांतील आपल्या जागीं तो उभा राही.

तसेंच तो लोकांवर दया व परोपकार करूं लागला. पूर्वीच्या दोस्तांशीं तो फार ममतेनें व निष्कपटपणानें वागे. चतुर, धैर्यवान व शहाणे अशा लोकांवर तो विशेष मेहेरबानी ठेवी. मोटमोठीं कडक शासनें त्यानें कधीं कोणास केलीं नाहींत. तेव्हां बंडखोर व लुटारू लोकांचें चांगलें फावलें. अशा लोकांस फार तर तो हद्दपार करी, पण तेवढ्यानें भागत नसे. खिलजी लोकांस त्याचा हा अतिसौम्य स्वभाव आवडत नसे. त्याची सौम्य वृत्ति पाहून बंडखोर लोकांस चांगलें फावलें. फारशी ग्रंथकार जलालुद्दीनच्या शांत वृत्तीचें फार वर्णन करितात. आशियाखंडांतील पुष्कळ विद्वान् लोकांस, कवींस व गवयांस त्यानें चांगला आश्रय दिला. सिद्दीमौला नामक दरवेशानें सुलतानास मारण्याचा बेत केल्यावरून त्यास त्यानें फाशीं दिलें. त्या वेळीं दरवेशानें मरतांना त्या सुलतानास शाप दिले, ते त्यास बरेच लागले. सन १२९१त सर्व देशभर मोठा दुष्काळ पडला, त्यांत हजारों लोक प्राणांस मुकले. त्याच वर्षी जलालुद्दीनचा मुलगा खानखानान हा मरण पावला. त्यानंतर बंडखोरांचा बंदोदस्त करण्याचें त्यानें कांहींसें मनावर घेतलें. माळव्यांत बंड झालें तें मोडण्यास तो स्वतः गेला, आणि दोन स्वाऱ्या करून माळवा प्रांतांत त्यानें स्वस्थता केली. सन १२९२त एक लाख मोगल स्वारांनीं पंजाबावर स्वारी केली. जलालुद्दीन स्वतः त्यांजबरोबर लढण्यास गेला. पांच दिवस दोनही फौजांचा तळ समोरासमोर होता. सहावे दिवशीं तुंबळ युद्ध होऊन मोगलांचा पराजय झाला. तरी उभयतांमध्यें लवकरच स्नेहभाव जुळून आला. नजरनजराणे देऊन त्यांना स्वस्थपणें परत जाण्याची जलालुद्दीननें परवानगी दिली. ह्या वेळीं उक्तायखान नामक चंगीझखानाच्या एका नातवानें जलालुद्दीनच्या मुलीशीं लग्न करून आपल्या तीनहजार लोकांस दिल्लीस ठेवून दिलें. त्यांस राहण्याकरितां दिल्ली शहरच्या वेशीजवळ जलालुद्दीननें एक जागा नेमून दिली, ती मोगलपुरा म्हणून अद्यापि प्रसिद्ध आहे. हे तीन हजार लोक लवकरच मुसलमान झाले. सर्व मोगलांनीं मुसलमान धर्म हा वेळपर्यंत स्वीकारिला नव्हता, पण मुसलमानांच्या सहवासानें त्यांनीं हळू हळू तो धर्म स्वीकारिला.

पूर्वी जलालुद्दिन फिरोज राज्यावर बसतांच त्यानें आपल्याजवळ आपला भाऊ शहाबुद्दीन मस्-उद ह्याचे दोन मुलगे जवळ बाळगिले होते. एकाचें नांव अला-उद्दीन व दुसऱ्याचें नांव आल्वसबेग. अलाउद्दीननें

मोगलांस हटविलें, म्हणून त्यास सुलतानानें गंगा व यमुना या नद्यांमधील अंतर्वेदी प्रांतांत कुरा म्हणून सुभा आहे त्याजवर सुभेदार नेमिलें. कुरा हें शहर अलाहाबादच्या वायव्येस चाळीस मैलांवर असून हल्लीं अगदीं मोडकळीस आलें आहे. सन १२९३त अलाउद्दीननें माळव्याच्या स्वारींत चांगला पराक्रम केला. भिलसा वगैरे कित्येक ठिकाणचे हिंदु लोकांस त्यानें जिंकिलें, म्हणून जलालुद्दीननें अयोध्येचा सुभाही त्यास दिला. येणेंप्रमाणें अला-उद्दीनचें वजन दरबारीं फार वाढत चाललें. अला-उद्दीन हा फार हुशार व खटपटी होता. तो मनांत आलेली गोष्ट केल्याशिवाय राहत नसे. माळव्यांत त्यानें पुष्कळ किल्ले व लूट मिळविली, म्हणून त्याला मोठी फौज बाळगितां आली.

३. **मुसलमानांचा दक्षिणेंत प्रथम प्रवेश.**—मुसलमान लोक हिंदुस्थानांत येऊन तीनशें वर्षें झालीं. एवढ्या अवधींत त्यांनीं उत्तरहिंदुस्थान काबीज केलें. दक्षिणहिंदुस्थानकडे त्यांची दृष्टि हा वेळपर्यंत गेली नाहीं. जलालुद्दीनच्या कारकिर्दींत मुसलमान लोकांनीं दक्षिणेंत प्रथम प्रवेश केला. ही गोष्ट चांगली लक्षांत ठेवण्याजोगी आहे. ह्या स्वारीची हकीकत महाराष्ट्रदेशाच्या प्राचीन इतिहासांतही येणारी आहे. भिलसा येथें असतांना अला-उद्दीन ह्यास दक्षिणेंत देवगड किंवा देवगिरी नामक एका धनाढ्य शहराची खबर कळून त्याच्या तोंडास पाणी सुटलें, आणि चुलत्याजवळ दक्षिणेंत जाण्याची त्यानें परवानगी मागितली. हें काम मोठें दुर्घट होतें. महाराष्ट्रदेश नर्मदेच्या दक्षिणेस. कुरा शहराहून देवगड ७०० मैल दूर; दिल्लीहूनही तितकेंच लांब; देवगडास जाण्याचा रस्ता बिकट जंगलांतून व अपरिचित मुलखांतून होता. नानाप्रकारच्या भयंकर लोकांची रस्त्यांत वस्ती होती. ते अला-उद्दिनास दाणावैरण मिळूं द्यावयाचे नाहींत; त्याच्या फौजेवर छापा घालून एकदम कापून काढणार; अशा प्रसंगीं सुटून जाण्यास मार्ग नाहीं. पण हिंदु लोकांची अला-उद्दिनास चांगली माहिती होती. ते सात्त्विक आहेत; धर्मयुद्धाचे नियम मोडीत नाहींत; वर्दी दिल्याशिवाय संग्राम करीत नाहींत; त्यांच्या वाटेस न जाणाऱ्यांस विनाकारण ते त्रास देत नाहींत. म्हणून स्वारांचा निकट जमाव करून व कांहीं तरी खोटी बात झोंकून देऊन, ह्या लोकांस चुकवितां येईल, अशी अला-उद्दीनची खात्री होती. त्यानें आपला खरा

घेत चुलत्यास किंवा दुसऱ्या कोणासही कळविलां नाहीं. आठ हजार स्वार घेऊन तो सन १२९३त कुराहून निघाला; आणि बुंदेलखंडाच्या जंगलांतून थेट दक्षिणेस चालला. सहा महिनेपर्यंत त्याचा मागमूस पाठीमागें कोणासही कळला नाहीं. 'मी दिल्लीचा सुलतान जलालुद्दीन ह्याचा पुतण्या आहें. चुलत्याबरोबर भांडून मी नोकरी पत्करण्याकरितां तेलंगणच्या राजाकडे राजमहेंद्रीस चाललों आहें,' असें सांगत तो चालला. त्यास कोणींच कोठें अडथळा केला नाहीं; किंवा तो सांगतो तें खरें कीं खोटें ह्याची काडीभर सुद्धां कोणीं चौकशी केली नाहीं. विंध्याद्रि उतरून अला-उद्दीन नर्मदा पार झाला, आणि देवगडच्या तटाखालीं एकदम येऊन उतरला.

देवगडासच पुढें दौलताबाद हें नांव मिळालें. हिंदुस्थानच्या इतिहासांत हें ठिकाण मोठ्या महत्त्वाचें आहे.त्याचें कारण पुढें हळू हळू समजेल. रामदेवराव जाधव नांवाचा मराठा राजा देवगड येथें राज्य करीत होता. रामदेवरावाचें विशेष वर्णन मराठ्यांचे इतिहासांत आलें आहे तें पहावें. अला-द्दीन येत आहे ह्याची त्याला वार्ता सुद्धां कळली नव्हती. शहराबाहेर देवदर्शनास गेला असतां त्यास अला-उद्दीन आल्याची बातमी लागली, तेव्हां तो एकदम मोठ्या काळजींत पडला. त्याची लढाईची तयारी नव्हती, फौज दुसरीकडे गेली होती, म्हणून शहरवासी लोकांतून व नोकरचाकरांतून कांहीं माणसें जमवून तो अला-उद्दीनवर चालून गेला. बराच वेळ त्याच्या लोकांनीं टिकाव धरिला. तथापि शेवटीं पराभव पावून तो किल्ल्याचे आश्रयास गेला. हल्लीं दौलताबादच्या किल्ल्यास मोठा खंदक आहे तो तेव्हां नव्हता. अला-उद्दीननें किल्ल्यास वेढा दिला आणि इकडे शहरांत शिरून लुटालूट आरंभिली. लोकांनीं आपल्या गुप्त ठेवी दाखवाव्या, म्हणून त्यांवर नानातऱ्हेचा त्यानें जुलूम केला, तरी किल्ला हस्तगत होईना. तेव्हां अला-उद्दीननें असें कळविलें, कीं 'मी फक्त लहानशी फौज घेऊन पुढें आलों आहे. बादशहाची मोठी फौज मागाहून येत आहे.' हें ऐकून रामदेवरावाची पांचावर धारण बसली. किल्ल्यांत सामुग्री भरितांना धान्याच्या ऐवजीं मिठाचीं पोतीं भरलीं गेलीं होतीं. धान्य संपलें, तेव्हां त्यानें घाबरून एकदम पुष्कळ द्रव्य देऊन अला-उद्दीनशीं तह केला. त्यास तरी हेंच पाहिजे होतें. कारण रामदेव-

रावांची मुख्य फौज परत आल्यावर तिजपुढें त्याचा टिकाव लागला नसता. तह होऊन अला-उद्दीन परत निघणार, इतक्यांत रामदेवरावाचा मुलगा शंकरदेव मोठी फौज जमवून बाहेरून आला. रामदेवरावानें त्यास निरोप पाठविला, कीं 'अला-उद्दीनशीं तह झाला आहे; तर तुम्ही लढाई करूं नये.' हें शंकरदेवानें मानिलें नाहीं. त्यानें अल्ला-उद्दिनास पत्र पाठवून कळविलें, कीं 'तुम्हाला जिवाची आशा असेल व सुखानें परत जाणें पाहिजे असेल, तर माझ्या राज्यांतून जें काय हरण केलें आहे, तें सर्व परत द्या, व जीव बचावला म्हणून संतोष मानीत परत जा.' या पत्रानें मुसलमानांचें पित्त खवळलें. त्यांनीं पत्र आणणाऱ्या जासुदाचे तोंडास काजळ फांसून हुसकून दिलें.

अल्ला-उद्दीन लगेच लढाईच्या तोंडावर गेला. एकहजार स्वार देऊन त्यानें मलीक नुसत ह्यास वेढा घालण्यास पाठविलें. त्या प्रसंगीं शंकर-देवानें विलक्षण पराक्रम दाखविला. मुसलमानांचा समूळ नाश होण्याची वेळ आली, इतक्यांत किल्ल्याचे रक्षणास ठेविलेला रामदेवाचा सरदार आपले थोडे लोक बरोबर घेऊन जरूर नसतां लढाईस आला. त्यांच्या पायांनीं उडालेली धूळ दुरून पाहून हिंदु लोकांस वाटलें, कीं दिल्लीहून अला-उद्दीनचे मदतीस जी मोठी फौज येणार होती ती हीच होय. आतां आपला निभाव नाहीं. या खोट्या भीतीनें भेदरल्यामुळें ते रणांगण सोडून सैरावैरां पळूं लागले. त्याबरोबर मुसलमानांस जय मिळाला. विजय संपादून अला-उद्दीन किल्ल्याकडे गेला. तेथें धान्या-ऐवजीं मिटाचीं पोतीं किल्ल्यांत गेलीं हें त्यास समजलें. तेव्हां देव-गिरीकर रामदेवास दुसरा कांहींच उपाय न राहून इलिचपुर व आस-पासचे प्रांत आणि अपरंपार द्रव्य अला-उद्दिनास देऊन, त्यानें कसाबसा आपला बचाव करून घेतला. अशा प्रकारें विजय संपादून अला-उद्दीन कुरा येथें परत आला. युद्धांत विजय किंवा पराजय होणें केवळ यदृच्छा-धीन आहे, असें जे अनेक युद्धविशारद सांगतात, त्याचा प्रत्यय वरील देवगडच्या लढाईनें चांगला येतो. हिंदुस्थानच्या इतिहासांत ह्या प्रकाराची पुनरावृत्ति वारंवार झालेली दिसून येते.

४. **अला-उद्दीनचें राज्यारोहण.**—जलालुद्दीनच्या पुळपुळीत कार-भारानें कोणाचेंच समाधान झालें नाहीं. आपल्यावर कोणी राजा आहे

असें पदोपदीं लोकांस वाटलें नाहीं, तर तो राजा काय कामाचा, असें त्यांस होऊन जातें. तत्त्वज्ञानाच्या गहन विचारांत निमग्न असलेल्या राजास फारसे कोणी अनुयायी मिळत नाहींत. तीच स्थिति जलालुद्दीनची झाली. लोकांचें लक्ष अला-उद्दीनकडे लागलें होतें. त्यास जलालुद्दीनची मुलगी दिलेली होती. अला-उद्दीन दक्षिणेंत गेल्यापासून त्याचें तिकडे काय झालें हें न समजल्यामुळें, मागें चुलत्यास फार काळजी लागली होती. पण अपार द्रव्य व कीर्ति मिळवून तो परत येत आहे असें जेव्हां त्यास समजलें, तेव्हां त्याचा आनंद गगनांत मावेना. कित्येक दूरदर्शी लोकांस अलाउद्दीनचा कावा ठाऊक होता. त्यांनीं व जलालची बायको मलीकी-जहान इनें त्यास पुष्कळ सांगितलें, कीं अलाउद्दीनचा हेतु शुद्ध नाहीं; तो कोणच्या वेळेस काय नुकसान किंवा घात करील याचा नेम नाहीं; तर आपण सावध असावें. पण जलालुद्दीन ह्यास ती गोष्ट खरी वाटेना. इतक्यांत अला-उद्दीनचें त्यास एक दक्षिणेंतून पत्र गेलें. तें अत्यंत नम्रतेच्या व शुद्ध हेतूच्या शब्दांनीं भरलेलें होतें. तें पत्र दाखवून जलालुद्दीननें सर्व लोकांच्या संशयाचें निवारण केलें. भोळ्या जलालुद्दिनास ह्या कपटपटु अला-उद्दीनचा उद्देश कसा समजणार? इ० सन १२९५त आपल्या पुतण्यास भेटण्यासाठीं बादशहा थोड्या फौजेनिशीं कुरा येथें गेला. पुढें अला-उद्दीनची व त्याची भेट झाली, तेव्हां अला-उद्दीन चुलत्याच्या पायां पडला. त्या समयीं तो सात्विक व वृद्ध जलालुद्दीन प्रेमानें त्याच्या गालांवरून हात फिरवीत आहे, आणि 'मीं तुला लहान-पणापासून वाढवून आपल्या मुलांपेक्षां तुजवर विशेष प्रीति ठेविली, असें असून तूं माझा विश्वास धरिला नाहींस?' असा त्यास रागें भरत आहे, इतक्यांत लपवून ठेविलेल्या मारेकऱ्यांस अलाउद्दीनची खूण होतांच, त्यांनीं तत्क्षणीं पुढें येऊन सुलतानाच्या पोटांत तलवारी खुप-सून त्याचीं आंतडीं बाहेर काढिलीं. त्या वेळीं 'अरे दुष्टा अलाउद्दिना'! असें म्हणून जलालुद्दीननें प्राण सोडिला. त्याचें शीर भाल्यावर टोंचून अलाउद्दीननें लष्करांत व सर्व शहरांत फिरविलें. ज्या दुष्ट मारेकऱ्यानें हें काम केलें तो पुढें वेड लागून मृत्यु पावला. ह्या घातकी कृत्यांत ज्यांनीं अला-उद्दिनास साहाय्य केलें होतें, त्यांची त्यानें कशी दुर्दशा केली, त्याचें वर्णन फेरिस्ता मोठ्या कौतुकानें करितो. दुष्टांस शासन

झालेलें पाहून समाधान वाटणें साहाजिक आहे; पण प्रत्यक्ष विश्वास-घात करून चुलत्याचा वध करविणारा जो अला-उद्दीन त्याची मरेपर्यंत अखंड भरभराटच होत गेली, हें पाहून इहलोकच्या न्यायन्यायाबद्दल मन बुचकळ्यांत पडतें ह्यांत संशय नाहीं.

जलालुद्दीन मरण पावल्याची बातमी दिल्लीस पोंचतांच, त्याच्या राणीनें आपला अल्पवयी मुलगा रुक्नुद्दीन ह्यास इब्राहिम नांवानें तख्ता-वर स्थापन करून त्याच्या तर्फेनें राज्य चालविलें. जलालुद्दीनचा मोठा मुलगा अर्कलीखान राज्याचे लायक असून मुलतानचे सुभ्यावर नेमिलेला होता. राज्यावर खरा हक्क त्याचा होता; पण संकटावह राज्यकारभाराच्या भानगडींत पडणें त्यास न आवडून तो स्वस्थ राहिला. जला-लुद्दिनास मारतेवेळीं दिल्लीचें राज्य आपणास मिळेल अशी अल्लाउद्दीनची खात्री नसल्यामुळें, एक स्वतंत्रच राज्य स्थापण्याचा त्याचा विचार होता; पण दिल्लीची बातमी ऐकतांच त्यास ज्यास्त हुरूप आली. पावसाळा असतांही तो एकदम कूच करून राजधानीकडे गेला. रस्त्यांत दर-मुक्कामीं त्यानें मोहरा उकळण्याचा सपाटा चालविला. सरदार व फौजें-तले अंमलदार कांकूं करीत होते, त्यांस त्यानें पैसे भरून वश केलें. येणेप्रमाणें छपन्न हजार स्वार व साठ हजार पायदळ एवढी फौज त्याजजवळ जमली. देवगडच्या लुटींत मिळविलेल्या द्रव्याचा ह्या राज्यप्राप्तीच्या कामीं अलाउद्दिनास फारच उपयोग झाला. अला-उद्दीन येत आहे हें ऐकतांच राणी मुलास घेऊन मुलतानास पळून गेली. पुढें सन १२९६ च्या अखेरीस अला-उद्दिनास दिल्लीचें तख्त बिनहरकत प्राप्त झालें. लोकांचीं मनें संतुष्ट करण्याकरितां त्यानें मोठमोठे समारंभ करून लोकांस मेज-वान्या दिल्या. तसेंच लहानथोरांस इनामें व बक्षिसें देऊन राज्यापहरणाचें पाप लोकांच्या मनांतून नाहींसें करण्याची त्यानें खटपट केली. फौजेस सहा महिन्यांचा पगार एकदम आगाऊ दिला. अशा प्रकारें स्थीरस्थावर केल्यावर तो राज्याच्या इतर हक्कदारांस दूर करण्याच्या विचारास लागला. आलफखान म्हणून अला-उद्दीनचा एक दूधभाऊ होता, त्यास त्यानें जलालुद्दीनच्या मुलास पकडण्यासाठीं मुलतानास पाठविलें. मुलतानच्या लोकांनीं स्वतःवरचें संकट टाळण्याकरितां दोघां राजपुत्रांस आलफखानाचे स्वाधीन केलें; आणि त्यांच्या जिवास अपाय करणार नाहीं असें त्यांजपासून

वचन घेतलें. हें वचन आलफखानानें कितपत पाळिलें असेल हें सांगणें नकोच. आलफखान परत जात असतां त्यास बादशहाचा हुकूम आला, कीं त्या राजपुत्रांचे डोळे काढावे. त्याप्रमाणें त्यांस अंध करून त्यानें हंसीच्या किल्ल्यांत बंदींत ठेविलें. तेथें त्या दुर्दैवी राजपुत्रांचा लवकरच अंत झाला.

राजहत्या व राज्यापहरण ह्या गोष्टी हिंदुस्थानच्या इतिहासांत अनेक वेळां केवळ नेहमींच्या इतर व्यवहारांप्रमाणें घडून आल्या आहेत. प्रत्यक्ष राजदरबारच्या मंडळीशिवाय इतरांचें तिकडे लक्ष जात नसे, ही मोठ्या आश्चर्याची गोष्ट होय. स. १७८९ त फ्रान्सदेशांत जी मोटी राज्यक्रान्ति घडून आली, तींत सर्व नागरिकांचा संबंध असून तिनें सर्व देश हलून गेला. हिंदुस्थानांत अनेक राज्यक्रान्ती घडल्याचें येथपावेतों वर्णन आलें असून पुढेंही येईल. परंतु लोकांस त्यांजबद्दल मुळींच पर्वा वाटली नाहीं. राजवाड्यांतील बारीकसारीक गोष्टी व घोटाळे यांबद्दल लोक घरोघर कुजबुजतात, आणि पाहिजे त्या आफवांवर त्यांचा भरंवसा बसतो. एखादा पराभूत झालेला हक्कदार राज्य परत मिळविण्यास आला असतां, बक्षिसाच्या आशेनें त्यास कित्येक लोक मिळतात. पण तशी लालूच नसली म्हणजे कोण आला व कोण गेला याची कोणी पर्वाच करीत नाहीं. नवीन राजानें मेजवान्या वगैरे दिल्या, म्हणजे तो कसाही दुष्ट, कपटी व अनाचारी असला, तरी त्याजवर लोक खुष होतात. नवीन राजाच्या मतलबी व वरपांगी थाटास भुलून परकी असतांही त्याजबद्दल त्यांस अभिमान वाटूं लागतो. त्याच्या वर्तणुकीचा किंवा दुष्ट कृत्यांचा कांहीं एक विचार न करितां त्याची कड घेऊन ते त्याचे धन्यवाद गातात. ईश्वराच्या इच्छेनुरूप सर्व गोष्टी घडावयाच्या अशी त्यांची समजूत होते. सारांश, स्वराज्याचा अभिमान एकदां नष्ट झाला म्हणजे असे प्रकार व्हावयाचेच. राजा, राज्य, स्वातंत्र्य इत्यादि कशाचीच त्यांना पर्वा वाटेनाशी होणें साहजिक आहे.

५. **अल्लाउद्दीनचे पराक्रम.**—राज्यावर येतांच अला-उद्दीननें प्रथम लांचखाऊ अंमलदारांची पुरी खोड मोडिली. ज्यांस त्यानें पैसे भरून वश केलें होतें, त्यांच्या कृतघ्नपणाबद्दल त्यांस त्यानें चांगलें शासन केलें. कित्यकांस ठार मारिलें; व कित्येकांचे डोळे काढून बंदींत टाकिलें. त्यांची सर्व संपत्ति घरेंदारें व वतन हरण करून सरकारांत घेतलीं; आणि त्यांचीं पथकें मोडून त्यांतील लोकांस निर-

निराळ्या ठिकाणीं नोकऱ्या दिल्या. फक्त तीनच अंमलदार असे होते, कीं त्यांनीं अला-उद्दीनच्या लांचास न जुमानून आपल्या धन्यास ( जलालुद्दीन ह्यास ) सोडिलें नव्हतें. त्यांस मात्र अला-उद्दीननें कांहीं एक त्रास दिला नाहीं.

आरंभींच्या मुसलमान सुलतानांत अल्लाउद्दीन खिलजी हा फार नामांकित व पराक्रमी असा मानिला जातो. ह्याची कारकीर्द हिंदुस्थानच्या इतिहासांत अनेक कारणांनीं विशेष स्मरणीय आहे. त्यास लिहितां वाचतां येत नव्हतें, तरी फौजेची व्यवस्था नीट ठेवून विजय कसे मिळवावे हें त्यास चांगलें कळत होतें. त्यानें मुसलमानांचा अंमल ह्या देशांत फार विस्तृत व चिरस्थायी केला. कुलीन हिंदु राजस्त्रियांना त्यानें मुसलमानी गोषांत ओढून आणिलें. तसेंच दक्षिणेंतील हिंदु राज्यांचा विध्वंस करून दक्षिणेस रामेश्वरापर्यंत मुसलमानी चांदास मिरवीत नेलें. ती हकीगत पुढें येईल. झियाउद्दीन बराणी नांवाचा एक गृहस्थ अला-उद्दीनच्या

पदरीं होता. त्याचा बाप व चुलता सुलतानांच्या नोकरींत होते. बराणीनें ह्या कार्किर्दीचा इतिहास लिहिलेला आहे, तो जरी सर्वथैव भरंवसे लायक नसला, तरी त्याजवरून अला-उद्दीनच्या कार्किर्दीवर चांगला प्रकाश पडतो.

( क ) **मोगलांच्या स्वाऱ्या.**—मध्यंतरीं ह्या देशावर मोगलांच्या स्वाऱ्या वारंवार होऊं लागल्या. विशेषतः स. १२९५ पासून १३०५ पर्यंत त्यांच्या टोळधाडी एकसारख्या येत होत्या. सन १२९६त मध्यतुर्कस्तानचा बादशहा, चंगीझखानाचा वंशज, अमीर दाऊद ह्यानें एकलाख लोकांनिशीं सिंध व पंजाब प्रांतांवर स्वारी केली. त्याजवर अला-उद्दीननें आलफखानास पाठविलें. तेव्हां लाहोरनजीक युद्ध होऊन मोगलांचा मोड झाला. मोगलांचीं पुष्कळ बायकामुलें आलफच्या हातांत सांपडलीं, त्या सर्वांचा त्यानें शिरच्छेद केला.

पुनः दोन वर्षांनीं दाऊदचा मुलगा कुत्लघखान ह्यानें दोन लाख मोगल स्वार घेऊन हिंदुस्थानांत प्रवेश केला. त्या वेळीं सर्व हिंदुस्थान देश जिंकण्याचा त्याचा विचार होता. मोगल फौज थेट दिल्लीनजीक येऊन यमुनेच्या कांठीं तळ देऊन राहिली. त्या प्रांतांतील अला-उद्दीनचा सुभेदार जाफरखान म्हणून होता. नुसतें सैन्य पाहूनच तो मागें हटत

चालला. मोगलांच्या त्रासास भिऊन बाहेरचे सर्व रयतलोक दिल्ली शह-रांत घुसले. सर्व रस्ते लोकांनीं इतके गच्च भरून गेले, कीं दिल्लींत बाहे-रचा दाणादुणा येण्याचें बंद झाल्यामुळें धान्याची अत्यंत महर्गता झाली. सर्व लोकांची पांचांवर धारण बसली. दरबारचे लोकही भिऊन जाऊन ते लढाई करण्याची अल्लाउद्दिनास सल्ला देईनात. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं आपण हातपाय गाळिले तर आपली पत काय राहणार व राज्य कसें टिकणार असा विचार करून नशिबावर हवाला देऊन स्वतः अला-उद्दीन आपली तीन लाख फौज घेऊन मोगलांवर गेला. अलीकडच्या बऱ्याच दिवसांत एवढीं दोन सैन्यें समरांगणीं सज्ज झालीं नव्हती. जाफरखान व आलफखान हे दोन अला-उद्दिनचे सरदार होते. त्यांस दोन बाजूंस ठेवून मध्यभागीं स्वतः अल्लाउद्दीन आपला वजीर नुस्रतखान ह्यास घेऊन लढाईस उभा राहिला. सर्वांच्या पुढें निवडक हत्तींची रांग लाविली होती. सुरवातीसच जाफरखानानें निकराचा हल्ला करून मोगलांस मागें हट-विलें, आणि एकटाच त्यांचा पाठलाग करीत दूरपर्यंत गेला. लगेच सुलतानानें आलफखानास त्याचे मदतीस जाण्याचा हुकूम केला. पण ह्या दोघां सरदारांमध्यें मत्सरभाव असल्यामुळें आलफखान जाफरखानाचे मदतीस गेला नाहीं. इकडे मोगलांनीं जाफरखानास वेढून सर्वांची कत्तल केली. त्यास जिवंत पकडण्याची मोगलांची इच्छा होती, पण तो शूर सरदार त्यांच्या स्वाधीन होण्याचें नाकबूल करून समरांगणीं लढून पतन पावला. तथापि अला-उद्दीनची बाकीची फौज तयारींत होतीच. तिजपुढें आपलें कांहीं चालत नाहींसें पाहून मोगल लोक जीव घेऊन हिंदुस्थान सोडून पळून गेले.

सन १३०३ सालीं अला-उद्दीन चितोड घेण्यामध्यें गुंतला असतां, मोगलसरदार तुर्घायखान यानें पुनरपि हिंदुस्थानावर स्वारी केली. ह्या प्रसंगीं अलाउद्दीनची फौज जवळ नसल्यामुळें दिल्ली शहर मोगलांचे अगदीं ताब्यांत जाण्याचा योग आला होता. पण कांहीं दैविक चमत्कार होऊन मोगलांची गाळण उडाली, आणि पहिल्याप्रमाणेंच ते एकाएकीं हिंदुस्थान सोडून निघून गेले.

दिल्लीस मुसलमानांचें राज्य कायमचें स्थापन झाल्यापासून, मध्य-आशियांतून अनेक परकी लोकांच्या झुंडीच्या झुंडी येऊन दिल्लीस राहू

लागल्या. अशा लोकांकरितां मोगलपुरा नांवाचा एक नवीन भाग तेथें बसला, हें मागें सांगितलेंच आहे. त्यांत नुसते मोगलच होते असें नाहीं. दिल्लीस आल्यावर हे परके लोक दरबारचें अनुकरण करण्यासाठीं मुसलमानी धर्म स्वीकारीत. तेव्हां त्यांस ' नवे मुसलमान, ' असें नांव मिळत गेलें. तथापि धर्मांतरामुळें त्यांची स्थिति सुधारली असें नाहीं. एकदां त्यांच्यांत फितवा झाल्याचें उघडकीस आल्याबरोबर अलाउद्दीननें एका दिवसांत तीस चाळीस हजारांची कत्तल केली, आणि त्यांच्या बायकापोरांस देशोधडीस पाठविलें. बायकामुलांशीं असलें क्रूर वर्तन पाहण्याचा हिंदुस्थानांतील लोकांस हा पहिलाच प्रसंग.

सन १३०५त ऐबकखान नामक सरदाराच्या हाताखालीं मोगली फौज पुनरपि हिंदुस्थानांत उतरली. मुलतान उद्ध्वस्त करून ते शिवालिक पहाडावर आले. गाजीबेग तुघ्लख नामक सरदार अलाउद्दीननें दिल्लीच्या पश्चिमेस बंदोबस्तास ठेविला होता. त्यानें दुसऱ्याच रस्त्यानें मोगलांच्या पाठीवर एकदम हल्ला करून पुष्कळांची कत्तल केली. बाकीचे

वाळवंटांत पळून गेले. भर उन्हाळा असल्यामुळें तिकडेही त्या बिचाऱ्यांचा संहारच झाला. पुष्कळ लोकांस पकडून दिल्लीस नेऊन हत्तीच्या पायांखालीं तुडविलें; आणि त्यांच्या शिराचा एक मोठा मनोरा बुदाऊन गेटाच्या बाहेर उभारिला. पुनः एकवार ह्या कारकीर्दींत मोगलांची अशीच दशा झाल्यामुळें त्यांचा धीर इतका खचला, कीं पुढें पुष्कळ दिवसपर्यंत ते हिंदुस्थानांत पाय ठेवण्यास धजले नाहींत. आणि दिल्लीच्या लोकांची मोगलांची दहशत पार नाहींशी झाली. इकडे गाजीबेग तुघ्लखनें हिंदुस्थानचे बाहेर त्यांच्या मुलखांवर स्वाऱ्या करून काबूल, गज्नी, कंदाहार वगैरे प्रांतांत सुद्धां त्यांस चैन पडूं दिलें नाहीं.

एखादा व्यवसाय हातीं घेतला म्हणजे त्याचा पिच्छा पुरविण्याची मुसलमानांची शिकस्त आहे. मोगल लोक एकसारखे हिंदुस्थानावर हल्ले करीत होते. अडीचशें वर्षेपर्यंत त्यांच्या प्रयत्नांस यश आलें नाहीं. तरी त्याच मोगल लोकांनीं पुढें परमैश्वर्ययुक्त व टोलेजंग बादशाही हिंदुस्थानांत स्थापन केली. महंमद कासीम, व सुलतान महंमूद ह्यांच्यासारख्या वीरांनीं हा देश जिंकण्याचे प्रयत्न सुरू केले, आणि शहाबुद्दीन घोरी व अलाउद्दीन खिलजी अशा पुरुषांनीं तें काम पुढें नेटानें चालविलें, तेव्हांच हिंदुस्थानचें

राज्य मुसलमानांच्या हस्तगत झालें. यूरोपची पूर्वरोमन बादशाही जिंकण्यांतही मुसलमानांनींच तीनशें वर्षें सतत प्रयत्न केला. ह्यावरून एकंदर मुसलमानांचा व विशेषतः मोगल लोकांचा चिकटपणा चांगला व्यक्त होतो.

(ख) चितोडगडची स्वारी, (स. १३०३–०४).—हल्लीं रजपुतान्यांत पुष्कळ रजपूत संस्थानें आहेत. त्यांत उदेपूर, जोधपूर व जयपूर हीं तीन आजमितीस प्रमुख आहेत. बिकानेर, किसनगड, जसलमीर, कोटा, बुंदी, शिरोही वगैरे आणखी पुष्कळ लहान राज्यें आहेत. ह्या सर्वांत उदेपूरचें घराणें मानानें श्रेष्ठ मानिलें जातें. जोधपूर व जयपूर येथील राजांनीं पुढें मोगल बादशहांशीं शरीरसंबंध केले, तसे उदेपूरच्या राजांनीं केले नाहींत, याजबद्दल त्या राजांस फार त्रास सोसावा लागला. उदेपूरचें राज्य ह्या तिहींत लहान असून त्यास मेवाडचें राज्य असें म्हणतात. त्याचा प्रदेश सर्व रजपुतान्यांत अत्यंत सुपीक आहे. ह्या राज्याचे पश्चिमेस आरवली पर्वताची रांग आहे. ह्या पर्वताचे पश्चिमेस जोधपूरचें राज्य आहे, त्यास मारवाडचें राज्य म्हणतात. ह्याचा बराच प्रदेश वालुकामय मैदानांचा आहे. मेवाडच्या उत्तरेस जयपूरचें राज्य असून तें उत्तरेस दिल्लीपर्यंत व दक्षिणेस मेवाडला लागलेलें होतें. मेवाडची पहिली राजधानी चितोडगड होती. सन १५६७ त ही राजधानी अकबर बादशहानें काबीज केल्यावर तेथील राजा उदयसिंग ह्यानें पश्चिमेस आरवली पर्वताचे पायथ्यास उदेपूर शहराची स्थापना केली. आपल्या घराण्याची उत्पत्ति सूर्यवंशापासून झाली आहे असें उदेपूरचे राणे मानितात. अद्यापिही उदेपूरचे राणे सुवर्णमय सूर्याचें राजचिन्ह धारण करितात. सूर्यवंशी राजे पूर्वी अयोध्येस राज्य करीत होते. कालांतरानें अयोध्याप्रांत त्यांजकडून जाऊन त्यांचें राज्य अजमिरास आलें. अखेरीस पृथ्वीराजाचे वेळेस दिल्ली व अजमीर हीं राज्यें एक होऊन तीं शहाबुद्दीन घोरीनें जिंकिलीं. तेव्हां त्यांच्या वंशजांनीं मेवाडांत चितोडगडास येऊन नवीन राज्यस्थापना केली. चितोडच्या राण्यांचें आडनांव घेलोट असें आहे.

शहाबुद्दीन घोरी निघून गेल्यावर सुमारें शंभरसवाशें वर्षेंपर्यंत चितोडच्या राण्यांस बरीच विश्रांति मिळाली. गुलामवंशी सुलतानांनीं त्यांस उपद्रव दिला नाहीं. पण अलाउद्दीनची सर्वव्यापी दृष्टी त्यांस फार दिवस

चुकवितां आली नाहीं. राणा लक्ष्मणसिंग चितोड येथें राज्य करीत होता. त्याचा चुलता भीमसिंग ह्यानें सिंहलद्वीपच्या रावाची रूपवती कन्या पद्मिनी आपली बायको केली होती. अलाउद्दीननें ह्या पद्मिनीच्या लोभानें चितोडगडावर स्वारी केली, आणि 'पद्मिनी माझ्या स्वाधीन करा' असा भीमसिंगास निरोप पाठवून त्यानें चितोडगडाला वेढा घातला. शहर हस्तगत होईना, तेव्हां 'एकवार पद्मिनीस पाहून मी परत जातों,' असें त्यानें बोलणें लाविलें. 'प्रत्यक्ष दर्शन तर नाहींच, परंतु आरसा ठेवून त्यांत तिचें प्रतिबिंब तुम्हांस दाखवूं,' असा त्यास भीमसिंगानें जबाब दिला. नंतर थोडया लोकांनिशीं अला-उद्दीन चितोडचे वाडयांत गेला. तेथें पद्मिनीचें रूप पाहून तो परत जात असतां भीमसिंग त्यास वाड्यांतून थोडासा बाहेर पोंचविण्यास गेला. ही संधि साधून अला-उद्दीननें त्यास कैद करून आपल्या छावणींत नेलें. पुढें 'पद्मिनी स्वाधीन केल्याशिवाय तुला सोडणार नाहीं,' असें अला-उद्दीननें भीमसिंगास सांगितलें. हें अनर्थाचें वर्तमान चितोड येथें समजल्यावर स्वतः पद्मिनीनें अला-उद्दिनास फसविण्याची एक चमत्कारिक युक्ति केली. 'मोठया लवाजम्यानिशीं आपणांस भेटण्यास मी येतें,' असें पद्मिनीनें अला-उद्दिनास सांगून पाठविलें. अला-उद्दीननें ती गोष्ट कबूल केल्यावर नेमल्या दिवशीं सातशें बुरख्याच्या पालख्या अला-उद्दीनचे गोटांत दाखल झाल्या. स्वतः पद्मिनी त्यांत नव्हतीच. दरएक पालखींत कोणास न कळत एक एक शूर शिपाई बसविलेला होता, आणि दरपालखीस सहा सहा शिपाई हत्यारें छपवून भोयांच्या वेषानें पालखी उचलावयास लाविलेले होते. पद्मिनी आली असें समजून अला-उद्दीननें तिला नवऱ्याच्या भेटीसाठीं अर्धा तास दिला. भीमसिंगास सोडूं नये असा अलाउद्दीनचा विचार होता. पण भीमसिंग एका रिकाम्या पालखींत बसून इतर दासींबरोबर किल्ल्यांत परत गेला. पुढें अलाउद्दीननें पद्मिनीच्या भेटीची घाई करितांच पालख्यांचे सर्व शिपाई एकदम बाहेर पडले आणि कापाकापी करूं लागले. अलाउद्दीन कांहीं बेफाम नव्हता. त्यानें त्या सर्वांची कत्तल केली. पुढें कांहीं दिवस निकराचें युद्ध होऊन अलाउद्दीनचें पुष्कळ नुकसान झालें. पुढें तिकडे दिल्लीवर मोगलांनीं हल्ला केला आहे असें ऐकतांच अलाउद्दीन वेढा उठवून परत गेला.

लगेच दुसऱ्या वर्षी म्हणजे सन १३०४त त्यानें चितोडावर पुनः स्वारी केली. ह्या प्रसंगीं रजपूत लोकांनीं लढण्याची कमाल केली. शेवटीं इलाज चालत नाहीं असें पाहून, आपल्या नेहमींच्या चालीप्रमाणें बायकांमुलांची अग्नींत आहुति देऊन, स्वतः समरांगणीं लढून त्यांनीं मरण पत्करिलें. कांहींनीं पळून जाऊन आरवलीच्या डोंगरांत अरण्यवास स्वीकारिला. तेव्हां अलाउद्दीननें चितोडगड काबीज केला, आणि तेथ मुसलमानी लष्कर जापत्यास ठेवून व झालोरच्या घराण्यांतील मालदेव नामक एका राजास जितोडचे गादीवर स्थापून, अलाउद्दीन दिलीस परत गेला.

आरवली पर्वतांत पळून गेलेल्या मंडळींत हमीर नांवाचा एक शूर राजपुत्र अलाउद्दीनचा सूड घेण्यासाठीं टपून बसला होता. तेथें पुष्कळ रजपूत लोक त्यास जाऊन मिळाले. मालदेवाची त्यानें गाळण उडवून दिली. तेव्हां हमीराशीं सख्य करण्याची मालदेवानें एक युक्ति योजिली. मालदेवास एक मुलगी होती. तिच्याशीं हमीरानें येऊन लग्न लावावें असा मालदेवानें त्यास निरोप पाठविला. त्याप्रमाणें लग्न झालें. नंतर आपल्या बायकोच्या मदतीनें हमिरानें चितोडगडचें राज्य मालदेवापासून परत मिळविलें, ( सन १३०४ ). तेव्हांपासून पुढें दोनअडीचशें वर्षें हमीरच्या वंशानें दिल्लीचे बादशहांस दाद न देतां मेवाडच्या राज्याची चांगली भरभराट केली.

( ग ) गुजराथचा पाडाव, ( सन १२९७ ).–अलाउद्दीननें गादीवर बसल्याबरोबर आलफखान व वझीर नुसतखान ह्यांस गुजराथप्रांत जिंकण्यास पाठविलें. गुजराथेंत अन्हिलवाडा येथें राजा कर्णराय राज्य करीत होता. मुसलमान फौज आल्याबरोबर तो पळून देवगडास राजा रामदेव याजकडे आश्रय मागण्यासाठीं गेला. मागें त्याचें राज्य व बायकामुलें मुसलमानांनीं काबीज केलीं. खंबायतप्रांत त्या वेळेस व्यापारामुळें फार सधन होता. तो नुसतखानानें येऊन लुटला. ह्या स्वारींत सोमनाथाचें देवालय मुसलमानांनीं पुनरपि लुटलें. महंमूद गज्नवीच्या स्वारीनंतर तेथें नवीन मूर्ति स्थापिली होती ती फोडून, तिचे तुकडे त्यांनीं दिल्लीस नेऊन मशिदींच्या पायऱ्यांस लाविले. नंतर आलफखान व नुसतखान परत जात असतां त्यांचें व लष्करांत नोकरीस असलेल्या मोगल लोकांचें

कडाख्याचें भांडण झालें. त्यांत मोगलांनीं हाच आलफखान असें समजून त्याचे पुतण्यास ठार मारिलें. पुढें हे दोघे सरदार दिल्लीस गेल्यावर बादशहानें बंडखोर मोगल लोकांची एकजात कत्तल उडविली. कर्णरायाची लावण्यवती स्त्री कमलादेवी मुसलमान सरदारांनीं पकडून दिल्लीस नेली. तिला बादशहानें आपली पट्टराणी केली, आणि तिजवर त्याची फारच मर्जी बसली.

**( घ ) रतनभोरचा पाडाव.**—अलाउद्दीन सुलतानास जसजसें यश येत गेलें, तसतशी त्याची महत्त्वाकांक्षा अनावर झाली. महंमद पैगंबराप्रमाणें आपणही नवीन धर्म स्थापन करावा, किंवा सिकंदर बादशहाप्रमाणें सर्व पृथ्वी काबीज करावी, अशी त्यास जबरदस्त इच्छा उत्पन्न झाली. दुसरा सिकंदर असें नांव धारण करून त्यानें आपल्या नांवाचें नाणें सुद्धां पाडिलें. रतनभोर नांवाचा एक मजबूत किल्ला जयपूरचे हद्दींत आहे, तो घेण्यासाठीं अलाउद्दीननें आलफखान व नुसतखान यांस सन १२९९त पाठविलें. तेथील राजा हंबीरदेव मोठी फौज घेऊन लढण्यास आला, आणि त्यानें मुसलमानांस मागें हटविलें. तेव्हां अलाउद्दीन स्वतः तो किल्ला घेण्यास आला. ह्या प्रसंगीं अलाउद्दीनचा पुतण्या रुक्नखान ह्यानें चुलत्यास एकटा गांठून त्याजवर बाण सोडिले, आणि तो मेला असें समजून गोटांत परत येऊन राज्यपद स्वीकारिलें. इतक्यांत अलाउद्दीन सावध होऊन परत आला, आणि त्यानें रुक्नखान ह्यास तेव्हांच देहान्त शासन दिलें. नंतर त्यानें रतनभोरास वेढा घातला. हंबीरदेवानें स्वसंरक्षणाचे होते तेवढे प्रयत्न केले; परंतु त्याचा प्रधान विश्वासघात करून मुसलमानांस मिळाला; त्यायोगें रजपुतांचा घात होऊन राजा सुद्धां सर्व लोक शत्रूनीं कापून काढिले, आणि किल्ला घेतला. अलाउद्दीननें त्या विश्वासघातकी प्रधानास 'ज्या त्वां आपल्या मूळच्या धन्यास सोडिलें, तो तूं दुसऱ्या धन्याचा घात करणार नाहींस कशावरून ?' असें सांगून ठार मारिलें.

**( ङ ) दक्षिणची दुसरी स्वारी, ( स. १३०६ ).**—देवगडचा राजा रामदेवराव दिल्लीस खंडणी पाठविनासा झाला होता. त्याचें पारिपत्य करण्याकरितां सुलतानानें एक मोठें सैन्य तयार करून तें मलीक काफूर नामक सरदाराच्या हाताखालीं रवाना केलें. काफूर हा पूर्वी खंबायतेस एका सावकाराजवळ गुलाम होता. गुजराथप्रांत जिंकिल्यावर अलाउद्दीननें त्याच्या

धन्यापासून त्याला जुलमानें आणिलें. पुढें त्याजवर सुलतानाची मर्जी बसून त्यास मोठमोठीं कामें मिळत गेलीं. हलक्या जातीचा असून तो एकदम थोर पदास चढल्यामुळें उमराव लोकांस फार वैषम्य वाटलें. सन १३०३ सालीं काफूर यास बंगाल्यांतून पूर्वेकडील मार्गानें अलाउद्दीननें वरंगूळचें राज्य काबीज करण्याकरितां पाठविलें होतें. पण मोगल लोकांनीं स्वारी केल्यामुळें हें सैन्य परत बोलवावें लागलें. पुढें सन १३०६त पुनः त्या गृहस्थास बादशहानें दक्षिणेंत पाठविलें. तो माळव्यांतून खानदेशच्या वाटेनें सुलतानपुरावरून देवगडास आला; आणि सर्व महाराष्ट्रदेशांत त्यानें लुटालूट आरंभिली. अशा सरदाराशीं टक्कर देण्यास आपण असमर्थ आहों, असें समजून राजा रामदेव त्याजबरोबर दिल्लीस गेला. तेथें सुलतानानें त्याचा चांगला सन्मान करून त्यास एक छत्र, राजाधिराज हा किताब व एक लाख रुपये बक्षीस दिले, आणि त्यास प्रतिष्ठेनें स्वदेशीं जाऊं दिलें. त्या वेळेपासून रामदेवानें मुसलमानांशीं वैर केलें नाहीं. ह्या स्वारींत काफूरच्या मदतीस त्वरेनें जाण्यास गुजराथेंतील सरदार आलफखान यास सुलतानानें हुकूम पाठविला. कमलादेवी व कर्णराय यांची देवलदेवी म्हणून एक मुलगी होती. कमलादेवी दिल्लीस रवाना झाल्यावर देवलदेवी बापाबरोबर अरण्यवासांत होती. रामदेवाचा मुलगा शंकरदेव यास ती देण्याचा कर्णरायाचा विचार होता. पुढें सन १३०६ सालीं आलफखान गुजराथेंतून दक्षिणेंत येऊं लागला, तेव्हां कमलादेवीच्या आग्रहावरून सुलतानानें त्यास असाही हुकूम पाठविला, कीं देवलदेवीचा शोध लावून तिला दिल्लीस पाठवावी. आलफखानानें कर्णरायास गांठून त्याच्या टोळीचा पराभव केला, पण देवलदेवीची अगोदरच देवगडास रवानगी झाली होती, म्हणून ती त्यास सांपडली नाहीं. पुढें आलफखान देवगडापासून एका मजलेवर वेरूळच्या लेण्यांजवळ उतरला असतां, अकस्मात् त्याच्या लोकांस देवलदेवी सांपडली. तिला घेऊन तो एकदम दिल्लीस गेला. तेथें बादशहाचा वडील मुलगा खिजरखान ह्यानें तिची प्रीति संपादन करून तिच्याशीं लग्न लाविलें. ह्या उभयतांच्या क्रीडेविषयीं अमीर खुस्रू कवीनें फारशी भाषेंत एक सुरेख कवन रचिलें आहे. अलाउद्दीन मरण पावल्यावर त्याचा मुलगा मुबारिक ह्यानें तिच्या नवऱ्याचे डोळे काढून तिला आपल्याकडे घेतलें. पण लवकरच मुबारिकचा आवडता

सरदार खुस्रू ह्यानें त्याचा प्राण घेतल्यावर, ह्या हतभागी बाईस त्यानें स्वतःच्या जनानखान्यांत नेलें. सन १३२१त तुघ्लखवंशाचा पहिला सुलतान ग्यासुद्दीन ह्यानें खुस्रूस मारिल्यावर देवलदेवीचा उत्तम बंदोबस्त करून दिला, आणि जन्माच्या दुःखदायक धिंडवड्यांतून तिची एकदांची सुटका केली.

दक्षिणेंत बरेंच यश येत गेल्यावर तिकडे ज्यास्त मुलुख काबीज करण्याचा सुलतानास हुरूप आला. आग्नेयीस तैलंगणांत वरंगूळचें राज्य मोठें असून नरपति आडनांवाचे राजे तेथें राज्य करीत होते. पूर्वी एकवार वरंगूळची मोहीम फसली, म्हणून पुनः सन १३०९त मलीक काफूर यास बादशहानें दक्षिणेंत पाठविलें. काफूर ह्यानें त्वेषानें मुलुख उद्ध्वस्त करीत थेट वरंगूळवर येऊन किल्ल्यास वेढा घातला. त्या वेळीं राजाचा पाडाव झाला, आणि पुष्कळ द्रव्य देऊन व पुढें निरंतर खंडणी पाठविण्याचें कबूल करून, नरपतिरायानें त्या मुसलमान सरदाराची मर्जी सुप्रसन्न करून घेतली. ह्या स्वारींत रामदेवरावानें मलीक काफूर ह्यास चांगली मदत केली.

६. **दक्षिणहिंदुस्थानांतील राज्यें.**—दक्षिणहिंदुस्थानावर ह्या वेळेपासून मुसलमानांच्या वारंवार स्वाऱ्या होऊं लागल्या, आणि पुढें हळू हळू सर्व प्रदेशांत मुसलमानी सत्ता प्रबळ झाली. म्हणून ह्या वेळचा इतिहास समजण्याकरितां दक्षिण देशांत त्या वेळीं कोणकोणतीं राज्यें होतीं हें सांगितलें पाहिजे.

महाराष्ट्रांत यादवांचें राज्य होतें हें वर सांगितलेंच आहे, आणि ह्या राज्याची हकीकत दुसऱ्या एका भागांत येणार आहे. महाराष्ट्राचे खालीं थेट दक्षिणेपर्यंत पुरातन काळापासून नानाविध राज्यें नांदत आलीं होतीं. त्यांची त्या वेळेस भरभराट असून तत्कालीन सुधारलेल्या राष्ट्रांत त्यांची गणना होती. त्या राज्यांचे इतिहास उपलब्ध नसल्यामुळें, त्यांची कांहींच माहिती देतां येत नाहीं, हें इतिहासकारांचें दुर्भाग्य होय. दक्षिणेंत मुख्यतः पांच भाषा चालतात: महाराष्ट्रांत मराठी, द्रविडदेशांत तामीळ, कर्नाटकांत कानडी, तैलंगणांत तेलगू, पश्चिमभागीं चेर आणि केरल देशांत मलयाळी. या भाषांच्या व्याप्तीस अनुसरून निरनिराळीं राज्यें होतीं. अगदीं दक्षिण टोंकास द्रविड किंवा तामीळ देश म्हणत. त्याच्या उत्तरेस कर्नाटक. बेदर व कोल्हापूर यांजमध्यें एक सरळ रेषा काढिली असतां

ती कर्नाटकची ठोकळ मानानें उत्तरमर्यादा होईल. कर्नाटकच्या पूर्वेस पूर्वकिनाऱ्यास लागून तैलंगण देश आहे, त्याचा विस्तार उत्तरेस महानदीपर्यंत व पश्चिमेस महाराष्ट्रास लागून आहे. महानदीच्या पलीकडे बंगालपर्यंत ओढया देश पसरला आहे. महाराष्ट्र व ओढया देश ह्यांजमध्यें जो जंगली प्रदेश आहे, त्यास गोंडवण म्हणजे गोंड लोकांचें वन अशी संज्ञा आहे. पश्चिमाकिनाऱ्यावर मलबार किंवा केरल देश आहे. द्रविड देशांत पूर्वी पांड्य नांवाचे राजे राज्य करीत होते. क्रिस्तशकारंभीं ह्या वंशांतील राजानें एकदां रोमचा बादशहा ऑगस्टस सीझर ह्याजकडे आपले वकील पाठविले होते. मदुरा शहर ह्या राज्याची राजधानी होती. पांड्य राजांच्याच शेजारीं चोल नामक राजांचें स्वतंत्र राज्य होतें. कांहीं दिवस हीं दोनही राज्यें एका अंमलखालीं होतीं. पांड्य राज्याचा अवशिष्ट भाग सन १७३६ च्या सुमारास अर्काटच्या नबाबानें जिंकिला. चोल राज्याचा अवशिष्ट भाग शिवाजीचा भाऊ व्यंकोजी भोंसले ह्यानें जिंकिला. कांचीनगर हें चोलांची राजधानी होय.

उत्तरमलबारास केरलदेश, व त्रावणकोरसह दक्षिणमलबारास चेरदेश अशा संज्ञा होत्या. केरलदेशच्या राजानें नवव्या शतकाचे सुमारास मुसलमानी धर्म स्वीकारिला. तेव्हां लोकांनीं त्याच्याविरुद्ध बंड केलें. त्यांत अनेक झगडे होऊन लहान लहान स्वतंत्र राज्यें स्थापन झालीं. पुढें मलबारच्या पेरुमाळ राजानें मुसलमानी धर्म स्वीकारिला. पोर्तुगीझ सरदार वास्को ड गामा हिंदुस्थानांत आला, तेव्हां कालिकोट येथें झामोरीन नामक राजा राज्य करीत होता. यानेंच वास्को ड गामा यास हिंदुस्थानांत प्रथम आश्रय दिला, ही हकीगत ब्रिटिश रियासतींत आहे.

कर्नाटकची प्राचीन माहिती चांगलीशी मिळत नाहीं. दहाव्या शतकांत यादव घराण्यापैकींच एकानें ह्या देशांत स्वतंत्र राज्य उभारून बल्लाळ वंशाची स्थापना केली. कांहीं दिवस कर्नाटकावर चालुक्यवंशी राजांचाही अंमल होता. नंतर देवगिरीच्या यादवांनीं कर्नाटकप्रांत जिंकिला, आणि पुढें सन १३१० त मलीक काफूर ह्यानें हा प्रांत मुसलमानांचे ताब्यांत आणिला.

तैलंगणांतच कलिंग व आंध्र देश मोडत. कलिंग देशावर कांहीं दिवस चालुक्यांचा अंमल होता. आंध्रांची राजधानी वरंगुळ शहर हैदराबादचे

ईशान्येस चाळीस कोसांवर आहे. मगध देशांतील आंध्रराजे व हे एकच असावेत. आंध्रांनंतर चोल आणि त्यांच्या पाठीमागून यवनवंशी राजे ह्या प्रांतावर अंमल करीत होते. अकराव्या शतकांत नरपति नामक राजे तैलंगणावर राज्य करूं लागले. त्या वंशांत काकती नामक एक महापराक्रमी राजा निपजला. सन १३०९त मलीक काफूर ह्यानें येथील राजांस मुसलमानांचे ताबेदार केलें. सन १३२३त पुनः दिल्लीहून मुसलमानांची फौज ह्या राज्यावर आली, तेव्हांच तेथील राजांची बहुतेक सत्ता नष्ट झाली. अखेरीस गोवळकोंड्याच्या मुसलमान राजांनीं तैलंगण देश कायमचा जिंकिला.

ओढ्या देशावर सुद्धां निरनिराळ्या वंशाचे अनेक पराक्रमी राजे राज्य करीत होते. कौरवपांडवांच्या वेळेपासून ह्या देशाचें नाव गाजत आहे. तेरा, चवदा, व पंधरा ह्या तीन शतकांत ओढ्या देशावर गांगवंशी राजांची सत्ता फार प्रबळ होती. बहामनी सुलतानांशीं ह्या राजांचे झगडे हंमेश चालू असत. सन १५७८त अकबर बादशहानें हा प्रदेश दिल्लीचे अमलाखालीं आणिला.

ह्या सर्व राजांचे आपसांत कलह चालू असून त्यांच्या राज्यांच्या मर्यादा वरचेवर कमीज्यास्त होत. हजारों वर्षें स्वातंत्र्याचा उपभोग घेत असल्यामुळें परकीयांचे हल्ले आले, तरी आपसांत ऐकमत्य करून परशत्रूंचें निवारण करण्याची बुद्धि त्यांस झाली नाहीं. वेरूळ व इतर ठिकाणचीं लेणीं आणि दुसरीं अनेक कृत्यें ह्या मध्यकालीन दाक्षिणात्य राजांच्या वैभवाची साक्ष देतात. कित्येक ग्रंथकार ह्या लेण्यांची तुलना इजिप्ट देशांतील पिरमिदींशीं करितात. तरी पण लेणीं तयार करण्याच्या कामास पिरमिदींपेक्षां ज्यास्त कल्पकत्व व ज्यास्त साहस लागलें असेल असें पुष्कळांचें म्हणणें आहे. शिलालेख व ताम्रपट यांचे योगानें ह्या राज्यांचा प्राचीन इतिहास अलीकडे कांहीं अंशीं उपलब्ध होत आहे. पण तो प्राचीन इतिहासाच्या भागांत येणारा असल्यामुळें प्रस्तुत गोष्टींच्या संदर्भास जरूर आहे त्यापेक्षां ज्यास्त हकीकत येथें देतां येत नाहीं.

**७. मलीक काफूरच्या स्वाऱ्या, दुसरी स्वारी (स. १३१०).**—कर्नाटकच्या बल्लाळ राजास जिंकण्याकरितां सुलतानानें काफूरची रवानगी केली. काफूर हा देवगड, व पैठण या शहरांवरून द्वारसमुद्र नामक राजधानीवर

चालून आला. हें शहर कर्नाटकच्या मध्यभागीं श्रीरंगपट्टणचे वायव्येस सुमारें शंभर कोसांवर होतें. ही राजधानी घेऊन काफूरनें बल्लाळवंशाचें राज्य बुडविलें. नंतर काफूर थेट दक्षिणेकडे गेला. त्यास कोणीं विशेष अडविलें नाहीं. श्रीक्षेत्र रामेश्वर* येथें त्यानें एक मशीद बांधिली. येणेंप्रमाणें मुसलमानांची धाड हिंदुस्थानावर लोटली, ती शेवटीं हिंदुस्थानच्या दक्षिणटोंकाशीं जाऊन थडकली. या स्वारींतून अला-उद्दीनच्या सेनापतींनीं ६१२ हत्ती, वीसहजार घोडे, ९६ हजार मण सोनें, (मणाच्या लहानमोठ्या प्रमाणानुसार चोव्वीसलक्ष शेर, किंवा १,५६,७२,००० शेर) व शिवाय जडजवाहीर, एवढी संपत्ति दिल्लीस आणिली. ह्या संपत्तीची किंमत सहज करितां येईल.†

**तिसरी स्वारी, (स. १३१२).**—काफूर देवगडास आला, त्या वेळीं रामदेवराव मरण पावला होता. त्याचा मुलगा खंडणी वेळेवर देईना, म्हणून काफुरास त्याच्याविषयीं अंदेशा येऊं लागला. तेव्हां सुलतानाच्या परवानगीनें काफूर महाराष्ट्रावर चालून आला. रामदेवाच्या मुलास त्यानें ठार मारिलें आणि देवगड राजधानी घेतली. महाराष्ट्रदेश पूर्णपणें मुसलमानांचे ताब्यांत आणून व अपार संपत्ति घेऊन काफूर दिल्लीस गेला, तो पुनः दक्षिणेंत आला नाहीं.

**८. अला-उद्दीनचा मृत्यु व राज्यव्यवस्था.**—सुलतान अलाउद्दीन स्वभावानें फार तापट होता. राज्यांत कांहीं असंतुष्ट लोक हे नेहमीं असावयाचेच. त्यांजकडून अनेक वेळां बादशहास ठार मारण्यासाठीं बंडें उद्भवत. अशा प्रसंगीं बादशहा ज्यास्तच चवताळे. काफूरची शेवटची स्वारी झाली, त्यानंतर अलाउद्दीनची सत्ता अगदीं कळसास पोंचली. तो स्वभावतः क्रूर असूनही मोठा नशीबवान होता. थोडया अवकाशांत त्याच्या राज्याची मर्यादा अतोनात वाढली. अव्यवस्थित राहण्यानें त्याची तब्यत दिवसेंदिवस बिघडत चालली होती. मलीक काफूरवर त्याची बहाल मर्जी असे. त्या दुष्टानें ह्या कृपेचा फारच दुरुपयोग केला. त्याच्याशिवाय बादशहाजवळ दुसऱ्या कोणाचें कांहीं चालत नसे. प्रत्यक्ष राणी व मुलगे यांच्याशीं सुद्धां सुलतानाचें वैमनस्य काफूरनें पाडून त्यांस

---

* कित्येकांच्या मतें काफूरची मशीद पूर्वकिनाऱ्यावर रामेश्वर येथें नसून पश्चिमकिनाऱ्यावर आहे. † Sewell's Forgotten Empire, P. 402.

अटकेंत ठेविलें. ते सर्व आळशी व दुर्व्यसनी निघाले. दरबारांतही घोटाळे उत्पन्न झाले. उमरावलोक त्रासले. गुजराथेंत बंड झालें. चितोडगड हातचा गेला. दक्षिणेंत रामदेवरावाचा जांवई हरपाळदेव ह्यानें मोठा उठावा करून मुसलमान किल्लेदार हांकून लाविले आणि स्वतः स्वतंत्रतेनें राज्य करूं लागला. हीं वर्तमानें ऐकून बादशहास क्रोधाच्या लहरी येऊं लागल्या. त्याचें दुखणें जडावलें; आणि थोडयाच दिवसांनीं त्याचा काळ झाला, ( सन १३१६ ). त्यानें वीस वर्षें राज्य केलें. कोणी म्हणतात, कीं काफूरनेंच त्याला विषप्रयोग केला.

हा सुलतान स्वभावानें छांदिष्ट, निर्दय व जुलमी होता. त्याचे कायदे अविचाराचे असत, तेणेंकरून लोकांस इजा पोंचे. तथापि त्याची जरब विशेष असल्यामुळें कारभार एकंदरींत बराच सुरळीत चालला. सर्व प्रांतांत स्वस्थता होऊन भीति नाहींशी झाली. संपत्ति वाढली. मोठमोठ्या इवेल्या उठून सुधारणेचें पाऊल थोडेंसें पुढें पडत चाललें. आरंभीं सुलतानास लिहितां वाचतां कांहीं येत नव्हतें. त्याजबद्दल त्यास लांच्छन वाटून प्रौढपणीं तो विद्या शिकला, आणि तेणेंकरून तो वहिवाटलेल्या कामगार लोकांसही भारी झाला.

अलाउद्दीनची राज्यनीति चमत्कारिक होती. राज्यांत वरचेवर फंदफितुर होतात ह्याचें कारण काय, ह्याबद्दल प्रधानमंडळांत विचार करून त्यानें असें ठरविलें, कीं ख्यालीखुशालीच्या मेजवान्या करून लोक त्या ठिकाणीं गुप्त बेत करितात; मोठमोठे उमराव लोक एकमेकांशीं शरीरसंबंध करून स्नेही झाल्यानें ते बादशहास भारी होतात; तसेंच कामगार लोक पुष्कळ पैसा मिळवून ते यजमानास जुमानीत नाहींत. ह्या गोष्टी मना करण्याकरितां त्यानें विलक्षण सक्तीचे उपाय केले. दारू पिण्याची मनाई केली. कोणाच्याही घरीं खासगी सभा भरूं नये असें ठरविलें. दरबारप्रकरणीं कोणीं वादविवाद करूं नये, सरकारच्या परवानगीशिवाय मेजवान्या किंवा लग्नकार्य वगैरे करूं नये, असे त्यानें अनेक त्रासदायक कायदे केले. शेतकरी लोकांनीं अमुकच जमीन व गुरें व नोकर ठेवावे असें ठरविलें. सरकारी वसूल सक्तीनें होऊं लागला. त्यानें जमीनधारा वाढविला. नोकरांचे पगार कमी केले. शिवाय रयतेच्या कमाईचा त्यास फार लोभ सुटल्यामुळें लोक हवालदील झाले. तसेंच लष्करी लोकांचा

खर्च कमी करण्याकरितां त्यानें सर्व जिनसांचे दर कायमचे ठरवून टाकिले; आणि त्याच दरांनीं माल विकण्याची त्यानें लोकांस फरज पाडिली. तो व्यापारासाठीं सरकारी पैसा लोकांस कर्जाऊ देई. राज्यांतून बाहेर माल नेण्याची त्यानें बंदी केली. बाजार उघडण्याच्या व बंद करण्याच्या वेळा त्यानें ठरवून दिल्या. चहूंकडे हेर ठेवून सर्व प्रकारची गुप्त बातमी आपणास कळण्याची तजवीज केली. अशा कायद्यांनीं त्यानें राज्यांत बंदोबस्त ठेविला; पण त्यामुळें लोकांस सौख्य झालें नाहीं. दुष्काळ पडला, तेव्हां वरील पुष्कळ कायदे चालेनातसे झाले. धर्मसंबंधांत अलाउद्दीननें जुलमी वर्तन केलें नाहीं. राजनीतीसंबंधीं त्याचें म्हणणें असें पडे, कीं 'वारंवार बदलणाऱ्या लोकमतापेक्षां एकट्या शहाण्या राजाची इच्छा अधिक चांगली'. मोठेपणाचा वडेजाव करून महंमद किंवा सिकंदर यांजप्रमाणें महत्कृत्य करण्याचा जेव्हां अलाउद्दीन विचार करूं लागला, तेव्हां अलाउल्मुल्क् नांवाच्या त्याच्या एका काजीनें 'अतितृष्णा न कर्तव्या,' ह्या नियमाचा त्यास चांगला उपदेश केला. तेव्हांपासून त्या उपदेशाप्रमाणें सुलतान वागूं लागला.

अलाउद्दीनच्या कडक कायद्यांनीं जिकडे तिकडे असा वचक बसला, कीं वाटसरू रस्त्यावर सुरक्षित निजत. बंगाल्याहून काबुलास व तैलंगणांतून काश्मिरापर्यंत व्यापारी लोक निर्धास्तपणें आपल्या मालाची नेआण करीत. वसुलाच्या बाबतींत लोकांवर जुलूम झाल्यास चौकशी करण्यासाठीं योग्य कामगार अलाउद्दीननें नेमिले होते.

सुलतान अलाउद्दीन अत्यंत निष्ठुर व निर्धारी असे. क्षुल्लक कारणावरून सहज दुसऱ्याचा प्राण घेई. त्याच्या आश्रयास राहून नवीन मुसलमान झालेल्या मोगल लोकांची त्यानें अनेक वेळां कत्तल केली. मलीक काफूर हा तृतीयप्रकृति मनुष्य होता. त्याच्या संगतीस लागून बादशहानें आपलें नुकसान करून घेतलें. त्याच्या पायीं त्याची प्रत्यक्ष बायको मलीकाजहान त्याला मोजीनाशी झाली. सर्व प्रकारच्या सौख्योत्पादक साधनांमध्यें लोळत असूनही त्यास अंतीं सुखाचा लवलेश मिळेना. खिजरखान व शादीखान हे त्याचे दोघे मुलगे कैदेंत होते. काफूरच्या सांगीवरून बादशहानें भाऊ आलफखान यास ठार मारिलें. हिंदु स्त्रियेशीं लग्न करणारा असा हा पहिलाच मुसलमान बादशहा होय. ऐश्वर्यमदानें धुंद होऊन

हातीं आलेल्या अधिकाराचा दुरुपयोग केल्यानें अंतीं दुःख कसें होतें व राज्य कसें लयास जातें, ही गोष्ट अलाउद्दीनच्या चरित्रापासून शिकण्याजोगी आहे.

**९. अला-उद्दीनची करामत व योग्यता.**—अला-उद्दीनचें सर्व कसब राज्याची सांपत्तिक स्थिति उत्तम राखण्यांत दिसून आलें. हरप्रयत्न करून त्यानें अगणित संपत्ति जमा केली, आणि राज्यांत आबादानी पसरिली. बराणी सांगतो, कीं 'प्रथम तीन वर्षें त्याला विशेष श्रम पडले. पुढें आपण वाटेल तशी चैन केली तरी राज्याची व्यवस्था कायम राहवी, असा बंदोबस्त त्यानें केला. दूरदूरच्या प्रांतांत त्याच्या फौजांस जय येत गेले. चहूंकडे विजय प्राप्त झाल्याच्या बातम्या त्यास हरहंमेश येऊं लागल्या. दरसाल दोन तीन मुलगे त्यास होऊं लागले. तिजोरींत पैसा विपुल राहूं लागला. हिरेरत्नांच्या पेट्यांच्या पेट्या नित्य दृष्टीस पडूं लागल्या. हजारों हत्ती त्याच्या पदरीं झुलत होते. दिल्ली शहरच्या सरकारी तबेल्यांत सत्तर हजार घोड्यांचा संग्रह झाला. ह्या अपार संपत्तीनें त्यास ऐश्वर्यमद चढून त्याच्या डोक्यांत भलभलते विचार घोळूं लागले. गर्वानें व अज्ञानानें फुगून जाऊन त्याचें डोकें बहकून गेलें. त्यामुळें भलभलत्याच वल्गना तो करूं लागला. विद्येचा तर त्यास गंध नव्हता आणि विद्वानांची संगतीही त्यास आवडत नव्हती. त्यास पत्र सुद्धां लिहितां येत नव्हतें. तो स्वभावानें तुसट, हट्टी व निष्ठुर होता, तरी सर्व लोक त्याजशीं हंसतमुख असत. नशीबाची त्याजवर कृपादृष्टि होती, आणि हातीं घेतलेल्या कामांत भराभर यश येत गेल्यामुळें, तो अत्यंत बेपरवा व उर्मट झाला. आपण नवीन धर्म स्थापन करावा, त्याचा आपण पैगंबर व्हावें, आणि दिल्लीच्या कारभारावर आपला एक प्रतिनिधि नेमून सिकंदराप्रमाणें भूतल जिंकीत संचार करावा, असे उद्गार तो वारंवार काढूं लागला. शिक्क्यांत व लेखांत आणि शुक्रवारच्या नमाजांत दुसरा सिकंदर असें नांव सुद्धां त्यानें धारण केलें. पण अला-उद्दीनजवळ कांहीं शहाणीं माणसें होतीं. बराणीच्या चुलत्यानें एके दिवशीं सुलतानाची बरीच कानउघाडणी केली. तो म्हणाला, 'धर्माचें काम करण्यास पैगंबर पुष्कळ मिळतील. पण अगोदर हिंदुस्थान देश तर जिंकून होऊं दे. रतनभोर, चितोड, चंदेरी, माळवा, धार, उज्जनी वगैरे

मोठमोठीं शहरें हिंदूंच्या हातांत आहेत, मोगल लोक वायव्येकडून त्रास देतच आहेत. तर मद्यप्राशनासारखे धंदे सोडून देऊन अगोदर हीं कामें कर.' हा उपदेश सुलतानास चांगला पटला. त्यानें बराणीच्या चुलत्यास मोठें बक्षीस देऊन लगेच त्यानें वरील कामें हातीं घेतलीं, आणि तीं लवकरच तडीस गेलीं. कामें हातीं घेतांच तीं किती कठीण आहेत हें त्यास दिसून आलें. नुसत्या एकट्या रतनभोरच्या वेढ्यानेंच तो जेरीस आला. तेव्हां सिकंदराच्या सारख्या पराक्रमाच्या वल्गना आपोआप जागीं बसल्या. प्रत्यक्ष त्याच्या पुतण्यानें बंड करून त्यास ठार मारण्याचा प्रसंग आणिला होता; पण सुदैवानें बंड उघडकीस येऊन अलाउद्दीननें पुतण्याची व त्याच्या साथीदारांची पुरी खोड मोडिली. अशा प्रकारचीं बंडें वारंवार होत असत.

अशीं बंडें कां होतात आणि त्यांच्या मुळाशीं काय आहे याचा शोध सुलतान करूं लागला. त्यानें आपले अधिकारी जमविले आणि त्यांजबरोबर रात्रंदिवस वाटाघाट चालविली. त्यांत असें निष्पन्न झालें, कीं लोकांच्या वर्तनावर सरकारचा दाब हवा तितका ठेवण्यांत आलेला नाहीं. लग्नकार्यांच्या व सणावारांच्या प्रसंगीं पुष्कळ लोक एकत्र जमून मद्यप्राशन वगैरे करून भलभलती चर्चा करीत असतात. मोठमोठे सरदार व वजनदार लोक उघड उघड राज्याच्या विरुद्ध मसलती करीत असतात. तसेंच पुष्कळ लोकांजवळ पैसा फार झाल्यामुळें त्यांना बंडाची सामुग्री आयतीच तयार करितां येते.

बंडाची ही मीमांसा सुलतानाच्या काउन्सिलांत निष्पन्न झाली असो, किंवा बराणीच्या डोक्यांतून निघालेली असो, तिचा बंदोबस्त मात्र सुलताननें लगेच सुरू केला. ( १ ) लोकांजवळ संपत्ति फार वाढली असें पाहून लगेच तिचा बंदोबस्त त्यानें मोठ्या उल्हासानें केला. लोकांस गांव किंवा जमिनी इनाम दिलेल्या होत्या, त्या त्यानें एकदम खालसा केल्या. कांहींना कांहीं सबबीवर त्यानें सर्व लोकांस पिळून त्यांजपासून पैसा उकळिला. सामान्य लोकांजवळ एक पै सुद्धां राहिली नाहीं, तेव्हां उदरनिर्वाहाच्या कामांत गुंतून गेल्यामुळें त्यांस बंडांची वार्ता कोठून सुचणार ? ( २ ) सुलताननें गुप्त हेरांची नवीन व्यवस्था सुरू केली. लोकांच्या यत्किंचित् हालचालींची वर्दी त्यास तावडतोब मिळूं लागली. सरदार,

उमराव, अम्मलदार वगैरेंच्या घरीं जे कांहीं प्रकार होत ते सर्व सुलतानास कळूं लागले. गुप्त बातम्या काढून लोकांची त्यानें अशी जाचणूक सुरू केली, कीं त्यांना तोंड उघडण्याची सोय राहिली नाहीं. बाजारांतले किंवा रस्त्यांतले सामान्य व्यवहार सुद्धां सुलतानाच्या कानावर जाऊं लागले. एवढ्यानेंच काम भागलें नाहीं. दारूच्या नादांत लोक वाटेल तसे वरळतात, यास्तव मद्याची विक्री व मद्यप्राशन त्यानें साफ मना केलें. त्याचप्रमाणें इतर अमली पदार्थही त्यानें बंद केले. दारू गाळणारांस व जुगारी लोकांस त्यानें शहरांतून हुसकून दिलें. त्यानें आपल्याजवळील मद्यप्राशनाचीं कांचेचीं वगैरे सर्व भांडीं फोडून बदाऊन दरवाजासमोर त्यांचा ढीग घातला. तसेंच दारूचे भरलेले घडे व पिपें रस्त्यावर ओतून दिल्यानें त्याचा पावसाळ्यांतल्यासारखा चिखल झाला. स्वतः सुलतानानें मद्यप्राशन सोडून दिलें आणि अनेकांना त्याबद्दल देहांत शिक्षा केली. त्या योगानें मद्यप्राशन जरी समूळ नाहींसें झालें नाहीं, तरी सार्वजनिक गुत्ते मात्र सर्व बंद पडले. (४) लोकांचे गुप्त बेत बंद पाडण्यासाठीं सुलतानानें असें फर्मान सोडिलें, कीं सरदार व उमराव लोकांनीं एकमेकांच्या घरीं भेटीस जाऊं नये, मेजवान्या करूं नयेत व चारचौघांनीं मिळून एकत्र विचार करीत बसूं नये. लग्न वगैरे ठरविण्यापूर्वी किंवा इतर मनुष्यांना आपल्या घरीं उतरूं देण्यापूर्वी त्यांनीं सरकारची परवानगी घेतली पाहिजे. ह्या फरमानामुळें मेजवान्या बंद पडल्या; कोणासही दुसऱ्याच्या घरीं जाण्याची सोय राहिली नाहीं. सरकारी हेरांच्या धाकानें त्यांनीं सर्व समारंभ व भेटी बंद केल्या. बंडखोर किंवा अराजनिष्ठ मनुष्यास दुसऱ्याच्या घरीं जाण्याची बंदी झाली. राजवाड्यांत उमराव लोक जमत, तेव्हां सुद्धां एकमेकांशीं त्यांस कानगोष्टी करण्याची सोय राहिली नाहीं. ( ५ ) हिंदु प्रजेविषयीं तर याहून ज्यास्त कडक नियम केले. हिंदूला बसावयाला घोडा मिळूं नये, त्यानें हत्यार बाळगूं नये, उंची पोशाख करूं नये, किंवा छानछोकीनें राहूं नये असा बंदोबस्त अलाउद्दीननें केला. हिंदूनें आपल्या जमीनीचें अर्धे उत्पन्न सरकारांत भरावें आणि गाईम्हशींचा सुद्धां कर द्यावा, इत्यादि नवीन नियम सक्तीनें अमलांत आणिले. कोणाही हिंदूच्या घरांत सोनें, चांदी किंवा सुपारीदेखील राहिली नाहीं. हिंदु अमलदारांच्या बायकांना मुस-

लमानांच्या घरीं नोकरी करावी लागे. सरकारी अंमलदार आला, कीं लोक त्यास दुरून नमस्कार करीत. राज्यांत हिंदु लोकांस नोकऱ्या मिळेनातशा झाल्या; आणि यदाकदाचित् एखाद्यानें नोकरी धरिली, तर त्यास दुसरे लोक आपल्या मुली देत नसत. कारण अशा मुलींस लग्न झाल्यावर मुसलमानांच्या जनानखान्यांत नोकरीस जावें लागे.

हे कायदे सुलतानानें स्वमतानें सुरू केले. त्यांत त्यानें कोणा कायदे-पंडिताचा विचार घेतला नव्हता. राज्यकारभाराच्या कामांत आपण करतों हें कायद्यानें योग्य आहे कीं नाहीं, ह्याचा विचार अलाउद्दीन करीत नसे. एके दिवशीं बियाणाचा काजी त्याच्या भेटीस आला असतां सुलतानानें त्यास विचारिलें, कीं ' मला कांहीं प्रश्न विचारावयाचे आहेत, त्यांचे तुम्ही खरे खरे जबाब द्याल काय ?' काजी मोठा विद्वान् होता, तो घाबरून बोलला, ' मला वाटतें माझें दुर्दैव ओढवलें, म्हणून आपणांस असे प्रश्न सुचले. ' सुलतान बोलला, भिऊं नका व माझ्या प्रश्नांचे जबाब खरे खरे द्या.' अला-उद्दीननें विचारिलें; ' आपल्या धर्मग्रंथान्वयें हिंदूंचें वर्तन कसें असावें ?' काजी बोलला, " हिंदूचें काम कर देण्याचें आहे. सरकारच्या अधिकाऱ्यांनीं चांदी मागितली असतां हिंदूंनीं मोठ्या अदबीनें तक्रार न करितां सोनें द्यावें. अधिकारी बोलला, मी तुमच्या तोंडांत थुंकणार, तर लगेच त्यांनीं कांकूं केल्याशिवाय तोंडाचा ' आ ' करावा. असें वर्तन करतील तरच ते शरण आले असें समजावें. अशा प्रकारें इस्लामाचा बोज राखणें हें आपलें कर्तव्य आहे. ' परधर्मी लोकांस नीच व निंद्य समज, ' असें धर्म आपणांस शिकवितो."

सुलतान बोलला, ' कर्तव्य वगैरे मी कांहीं ओळखीत नाहीं, पण हिंदूंची रग मीं पुरी जिरविली आहे. मी हुकूम करण्याचा अवकाश, कीं ते उंदरांसारखे बिळांत शिरतील. काजीसाहेब, आपण विद्वान् आहां खरे, पण जगाचा अनुभव आपणांस नाहीं. मी कांहीं शिकलेला नाहीं, पण प्रत्यक्ष अनुभव मात्र रग्गड मिळविला आहे. त्यावरून माझी अशी खात्री झाली आहे, कीं हिंदूंजवळ जोंपर्यंत पैसा आहे, तोंपर्यंत त्यांचे कितीही हाल केले, तरी ते शरण येणार नाहींत. म्हणून मीं असें फर्माविलें आहे, कीं दहीं, दूध व धान्य फार तर एक वर्ष पुरेल इतकं

हिंदूंपाशीं राहूं द्यावें, त्याहून ज्यास्त द्रव्यसंचय त्यांस करूं देऊं नये.' असो, ह्या बाबतींत काजी व सुलतान ह्यांचा फारसा मतभेद झाला नाहीं. मतभेदाचा प्रसंग पुढें आला. 'युद्धांत कमावलेली लूट व सरकारी खजिना ह्यांजवर माझी मालकी आहे कीं नाहीं,' असा प्रश्न पुढें सुलतानानें काजीस विचारिला. त्यावर काजी बोलला, 'आतां मात्र माझा मृत्यु जवळ आला खरा. जर मीं खरा जबाब दिला, तर तुम्ही मला फांशीं द्याल; जर खोटा दिला, तर परमेश्वर मला फांशीं देईल.' तरी काजीनें खरा जबाब होता तो दिला. 'इस्लामाच्या फौजेनें मिळविलेली लूट सरकारी समजावी, खासगी नव्हे. जितका हिस्सा इतर शिपायांस मिळतो, तितकाच तुम्हीं आपल्याकरितां ठेवावा. ज्यास्त घेण्याचा तुम्हांस अधिकार नाहीं. मोठमोठ्या खलीफांचें आचरण असेंच आहे.' ह्या उत्तरानें सुलतानास राग येऊन तो बोलला, 'काय, तुम्हांस माझ्या तलवारीचें भय नाहीं वाटत; जनानखान्यासंबंधीं मी जो एवढा खर्च करितों, तो सर्व बेकायदेशीर आहे, असें तुम्ही मला सांगतां काय?' काजी बोलला, 'मला आपल्या तलवारीची भीति वाटते, नाहीं असें नाहीं; पण माझी मरण्याची तयारी आहे. आपण मला धर्मग्रंथांतला प्रश्न विचारिला, आणि धर्मग्रंथान्वयें मीं त्याचें उत्तर दिलें. पण धर्मग्रंथ बाजूस ठेवून व्यवहाराची बाजू विचाराल, तर लोकांवर दाब ठेवण्याकरितां राजानें भपका दाखविला पाहिजे, आणि जनानखाना वाढविल्यानें भपका वाढतो ह्यांत संशय नाहीं.' पुढें आपण कसा कडक बंदोबस्त ठेवितों, ह्याचें वर्णन करून सुलतान बोलला, 'हें माझें वर्तन गैरकायदा आहे काय?' त्यावर काजी जमिनीवर नाक घांसून बोलला, 'महाराज, आपण मला बंदींत टाका, किंवा तुकडे करून ठार मारा, पण मी खरें तेंच सांगणार. आपल्या वर्तनास धर्मग्रंथांत बिलकुल आधार नाहीं.' त्यावर सुलतान उठून मुकाट्यानें जनानखान्यांत गेला. काजी घरीं जाऊन बायकामुलांची शेवटची रजा घेऊन परत आला, आणि सुलतानास भेटला. पण सुलतानानें त्याजवर राग न करितां, उलट त्यास एक हजार टांक म्हणजे रुपये बक्षीस दिले; आणि म्हणाला, 'मी कांहीं धर्मग्रंथ पढलों नाहीं. तरी पण मी अस्सल मुसलमान आहें. बंडावा मोडण्याकरितां मला नानाप्रकारचे निष्ठुर उपाय करावे लागतात. त्यांत राज्याचें

कल्याण व्हावें हाच माझा हेतु असतो. लोक सरकारचे हुकूम खुशीनें पाळीत नाहींत, तेव्हां त्यांजवर जबरदस्ती करावी लागते. लोकांना बरें आहे असें मला वाटतें तें मी फर्मावितों, मग त्यास धर्मग्रंथाचा आधार असो वा नसो.'

बराणीच्या लेखांतून हे उतारे विस्तारानें दिले आहेत, त्यांवरून मुसलमानी राज्यकारभाराचें सामान्य धोरण कसें होतें, हें व्यक्त होईल. कदाचित् वरील भेटीची हकीगत थोडीबहुत काल्पनिक असण्याचाही संभव आहे. तरी पण बराणी हा नेहमीं दरबारांत वागणारा असून, त्याचे सगेवाले सर्व सुलतानाच्या नोकरींत होते; त्यावरून सामान्यतः त्या वेळीं प्रचलित असलेल्या कल्पना जरी ह्या वृत्तान्तांत गोंवलेल्या असल्या, तरी त्यांची किंमत बरीच मोठी आहे.

राज्यकारभाराचे कामीं सुलतानाची भिस्त नुसत्या क्रूर वर्तनावर नव्हती. स. १३०३ तील मोगलांच्या स्वारीनें तो पुष्कळ नवीन गोष्टी शिकला. दिल्ली येथें मजबूद किल्ला बांधून तेथें त्यानें आपल्या राजधानीच्या बचावाचा चांगला बंदोबस्त केला; नवीन तोफा ओतल्या, आणि हत्यारें तयार केलीं. राजधानीच्या प्रवेशद्वारावर चांगली मजबुदी करून, मोगलांच्या बंदोबस्तासाठीं नवीन व वाकब कामगार नेमिले. फौजेची तयारी नेहमीं जय्यत असावी अशी योजना करून, सर्व गोष्टींची व्यवस्था ठरवून दिली. प्रत्येक स्वाराचा सालाचा तनखा २३४ टंक (म्ह. ३६० रुपये), व दोन घोडे ठेविल्यास आणखी १०० रुपये ज्यास्त, देण्याचें ठरविलें. ह्या तनख्यांत शिपायाची गुजराण चांगली होऊन त्यास हत्यारें वगैरे नीट ठेवितां यावीं, ह्यासाठीं धान्याच्या खरेदीविक्रीचे नवीन नियम ठरवून दिले. धान्याविक्रीचे भाव खालीलप्रमाणें ठरविलेले होते. गहूं, अठ्ठावीस शेरांच्या मणास ३ आणे, तांदूळ २ आणे, डाळ २ आणे, मसूर १ आणा. अलाउद्दीनच्या हयातीपर्यंत हे भाव बरोबर चालले. वास्तविक त्या वेळचे हे बाजारदरच होते. कित्येक वेळां धान्याची महर्गता होऊन भाव चढत, ते चढूं नयेत म्हणून अलाउद्दीननें वरील ठराव केला होता. दिल्लींत धान्याचा तोटा पडूं नये म्हणून दुआब वगैरे कित्येक प्रांतांतील सरकारी वसूल धान्यांतच घ्यावा, आणि महर्गता झाली तर ठरीव भावानें तें धान्य लोकांना विकावें अशी तजवीज अलाउद्दीननें केली होती. धान्याची

१०-७९१-२०००

नेआण करणारे इसम ठरवून दिलेले होते. कोणी ठरीव भावापेक्षां ज्यास्त किंमत घेतल्यास त्यास कडक शिक्षा होत असत. कोणी वजनांत लबाडी केल्यास, लबाडीच्या वजनाइतकें त्याच्या अंगाचें मांस काढून घेत असत. भाज्या, फळें, साखर, तेल, टोप्या, जोडे, कंगवे, सुया, घोडे, गुलाम, नोकर, मोलकरणी, वेश्या इत्यादि सर्वांची किंमत ठरवून दिलेली होती. मोलकरणीस पांचपासून बारा रुपये, वेश्येस वीसपासून चाळीस रुपये, गुलामास १० पासून १५ रुपये, सुरूप नोकरास २० पासून ३० रुपये, असे भाव ठरविले होते. या बाबतींचा त्या वेळच्या मानानें विचार केला पाहिजे. सुलतान छांदिष्ट किंवा मन मानेल तसें वागणारा होता असें ह्यावरून होत नाहीं. सुलतानानें केलेले नियम त्या वेळच्या स्थितीस योग्य होते, आणि त्यांचा परिणामही इच्छिल्याप्रमाणें हितावहच झाला. बंडें बंद झालीं, मोगलांचे हल्ले थांबले. राज्यांत शांतता आणि आबादानी झाली. अशी स्वस्थता केल्यावर हिंदुस्थानांतील इतर भाग जिंकून आपल्या राज्याखालीं आणण्यास, सुलतानास विलंब लागला नाहीं. पंजाबांत वायव्य हद्दीवर गाजी मलीक तुघ्लख यास ठेवून दिलें, आणि दक्षिणदेश जिंकण्यास मलीक काफूर यास पाठविलें. दोघांच्याही नेमणुका अगदीं यथायोग्य होत्या. दोघांनींही आपलीं कामें उत्कृष्ट बजाविलीं. देवगिरि व वरंगूळ येथील राज्यें हस्तगत होऊन अलोट संपत्ति सुलतानास मिळाली. दक्षिणदेश ह्या वेळीं मुसलमानांच्या ताब्यांत गेला, तो बहुतेक शिवाजीच्या वेळेपर्यंत तसाच परकी अमलाखालीं होता.

एवढी सगळी करामत पाहिली म्हणजे अलाउद्दीन मोठा कर्तृत्ववान होता, असें दिसून येतें. बाजारभाव ठरले गेल्यामुळें लोकांच्या मनाची चलबिचल नाहींशी झाली, आणि शेती सुधारून चोऱ्यामाऱ्या कमी झाल्या. सारांश, क्रूरपणाबद्दल अलाउद्दिनास दोष देतांना त्याच्या राज्यकारभाराची प्रशंसा करणें योग्य आहे.

**१०. मुबारिक खिलजी, (स. १३१६–१३२०).**—अलाउद्दीनच्या मरणाचे दुसरे दिवशीं मलीक काफूर ह्यानें मयत बादशहाचा एक खोटाच मृत्युलेख पुढें आणिला, कीं पांच वर्षांचा शहाज़ादा उमरखान यास तख्तावर स्थापून काफूरनें राज्यकारभार पाहवा. त्याप्रमाणें त्या मुलाच्या वडील भावांचे डोळे काढून व त्यांच्या आईस बंदींत ठेवून, काफूर हा

आपण कारभार पाहूं लागला. दिल्लीच्या लोकांस ह्या दुष्ट मनुष्याचा अंमल सोसवेना. त्याच्याच तैनातीस असलेल्या पहारेकऱ्यांनीं त्यास एके रात्रीं ठार मारिलें, आणि मुबारिक नांवाचा चवथा एक मुलगा काफूरच्या तडाख्यांतून शाबूद राहिला होता, तो राज्यकारभार पाहूं लागला. दोन महिनेपर्यंत धाकट्या मुलाच्या नांवानें कारभार केल्यावर, त्याचे डोळे काढून व इतर सर्वांचा शिरच्छेद करून, मुबारिक स्वतःच सुलतान झाला. खिजरखान मेल्यावर त्याची बायको देवलदेवी इला मुबारिकनें आपली पट्टराणी केली.

मुबारिक हा अत्यंत दुर्व्यसनी व हलकट निघाला. तो नेहमीं खाण्यापिण्यांत निमग्न राही. नटव्यासारखा सजून कसबिणींबरोबर थोर लोकांच्या घरीं नाचावयास जाई. तो मोठमोठ्या लोकांची दरबारांत बेअदबी करूं लागला. आपल्या गुलामांतून पुष्कळांस त्यानें मोठ्या पदव्या व हुद्दे दिले. त्यांत हसन म्हणून एक जातिभ्रष्ट गुजराथी होता. त्यास चढवितां चढवितां त्यानें आपला वजीर केलें. ह्या दुष्ट इसमानें मलीक खुस्रू अशी पदवी आपल्यास घेतली. त्या वेळीं दरबारचे सर्व शहाणे व योग्य मनुष्य कित्येक घरीं बसले, आणि कित्येक अब्रू बचावण्याकरितां दूरदेशीं निघून गेले. खुस्रूनें गुजराथेंतील आपल्या जातीचे वीस हजार लोक आणवून त्यांजकडे मोटमोठे अधिकार दिले. मुबारिक याचे हातून कित्येक चांगलीं कृत्येंही झालीं, नाहीं असें नाहीं. अलाउद्दीनचे सतरा हजार बंदीवान होते ते त्यानें सोडून दिले. अलाउद्दीननें जप्त केलेल्या जमिनी सोडून दिल्या; सक्तीचे कर बंद केले; व्यापार व जिंदगी ह्यांविषयीं अलाउद्दीननें ठरविलेल्या निष्कारण हरकती त्यानें दूर केल्या. तथापि आळशी व व्यसनाधीन असल्यामुळें त्याचें कांहीं चाललें नाहीं. धान्याचे दर महाग झाले, मजुरी वाढली, राज्यांत लांच खाऊन पैसे उपटण्याचा सपाटा सुरू झाला.

सन १३१८त त्यानें ऐनुल्मुल्क् नामक सरदारास गुजराथप्रांत सर करण्याकरितां पाठविलें, आणि आपण स्वतः दक्षिणदेशांत फौज घेऊन गेला. रामदेवराव जाधवाचा जांवई हरपाळदेव देवगड येथें स्वतंत्रपणें राज्य करूं लागला होता, त्यास त्यानें जिवंत सोलून हाल करून ठार मारिलें, आणि त्या प्रांताचा चांगला बंदोबस्त करून आपण दिल्लीस परत आला.

यादवांच्या ताब्यांतील स्वतंत्र मराठशाहीचा हा शेवटचा अवशेष नष्ट झाल्यानें दक्षिण देशांत मुसलमानी अंमल कायमचा बसला.

दिल्लीस परत आल्यावर जिकडे तिकडे बंडें होऊं लागलीं. एक बंड मोडावें तों लगेच दुसरें उभें राही. त्यांत निरपराध्यांसही नुसत्या वहिमावरून जबरदस्त शिक्षा होत. येणेंकरून जिकडे तिकडे जुलूम व अंदाधुंदी ह्यांचा प्रळय झाला. बादशहाबरोबर मलीक खुस्रू दक्षिणेंत गेला असतां त्यास त्यानें मलबारदेश जिंकण्यास पाठविलें. त्यानें तो प्रांत एका वर्षांत सर करून अपार संपत्ति दिल्लीस आणिली. तेव्हां सन १३१९ त बादशहानें संतुष्ट होऊन सर्व कारभार खुस्रूचे हातीं सोंपविला. ह्यामुळें सुलतानाचें अनुकरण इतर लोक करूं लागले. लाजलज्जा सर्व सुटली, वेश्यांच्या किंमती शेंकडोंपट वाढल्या, सुलतानानें प्रार्थनेसाठीं मसिदींत जाणें सोडिलें, रमजानचा उपास कोणी पाळीना. पुढें खुस्रूनें मन मानेल तसें आचरण करून प्रत्यक्ष बादशाही तख्त मिळविण्याची खटपट चालविली. अलाउद्दीन व मलीक काफूर, आणि मुबारिक व खुस्रू, ह्या दुकली एकाच प्रकारच्या असून मुसलमान इतिहासकार त्यांजबद्दल अत्यंत तिरस्कार व्यक्त करितात. आपल्या हलकट दोस्तांस बरोबर घेऊन खुस्रूनें सुलतानाचा एके रात्रीं खून केला, आणि आपण दिल्लीचें तख्त बळकाविलें.

**११. खुस्रूचा विक्षिप्तपणा.**—खुस्रूचें एकंदर आचरण चमत्कारिक आहे. धर्मांतर केलेल्या ह्या माणसाच्या हातून परस्परासंबद्ध अशीं कृत्यें पुष्कळ घडलीं. प्रथमतः त्यानें तिजोरी खुली करून फौजेस मुबलक द्रव्य देऊन तिला वश केलें. नंतर नासिर-उद्दीन असें नांव धारण करून तो सुलतान झाला. त्यानें आपल्या नांवानें खुत्बा वाचविला आणि नाणीं पाडिलीं. नंतर त्यानें खिलजी घराण्यांत जेवढे पुरुष होते, त्या सर्वांची कत्तल केली; आणि पुढें हरएक कामांत स्वतःस हिंदु समजून तो मुसलमानांविरुद्ध वर्तन करूं लागला. त्यानें देवलदेवीशीं लग्न केलें. त्याच्या हिंदु अनुयायांनीं दिल्ली येथें सर्व मशिदींत मूर्ति स्थापिल्या. ते कुराणांवर बसूं लागले. जनानखान्यांत त्यांनीं अंगावर शहारे येणारीं कृत्यें केलीं. राजघराण्यांतील व सरदार लोकांच्या स्त्रिया खुस्रूनें आपल्या परिया अनुयायांच्या हवालीं केल्या. पांच महिनेपर्यंत हिंदु बंडवाल्यांच्या ताब्यांत दिल्ली

शहर होतें. शेवटीं मुसलमानांनीं आपला सूड घेतला. पंजाबचा सुभेदार गाजीबेग तुघ्लख हा फौजबंद होऊन दिल्लीवर आला. खुस्रूखानास पकडून त्यानें ठार मारिलें, आणि ग्यासुद्दीन नांव धारण करून तो दिल्लीचा सुलतान झाला, (स. १३२१).

खुस्रूच्या हातीं कारभार असतां, सर्व देशांत इतकी अंदाधुंदी व अव्यवस्था होती, कीं हिंदुराजांनीं यत्किंचित् प्रयत्न केला असता, तर दिल्लीचें तख्त त्यांस सहज मिळालें असतें. चितोड, व रतनभोर येथील राज्यें कायमचीं जिंकलीं गेलीं नव्हतीं, त्यांनीं सुद्धां स्वतंत्र होण्याचा प्रयत्न केला नाहीं, आणि योग्य संधि वायां घालविली.

खुस्रूखान मूळचा परिया म्हणजे अंत्यज होता. मुसलमान झाल्याशिवाय आपला मोठेपणा वाढविण्याचें त्यास साधन नव्हतें. दिल्लीचें तख्त बळकाविल्यावर तेथें हिंदुपदपादशाही व हिंदुधर्म स्थापन करण्याची त्यांची फार इच्छा होती. ह्याबद्दलची सर्व हकीकत मुसलमान ग्रंथकारांनीं दिलेली असल्यामुळें ती निःसंशय एकतर्फी आहे. अलीमहंमदखानानें गुजराथचा इतिहास लिहिला आहे, त्यांत तो खुस्रूखान हा मूळचा रजपूत होता असें सांगतो. ह्या वेळची हिंदूंनीं लिहिलेली माहिती सांपडेल तर वरील बंडाचा चांगला उलगडा होईल. कदाचित् ह्या सर्व प्रकरणांत देवलदेवीचें अंग असेल. मुबारिक तिला आवडत नव्हता. तिनें खुस्रूखानाकडून त्याचा खून करविला असेल. त्या वेळेचें हें बंड दोन जातींच्या लोकांमध्यें चाललें होतें. सन १८५७ सालच्या बंडाशीं ह्याचें पुष्कळ साम्य आहे. दोहोंतही पांच महिने दिल्ली बंडवाल्यांचे ताब्यांत राहून अखेरीस पंजाबच्या* अंमलदाराच्या साह्यानें ती प्राचीन राजधानी पूर्ववत् परकीय अमलाखालीं गेली. दिल्ली शहरांत मुसलमानांचाच बहुतेक भरणा असून, हिंदूंचें बंड सिद्धीस जाणें फारसें शक्य नव्हतें. मलीक काफूर व खुस्रू हे मूळचे हिंदु असून त्यांजकडूनच मुसलमानांच्या ह्यावेळच्या राज्यवृद्धीस विशेष मदत झाली हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे.

---

* १८५७ सालच्या बंडांत दिल्ली परत घेण्याचें काम पंजाबचा अधिकारी सर जॉन लारेन्स याजकडून झालें, ह्या गोष्टीशीं येथें संबंध आहे.

# प्रकरण नववें.

## तुघ्लख घराणें.

### सन १३२१–१३८८.

१. ग्यास्-उद्दीन तुघ्लख, (१३२१–२६). २. आफ्रिकेंतील प्रवासी इब्न भतूता.
३. महंमद तुघ्लख व त्याच्या अडचणी. ४. बंडें व मृत्यु, ( स. १३५१ ).
५. महंमद तुघ्लखाची योग्यता. ६. फिरोज तुघ्लख व त्याचा वजीर.
७. जनहिताचीं कामें. ८. हिंदुधर्मावर वक्रदृष्टि.
९. मृत्यु व योग्यता, ( स. १३८८ ).

**१. ग्यास्-उद्दीन तुघ्लख, (स.१३२१–१३२६).**—तुघ्लख घराणें हें तुर्क–अफगाण जातीचें तिसरें घराणें होय. गुलाम सुलतान बल्बन याचे जवळ ग्यासुद्दीन हा पूर्वीं गुलाम होता. तो लाहोरच्या आसपासच्या शेतकरी लोकांपैकीं असावा. स्वतःच्याच चांगल्या वर्तणुकीनें तो मोठ्या पदास चढला. त्यानें अलांउद्दीनच्या वेळेपासून अनेक वेळां मोगल वगैरे लोकांशीं लढून सरहद्दीचें संरक्षण उत्तम प्रकारें केलें होतें. म्हणून त्यास गाजी-मलीक असें नांव मिळालें. खिलजी घराण्यांत कोणी वारस असेल, तर त्यास तख्तावर बसविण्यास आपण तयार आहों, असें त्यानें प्रथम जाहीर केलें, पण तसा कोणी वारस न मिळाल्यामुळें तो तख्तावर बसला. दिल्लीच्या लोकांनीं त्यास सांगितलें, ‘तुम्हीं इतके दिवस सरहद्दीचा बंदोबस्त ठेविला, हिंदूंच्या व परियाच्या जाचांतून मुसलमानांचा बचाव केला, तर राज्य करण्यास तुमच्याशिवाय दुसरा कोण योग्य आहे?’ त्या भानगडीच्या काळीं मुसलमानी राज्य संभाळण्यास तोच समर्थ होता. दुष्कर्म करून प्रतिष्ठा मिळविण्याचा त्यानें यत्न केला नाहीं. तो एकवचनी व नीतिमान असून लोभिष्ट नव्हता. त्यानें फक्त पांच वर्षें राज्य केलें. पण तेवढ्या अवधींत प्रजेपासून चांगली शाबासकी मिळविली. राज्यकारभाराचे त्यानें नियम बांधिले. त्यानें किल्ले व वाडे नीट केले, आणि कित्येक नवे बांधिले. व्यापार वाढविला. मोठमोठे विद्वान् लोक बोलावून त्यांजकरवीं कुराणाचे आधारानें व दिल्लींतील मूळच्या चालींस अनु-

सरून, कायद्यांचें एक नवीन एकीकरण त्यानें केलें. राज्यावरचे कर त्यानें पुष्कळ कमी केले, तरी मुसलमानांपेक्षां हिंदूंवर कर ज्यास्त बसविला. मोगलांपासून उपद्रव न व्हावा म्हणून त्यानें सरहद्दीचा बंदोबस्त चांगला केला. दक्षिणेंतील दंगा मोडण्याकरितां त्यानें आपला मुलगा जोना ऊर्फ उलुघखान यास तिकडे पाठविलें. पण त्या स्वारींत पराजय होऊन जोनास परत यावें लागलें. सन १३२३त पुनरपि उलुघखान दक्षिणेंत आला, आणि त्यानें तैलंगणची राजधानी वरंगूळ जिंकून, तेथील राजास कैद करून दिल्लीस नेलें. पुढें सुलतानानें कांहीं दिवसांनीं त्यास बंधमुक्त करून त्याचें राज्य त्यास परत दिलें. इकडे बंगालप्रांत बल्बनच्या मृत्यूनंतर बहुतेक स्वतंत्रच होता. तो जिंकण्याकरितां सुलतान तिकडे गेला, तेव्हां बल्बनचा मुलगा बोगराखान याचा नातू नासिरुद्दीन लखनौती येथें कारभार करीत होता, तो सुलतानास शरण आला; तेव्हां त्याचा सत्कार करून, दुसरीं कित्येक बंडें मोडिलीं, आणि तिरहूत म्हणजे प्राचीन मिथिला देश जिंकून ग्यासुद्दीन परत दिल्लीस येत होता, तेव्हां त्याचा मुलगा उलुघखान हा मोठ्या समारंभानें शहराबाहेर बापास भेटण्याकरितां गेला. सुलतानाचा सत्कार करण्याकरितां एक लांकडी डेरा मुद्दाम तयार केलेला होता. तेथें मेजवानीचा वगैरे मोठा समारंभ झाला. त्या प्रसंगीं लांकडी मंडप एकाएकीं पडून त्याखालीं ग्यासुद्दीन व दुसरे पांच असामी चिरडून मेले. त्यांत उलुघखान सांपडला नाहीं; परंतु ग्यासुद्दीनचा दुसरा आवडता मुलगा होता तो सांपडला; ह्यावरून हें सर्व उलुघखानाचेंच कपटकृत्य असावें ह्यांत संशय नाहीं.

दिल्लींत अनेक राज्यक्रांती घडून आल्यामुळें ती जागा तुघ्लख सुलतानास अपयशाची वाटली. ग्यासुद्दीननें दिल्लीस लागून तुघ्लखाबाद नामक एक लहानसा गढीवजा किल्ला बांधिला, त्यावरून तुघ्लख वंशाचें नांव दिल्लीस कायमचें राहिलें आहे. म्हणून ग्यासुद्दीन व त्याचा मुलगा हे नेहमीं तुघ्लखाबादेसच राहत असत. हल्लीं हा किल्ला मोडक्या स्थितींत आहे, तरी त्याचें प्रत्यक्ष स्वरूप पाहिल्यानें त्या वेळची बरीच कल्पना होते. तटाच्या भिंती भव्य व मजबूद आहेत. आंत जाण्याचे दरवाजे वगैरे सर्व खालीं भुयारांत आहेत. किल्ल्यांत बसून बाहेरचें बंड सहज मोडतां यावें अशी व्यवस्था केलेली आहे. तेथून पाहिजे त्या ठिकाणीं लष्कर

पाठविण्याची सोय होती. रस्ते, बाजार, वाडे, बागा ह्यांच्या खाणाखुणा अद्यापि दिसतात. तेथून शहरांत येण्याचा रस्ता भुयारांतून आहे. हल्लीं तेथें लोकवस्ती नाहीं.

२. **इब्न भतूता.**—आफ्रिकाखंडांतील तांजर्स येथें राहणारा इब्नभतूता नामक एक विद्वान् गृहस्थ आशियाखंडांत फिरत फिरत सन १३४०त दिल्लीस आला होता. त्यानें महंमद तुघ्लखच्या दरबारची बरीच हकीकत दिली आहे. तो म्हणतो, ' दिल्ली शहर विस्तीर्ण होतें. एका टोंकापासून दुसऱ्या टोंकाचें अंतर दहा मैल होतें. शहराचे निरनिराळे अनेक भाग निरनिराळ्या राज्यकर्त्यांनीं वसविलेले होते ते असेः—अगदीं जुना भाग कुत्बुद्दीनच्या वेळेस वसलेला, नंतर ' शिरी ' म्हणून अला-उद्दीननें वसविलेला, ग्यासुद्दीननें वसविलेला तुघ्लखाबाद, आणि महंमद तुघ्लखानें वसविलेला ' जहांपन्ना ' ( जगदाश्रय ) नांवाचा भाग. जुन्या भागाचा तट फारच मजबूद असून त्यास अठ्ठावीस दरवाजे होते. निरनिराळ्या भागांतले राजवाडे, मशीदी, तट व कुत्बमिनार इत्यादिकांचें भतूतास मोठें कौतुक वाटलें. अशीं कामें, तो म्हणतो, पृथ्वीवर दुसरे कोठें नाहींत.. तरी दिल्लींतील लोक दक्षिणेंत निघून गेल्यामुळें सर्व शहर ओसाड दिसत आहे. महंमदाच्या राज्यामध्यें प्रकाश व अंधार, न्याय व अन्याय, यांचें चमत्कारिक मिश्रण झालेलें आहे. दंग्याधोप्यांमुळें प्रवास करण्याचें काम मोठें जोखमीचें झालें आहे. तरी राजधानीपासून अगदीं सरहद्दीच्या प्रांतापर्यंत उत्कृष्ट घोडेस्वारांची व पायांनीं चालणाऱ्या कासीद लोकांची बादशहानें टपाल ठेविली आहे.' इब्नभतूता दिल्लीस पोंचला, त्या वेळेस सुलतान तेथें नव्हता. सुलतानाच्या आईनें ह्या परदेशी पाहुण्याचें स्वागत अत्युत्तम केलें. सुलतान आल्यावर त्यानें त्याच्या खर्चाचा बंदोबस्त चांगला करून दिला. इब्नभतूताची मुलगी दिल्लींत वारली, तेव्हां सुलतानानें तिचा उत्तरविधि मोठ्या समारंभानें करविला. त्या समारंभांत सुलतानाचे वतीनें त्याचा वजीर हजर होता. भतूता ह्यास महंमदानें न्यायाधीशाचें काम सांगितलें आणि त्याबद्दल मोठें वेतन करून दिलें. भतूताचें पंचावन हजार दिनाराचें कर्ज सुलतानानें वारिलें. पुढें कांहीं दिवसांनीं दिल्लींत राहणें न आवडून चीनच्या वकिलातीबरोबर भतूता चिनांत गेला. तेथून स्वदेशीं परत गेल्यावर त्यानें आपलें प्रवासवृत्त लिहिलें.

**३. महंमद तुघ्लख व त्याच्या अडचणी.**—पुढें ग्यासुद्दीनचा मुलगा जोना ऊर्फ उलुघबेग महंमद नांव धारण करून तख्तावर बसला. तुघ्लख घराण्यास मार्कोपोलोनें 'करौना' म्हणजे मिश्रजाती ( half-breeds ) अशी संज्ञा दिली आहे. म्हणजे ह्या वंशांतले पुरुष हिंदु स्त्रियांच्या पोटीं तार्तार बीजापासून उत्पन्न झाले होते. गुलाम घराण्यांत जसा बल्बन, अगर खिलजी घराण्यांत अला-उद्दीन, त्याचप्रमाणें तुघ्लख घराण्यांत महंमद तुघ्लख विशेष स्मरणीय आहे. कृतीवांचून कल्पनांतच कांहीं अचाटपणा असेल तर त्यास 'अचाट कल्पनांचा पुरुष' हें नांव शोभेल. त्याच्या कल्पना अगदींच टाकाऊ होत्या असें नाहीं, पण त्या तत्कालीन परिस्थितींत शक्य नव्हत्या. अला-उद्दीन अगदींच निरक्षर होता, पण महंमद तुघ्लख चांगला शिकलेला होता. तत्कालीन शास्त्रकला त्यास चांगल्या अवगत होत्या. फारशी कविता त्यास फारच आवडत असे. तो उत्तम लेखक व उत्तम वक्ता होता. गणितांत त्याची गति उत्कृष्ट होती. वैद्यक, तर्क व न्यायशास्त्रें त्यास चांगलीं येत असून, त्या वेळचे माठमोठे विद्वान सुद्धां त्याजबरोबर वादविवाद करण्यास कचरत असत. त्याचें हस्ताक्षर उत्कृष्ट असून, नाण्यांवर खोदिलेलीं अक्षरेंही सुंदर असलीं पाहिजेत अशी दक्षता त्यानें ठेविली होती. आरबी भाषाही त्यास येत असे. त्याची बुद्धि अचाट असून अगदीं आणीबाणीच्या प्रसंगीं एखादी अजब युक्ति काढून तो लोकांस थक्क करी. तख्तावर येतांच विद्वान् व दोस्त मंडळीस देणग्या व नेमणुका करून देऊन त्यानें जें औदार्य प्रगट केलें, तसें आजपर्यंत कोणत्याही बादशहानें केलेलें नाहीं. त्याचें आचरण धर्मनिष्ठ असे. दारूस तो शिवत नसे. तसेंच नियमितपणा व शौर्य हेही गुण त्याजमध्यें कांहीं कमी नव्हते. त्याची स्मरणशक्ति तर फारच तीव्र होती. त्या वेळचे ग्रंथकार हा कोणी अद्भुत पुरुष होता असें वर्णन करितात. इतकें त्याच्या चांगुलपणाचें वर्णन झालें. पण त्याच्या दुराचाराचीही ख्याति अशाच मासल्याची आहे. तो अत्यंत स्वेच्छाचारी व उतावळा होता. वृथा मनोरथांच्या सिद्ध्यर्थ त्यानें भलतेच उपाय योजिले, त्यामुळें त्याच्या राज्याची व रयतेची अत्यंत दैना उडाली. तो खुनशी व क्रूर होता. एखादे वेळेस त्याचा राग इतका अनावर होई, कीं त्यामुळें हा सर्व मनुष्यजातीचें पृथ्वी-

तलावरून निर्मूलन करून टाकतो कीं काय असें वाटे. व्यावहारिक दूरदृष्टि व परिस्थिति ओळखण्याचें चातुर्य अंगीं नसल्यामुळें, उत्कृष्ट बुद्धीची व विद्वत्तेची हानि कशी होते हें ह्या कार्किर्दीवरून चांगलें कळून येईल. ह्याच्या कारकीर्दीचा इतिहास म्हणजे केवळ त्याच्या चुकांचें वर्णन होय.

**अचाट कल्पनांचा विपरीत परिणाम.**—त्याच्या कार्किर्दीची सुरुवात चांगली झाली. त्या वेळीं बापाचा लौकिक मोठा असून, त्याचाही वोज लोकांत चांगला होता. हिंदुस्थानांत शांतता होती. बंगाल व महाराष्ट्र हे दूरचे प्रांतही राज्यांत मोडत होते. सारांश, त्याला अपयश आलें तें केवळ त्याच्याच कृतीनें आलें, असें म्हणावें लागतें.

दक्षिणदेश जिंकिल्यामुळें राज्याची मर्यादा व जबाबदारी अतोनात वाढली; पण त्यामानानें प्राप्ति कांहींच झाली नाहीं. सर्व प्रांत लुटीनें फस्त झाल्यामुळें लोकांत त्राण राहिलें नव्हतें, म्हणून ते जीव बचावण्यासाठीं निकरानें राजाविरुद्ध उठले. हीं बंडें मोडण्याकरितां महंमदानें आपली फौज रवाना केली. अशा संधीस तुर्मूशिरीनखान नामक एका पराक्रमी सरदाराच्या हाताखालीं मोगलांनीं उत्तरेकडून पंजाबावर हल्ला केला. महंमदाची लढण्याची तयारी नसल्यामुळें त्यानें मोगलांस पुष्कळ द्रव्य देऊन वाटेस लाविलें. ह्या लालुचीनें ते पुनः लवकर इकडे आले नाहींत, हें ह्या सुलतानाचें भाग्य होय. बाकी अशा लालुचीचा परिणाम नेहमीं घातुक होतो. दक्षिणेंतील राजांशीं सलोख्यानें वागून त्यांस त्यानें खुष ठेविलें असतें, तर त्याचा बचाव बऱ्या रीतीनें झाला असता. पैसा नाहींसा झाला, म्हणून त्यानें लोकांवर जबरदस्त कर बसविले. त्या योगानें गरीब होते ते धुळीस मिळाले, आणि श्रीमंत होते ते बंडखोर झाले. लोकांनीं शेती सोडून दिली. धान्य महाग झालें. इतक्यांत मेघराजाची अवकृपा होऊन अवर्षण पडलें, तेव्हां सर्व प्रदेश दुष्काळानें व्यापिला. त्यांत बहुतेक उत्तरहिंदुस्थान भिकेस लागलें; गांवेंच्या गांवें बसलीं; कुटुंबें नाहींशीं झालीं; हजारों लोक मृत्युमुखीं पडले. अर्थात् राजसत्ता व राजवैभव ह्यांचा अस्तसमय प्राप्त झाला.

त्यांतच सुलतानाच्या क्रूर स्वभावाची भर पडली. ह्या क्रूर कृत्यांचें इब्नबतूतानें दिलेलें वर्णन वाचून अंगावर कांटा उभा राहतो. हीं कृत्यें त्यानें स्वतः पाहिलेलीं आहेत. मनुष्यवध करण्यासाठीं हत्ती

शिकवून तयार केलेले होते. ते बंडखोरांस पायांखालीं चिरडून मारीत, अगर दांतांस बांधलेल्या तलवारींनीं त्यांचे तुकडे करून त्यांस वर हवेंत फेंकून देत. प्रत्यक्ष त्यानें आपल्या भावास व पुतण्यास अशा रीतीनें ठार मारिलें. पुतण्यास तर जिवंत सोलून त्याचें मांस शिजवून तें त्याच्या कुटुंबाकडे पाठवून दिलें.

दुष्काळ वगैरे कारणांनीं झालेली दुर्दशा भरून काढण्याकरितां दिल्ली शहर सोडून दक्षिणेंत राजधानी करण्याचा सुलतानानें विचार ठरविला. दिल्लीहून दक्षिणचा बंदोबस्त नीट राहत नसे. दक्षिणेंत सुबत्ता होती, पण तेथील खजिना दिल्लीस सुरक्षित आणण्याची मोटीच अडचण पडूं लागली. तेव्हां दिल्ली सोडण्याचा विचार वावगा नव्हता. पण दिल्लीच्या सर्व लोकांनीं शहर सोडून जाण्याचें कारण नव्हतें. थोडेसे आप्तस्वकीय लोक घेऊन दक्षिणेंत जाऊन त्यास राहतां आलें असतें. तें न करितां, देवगड शहरास दौलताबाद असें नांव देऊन ती आपली राजधानी करण्याचा विचार ठरविला. ह्या योगानें दुष्काळांतून सुटून शिवाय दक्षिणचाही बंदोबस्त होईल, असा त्याचा समज होता. पण ह्या योजनेचे परिणाम विपरीत झाले. दिल्ली शहर आज दोनशें वर्षें राजधानीचें स्थान होतें. तेथून देवगड सातशें मैल दूर असून तेथें जाण्याचा रस्ता भयंकर अरण्यांतून होता. बादशहानें सर्व लोकांस दिल्ली शहर सोडून दक्षिणेंत जाण्याचा हुकूम केला. त्यानें रस्त्यावर गरिबांचे पोटाची वगैरे तजवीज केली. पण दिल्ली शहर ओस पडलें. त्यांत घुबडें व हिंस्र पशु वास करूं लागले. पुष्कळ दिवसांच्या सहवासानें दिल्लीस त्यांच्या सर्व सोयी लागलेल्या होत्या. सातशें मैलांच्या व चाळीस दिवसांच्या ह्या प्रवासांत त्यांस कितीसें सामान बरोबर घेतां येणार ! मुलेंबाळें व नोकरचाकर घेतांनाच त्यांस जड झालें. इकडे देवगडास एकदम सर्वांची सोय लागणें शक्य नव्हतें. प्रवासाच्या त्रासानें असंख्य लोक प्राणांस मुकले. देवगडास पोंचल्यावर अनेक लोकांचा संहार झाला. ह्या कृत्यांत इतका कहर उडाला, कीं अखेरीस सुलतानानें सर्व लोकांस दिल्लीस परत बोलाविलें. पण एकवार मोडलेला मेळ पुनः कसा बसावा ? पुनः परत येण्यामध्यें आणखी पुष्कळ लोकांचा फडशा उडाला. हे सर्व लोक मुसलमान होते. दिल्लीपासून दौलताबादचा रस्ता उत्कृष्ट होता

म्हणून बरें. रस्त्याच्या दोनही बाजूंस झाडें लावलेलीं असून, आपण एखाद्या बागांतूनच चाललों आहें असें प्रवाशास वाटे.

अशा कचाट्यांत सांपडला असतां पैशाची अडचण भरून काढण्यासाठीं महंमदानें तांब्याचीं नाणीं सोन्याच्या नाण्यां-ऐवजीं चालविण्याचा हुकूम केला. चीनदेशांत एक प्रकारचें कागदाचें नाणें चालवितात, म्हणून त्यानें ऐकिलें होतें. त्या काग-दांवर बादशहाचा मुखवटा छापिलेला असून हल्लींच्या कागदी नोटीप्रमाणें सरकारी तिजोरींत कागद दिला, म्हणजे त्याचे पैसे मिळत. ह्या कागदा-च्या ऐवजीं महंमद तुघ्लखानें तांब्यांचे तुकडे तयार केले, आणि त्या तुक-ड्यांवर दाखल केलेल्या आंकड्यांस अनुसरून सोन्याच्या नाण्यांसारखी देवघेव व्हावी असें फर्माविलें. शिक्षेच्या भीतीनें लोक तें नवीन नाणें  मानूं लागले; आणि जर कपट करण्यास लोकांस जागा मिळाली नसती, तर ह्या क्लृप्तीचे इतके वाईट परिणाम झाले नसते. बनावट नाणीं साफ बंद झाल्याशिवाय असले उपाय सिद्धीस जाणें शक्य नाहीं. परंतु ह्या सर-कारी नाण्यांच्या हुबेहूब नाणीं लोकांनीं तयार केलीं. सरकारांत भरावयाचा पैसा सोन्याच्या नाण्यांत न भरतां ह्या तांब्याच्या तुकड्यांनीं ते भरूं लागले. तसेंच तांब्याचीं नाणीं स्वस्त झाल्यामुळें लोक घोडे, हत्यारें, मौल्यवान जिन्नस भराभर खरेदी करूं लागले. हिंदुस्थानांत तयार झालेले जिन्नस तांब्याच्या नाण्यांत विकत घेऊन व्यापारी लोक ते परदेशांत सोन्याच्या किंमतीस विकूं लागले. ह्यामुळें लोकांचा फायदा झाला, पण सरकारचें सर्वस्वी नुक-सान झालें. परदेशांतून हिंदुस्थानांत माल येण्याचें बंद झालें. त्यामुळें व्यापार बसला. तांब्याच्या नाण्यास कोणीं विचारीनासें झालें. राज्यक्रांतीच्या व धामधुमीच्या अशा त्या काळांत ह्या हलक्या व खोट्या नाण्यांवर लोकांचा विश्वास बसेना ह्यांत नवल नाहीं. सोन्याची किंमत चौपट वाढली. हे परिणाम पाहून सुलतान क्रोधानें वेडा होऊन गेला. काय करावें हें त्यास सुचेना. तेव्हां रागारागानें त्यानें नाण्यांचा कायदा रद्द केला आणि सर्वांना नाण्यांची किंमत सोन्यांत देण्यास आपण तयार आहों असें त्यानें जाहीर केलें. पण तांब्याचीं नाणीं भराभर नवीन होऊं लागल्यामुळें त्यास आपलें वचन पाळितां येईना. तुघ्लखाबाद येथें तांब्याच्या नाण्यांचे पर्वतप्राय ढीग

जमले. तिजोरींतील सोनें खलास झालें. तेव्हां अर्थात् तिजोरी बंद करावी लागली. येणेंप्रमाणें ह्या अनर्थमूलक प्रयोगाचा शेवट झाला.

तथापि हे सर्व भयंकर परिणाम एकदम घडून आले नाहींत. सर्व फौजेचा पगार सुलतान ह्या नवीन नाण्यांत देई. लष्करी लोक तें नवीन नाणें नेहमीं वापरीत. म्हणून आपली युक्ति सिद्धीस गेली असें वाटून सुलतान आरंभीं अगदीं चढून गेला होता. पुढें चीनदेश जिंकण्यासाठीं त्यानें आपला पुतण्या खुस्रूमलीक यास हिमालयाच्या पहाडांतून एक-लाख फौजेसह रवाना केलें. मोठ्या कष्टानें नेपाळच्या रानांतून वाट काढीत स. १३३७ त खुस्रूमलीक चीनच्या हद्दीवर येऊन पोंचला. तेथें चिनी फौजेशीं संग्राम होऊन खुस्रूस परत फिरावें लागलें. त्याच संधीस पर्ज-न्यानें सर्व प्रदेश जलमय झाला. त्यांत व थंडीवाऱ्यांत उपासमार होऊन सर्व फौजेचा संहार झाला. एक लाखापैकीं फक्त दहा असामी मात्र ह्या अनर्थाची बातमी सांगण्यास परत आले. नंतर दुसरी एक मोठी फौज तुर्कस्तान व इराण हे देश जिंकण्याकरितां त्यानें तयार केली. तीस एक वर्षपर्यंत रिकामी बसवून पगार द्यावा लागला. इतक्यांत तिजोरी रिकामी झाल्यामुळें त्या फौजेस रजा द्यावी लागली. तींतील लोक मोकळे झाल्यावर सर्व देश उद्ध्वस्त करीत फिरूं लागले. देशभर दरवडेखोरांनीं आंकांत करून सोडिला.

**४. बंडें व मृत्यु, (स.१३५१).**—महंमद तुघ्लखाचे हातून कोणत्याही कामाची तड लागली नाहीं. जसजशा ज्यास्त अडचणी येत चालल्या, तसतसा त्याचा स्वभाव क्रूर बनला. कर्शास्प नामक त्याच्या पुतण्यानें बंड केलें, तेव्हां त्यास पकडून सुलतानानें दिल्लीस नेलें. तेथें जिवंत सोलून व नानाप्रकारचे हालहाल करून त्यानें त्याचा जीव घेतला, (स. १३३८). पारधीकरितां राखून ठेविलेल्या रानांत कोणीं हुकु-माशिवाय शिकार केल्यास, तो त्यास भयंकर शिक्षा करी. शिवाय मनुष्याची पारध करण्याची त्यानें अशी एक दुष्ट युक्ति काढिली होती, कीं तिच्यासारखें मानवी क्रौर्याचें उदाहरण इतिहासांत सांपडणें कठीण आहे. तो एकाद्या मोठ्या प्रदेशाला सैन्याचा वेढा घाली. नंतर तो वेरा संकोचित करीत जाऊन आंत जे कोणी सांपडतील, त्यांची रानांतील सावजांप्रमाणें शिकार व कत्तल करी. त्यांत बहुधा निरुपद्रवी शेतकरी

लोक सांपडत. अशी मनुष्यांची शिकार त्यानें अनेक वेळां केली. एका प्रसंगीं तर कनोज शहरांतील सर्व मनुष्यांची त्यानें कत्तल उडविली. तेव्हां देशांत दुष्काळ पडून लोक भिकेस लागले.

जमाबंदीची व्यवस्था देशांत सुरू करणारा हाच पहिला मुसलमान शहा होय. गंगा व यमुना यांजमधील प्रदेशांत त्यानें जमिनीचा सारा दसपट व कांहीं ठिकाणीं तर वीसपटही वाढविला. त्याचे कामगार वसूल करावयास गेले असतां, सर्व लोक गांवें सोडून पळून जात व दरवडे घालीत. येणेंकरून शेतीच्या जमिनींत जंगलें वाढलीं. दहशत बसविण्याकरतां हजारों लोक मारून त्यांचीं शिरें त्यानें दिल्लीच्या तटावर रोंविलीं. ह्या सर्व कृत्यांचा परिणाम असा झाला, कीं जिकडे तिकडे झोटिंगशाही माजली. बंगाल, मलबार व दक्षिण ह्या प्रांतांत निरनिराळ्या लोकांनीं उचल खाऊन स्वातंत्र्याचा झेंडा उभारिला. सुलतान दिवसेंदिवस ज्यास्तच चवताळत चालला. स्वतःच्याच प्रजेशीं तो लढूं लागला, आणि तलवार व अग्नि ह्यांचा त्यांजवर त्यानें भडिमार चालू केला. तेव्हां लोक शेतांभातांस आग लावून, गुरें रानोमाळ सोडून, वाट फुटेल तिकडे पळूं लागले. नेहेमींच्या उदरंभरणाच्या जिनसांवर त्यानें असे जबरदस्त कर बसविले, कीं आपल्या श्रमाचें फळ मिळण्याची आशा नाहींशी होऊन, लोकांनीं आपलीं कामें सोडून दिलीं. अर्थात् कोणांतही त्राण राहिलें नाहीं.

सरते शेवटीं दक्षिणेंतील बंड विकोपास गेलें. मुसलमानांस कायमचे हांकून देण्यास ही संधि बरी आहे, असें पाहून मोठमोठ्या हिंदु राजांनीं कट केला. होयसळराजा बल्लाळदेव, वरंगूळच्या रुद्रदेवाचा पराक्रमी मुलगा कृष्णनाईक व अनागोंदीचा बुकरराय वगैरे झाडून साऱ्या लहान मोठ्या राजांनीं हिंदूंचा मोठा कट केला; आणि ते मुसलमानांस मागें हटवीत इतके पुढें आले, कीं दौलताबादेशिवाय दुसरें एकही स्थळ दिल्लीच्या सुलतानाकडे राहिलें नाहीं. ह्याच धामधुमींत कलबुर्गा येथें बहामनी राज्याची व विजयनगर येथें हिंदु राज्याची स्थापना झाली, त्यांच्या हकीगती पुढें येतील. शेवटीं महंमद तुघलख स्वतः सेनापत्य स्वीकारून दक्षिणेंत आला. दौलताबादचा बंदोबस्त करितो आहे, इतक्यांत गुजराथेंत बंड उठल्याची वार्ता त्यास कळली, तेव्हां तो गुजराथेंत गेला. तेथें असतां सिंधचे बंडखोर राजाची खोड मोडण्यासाठीं त्यानें सिंधुनदींत ठठ्ठा

येथें पुष्कळ होड्या जमविल्या. तेथें त्यास ज्वर येऊं लागला, आणि चांगला बरा होण्यापूर्वीच उतावळ करून पुनरपि बाहेर पडल्यामुळें दुखणें उलटून, हा विक्षिप्त सुलतान, सत्तावीस वर्षें राज्योपभोग घेऊन, ठठ्ठा येथें स्वर्गवासी झाला.

ह्या कार्किर्दीत पुष्कळ मोगल लोक मुसलमानी धर्म स्वीकारून हिंदुस्थानांत येऊन राहिले. तसेंच हिंदुस्थानच्या निरनिराळ्या प्रांतांतील अंमलदार स्वतंत्रतेनें कारभार पाहूं लागले. बंगाल व कर्नाटक हे प्रांत तर मुसलमानांच्या हातांतून गेले. अफगाण व गकर लोकांनीं वायव्येकडच्या सरहद्दीवरील प्रांत बळकाविले. महाराष्ट्रांत सुलतानाचा जांवई इमाद-उल्मुल्क यास हसन गंगूनें ठार मारून बहामनी नांवाचें स्वतंत्र राज्य स्थापिलें. येणेंप्रमाणें स्वतंत्र झालेल्या राज्यांचे इतिहास पुढें निराळ्या प्रकरणांत देण्यांत येतील.

**५. महंमदाची योग्यता.**—महंमदाचे वेळेस दक्षिणदेशाचा वसूल १,१६,६०,००० रुपये होता. ह्याचे कार्किर्दीचे आरंभीं राज्यविस्तार होता, तेवढा येथें ह्यापूर्वी कोणत्याही मुसलमान सुलतानाचे ताब्यांत नव्हता. उद्योगानें व विद्येनें नरदेहास शोभा आणून दुष्कृत्यांनीं त्यास डाग लाविल्याची त्याची सुकीर्ति व दुष्कीर्ति महंमदाचे पाठीमागें राहिली आहे. दौलताबादचा प्रचंड किल्ला ह्या सुलतानानें बांधिला. त्याचा तट तिहेरी असून तो १८० फूट उंचीचा गुळगुळीत असा दगडांत कापून काढिलेला आहे. सभोंवार तिहेरी खोल खंदक असून किल्ल्यांत जाण्याचा रस्ता फार वांकडा तिकडा आहे. हें प्रचंड कृत्य पाहिलें म्हणजे सुलतानाच्या अकलेची तारीफ केल्यावांचून राहवत नाहीं.

महंमदाच्या कल्पना अचाट असत हें वर सांगितलेंच आहे. तीव्र बुद्धि, जबरदस्त स्मरणशक्ति व कधीं हार न खाणारी इच्छा ह्या गुणांमुळेंच त्याचा अखेरीस बोजवारा झाला. राजधानी बदलणें व नवीन नाणें सुरू करणें ह्या दोनही कल्पना चांगल्या होत्या, पण त्या घाईनें व आग्रहानें तडीस जाणाऱ्या नव्हत्या. लोकांस चालू असलेली पद्धत आवडते; त्यांत बदल झाला, कीं त्यांचीं मनें चलबिचल होतात. तेव्हां राज्यकारभारांतील कोणत्याही नवीन सुधारणा हळूहळूच तडीस जावयाच्या.

त्या लोकांस एकदम पसंत पडल्या नाहींत, तर त्याजबद्दल त्यांस जबरदस्त शिक्षा करण्याचें प्रयोजन नव्हतें. पण महंमदास वाटे, जी गोष्ट चांगली आहे, ती एकदम अंमलांत आली पाहिजे. त्यांत विलंब लागल्यास तो लगेच चवताळून जाई. सारांश, व्यवहारशून्यतेमुळें तो शेवटीं फसला. बंडें मोडण्यासाठीं त्यास कडकपणा धारण करावा लागला, तेव्हां लोकांचें बरें करीत असतांही, ते त्याचा द्वेष करूं लागले; आणि सव्वीस वर्षें राज्य करून शेवटीं परिणाम काय, तर राज्याचे तुकडे झाले; लोकांत सर्वत्र बंडें सुरू झालीं, आणि सरकार व लोक सर्वथैव निर्धन बनले.

महंमद तुघ्लख आपल्या कामांत सहसा कोणाची सल्ला घेत नसे. एके दिवशीं इतिहासकार बराणीस त्यानें भेटीस बोलाविलें. 'माझ्या राज्यास कीड लागलेली दिसते, त्यास उपाय काय करावा, सांगा! वैद्य औषध देऊन एक रोग बरा करितो, तों दुखणें दुसरीकडेच उमटतें. तशी माझ्या राज्याची स्थिति झाली आहे.' बराणी म्हणाला, 'अशा स्थितींत तुम्ही राज्य सोडा, अगर चार शहाण्या माणसांकडे सर्व कारभार सोंपवून तुम्ही बाजूस रहा'. ही कल्पना सुलतानास पटली पण रुचली नाहीं. तो म्हणाला,

'हल्लीं लोक मजवर चिडले आहेत, आणि मलाहि त्यांचा राग आला आहे. मी त्यांच्या बऱ्याकरितां झटतों हें ते ओळखतात, आणि मलाहि त्यांच्या दुर्दशेची दया आल्याशिवाय राहत नाहीं. पण माझा कोणताच उपाय सिद्धीस जात नाहीं. माझा उपाय तलवार. पण तलवारीनें काम भागत नाहीं.' अशा प्रकारें नाना तऱ्हेचे विचार सुलतानाच्या डोक्यांत घोळत खरे, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. वास्तविक त्याची चूक अशी झाली, कीं कोणताही बरा वाईट प्रकार दृष्टीस पडल्याबरोबर लगेच उतावळीनें त्याचा उपाय केल्यास, तो तडीस जात नाहीं. तो प्रकार कांहीं दिवस तसाच चालूं द्यावा. त्याबद्दल एकदम संतापून अगर उतावळेपणा करून राज्यकारभार कधीं चालावयाचा नाहीं. इब्न बतूतानें सुलतानाच्या स्वभावाचें वर्णन येणेंप्रमाणें केलें आहे. 'लोकांवर उपकार करणें व त्यांस तलवारीच्या धारेखालीं धरणें ह्या दोनही गोष्टी एकदम करणारा मनुष्य सुलतानाशिवाय दुसरा कोणी सांपडणार नाहीं. सुलतानाच्या हातून द्रव्य मिळवून दुःख निवारण झालेला भिकारी, आणि त्याच्याच हातून शिक्षा झालेल्या इसमाचें प्रेत, अशांची

जोडी त्याच्या वाड्याच्या दारांत सदैव दिसून येत असे! त्याच्या औदार्याच्या व क्रूरतेच्या दोनही गोष्टी लोकांस चांगल्या अवगत आहेत. न्याय व खरेपणा ह्यांत सुलतानाचा हात धरणारा कोणी सांपडणार नाहीं. तो अत्यंत धर्मनिष्ठ आहे. परंतु सर्वांत त्याचा मोठा गुण म्हणजे परोपकार होय.' ह्या त्याच्या परोपकारानेंच त्याच्या सर्व अडचणी उत्पन्न झाल्या. पैसा पुष्कळ असला तरी उधळेपणाला तो कितीसा पुरणार! त्याचा दरबारचा खर्चही अतोनात होता. विशेषतः परकी लोकांवर त्याची बहाल मर्जी असे. भतूतावर त्यानें अतोनात उपकार केले. दिल्लीस कोणीही परदेशांतला इसम आला, कीं त्याची संभावना सुलतानाकडून चांगली होत असे. अनेकांस तो जहागिरी व उत्पन्नें तोडून देई; कित्येकांचा खर्च सरकारांतून चालवी. सर्व प्रकारच्या विद्वानांस त्याचा नेहमीं मोठा आश्रय असे. त्याच्याकडे येऊन कोणी विन्मुख गेला असें होत नसे. त्याच्या बापानें पुष्कळ संपत्ति मिळवून ठेविली होती, ती सर्व वरप्रमाणें लोकांस वांटण्यांत आणि इराण व चीन देश जिंकण्यांत त्यानें खर्चून टाकिली. त्यामुळेंच तो पैशाच्या पेंचांत आला. लोक वसूल बरोबर देत नाहींत, असें वाटून त्यानें हिंदु शेतकऱ्यांवर शस्त्र धरिलें, आणि फौजेच्या गराड्यांत त्यांस कोंडून हिंस्र पशूंसारखी त्यांची शिकार चालविली. अशा रीतीनें दुआब, कनोज इत्यादि समृद्ध प्रांत ओस झाले.

उतावळेपणानें अशीं क्रूर कृत्यें सुलतान करी, तथापि एकदां आपली चूक झाली असें कळल्यावर, ती दुरुस्त करण्यास तो विलंब करीत नसे. दिल्ली शहरच्या लोकांची दक्षिणेंत झालेली दुर्दशा पाहून, त्यांचें दुःख परिहार करण्याचे त्यानें अनेक प्रयत्न केले. त्यानें लोकांवरचे कर कमी केले; सहा महिनेपर्यंत दिल्लींतील लोकांस फुकट शिधा वांटला; आणि शेतकऱ्यांस कर्जाऊ रकमा देण्याची व्यवस्था केली.

नवीन फेरफारांनीं लोकांत असंतोष पसरून जीं बंडें सुरू झालीं, त्यांस दुसरीं अंतस्थ कारणेंही बरीच होतीं. पूर्वीं खिलजीच्या वेळचे प्रांतिक कामगार अस्सल तुर्क होते. ते आपल्या धन्याबरोबर इकडे येऊन स्थायिक झाले होते. पण तुघ्लख हे अस्सल तुर्क नव्हते, म्हणून त्यांजबद्दल तुर्क सरदारांस आदर वाटत नव्हता. तसेंच तुघ्लखांनीं पूर्वींचे तुर्क अंमलदार कारभारावरून काढून टाकिले; आणि त्यांच्या जागीं अफगाण, मोगल

११-७९१-२०००

वगैरे अनेक परदेशी लोक केवळ पैशाच्या लालुचीनें इकडे आलेले होते, त्यांस निरनिराळ्या प्रांतांतील कारभारावर नेमिलें. त्यांची दृष्टि केवळ स्वतःच्या तुंबड्या भरण्याकडे असून, मुख्य राज्याविषयीं त्यांस बिलकुल अभिमान नव्हता. ह्या नवीन लोकांस ' परदेशी अमीर ' असें टोपणनांव मिळालें होतें. आरंभींच्या मुसलमानांचा करडा दम हळू हळू थंडावत चालला होता.

राज्यरोहणाच्या वेळीं महंमद तुघ्लखाच्या टंकसाळी उत्तरेस दिल्ली, आग्रा, व तिर्हूत, दक्षिणेस दौलताबाद, वरंगूळ (नवीन नांव सुलतानपूर), बंगाल्यांत लखनौती, सातगांव, सोनारगांव, इत्यादि दूरदूरच्या ठिकाणीं पसरलेल्या होत्या. त्याच्या राज्याचे तेवीस सुभे होते. सगळ्या मुसलमानी अमलांत, त्याच्याइतका राज्यविस्तार फक्त औरंगजेबाचा होता. परंतु महंमद तुघ्लखाच्या हयातींतच राज्यास ओहोट लागली. निरनिराळ्या ठिकाणीं बंडें होऊन एकामागून एक परगणे स्वतंत्र होऊं लागले.

सुलतानानें आपलें राज्य राखण्यासाठीं नाहीं नाहीं ते उपाय करून पाहिले. कैरोच्या खलीफाकडून आपल्याला नवीन वस्त्रें आणविलीं; आणि त्याजकडून सुलतान हें पद मिळवून तें प्रांतोप्रांतीं जाहीर केलें, (सन १३४३). बगदादच्या खलीफाचा एक वंशज रानोमाळ भटकत होता, त्यास मोठ्या इतमामानें दिल्लीस आणून त्याचा सत्कार करण्यांत अतोनात खर्च केला, आणि त्याचा पवित्र पाय आपल्या शिरावर धारण केला. कोणीकडून तरी मुसलमानांत पुनरपि जागृति होऊन त्यांनीं आपणांस साह्य करावें अशी सुलतानाची खटपट होती. पण ह्या युक्त्यांनीं लोकांच्या मनांत राजनिष्ठेचा लवलेश उत्पन्न झाला नाहीं. चलचित्त सुलतानावर कोणाचाच भरंवसा बसला नाहीं. अशा संकटांनीं, अडचणींनीं, व दुःखानें गांजून जाऊन, आणि क्रोधानें व निराशेनें वेड लागल्यासारखा होऊन, ह्या सुसंस्कृत सुलतानाचा असा शोकपर्यवसायी शेवट झाला.

वरील हकीकतींत लोकांना बक्षिसें देणें, त्यांची मनधरणी करणें इत्यादि उल्लेख आले आहेत, ते बहुधा मुसलमानांविषयींचे असून, हिंदूंच्या वांट्यास शिक्षांचा व क्रूरपणाचाच भाग बहुशः आलेला होता, हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे.

राज्यांत बंडें झालीं; जिकडे तिकडे धामधूम चालू होती; निरनिराळे प्रांत स्वतंत्र होत होते; अशा स्थितींत हिंदु राजांनीं स्वतंत्र होण्याचा प्रयत्न केल्याचें दिसत नाहीं. नाहीं म्हणण्यास विजयनगरचा मात्र एक प्रयत्न झाला. लहान लहान मुसलमान सरदार जर स्वतंत्र होऊं शकले, तर मूळपासूनच ज्यांचा जम बसलेला होता, अशा हिंदु राजांस स्वतंत्र होण्यास फारसा प्रयास पडला नसता. ह्या वेळच्या स्थितीची हिंदूंच्या तर्फेची हकीकत उपलब्ध नसल्यामुळें, वरील मजेदार प्रश्नाची चर्चा करितां येत नाहीं. ह्या वेळची सर्व माहिती मुसलमानी ग्रंथांतच कायती आहे.

**६. फिरोज तुघ्लख व त्याचा वजीर.**—महंमद तुघ्लख मरण पावल्यावर हिंदुस्थानास कांहीं दिवस शांतता प्राप्त झाली. एखादा आजार येऊन गेल्यावर त्यांतून मनुष्य हळूहळू बरा होऊं लागतो, अथवा वादळ निघून गेल्यावर जिकडे तिकडे शांतता होते, तशांतला प्रकार राज्यांत झाला. लोकक्षोभाचें मूळ नाहींसें होऊन त्यांच्या वाटेस कोणी गेलें नाहीं म्हणजे ते शांत असतात, ही गोष्ट निदर्शनास आली. मरणसमयीं महंमदानें आपला चुलतभाऊ फिरोज यास आपल्या पाठीमागें तख्तावर बसविण्याचें ठरविलें होतें. त्याअन्वयें थोडी गडबड होऊन फिरोज तुघ्लख तख्तनशीन झाला. फिरोजनें सदतीस वर्षें राज्य केलें. ह्या अवधींत एकही बंड झालें नाहीं. राज्यावर आला, तेव्हां फिरोजचें वय ४५ वर्षांचें होतें. त्याची आई ही दीपलपूरच्या रजपूत राजाची कन्या. दीपलपूरचा राजा मलभट्टी यानें आपली मुलगी फिरोजच्या बापास दिली नाहीं, म्हणून त्यानें दीपलपूरवर स्वारी करून राज्यांत धुमाकूळ आरंभिला. तेव्हां आपल्या लोकांचा जाच बंद करण्याकरितां तिनें आपखुशीनें तुर्क सरदाराशीं लग्न लाविलें. तिचा मुलगा फिरोज. प्रथम ग्यासुद्दीननें त्यास लहानाचा मोठा केलें, आणि पुढें महंमद तुघ्लखनेंही त्यास चांगलें शिक्षण दिलें. त्यानें महंमदाच्या चुका प्रत्यक्ष पाहिलेल्या असल्यामुळें, त्यांचें इंगित ध्यानांत ठेवून तदनुसार आपली राज्यपद्धति ठरविली.

बंगालप्रांत स्वतंत्र झाला होता, त्यावर फिरोजनें लढाईच्या निमित्तानें दोन स्वाऱ्या केल्या, एक स.१३५३त व दुसरी स. १३५९ त. पहिलींत अठरा हजार बंगाली मारले गेले. पण पर्जन्यामुळें त्यास परतावें लागलें. पुढें ज्यास्त मुलूख जिंकण्याचे नादास लागणें श्रेयस्कर नाहीं, असें फिरोज-

शहास वाटून, त्यानें बंगाल प्रांत परत मिळविण्याचा यत्न सोडून दिला, आणि दक्षिणच्या सुलतानाचें स्वातंत्र्य त्यानें कबूल केलें, ( स. १३५४ ). दक्षिणचे सुलतान कांहीं दिवस दिल्लीच्या सुलतानास खंडणी देत असत. त्याच वर्षी फिरोजशहानें दिल्लीनजीक एक नवीन शहर स्थापून त्यास स्वतःच्या नांवावरून फिरोजाबाद असें नांव दिलें. त्यानें शांततेनें राज्य केलें. लढाया करणें त्यास आवडत नसे. देशांतील व कोनाकोपऱ्यांतील दूरदूरचे प्रांत जिंकण्यांत व्यर्थ श्रम व पैसा खर्च करणें हें आपलें कर्तव्य आहे असें फिरोज समजत नसे. राज्य लहान कां होईना, पण त्याची व्यवस्था उत्कृष्ट ठेवणें ह्यांतच तो भूषण मानी. ह्या त्याच्या शहाणपणामुळें त्यानें मुसलमानी इतिहासांत आपलें नांव चिरस्मरणीय करून ठेविलें आहे.

फिरोजनें बंगाल्यावर स्वाऱ्या करण्याचे दोन तीन प्रयत्न करून पाहिले, पण ते साधले नाहींत. स. १३५९त पुनरपि बंगाल्यावर स्वारी केली, तींत त्याचा हेतु न साधून बंगालच्या राजाशीं त्यानें तह केला. पुढें कांहीं दिवसांनीं त्यानें ठठ्ठावर स्वारी केली. ही स्वारी त्यानें सिंधुनदींतून केली. पांच हजार बोटींतून कांहीं फौज नदींतून खालीं आली आणि कांहीं जमिनीवरून आली. मुसलमानांस अनेक संकटें सहन करावीं लागलीं. शेवटीं सिंधप्रांत जिंकून त्यानें तेथील राजास दिल्लीस आणिलें आणि त्यास इतमामानें वागविलें. ह्या स्वारींत फिरोजचीं अडीच वर्षे खर्च झालीं.

**वजीर मक्बुलखान.**—फिरोजशहाच्या यशस्वी कारभाराचें बरेंचसें श्रेय त्याचा वजीर मक्बुलखान ह्यास आहे. हा गृहस्थ मूळचा तैलंगणांतल्या एका उच्च कुळांतला हिंदु असून, त्यानें मुसलमानी धर्म स्वीकारिला होता. महंमद तुघ्लखच्या वेळेस त्यानें वरींच वर्षे चांगलें काम केलें असून, फिरोज तर केवळ त्याच्या मुठींत होता. फिरोज म्हणे, 'माझा खान्–इ–जहानच खरा सुलतान आहे.' खानिजहान ( जगत्प्रभु ) हा प्रत्येक वजिराचा किताब असे. त्याजवर फिरोजची बहाल मर्जी होती. ह्या वजिराच्या प्रत्येक मुलामुलीस दरसाल एक हजारांचें वेतन फिरोजशहानें करून दिलें होतें. वजिराच्या जनानखान्यांत दोन हजार स्त्रिया असून, त्यांत पश्चिमेकडील ग्रीस देशापासून, पूर्वेकडील चीन देशापर्यंतच्या टापूंतील हरएक वर्णाच्या स्त्रिया होत्या. एवढ्यांचा खर्च किती असेल ह्याचा कल्पनाच केली पाहिजे. पण एवढ्या मोठ्या वेतनाचा मो-

बदला वजिराच्या नोकरीनें सुलतानास पुरेपूर मिळाला. फिरोज जेव्हां बाहेर स्वाऱ्यांत किंवा प्रांतांत फिरत असे, तेव्हां हा वजीर सर्व कारभाराचा बंदोबस्त उत्कृष्ट ठेवी, आणि सुलतानास कोणतीही तखलीफ पडूं देत नसे. ह्यामुळेंच राज्यांत प्रजाहिताचीं वगैरे कामें करण्यास सुलतानास फुरसत मिळाली. फिरोजचा जन्म हिंदु आईपासून, आणि त्याचा वजीर मूळचा हिंदु. ह्या कारणांमुळेंच तुर्क लोकांसारखे क्रूरपणाचे अत्याचार ह्या कार्किर्दींत घडले नाहींत. विशेषतः शेतकरी लोकांची काळजी विशेष घेण्यांत येई. मागील कार्किर्दींतल्या तगाईच्या बाक्या लोकांकडे येणें होत्या, त्या ह्या सुलतानानें माफ करून, कर्जरोख्यांचे सर्व कागद फाडून टाकिले.

**७. जनहिताचीं कामें.**—फिरोज तुघ्लखनें प्रजेच्या हितासाठीं पुष्कळ पैसा खर्च करून अनेक कामें केलीं. त्यांची संख्या मुसलमानी इतिहासांत खालीं लिहिल्याप्रमाणें दिलेली आहे:—४० मशीदी, ५० धरणें, ३० पाठशाला, १०० धर्मशाळा, २०० शहरें, ५ प्रार्थनामंदिरें, १०० सार्वजनिक स्नानगृहें, २० राजवाडे, १०० रोगचिकित्सागृहें, १० मनोरे, १० मोठाल्या विहिरी, ३० मोठे तलाव, व १५० पूल. ह्यांशिवाय त्यानें अनेक मोठमोठे कालवे बांधिले ; त्यांतून तीन विशेष सुप्रसिद्ध आहेत. यमुनानदींतून एक कालवा त्यानें कर्नूळजवळ फोडून, तो पानिपतच्या समरभूमीच्या बाजूनें विकानेरच्या वाळवंटांतून थेट हंसी व हिसारपर्यंत नेला, ( स. १३५५ ). हिसार हें नवीन शहर दिल्लीनजीक स्थापून तेथेंच स्वतः सुलतान राहत असे. ह्या कालव्यानें त्याच्या ह्या राहत्या शहरास पाण्याचा पुरवठा झाला. तो कालवा अद्यापि चालू असून इंग्रज सरकारानें दुरुस्त ठेविला आहे. त्याच्या दुसऱ्या कालव्यानें सतलज व घोगरा ह्या नद्या यमुनेशीं जोडल्या गेल्या. तिसरा एक मोठा कालवा त्यानें सरस्वतीनदीपासून कुगरनदीपर्यंत आणिला. त्यांत वर्षानुवर्ष जिवंत पाणी राहून सरहिंद व मनसूरपूर येथील लोकांची मोठी सोय झाली. ह्या कालव्यावर पन्नास हजार मनुष्यें पुष्कळ दिवस काम करीत होतीं. हा कालवा हल्लीं चालू नाहीं. पण त्यासंबंधीं एक गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी अशी आहे, कीं हा कालवा खोदीत असतां अवाढव्य आकाराच्या मानवी प्राण्यांचीं हाडें जमिनींत सांपडलीं. त्यांत कांहीं हाडें हत्तीचींही होतीं. त्यांत माणसांचें

हाड तीन गज म्हणजे पांच फूट दोन इंच भरलें, असें लिहिलेलें आहे. हीं माणसें कधींचीं असतील तीं असोत.

फिरोज तुघ्लखाचे पूर्वी शेतीच्या सुधारणेसाठीं कालवे बांधण्याचें काम उत्तरहिंदुस्थानांत कोणीं केलेलें नव्हतें. तैलंगणांत पूर्वीपासून कालवे असून त्यांचा उपयोग फिरोज यास स्वतः कळून आला होता. त्यावरून त्यानें ती युक्ति उत्तरहिंदुस्थानांत चालू केली. तसेंच पडित जमिनी लागवडींत आणून, राज्याचा वसूल वाढविण्याच्या अनेक तजविजी सुलतानानें केल्या. वरील कालव्यांमुळें पुष्कळ जमिनी दुपिकी झाल्या. फिरोजशहाच्या कामांत नवीन रस्ता बांधल्याचें एकही उदाहरण नाहीं हें आश्चर्य आहे.

फिरोज नेहमीं एके ठिकाणीं राहत नसे. रयतेची दाद घेण्यासाठीं दरवर्षी तो आपल्या राज्यांत फिरे. अनेक ठिकाणीं नवीन गांवें वसवून त्यानें शेती वाढविली, आणि लोकांवरील नानाप्रकारचे जुलमी कर बंद केले. येणेंकरून लोक धनवान व आबाद झाले. प्रत्येक इसम धान्य व घोडे बाळगून असे; प्रत्येक स्त्रीपाशीं दागदागिना राही; चिरगुट-

पांघरूण व सामानसुमान नाहीं असें घर नव्हतें. रयतेच्या सुखासाठीं ज्या अनेक गोष्टी त्यानें केल्या, त्यांचें त्यानें स्वतः लिहून ठेविलेलें थोडेंसें वर्णन येथें देणें अप्रासंगिक होणार नाहीं.

'आजपर्यंत असा प्रघात चालत आला आहे, कीं क्षुल्लक प्रसंगीं मुसलमानांचा रक्तपात करावा, यःकश्चित् अपराधाबद्दल त्यांस छिन्नविच्छिन्न करून हाल करावे, त्यांचे हातपाय तोडावे, नाककान कापावे, गुन्हेगारांचे डोळे काढून त्यांचीं हाडें चुरावीं, व त्यांस अग्नींत फेंकून, जिवंत सोलून, फांस घालून, तलवारीनें तोडून किंवा सुळावर देऊन मारून टाकावें. ज्या सर्वशक्तिमान परमेश्वरानें मला हा राज्याधिकार दिला, त्यानेंच अत्यंत कृपाळु होऊन असले दुष्ट प्रचार बंद करण्याची मला बुद्धि दिली आहे. तदनुसार वर्तन करण्याचा माझा निर्धार असून आणखी मी असें फर्मावितों, कीं आजपर्यंत ज्या सत्ताधीशांनीं दिल्लीचे अधिपति असतां असलीं निष्ठुर कृत्यें करविलीं, त्यांच्यावरचा ईश्वराचा कोप शमविण्यासाठीं सर्वांनीं आपल्या दैनिक आराधनेंत ईश्वराची प्रार्थना करावी. तसेंच लहान लहान व्यापाऱ्यांपासून ज्या

देणग्या, नजराणे किंवा त्रासदायक व क्षुल्लक कर सरकारचे कामगार घेत असतात, ते त्यांनीं इत:पर घेऊं नयेत. सरकारच्या पडित जमिनीवर गोवारी लोकांपासून घेण्याची गुरचराई; फुलें, मासे वगैरे विकणें, कापूस पिंजारणें, किंवा स्वयंपाक करणें ह्या गोष्टींबद्दल हल्लीं सरकारांत येत असलेला वसूल, दुकानदार व दारूवाले ह्यांजला परवाने घेण्यास लागणारा खर्च, हे सर्व राज्यांत माफ करण्यांत आले आहेत. कारण अशा प्रकारें सरकारचा वसूल करण्यास नेमिलेले अधिकारी आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करून रयतेस जो त्रास देतात, त्यापेक्षां ह्या बाबतींवरील सरकारचा वसूल मुळींच कमी झालेला फार चांगला. इत:पर प्रसिद्ध झालेल्या नियमांबाहेर कोणताही नवीन कर रयतेवर बसविला जाऊं नये. युद्धांमध्यें लुटीपासून वगैरे जो ऐवज जमा होतो, त्याचे पांच हिस्से करून चार सरकारांत घेण्याची व एक हिस्सा लष्करास वांटून देण्याची हल्लीं वहिवाट आहे. इत:पर चार हिस्से लष्करास देऊन फक्त एकच हिस्सा सरकारानें घ्यावा. नास्तिक मत धारण करणें, दुर्व्यसनाच्या संस्था चालविणें, लांचरुष्वत स्वीकारणें, आणि सरकारी अधिकाऱ्यांनीं आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करणें, या अपराधांबद्दल गुन्हेगारांस हद्दपार केलें जाईल. लोकांनीं माझें अनुकरण करावें म्हणून मीं उंची वस्त्रें, व भारी किंमतीचे दागिने अंगावर घालण्याचें सोडून दिलें आहे. माझ्या पूर्वींच्या सत्ताधीशांनीं धर्मशाळा वगैरे जीं लोकोपयोगी कामें केलीं, त्या सर्वांची डागडुगी करून तसलीं आणखी कामें करण्यांत व चालू ठेवण्यांत पैशाचा व्यय करणें मी आपलें कर्तव्य समजतों. महंमद तुघ्लखाच्या रागाच्या तावडींत जे जे सांपडले, त्यांच्या नातेवाइकांचा तपास करून त्यांस नेमणुका वगैरे करून दिल्या आहेत, आणि विद्वान् व धर्मनिष्ठ माणसांच्या देखत त्यांजकडून त्या सुलतानाच्या अपराधांची माफी लिहवून घेऊन, त्या कागदांवर सन्मान्य गृहस्थांच्या सह्या व मोर्तब करून, ते पेटींत बंद करून ती त्या सुलतानाच्या कबरेंत पुरिली आहे. विद्वान् व सन्मान्य गृहस्थांकडून मी नेहमीं सुबोध ऐकत असतों, आणि त्याप्रमाणें चालण्याचा प्रयत्न करितों. लष्करांतील एखादा नोकर जखमा लागून किंवा वयानें नोकरी करण्यास नालायक झाल्यास, त्याचा भरपूर पगार त्यास जन्मभर चालू ठेवण्याचा मीं हुकूम

दिला आहे. मजवर दोन प्रसंगीं विषप्रयोग करण्यांत आला, परंतु दोनही वेळां तो प्रयत्न फसला.'

फिरोजनें आपला सर्व वेळ सत्कृत्यें करण्यांत घालविला. पूर्वी पुष्कळ अपराधांस मरणाची शिक्षा ठरविलेली असे. पण मरणाच्या शिक्षेचे अपराध त्यानें फार कमी केले. शेतकऱ्यांचें सरकारदेणें कायमचें ठरवून दिलें, आणि तें जमा करणाऱ्या अधिकाऱ्यांस लोकांस त्रास देण्याची सवलत अगदीं कमी केली. फिरोजची सत्कीर्ति इजिप्टदेशांत कैरो येथें खलिफाकडे पोंचली; आणि खलीफानें सुलतानास एक मानपत्र व पोषाख पाठवून दिला, (सन १३५६).

**८ हिंदुधर्मावर वक्रदृष्टि.**—हा सुलतान मुसलमान धर्माचा कट्टा अभिमानी होता. स्वभावाचा चांगला असल्यामुळें त्यानें हिंदु लोकांवर जुलूम केला नाहीं. त्याची हकीकत फक्त एकतर्फी सांपडते. तरी मुसलमानी ग्रंथांवरूनच हिंदु धर्माविषयीं त्याची बुद्धि कशी होती याजविषयीं अटकळ करितां येते. मूर्ती असलेलीं देवालयें तो नाहींशीं करी. अशा

देवालयांत असलेला ग्रंथसंग्रह, पात्रें व मूर्ती ह्यांचा त्यानें विध्वंस केला. ब्राह्मणांशीं तर तो फारच निष्ठुरपणानें वागे. पूर्वीच्या सुलतानांनीं जिझिया कर ब्राह्मणांस माफ केला होता, तो फिरोजनें पुनरपि बसविला. तो असें सांगे, कीं ब्राह्मण हे मूर्तिपूजेच्या खोलीची किल्ली होत. त्यांस जिझिया कर माफ करणें ही चूक आहे. ब्राह्मणांनीं नानातऱ्हेच्या तक्रारी केल्या. त्यांनीं राजवाड्यासमोर उपास काढून व अग्निप्रवेश करून आत्महत्या करण्याचा उद्योग केला. पण सुलतानानें त्यांजकडे कांहींच लक्ष दिलें नाहीं. पुष्कळ ब्राह्मण त्रागा करून मृत्युमुखीं पडले. सरते शेवटीं इतर जातीच्या लोकांनीं ब्राह्मणांबद्दल कर दिला, तेव्हां ते स्वस्थ बसले.

परंतु एका ब्राह्मणाची गोष्ट विशेष चमत्कारिक असून तिजपासून त्या वेळच्या धर्मस्थितीचा बराच बोध होतो, म्हणून ती येथें देणें अवश्य आहे. 'दिल्ली शहरांत एक वृद्ध ब्राह्मण राहत होता. मुसलमानी राज्यांत प्रसिद्धपणें मूर्तीची पूजाअर्चा करण्यास हिंदूंस सक्त मनाई होती. या हुकमाविरुद्ध तो ब्राह्मण आपल्या घरीं सर्व लोकांस बोलावून मूर्तीची पूजा मोठ्या थाटानें करी. ह्या ब्राह्मणाचा देव पुष्कळांस पावत असल्या-

मुळें त्याच्या घरीं पुष्कळ मुसलमान व नानाजातींचे हिंदुलोक दर्शनास येत. एका लांकडी फळीवर रंगीत चित्रें काढून त्यांची तो पूजा करी. कित्येक नेमलेल्या दिवशीं तर त्याचे घरीं सरकारी अंमलदारांच्या नकळत मोठीच यात्रा जमे. असें होतां होतां मुसलमान बायकापुरुषांची ह्या ब्राह्मणावर निस्सीम भक्ति बसली. कांहीं दिवसांनीं सुलतानास बातमी कळली, कीं हा ब्राह्मण मुसलमान बायकामुलांस धर्मभ्रष्ट करीत आहे; आणि अनेक मुसलमान स्वधर्म सोडून ह्या मूर्तिपूजकाच्या नादीं लागले आहेत. असें ऐकून सुलतानानें त्या ब्राह्मणास मूर्तीसुद्धां आपल्यासमोर आणविलें नंतर त्यानें सर्व उलमा* जमविला. आणि विद्वान् गृहस्थांची सभा जमल्यावर त्यांस त्यानें प्रश्न केला, कीं 'ह्या ब्राह्मणास शिक्षा काय द्यावी?' सर्वांनीं मिळून जबाब दिला, कीं 'या बाबतींत कायद्याचा आधार स्पष्ट आहे. ह्या ब्राह्मणानें मुसलमानी धर्म स्वीकारावा. हें त्यानें नाकबूल केल्यास त्यास जिवंत जाळून टाकावें.' ब्राह्मणास तो हुकूम कळतांच त्यानें मरण पत्करिलें. दरबारच्या समोर एक मोठा लांकडांचा ढीग करून ब्राह्मणाचे हातपाय बांधून त्यास वर ठेविलें, आणि सर्वांच्या वर त्याची ती चित्रयुक्त फळी ठेवून त्यास आग लावून दिली. क्षणार्धांत ज्वालांनीं त्या धर्मनिष्ठ ब्राह्मणाचा स्वाहा केला.

ह्या गोष्टीवरून असें दिसतें, कीं फिरोजशहा परधर्मांचा पक्का द्वेष्टा होता. ह्या त्याच्या जाचामुळें हिंदु प्रजेस तो फारसा प्रिय झाला नसेल. त्याची आई जरी रजपुतांची कन्या होती, तरी मुलावर तिच्या धर्माचा परिणाम झाल्याचें दिसून येत नाहीं.

**९. मृत्यु व योग्यता, (१३८८).**—स. १३७१ त वजीर मक्बुलखान मरण पावला, तेव्हां त्याच्या मुलास फिरोजशहानें वजिरी दिली. त्यासही खानिजहान हा किताब मिळाला. पुढें फिरोज वयोवृद्ध व अशक्त झाला, तेव्हां ह्या खानिजहान वजिराचे हवालीं त्यानें बहुतेक राज्यकारभार केला. महंमद म्हणून शहाचा एक आवडता पुत्र होता. त्याचें व या

---

* उलमा म्हणजे मुसलमानी शास्त्र पढलेले गृहस्थ. एखादा धर्माचा प्रश्न आला असतां सर्व उलमांस एकत्र जमवून, त्याचा निकाल करण्याची वहिवाट मुसलमानी अमलांत चालू होती.

वजिराचें वांकडें असल्यामुळें वजिरानें सुलतानाच्या मनांत असें भरविलें, कीं 'हा मुलगा तुमचा प्राण घेण्यास टपला आहे.' महंमदास हा सुगावा लागतांच त्यानें युक्तीनें बापाची गांठ घेऊन त्याची संशयनिवृत्ति केली. त्यावर फिरोजनें आपल्या वजिरास त्या पुत्राचे ताब्यांत दिलें, आणि सर्व कारभारही त्या पुत्रावरच सोंपविला. महंमदानें स. १३८७ त वजिरास ठार मारिलें. पण महंमद विषयी होता. त्याच्यानें राज्याची जोखीम निभेना. राज्यांत बंडें होऊन राजधानीच्या शहरीं ह्या राजपुत्राच्या सैन्याची व त्याचे प्रतिपक्षी दोन भाचे होते त्यांची लढाई जुंपली. तेव्हां वृद्ध बादशहानें येऊन ती आग विझविली, आणि स्वतःचे हातीं पुनरपि राज्यकारभार घेतला. महंमदास लोकांनीं दिल्लींतून घालवून दिलें होतें. तेव्हां आपल्यामागें आपला दुसरा पुत्र फत्तेखान ह्याचा मुलगा ग्यासुद्दीन यास राज्याचा वारस नेमून, हा नव्वद वर्षांचा वृद्ध सुलतान फिरोजशहा सन १३८८त मरण पावला.

फिरोजच्या कार्किर्दीचे वृत्तांत पुष्कळांनीं लिहिलेले असून कित्येकांचे इंग्रजींत तरजुमेही झालेले आहेत. त्यांत आफीफ नांवाचा एक ग्रंथकार म्हणतो, 'रयत संतुष्ट झाली. तिजपाशीं पैसा सांचला. त्यांच्या घरांत धान्य, सामान, घोडे वगैरे वस्तूंची समृद्धि झाली. घरांत सोन्याचांदीचा संचय झाला. प्रत्येक बाईच्या अंगावर दागदागिने दिसूं लागले. पलंग वगैरे सामानानें घरें सुशोभित झालीं.'

निरनिराळ्या तऱ्हेच्या बांधकामाचा सुलतानास मोठा शोक होता. नवीन शहरें स्थापन करून त्यांस टुमदार नांवें देण्याची त्यास मोठी हौस वाटे. राज्य मिळाल्यावर प्रथमच दिल्लीस जात असतां रस्त्यांत त्यास एक मुलगा झाला. त्याचें नांव त्यानें फत्तेखान ठेविलें, आणि त्याचा जन्म झाला त्या ठिकाणीं नवीन शहर स्थापन करून त्याचें नांव फत्त्याबाद ठेविलें. अशीं आणखी पुष्कळ नांवें निरनिराळ्या प्रांतांतील शहरांस दिलीं. बंगल्यांतून परत येत असतां त्यानें अयोध्याप्रांतांत नवीन शहर स्थापून त्यास महंमद तुघ्लखाच्या पहिल्या 'जोना' ह्या लाडक्या नांवावरून जोनपूर असें नांव दिलें. हें शहर पुढें फार प्रसिद्धीस आलें. दिल्लीनजीकच यमुनेच्या कांठीं फिरोजाबाद नांवाचें नवीन शहर स्थापून तेथेंच सुलतान बहुतेक सर्व वेळ राहत असे. अशोकाचे दोन स्तंभ

त्यानें ह्या ठिकाणीं आणून ठेविले. अब्दुल हक्क व मलीक गाझी सहाना नांवाचे दोन उत्कृष्ट कारागीर त्याजपाशीं होते. त्यांच्या देखरेखीखालीं त्याचीं हीं सर्व कामें चालत.

देवस्थानांच्या खर्चास व विद्वानांच्या बिदागीसाठीं फिरोजशहानें सालाचीं छत्तीस लाख रुपयांची नेमणूक ठरविली होती; तसेंच सालिना एक कोट रुपये गरीब लोकांच्या निर्वाहासाठीं खर्च होत असत. सुलतानास बागबगीच्यांचा शोक फार होता. दिल्लींत व इतर ठिकाणीं त्यानें एकंदर बाराशें बाग तयार केले. ह्या बागांपासून दरसाल एक लाखाचें उत्पन्न खजिन्यांत येत असे. एकंदरीनें आपल्या नवीन व्यवस्थेनें त्यानें सव्वाकोट रुपयांचें उत्पन्न वाढविलें. त्याच्या राज्याचा एकंदर वसूल दहा कोटि होता, म्हणजे अकबराच्या वसुलाचा एकतृतीयांश होय.

सरकारी नोकरांस स्वतंत्र पगार न ठरवितां त्यांस महालानिहाय उत्पन्नें तोडून दिलेलीं होतीं. ही व्यवस्था मोडून टाकण्याचा अला-उद्दीननें प्रथम प्रयत्न केला. पण फिरोजशहानें तो पुढें चालविला नाहीं, म्हणूनच त्याच्या पश्चात् राज्याचे तुकडे झाले, असें अनेक लेखकांचें मत आहे.

फिरोजशहाचा दरबार मोठ्या थाटाचा व व्यवस्थित असे. त्यास मद्यप्राशनाचा नाद बराच होता. हा नाद सोडून देण्याबद्दल पुष्कळांनीं त्यास सांगितलें. पण वजिरावर सर्व कारभार सोंपविलेला असल्यामुळें, शिकार व मद्यप्राशन ह्या गोष्टी करण्यास त्यास अवकाश सांपडे.

लोकांची भक्ति फिरोजशहावर अतोनात होती. ते त्यास बापाप्रमाणें भजत. गरिबांस तर तो आपला अन्नदाताच वाटे. गरीब मुसलमानांच्या लग्नास तो पैसे देई, आणि रोग्यांच्या औषधपाण्याची चांगली तजवीज ठेवी. हिंदुधर्माविषयीं त्याच्या मनांत द्वेष असल्यामुळें, त्यांची मूर्तिपूजा मात्र तो बिलकुल चालूं देत नसे. त्याची वागणूक सर्वथैव मुसलमानी धर्मास अनुसरून होती. कुराणाचा आधार पाहिल्याशिवाय तो कांहीं एक काम हातीं घेत नसे. त्यानें स्वतः आपल्या कारभाराची थोडीशी हकीकत लिहून ठेविली आहे, तिजवरून त्याचें राज्यकारभाराचें धोरण चांगलें व्यक्त होतें.

**लोकसंग्रहाची योजना.**—भरंवशाचे व राज्याचें हित पाहणारे लोक आपल्या संग्रहीं जमविण्याची एक चमत्कारिक योजना फिरोजशहानें केली, ती ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. राज्यांतील मोठमोठे प्रांतिक कामदार वेळोवेळीं सुलतानाच्या भेटीस येत, तेव्हां सुलतानाकरितां नानाप्रकारचे नजराणे ते बरोबर आणीत. घोडे, हत्ती, उंट, खेचरें, हत्यारें, सोन्याचांदीचीं भांडीं वगैरे जिन्नस ते आपल्याबरोबर आणीत; त्यांतच प्रत्येकजण दहापासून शंभरपर्यंत चांगले देखणे व धष्टपुष्ट गुलाम सुलतानाकरितां आणीत. हे गुलाम आणिल्याबद्दल त्या कामदारांस त्यांच्या वसुलाच्या रकमेंत कांहीं रक्कम सुलतानाकडून माफ होत असे. जो असले गुलाम पुष्कळ आणी, त्याचा बोज चांगला राहत असे. ह्या गुलामांस निरनिराळ्या प्रकारचें शिक्षण देत; आणि सरकारवाड्यांत, फौजेंत व इतर जोखमेच्या ठिकाणीं त्यांच्या नेमणुका करीत. सरकारवाड्यांतील खास पहाऱ्यावर चाळीस हजार लोक व दिल्ली येथें बारा हजार कारागीर ह्या गुलामांतून तयार झालेले होते. फिरोजशहाजवळ अशा प्रकारचे एकंदर एक लक्ष ऐशीं हजार गुलाम होते. त्यांच्या व्यवस्थेचें एक स्वतंत्र खातेंच होतें. सुलतानाची स्वारी बाहेर निघाली, म्हणजे त्याजबरोबर शस्त्रें धारण करणाऱ्या हजारों गुलामांचा तांडा असे. ते तुर्कस्तानांतील जानिझरीसारखे एक प्रकारचे खास बॉडीगार्ड्सच होते.

---

# प्रकरण दहावें.

## तयमूरलंगाची स्वारी.

### स. १३९८.

१. फिरोजशहानंतरच्या घालमेली. २. तयमूरचा पूर्ववृत्तांत, (स. १३३५)
३. तयमूरची दिल्लीवर स्वारी. ४. तयमूरची अवतारसमाप्ति व योग्यता.
५. सय्यद घराणें, (१४१६–१४५०) ६. लोदी घराणें, (१४५०–१५२६.)
७. लोदी घराण्याची समाप्ति, (स. १५२६.)

**१. फिरोजशहानंतरच्या घालमेली.**—फिरोजशहाच्या पुष्कळ दिवसांच्या कार्किर्दीत लोकांना सुख व शांतता झाली खरी, पण त्यामुळें

सुलतानाच्या अंमलाचा जोर कायम राहिला नाहीं. फिरोजवर लोकांचें प्रेम होतें, पण त्याजबद्दल लोकांस भीति वाटत नव्हती. बल्बन, अलाउद्दीन, महंमद तुघ्लख ह्यांच्यासारख्या कठोर सुलतानांचा दरारा ओळखणारे लोक नाहींसे झाले. नवीन पिढीस त्यांची ओळख राहिली नाहीं. फिरोजच्या पश्चात् तशीच शांतता राज्यांत राहील असा नेम नव्हता. उलट पक्षीं, सुलतानाच्या पश्चात् लवकरच दंगेधोपे सुरू होणार अशीं चिन्हें दिसत होतीं.

सुलतानाच्या खास तैनातीस गुलाम ठेवण्याची योजना वर सांगितली आहे. त्या योजनेचे परिणाम चांगले झाले नाहींत. त्यांतले बहुतेक गुलाम मूळचे हिंदु असून बाटून मुसलमान झालेले होते. फिरोजशहाशीं ते इमानानें वागले, तसे पुढील सुलतानांशीं वागण्यास त्यांस कारण नव्हतें. फिरोजच्या कार्किर्दींत हिंदूंच्या मानेवरचें जूं ढिलें झाल्यामुळें, ते लोक फिरून वर डोकें काढूं लागले होते; त्यांस ह्या गुलामांची थोडीबहुत मदत झाली. राजघराण्यांतील व सरदार मंडळी हिंदु स्त्रियांशीं लग्नें करीत, पण त्यामुळें हिंदुमुसलमानांची एकी अशी कधींच झाली नाहीं. हिंदु रयत व राजेरजवाडे मुसलमानांस इलाज नाहीं म्हणून करभार देत, आणि संधि सांपडतांच स्वतंत्र होण्याचा प्रयत्न करीत. फिरोजशहाच्या मृत्यूनंतर हिंदूंच्या पुढाऱ्यांनीं उचल खाल्ली; त्यांस बाटलेल्या गुलामांनीं मदत केली. तेव्हां एकीकडे प्रांतिक कामदार स्वतंत्र होत असतां, इकडे आंतून हिंदु लोकही वर डोकें उचलूं लागले. अशा दुहेरी पेचांत तुघ्लखांचें राज्य सांपडलें.

ग्यासुद्दीन सुलतानानें सारें पांच महिने राज्य केलें. त्याचा भाऊ व चुलतभाऊ यांनीं त्यास ठार मारिलें. पुढें अबूबक्र् म्हणून दुसरा एक फिरोजशहाचा नातू होता, त्यानें तख्त बळकाविलें. परंतु तोही अयोग्य वाटल्यावरून दरबारच्या मंडळींनीं फिरोजचा मुलगा महंमद दिल्ली सोडून गेला होता,त्यास परत बोलावून राज्यावर बसविलें. महंमदशहानें स.१३९० पासून स. १३९४पर्यंत चार वर्षें राज्य केलें. मेवाडी रजपूत लोकांनीं दिल्लीवर केलेला हल्ला त्यानें स्वतः मागें हटविला. महंमदशहा स.१३९४त ज्वर येऊन मरण पावला. पुढें त्याचा मुलगा हुमायून, सिकंदर हें भपकेबाज नांव धारण करून तख्तावर बसला. पण तोही एकाएकीं मरण

पावल्यावर, महंमदशहाचा दुसरा मुलगा महंमूद म्हणून होता, त्याच्या हातीं राज्यकारभार आला. एकंदरींत राज्यकारभार चालविण्यास लायक मनुष्य अलीकडे कोणी न मिळाल्यामुळें चोहोंकडे दंगे होऊन, दिल्लीचें राज्य विसकळीत झालें. ख्वाजा जहान म्हणून एक गृहस्थ वजिरीचें काम पाहत असे, त्यानें बंगालप्रांत काबीज करून जोनपूर येथें स्वातंत्र्य धारण केलें. सारंगखान नांवाच्या दुसऱ्या एका सरदारानें गकर लोकांस मागें हटवून लाहोर व पंजाब येथें स्वतंत्र राज्य स्थापिलें. गुजराथ, माळवा व खानदेश ह्या प्रांतांची स्थितिही सदरप्रमाणेंच झाली. प्रत्यक्ष दिल्लींत अनेक पक्षांचे युद्धप्रसंग सतत चालू लागले. नुसतखान म्हणून फिरोजशहाचा एक नातू महंमूदशहाशीं राज्याकरितां भांडत होता. त्यास महंमूदशहाच्या तर्फेनें इक्बालखान नामक सरदारानें घालवून देऊन, दिल्ली शहरांत थोडेंबहुत स्वास्थ्य केलें. इतक्यांत दिल्लींतील ह्या भानगडी ऐकून मध्य-आशियांतील मोगल लोकांचा प्रबल बादशहा तयमूरलंग आपल्या अगणित फौजेनिशीं दिल्लीवर चालून आला. ह्या तयमूरलंगाच्या हकी-कतीकडे प्रस्तुत आपणांस वळलें पाहिजे.

**२. तयमूरचा पूर्ववृत्तान्त.**—तयमूरलंगाची माहिती गिबनच्या पुस्त-कांत चांगली दिलेली आहे. त्याचा वृत्तान्त मूळ त्याच्या चिटणिसांनीं लिहिलेला शरीफुद्दीन नांवाच्या गृहस्थास सांपडला. त्यानें तयमूरजवळ काम केलेल्या अनेक लोकांजवळून प्रत्यक्ष माहिती मिळवून, तयमूरचा इति-हास फारशी भाषेंत तयार केला. त्याचें भाषांतर फ्रेंच भाषेंत स. १७२२त झालें. म्हणून हा ग्रंथ चांगला खात्रीलायक आहे. वास्तविक तयमूरनेंच स्वतः आपला हा वृत्तान्त तयार केला. 'राजनीति' नांवाचा दुसरा एक ग्रंथ तयमूरनें रचिलेला आहे, त्यांत नाना देशांतील माहिती गोळा करण्याविषयीं तयमूर किती दक्ष होता हें दिसून येतें. तयमूरचे हे ग्रंथ बाहेर आले, त्यापूर्वी त्याच्या नांवाची सर्व जगभर अतिशय नालस्ती झालेली होती. ज्या राष्ट्रांस त्यानें पादाक्रान्त केलें, त्यांनींच ही त्याची नालस्ती सुरू केली. पण कालांतरानें तयमूरच्या बाजूचा पुरावा गिबनसारख्यांच्या श्रमानें बाहेर आला, आणि तयमूरच्या कर्तबगारीचा खरा अंदाज करण्याची लोकांस सोय झाली.

तयमूरलंग हा जातीनें तुर्क होता, मोगल नव्हता. त्याचा पांचवा पूर्वज, चंगीझखानाचा मुलगा झगताइखान ह्याजपाशीं मध्य आशियांत वजीर होता. समर्कंदच्या दक्षिणेस चाळीस मैलांवर स. १३३५ ह्या वर्षी तयमूरचा जन्म झाला. त्याचा बाप दहा हजार स्वारांचा मनसबदार असून त्याजकडे काश प्रांताचा कारभार होता. त्या अंदाधुंदीच्या काळांत साहसी व शूर पुरुषांस नांव काढण्यास पुष्कळ जागा होती. लहानपणापासूनच त्याच्या अंगीं तीव्रबुद्धि व जबरदस्त धाडस वास करीत होतें. बाराव्या वर्षापासून त्यानें लढाईची सुरुवात केली. पंचविसाव्या वर्षी मध्यआशियांतलि तुर्कस्थानचा तो स्वतंत्र मालक झाला. तेव्हां त्याच्या जातीचे लोक त्यास भजूं लागले, आणि त्याच्याकरितां प्राण देण्यास तयार झाले. पुढें लवकरच त्याजवर संकटें कोसळलीं. त्यांत दहापांच सुद्धां लोक त्याजपाशीं राहिले नाहींत. तो रानावनांत भटकूं लागला. अंधारकोठडीची कैद सुद्धां त्यानें भोगिली. एकदां अमूदर्या नदींतून पोहून जाऊन त्यानें आपला जीव बचाविला. संकटसमयीं धैर्य खचूं न देतां हातीं घेतलेलें काम निश्चयानें तडीस न्यावयाचें, हा त्याच्या अंगचा सर्वांत मोठा गुण होय, आणि ह्या गुणानेंच तो ऐश्वर्यास चढला. लवकरच त्यानें शत्रूंचा पाडाव करून झगताईच्या मोगल वंशाची समाप्ति केली, आणि समर्कंदचें राज्य मिळविलें, ( स. १३६९ ). त्याला चंगीझखानाबद्दल मोठी पूज्यबुद्धि वाटे, आणि चंगीझसारखीच सर्व जग जिंकण्याची त्याला हांव होती. त्यानें एकंदर सत्तावीस मुकुट काबीज केले. त्यांत झगताईचा मुकुट होता. निरनिराळ्या ठिकाणीं त्यानें एकंदर पसतीस स्वाऱ्या केल्या; आणि पश्चिमेकडे इराण, व आशियामायनरवरून मास्कोपर्यंत, दक्षिणेस हिंदुस्थान व पूर्वेस चीनच्या हद्दीपर्यंतचा प्रदेश त्यानें काबीज केला.

**३. हिंदुस्थानावर स्वारी, ( स. १३९८ ).**—अफगाणिस्तान जिंकल्याबरोबर हिंदुस्थानच्या संपत्तीची वार्ता तयमूरच्या कानावर गेली. निरनिराळे देश जिंकण्याची त्याची हांव मूळपासूनच अनावर होती. मोगल लोक शेंकडों वर्षें हिंदुस्थान जिंकण्यासाठीं धडपडत होते. तेव्हां तें काम हातीं घेण्याचें मनांत आणून त्यानें आपला बेत मसलतगार मंडळीपुढें ठेविला. तेथें पुष्कळ भवति न भवति झाली. ‘आजपर्यंत शेंकडों गृहस्थांनीं हिंदुस्थानावर स्वाऱ्या करून यश मिळविलें. मग

आपणांस त्यांत यश कां येणार नाहीं?' 'पण अनेक नद्या, मोठमोठीं निबिड अरण्यें, त्यांतील अवघड ठिकाणीं किल्ल्यांच्या आश्रयानें आपणास अडविणारे शेंकडों शूर सरदार, आणि त्यांच्या मदतीस हत्यारबंद हत्तींचा तांडा, इतक्यांच्या पुढें आपला निभाव कसा लागणार'! असें विरुद्ध पक्षाचें म्हणणें पडलें. त्यावर तयमूर बोलला,' गज्नवी महंमुदाच्या लहानशा फौजेला जर ह्या अडचणी बाधल्या नाहींत, तर आमच्या प्रचंड सेनेपुढें त्यांचें काय चालणार?' तयमूरचे मुलगे बोलले, 'हिंदुस्थानची अपार संपत्ति आपणांस मिळेल, आणखी काय पाहिजे?' धर्माभिमानी लोक म्हणाले, 'एवढ्या मोठ्या देशांत इस्लामाचा प्रसार करण्याची आपणास संधि मिळते, हा काय लहान फायदा!' तथापि उलटपक्षाचा विरोध मिटला नाहीं. ते म्हणाले, 'हिंदुस्थान देश आपण जिंकिला, तरी आपले लोक त्या उष्ण व रोगट हवेंत लवकरच निःसत्त्व बनतील. असा प्रकार थोडाबहुत झालेला आज आपण पाहतोंच.' पण अशा हरकतींना भीक घालणारा तयमूर नव्हता. त्याच्या आत्मचरित्रांत खालील मजकूर आहेः—

"हिंदुस्थानच्या काफर लोकांवर स्वारी करून त्यांस इस्लामी धर्मांत आणावें, त्यांचीं मंदिरें व मूर्ती नाहींशा कराव्या, आणि 'गाजी' हें सन्मान्य नांव मिळवावें, अशी माझी फार इच्छा आहे." झालें. तयमूरची बलवत् इच्छा कोण मोडणार! हिंदुस्थानावर स्वारी करण्याचा बेत नक्की झाला.

तयमूरचा नातू पीरमहंमद जहांगीर काबूलच्या कारभारावर होता, त्यानें स. १३९७ त होड्यांचा पूल करून सिंधुनदी उतरून उंच शहरास वेढा दिला. मुलतानचा सुभेदार सारंगखान त्याजबरोबर टक्कर देण्यास आला. उभयतांचें युद्ध झाल्यावर सारंगखानाचा मोड होऊन तो मुलतानच्या किल्ल्यांत शिरला. त्या किल्ल्यास पीरमहंमद सहा महिने वेढा घालून बसला. पुढें अन्नसामुग्री संपली. शेवटीं निरुपाय होऊन सारंगखानानें किल्ला पीरमहंमदाचे स्वाधीन केला. पण ह्या संधीस त्याचे घोडे वगैरे पुष्कळ मरून त्यास पुढें जातां येईना.

'हिंदुस्थानांत अंदाधुंदी चालली आहे, आपण प्रयत्न केला तर देश सहज हस्तगत होईल', असें पीरमहंमदानें आजास कळविलें; आणि

आपणांसही मदत मागितली. तेव्हां सन १३९८ च्या मार्च महिन्यांत तयमूर समर्कंद सोडून निघाला; तो बर्फाळ डोंगर ओलांडून अटक-जवळ आला. तेथें सिंधुनदी उतरून अलीकडे आला. चिनाब व रावी ह्यांच्या संगमावरील तुलुंब शहरांत शिरून त्यानें सर्व लोकांस कापून काढिलें. तेथून शहानवाज शहरीं जाऊन तेथील धान्य स्वतःस पाहिजे तेवढें घेऊन बाकीचें त्यानें जाळून टाकिलें. पुढें लवकरच आपला नातू संकटांत आहे असें ऐकून तयमूर त्यास जाऊन मिळाला. भाटनीरचा राजा पीरमहंमदाशीं लढत होता. सबब ते दोघे त्या शहरावर आले. त्या ठिकाणीं असंख्य निरपराधी लोकांचे तयमूरनें प्राण घेतले. पुढें चाल करून सरस्वती, फत्तेबाद, राजपूर वगैरे अनेक ठिकाणीं असेच घोर अनर्थ करून, स. १३९८च्या डिसेंबरांत ही टोळधाड पानिपतावरून दिल्लीकडे येऊं लागली. त्या वेळीं सर्व लोक भयभीत होऊन जंगलांत पळून गेले. पानपतावर मोगलांस कोणीं अडविलें नाहीं. तेव्हां ते तसेच पुढें थेट दिल्लीवर आले. तयमूर थोड्या लोकांनिशीं दिल्लीची तटबंदी पाहण्यास पुढें आला असतां, नामधारी सुल-तान महंमूदशहा व त्याचा वजीर मल्लू इक्बालखान ह्यांनीं त्याचे लोक थोडे पाहून त्याजवर हल्ला केला, त्यांत तयमूरनें धाडसानें बादशहास मागें हटविलें. तयमूरच्या फौजेस दिल्लीच्या हत्तींची भीति अतिशय वाटत होती, त्यांस तयमूरनें चांगला धीर देऊन, कदाचित् पराभव झाला असतां, पुढील सर्व तजवीज नीट लावून ठेविली. बायका, गुरें, सामुग्री व विद्वान् मंडळी ह्यांस फौजेच्या मागें बंदोबस्तानें ठेवून, त्यांच्या सभोंवार मोठमोठी झाडें, व कांटेरीं झुडपें लावून कुंपणासारखा बंदोबस्त केला. ह्या वेळीं तयमूरचे ताब्यांत लाखों लोक गुलाम करून आणिलेले होते. दिल्लीचे बादशहानें तयमुरास अडचणींत गांठलें हें पाहून त्या गुलामांनीं आनंद प्रदर्शित केला. ही गोष्ट पुढें तयमूर यास कळतांच त्यानें एकदम हुकूम सोडून पंधरावर्षांवरच्या सर्व लोकांची एकजात कत्तल करविली. त्यांत हिंदु व मुसलमान दोनही जातींचे लोक होते. पुढें तयमूरनें आपल्या फौजेचा फिरोजाबादचे मैदानांत तळ दिला; आणि दोन दिवसांनीं दिल्लीचे फौजेशीं टक्कर देण्याकरितां आपली फौज उभी केली. महंमूदशहा व इक्बालखान यांची तयारी कांहीं कमी नव्हती. ते

आपली तयारी करून लढण्यास आले. नेहमींप्रमाणें लढाईस सुरुवात झाली. तयमूरनें सर्व व्यवस्था पुनः तपासून पाहिली. आणि गुढगे टेंकून प्राथना केल्यावर, अल्लानें आपली विनंति मान्य केलीसें दाखवून तो वर उठला; आणि रणवाद्यें वाजवून त्यानें लढाईस सुरुवात केली. तेव्हां कांहीं वेळ निकराचें लढणें होऊन तयमूरच्या फौजेस जय मिळाला. इक्बालखानानें लढण्याची शिकस्त केली. तयमूर म्हणतो, 'दिल्लीची फौज कांहीं कमी शूर नव्हती. पण त्यांचे अंमलदार योग्य नव्हते.' इक्बालखान पळून गेला. त्याचीं बायकामुलें मागें राहिलीं. आपणास जय दिल्याबद्दल तयमूरनें मोठ्या गहिंवरानें ईश्वराचे आभार मानिले. ह्या लढाईत महंमूद तुघ्लखाचा पराजय झाला, (ता. १७ डिसेंबर), आणि रातोरात तो गुजराथेकडे पळून गेला. तेव्हां झगडा सोडून देऊन सर्व लोक तयमुरास शरण गेले. तयमूरनें दिल्लीचें बादशाही पद स्वीकारून स्वतःच्या नांवानें खुत्बा वाचविला. नंतर त्यानें दिल्ली शहरांतून मोठी खंडणी वसूल करण्याचा हुकूम दिला. त्यावरून त्याचे कांहीं लोक शहरांत शिरून लुटालूट करूं लागले. ही लूट पांच दिवस चालू असून तिची वार्ता तयमूर यास कळली नव्हती. तो शहराबाहेर राहून विजयोत्सव करीत होता. इकडे शहरवासी लोकांस लुटीचा उपद्रव सहन न होऊन ते बायकामुलांस ठार मारून व घरादारांस बत्ती लावून, शस्त्रास्त्रांनिशीं परकीयांबरोबर लढण्यास आले, (ता. २६ डिसेंबर). तेव्हां तर तयमूरच्या लोकांनीं एकसारखा शहरांत रक्तपात चालविला. रस्त्यांतून जाण्यास मार्ग नाहीं इतक्या प्रेतांच्या राशी सर्व शहरभर पसरल्या. हिरे, माणकें, मोत्यें, सोनें चांदी वगैरे लूट किती जमा झाली ह्याची तर गणतीच नाहीं. तयमूर ह्यास ही हकीगत समजली, तेव्हां तिजबद्दल त्यास कांहींच वाटलें नाहीं. तो म्हणतो, 'लोकांस दुखवूं नये अशी माझी मनापासून इच्छा होती, पण माझी फौज माझ्या कह्यांत राहिली नाहीं.' पकड, लूट, व मारहाण ह्यांशिवाय कोणास कांहीं सुचेना. प्रत्यकानें निदान पंचवीस तीस गुलाम पकडून आणिले. सर्व दिल्लीशहर ओस पडलें. फक्त सय्यदांचा व उलमांचा भाग तेवढा बचावला. पंधरा दिवसपर्तंत दिल्लींत राहून नंतर त्यानें स्वदेशीं गमन केलें, (ता. १ जानेवारी, १३९९). स्वतःचे वांटणीस आलेला लुटीचा हिस्सा त्यानें बरोबर घेतला. हिंदुस्थानांतील कलाकौशल्यानें चकित होऊन त्यानें इकडचे पक-

डलेले बहुतेक लोक व कुशल कारागीर स्वदेशीं नेले. परत जातांना रस्त्यांत त्यानें मिरत शहरावर कांहीं फौज पाठविली. तेथच्या फौजेनें तयमूरच्या लोकांची थट्टा केलेली त्याच्या कानीं येतांच तो स्वतः तेथें गेला. शिड्या लावून त्याचे लोक किल्ल्यांत शिरले. येथेंही दिल्लीचाच प्रकार घडून आला. विस्तव व तलवार ह्यांचा प्रळय त्यानें सर्व देशावर परत जातांनाही चालविला. पुढें तयमूर हरद्वारवर गेला. तेथें गोमुखांतून गंगा पडते ही आख्यायिका ऐकून त्याचें पित्त खवळलें, आणि ह्या त्यांच्या समजुतीबद्दल हरद्वारच्या लोकांस चांगलीच अद्दल घडली. लाखों लोकांस त्यानें यमसदनास पाठविलें. इस्लामाच्या एकनिष्ठ सेवकांनीं ओझींच्या ओझीं लूट पैदा केली. तयमूरनें मोठ्या समारंभानें परमेश्वराची आभारपूर्वक प्रार्थना केली, आणि गुढगे टेंकून आनंदाश्रूंच्या भरांत बोलला, ' देवा! हिंदुस्थानांतली माझी कामगिरी त्वां सिद्धीस नेली. दोन गोष्टींसाठीं मी येथें आलों. एक काफर लोकांशीं लढून परलोकसाधन करावें, आणि दुसरी, संपत्ति लुटून इहलोक साधावा. धर्माकरितां लूट करणें हें मुसलमानांचें बाळकडूं आहे. ' पुढें मसूरीखालच्या शिवालिकपहाडांतून नगरकोट व जम्मू शहरें लुटून, आणि लाहोर काबीज करण्यास फौज पाठवून, तयमूर हिमालयाच्या बर्फाळ खिंडींतून आला तसाच हां हां म्हणतां स. १३९९च्या मार्च महिन्यांत, नाहींसा झाला. त्यानें पुनः हिंदुस्थानांत आपली फौज पाठविली नाहीं. जातांना मुलतान, लाहोर व दीपलपूर ह्या प्रांतांवर खिजरखान सय्यद नामक सरदारास नेमून काबूलच्या वाटेनें तो समर्कंदास पोंचला.

**४. तयमूरची अवतारसमाप्ति व योग्यता.**—तयमूरलंग पुनः हिंदुस्थानांत आला नाहीं. आशियाखंडाचे पश्चिमेस त्याच्या राज्यांत दंगे उद्भवलेले ऐकून तो घाईनें परत गेला. त्या वेळीं त्याचें वय त्रेसष्ट वर्षांचें असतां तो मोठ्या लगबगीनें समर्कंद सोडून पश्चिमेस गेला. ऑटोमन सुलतान बायजीद युरोपखंड जिंकण्याच्या तयारींत होता, आणि तयमूरनें त्याला साह्य केलें असतें, तर दोघांनीं सर्व युरोपाचा फन्ना उडविला असता. पण बायजीद व तयमूर यांनीं पत्रोपत्रीं एकमेकांचा इतका अपमान केला, कीं तयमूरनें बायजीदवर स्वारी करून अंगोरा येथील घनघोर संग्रामांत त्याचा पुरा नाश करून त्यास ठार मारिलें; आणि त्याचें राज्य

काबीज केलें. तसेंच आलेप्पो, डमास्कस, बगदाद, बूर्स, इस्पहान, आस्त्राखान इत्यादि शहरें धुळीस मिळवून असंख्य लोकांची कत्तल केली. कसबी व कारागीर लोक मिळत, तेवढे मात्र त्यानें समर्कंदास पाठवून दिले. बगदाद येथें नव्वद हजार मुंडक्यांचा त्यानें एक मनोरा उभारला. युरोपखंड धुळीस मिळविण्याचा त्याचा बेत होता, पण तो सिद्धीस गेला नाहीं. चंगीझचा मुलगा कुब्लाईखान हा पराक्रमी बादशहा पेकिन येथें राज्य करीत असे. दीडशें वर्षेंपर्यंत ह्या मोगल वंशाचा अंमल चीन देशावर होता, पुढें चिनी लोकांनीं आपलें राज्य त्याजपासून परत मिळविलें. तरी पण ह्या दीडशें वर्षांत चिनी व मोगल ह्या जातींचें मिश्रण पुष्कळ झालें. त्याच वेळेस मध्यआशियांतील भागांत स्वतंत्र राज्यें स्थापन होऊन तेथच्या मोगलांनीं मुसलमानी धर्म स्वीकारिला. तेव्हांपासून पूर्वेकडील अस्सल मोगलांशीं त्यांचा संबंध तुटला. चिनी लोकांनीं स्वतंत्र राज्य स्थापिलें, हा प्रकार तयमूरलंग यास सहन न होऊन सर्व चीन इस्लाममय करण्याचे इराद्यानें चीनवर स्वारी करीत असतां, राजधानीपासून ३०० मैलांवर उत्रार येथें सन १४०५त ज्वर येऊन तयमूर मरण पावला. त्यामुळें चीन देशावरचें मोठें अरिष्ट टळलें. मरणसमयीं त्याचे मुलगे व नातू मिळून छत्तीस असामी जिवंत होते. तयमूरच्या जन्मापूर्वींच त्याच्या वाडवडिलांनीं मुसलमानी धर्म स्वीकारिला होता. एका संग्रामांत जखम लागून त्याचा हात व पाय लंगडा झाल्यामुळें त्यास 'लंग' हें टोपण नांव पडलें. तेंच ग्रंथकारांनीं वापरिलें आहे.

मनुष्यजातीचे शत्रु अशा नांवानें जे महान पुरुष इतिहासामध्यें नांवाजले आहेत, त्यांच्यामध्यें तयमूरची गणना केली जाते. ह्याच्या निरनिराळ्या हकीकती पुष्कळ उपलब्ध आहेत. क्लॉव्हिगो नांवाचा एक स्पेन देशच्या राजाचा वकील तयमूरकडे समर्कंदास आला होता. त्यानें आपल्या प्रवासाची व तयमूरची मनोरंजक हकीकत लिहून ठेविली आहे.

तयमूराचा वकील स्पेन देशांत गेला होता, तो परत येत असतां त्याबरोबर क्लॉव्हिगो सन १४०३ च्या मे महिन्यांत स्पेनदेश सोडून निघाला, तो १४०४ च्या ऑगस्ट महिन्यांत समर्कंद येथें पोंचला. कॉन्स्टांटिनोपलच्या बादशहास भेटून त्रिबिझोंड, अर्झरूम, तेहेरान व मर्व्ह ह्या शहरांवरून

तयमूरची राणी समर्कंद येथें जनानखान्यांत बायांची भेट घेते. मध्य आशियांतील तुर्की पेहराव. पृ. १८१.

'खुदाबक्ष लायब्ररी'च्या मालकांच्या मेहेरबानीनें.

त्यानें प्रवास केला. त्रिबिझोंड येथें तयमूरच्या राज्याची हद्द लागली. तयमूरचा वकील बरोबर असल्यामुळें क्लोव्हिगो यास कोणत्याही गोष्टीची प्रवासांत अडचण पडली नाहीं. त्याजला जाण्यास बादशहानें टप्याचे घोडे ठेविले होते. रस्त्यावर सर्व ठिकाणीं त्याचा उत्तम प्रकारें पाहुण-चार करण्यांत आला. इराणांतून त्यास भर उन्हाळ्यांत प्रवास करावा लागला. वाटेंत उन्हानें, तहानेनें व प्रवासाच्या उतावळीनें पुष्कळ लोक मरण पावले. रात्रंदिवस चालून दोन दिवसांत सव्वाशें मैल जाण्यांत दोन घोडे मेले तरी हरकत नाहीं, पण त्याच प्रवासास तीन दिवस लागलेले तयमूर यास खपत नसत. सर्व रस्त्यावर मैलांचे खांब रोवलेले असत. राज्यांतील सर्व लष्करी कामगारांस प्रवासाच्या वेळीं दररोज निदान ६० मैल तरी चालण्याची सक्त ताकीद असे. तयमूरच्या काम-गारांची उत्तम बरदास्त ठेवण्याविषयीं सर्व ठिकाणच्या लोकांस विलक्षण दहशत बसलेली असे. सरकारच्या पाहुण्यांचें स्वागत करण्यांत यत्किंचित् चूक झाली तर अपराध्याचें डोकेंच उडे. एवढ्या अफाट राज्यांत तयमूरच्या इतकी दहशत कोणीं कधींच बसविली नसेल. तहान, भूक, थंडी, उष्णता इत्यादि संकटें सोसण्यास तयमूरच्या लष्कराइतकें कंटक लष्कर दुसऱ्या कोणाचें नव्हतें.

समर्कंदास पोंचल्यावर आठ दिवसांनीं तयमूरनें क्लोव्हिगोची भर-दरबारांत भेट घेतली. नंतर पुष्कळ मेजवान्या झाल्या; त्यांमध्यें बादश-हाच्या बायका उघडपणें बाहेर आल्या होत्या. मेजवानीकरितां सोन्याचीं मेजें व हिरेमाणकांनीं जडलेलीं ताटें व पेले मांडलेले होते. त्या प्रसंगीं तयमूरच्या सहा नातवांचा लग्नसमारंभ चालू होता. तन्निमित्त नानाप्रकारचे शोभिवंत रेशमी तंबू उभारलेले पाहून, आणि अनेक खोल्यांनीं युक्त अशी किल्ल्यासारखी त्या तंबूंची रचना व एकंदर समारंभाचें अवाढव्य स्वरूप अवलोकन करून, आलेल्या पाश्चात्य पाहुण्यांचे डोळे दिपून अंतः-करणें थक्क झालीं. तयमूरची पट्टराणी आपल्या ऐश्वर्यसंपन्न पेहेरावानिशीं सर्व समारंभावर दक्षता ठेवीत होती. तिचा पाठीमागें लोळणारा झगा उचलून धरण्यास पंधरा दासी व डोक्यावरील मुकुट सांवरण्यास तीन दासी लागत. तिच्या डोक्यावरील रत्नजडित मुकुट अत्यंत मौल्यवान होता. तिचे काळे कुळकुळीत केश खांद्यांवरून खालीं लोळत होते.

तिच्याबरोबर तीनशें दासी सेवा करण्यास हजर असत. दुसऱ्या राण्यांचा इतमाम कमी होता असें नाहीं. स्वयंपाकाच्या लांकडांकरितां मोठमोठीं अरण्यें तोडून आणिलेलीं होतीं. मांसाचे व अन्नाचे पर्वत पडले होते, आणि दारूचीं टांकीं भरून वाहत होतीं. समारंभासाठीं दूरदूरचे हजारों पाहुणे आले होते, त्यांतच यूरोपच्या राजांचे वकील होते. वधूवरांच्या मस्तकावर हिरेमाणकांचा वर्षाव चालू होता. दोन महिने हा समारंभ चालला, तेवढ्या अवधींत नेहमींची शिस्त बंद ठेवून लोकांना मनमुराद चैन करण्याचा हुकूम होता. एकदां हत्ती, घोडे यांच्या खेळाचा एक समारंभ झाला, त्याकरितां चौदा पंधरा हजार तंबू लाविले होते. अत्यंत थाटमाटाच्या पाहुणचारांत बरेच दिवस घालविल्यावर हा स्पेनदेशचा वकील सन १४०६च्या मार्च महिन्यांत स्पेन देशास परत आला.

ह्या वकिलाच्या वर्णनावरून एक दोन गोष्टी विशेष ध्यानांत ठेवण्याजोग्या दिसतात. तयमूरच्या दरबारी मंडळीपेक्षां हे स्पेनचे लोक ज्यास्त हुशार किंवा बुद्धिमान नव्हते. सुधारणेच्या संबंधानें त्या वेळचें तयमूरचें दरबार स्पेनच्या दरबाराहून कमी नव्हतें. दरबारची टापटीप, व्यवस्था व काम करण्याची शैली ह्यांत तयमुरास नांवें ठेवण्यास जागा नव्हती. एवढें लक्षांत ठेविलें पाहिजे, कीं त्या वेळीं स्पेनचें राष्ट्र सर्व यूरोपखंडांत अत्यंत बलाढ्य व सुधारलेलें होतें. पंधराव्या शतकाच्या आरंभीं आशियाखंडांतील लोक युरोपापेक्षां कमी सुधारलेले नव्हते, आणि तयमूर कितीही दुष्ट असला तरी रानटी नव्हता, हें वर सांगितलेल्या पाश्चात्यांच्या स्वतःच्या पुराव्यावरून उघड होतें.

तयमूरलंग एखाद्या नवीन शहरीं आला म्हणजे तेथील लोकांपासून सर्व संपत्तीची दरडावून मागणी करी. नंतर ती लुटून आणण्यास आपली फौज पाठवी. सर्व लोकांस तो पकडून एके ठिकाणीं जमा करी. अशा लोकांतून कारागीर व विद्वान् असे जे कोणी असतील त्यांस वेगळे काढून राज्यांतील एखाद्या ओसाड प्रदेशांत वसाहत करण्यास पाठवी. इतरांचा जीव घेऊन त्यांच्या शिरांचा एक मोठा ढीग शहराबाहेर रचण्यांत येई. बगदाद शहर घेतलें त्या वेळेस अशा शिरांचे मनोरे एकशेंवीस झाले होते. केव्हां केव्हां जिवंत माणसांस चुन्यानें व विटांनीं चिनून त्यांचा तट बांधण्याचें काम तयमूरचे कुशल कारागीर करीत.

'मोगल लोक येत, नासधूस करीत, जाळीत, कत्तल करीत, लुटीत व निघून जात.' या एका वाक्यांत तयमूरच्या सर्व स्वाऱ्यांची हकीकत येते. हिंदुस्थानांत मोगल बादशाहीची सुरुवात तयमूरनें केली असें म्हणण्यास हरकत नाहीं. तो जिवंत असेपर्यंत त्याच्याच नांवानें हिंदुस्थानांत खुत्बा वाचण्यांत येत असे. त्याची स्वारी म्हणजे एक ईश्वरी क्षोभ असेंच हिंदुस्थानांत सर्व लोक समजत. तयमूरनें आपले लेख नेस्टोरियन नामक क्रिस्तीपाद्र्यांनीं काढिलेल्या लिपींत लिहिले. त्यास आरबी भाषा येत नव्हती. तुर्की व फारसी भाषा येत होत्या. पुढें तुर्की भाषेची एक नवीन लिपी बाबर बादशहानें सुरू केली. तयमुरास बुद्धिबळें खेळण्याचा नाद विशेष होता.

तयमूर जन्मापासून संकटांत कसलेला होता. संकटांशीं झगडण्याच्या प्रसंगांमुळें पुरुषास जें शिक्षण मिळतें त्याची किंमत पुस्तकी विद्येच्या शेंकडोंपट ज्यास्त आहे, हें तयमूर, अकबर, शिवाजी वगैरे अनेक पुरुषांच्या चरित्रांवरून व्यक्त होतें. तयमूरचा बाप तुर्घायखान हा मरण पावल्यावर तो अगदीं निकृष्ट स्थितीस येऊन पोंचला होता. कित्येक प्रसंगीं तर त्याच्याजवळ स्वतःचे असे एक दोनच मनुष्य होते. पुढें त्यास एकनिष्ठ, कुलीन, व धाडसी असे अनुयायी मिळत गेले, आणि हळू हळू त्याची भरभराट झाली.

त्याचा बांधा सुरेख, रंग गोरा, चेहरा उग्र पण उदार व निष्कपट, व आवाज कर्कश होता. त्याची खरी तसबीर उपलब्ध नाहीं असें जहांगीर बादशहानें म्हटलें आहे. पण तयमूरचें जें चित्र रेंब्रांट चितान्यानें काढून ठेविलें आहे, त्या तसबिरीवरून धाडस, सोशिकता, कावेबाजपणा हे गुण त्याच्यांत व्यक्त होतात. त्यास लिहितां वाचतां येत नव्हतें, म्हणून त्यानें लिहून ठेविलेल्या हकीकती आहेत, त्या केवळ त्यानें दुसऱ्यांकडून लिहविलेल्या व स्वतः ऐकून दुरुस्त केलेल्या आहेत. त्याचा भाग्योदय कसा झाला, याविषयीं एका मुंगीची एक चमत्कारिक गोष्ट त्यानें लिहून ठेविली आहे. 'एके दिवशीं शत्रूपासून पराभव पावून मी एका पडक्या घरांत गेलों आणि लपून बसलों. अंतःकरणांतील दुःख विरसण्याकरितां जवळून एक मुंगी चालली होती. तिच्याकडे मीं दृष्टि लाविली. ती मुंगी एक गव्हाचा दाणा तोंडांत धरून भिंतीवर चढत

होती. दाणा जड असल्यामुळें भिंतीच्या शिखरावर पोंचण्यापूर्वी ती मुंगी एकूणसत्तर वेळां खालीं पडली. सत्तरावे खेपेस तिचा प्रयत्न सिद्धीस गेला. हें मुंगीचें कृत्य पाहून तत्क्षणीं मला नवीन जोर प्राप्त झाला, आणि मी पुढील उद्योगास लागलों. त्या मुंगीचें उदाहरण मी कधींही विसरलों नाहीं.' सन १३५६ मध्यें अमीर सय्यद बेरेका नामक पैगंबराच्या वंशांतील एका विद्वान् गृहस्थास तयमूरनें आपला गुरु केलें. ह्या दोघांमध्यें अकृत्रिम स्नेह होता. तयमूर शियापंथी असून पुढें त्याच्या वंशजांनीं सुनी पंथ स्वीकारिला.

तयमूरचें राज्यकारभाराचें मुख्य तत्त्व असें होतें, कीं काय वाटेल तें होवो, पण एकदां राजाच्या तोंडून शब्द गेला, कीं तो परत घेऊं नये किंवा फुकट जाऊं देऊं नये. तो अंमलांत आलाच पाहिजे.

राज्यकारभार चालविण्याचीं बारा सूत्रें तयमूरनें आपल्या राजनीति ग्रंथांत लिहून ठेविलीं आहेत, तीं सर्व येथें देण्याचें प्रयोजन नाहीं. पण त्यांवरून तयमूर हा विलक्षण बुद्धिमान व अतिधोरणी राजा झाला असें म्हणावें लागतें. 'निष्पक्षपातानें न्याय करून गरिबांवर मीं जुलूम होऊं दिला नाहीं. चांगल्या कृत्याबद्दल बक्षीस व वाइटाबद्दल शासन दिल्याशिवाय राहिलों नाहीं. लोकांवर दया व शत्रूंसही मी क्षमा करीत असें.' अशा प्रकारें त्यानें आपली स्तुति केली आहे. हें वर्णन व त्याची प्रत्यक्ष कृति यांजमध्यें निर्विवाद महंदतर दिसतें. वाईट मनुष्यास सुद्धां स्वतःच्या दुष्कृत्यांचा अभिमान वाटत नसून लोकांनीं आपणांस चांगलें म्हणावें अशी बळकट इच्छा असते. त्यानें स्वतःबद्दल लिहिलेलें चांगलें वर्णन अशा इच्छेचाच परिणाम होय. तथापि तयमूरलंगाची तुलना तत्कालीन परिस्थितीच्या संबंधानेंच केली पाहिजे. बगदाद व डमास्कस येथील विद्यापीठांचा त्यानें विध्वंस केला; तरी त्यांच्याच तोडीचीं नवीन विद्यापीठें त्यानें समर्कंद येथें निर्माण केलीं.

चंगीझखानानें जे नियम व कायदे अमलांत आणिले होते, तेच तयमूरनेंही चालू ठेविले. राज्यरूपी इमारत बांधण्याची त्याची कल्पना महंमद पैगंबराच्या कुराणांतील तत्त्वांवर त्यानें रचिली नाहीं. 'मुसलमान तेवढे एकमेकांचे भाऊ होत,' हें कुराणांतील तत्त्व राज्यकारभारांत त्यानें पाळिलें नाहीं. लष्करी जोरावर राज्य स्थापून त्याचीं सर्व सूत्रें राजाच्या

ताब्यांत असावीं ही चंगीझखानाची कल्पना तयमूरनें प्रत्यक्ष अमलांत आणिली. तयमूरनें पुष्कळ मशीदी बांधिल्या, आणि धर्माधिकाऱ्यांस वेतनें करून दिलीं, इतक्यापुरता तो मुसलमानी धर्माचा भक्त होता, पण धर्माचा संबंध त्यानें राज्यकारभारांत येऊं दिला नाहीं. शिक्षेच्या भीतीनें व लुटीच्या आशेनें लोक त्यास भजत. त्याच्या धर्माची त्यास परवा वाटत नसे. तयमूरनें आपल्या लेखांत खोडसाळपणा केला आहे असें मानण्याचें कारण नाहीं. तत्कालीन स्थितीच्या मानानें तो चांगला राज्यकर्ता झाला हें निर्विवाद आहे. त्यानें केलेले नियम इराणी, तुर्क वगैरे लोकांतील विद्वानांकडून त्यानें जमविले. ते तरी सर्व राज्यभर चालू झाले होते असें नाहीं. तरी पण त्याच्या वंशजांस त्यानें केलेल्या कायद्यांचा निःसंशय पुष्कळ उपयोग झाला असावा. हिंदुस्थानांतील मोगल बादशहांनीं सुद्धां त्याचेंच अनुकरण पुष्कळ अंशीं करून कीर्ति मिळविली. अकबरानें तर ते नियम आपल्या राज्यास अक्षरशः लागू केले. तयमूरचें वर्तन कडक होतें तरी अंतःकरण कोमल होतें. त्याची कुटुंबांतील माणसांवर फारच प्रीति असे. तरी मुलांवर त्याची शिक्षा फार कडक होती. अनेक प्रसंगीं यःकश्चित् गुलामांप्रमाणें तो त्यांस वागवी. फारशी कवी हाफीज हा तयमूरलंगाचा समकालीन होता. निस्पृह भाषणानें तयमूरलंगासारख्या रागीट माणसाकडूनही त्यानें बक्षीस मिळविलें. तसेंच कर्माणी नांवाचा दुसरा एक कवि तयमूरजवळ होता. आंघोळ करून वस्त्रानें अंग पुशीत असतां तयमूरानें कर्माणीस पुसलें, ‘ मला विकलें तर माझी किंमत काय येईल ? ’ कवीनें उत्तर दिलें, ‘ येईल सुमारें २५ अस्पर्स. ’ ‘ कां बरें, तितकी तर माझ्या अंगावरील ह्या वस्त्राचीच किंमत होईल,’ असें तयमूर म्हणाला. त्यावर कवि बोलला, ‘ मीं तरी त्या वस्त्राचीच किंमत सांगितली; तुमची एकट्याची किंमत कवडीइतकीही नाहीं !’

राज्यांतल्या शिस्तीपेक्षां त्याच्या लष्करची शिस्त फारच कडक असे. युद्धसामुग्री, व लढाईची टापटीप या बाबतींवर तो स्वतः देखरेख ठेवीत असे. त्याच्याजवळ दोन लाख फौज नेहमीं लढाईच्या तयारीनें असे. त्यानें मोठमोठ्या चाळीस स्वाऱ्या केल्या, आणि तत्कालीन सर्व मोठमोठीं राज्यें पादाक्रांत केलीं. त्यावरून एकंदरींत तो मानवजातीचा उपकारकर्ता नसून संहारकर्ता होय, असें इतिहासकार समजतात.

तथापि अचाट बुद्धिमत्तेनें त्यानें विजय संपादिले, याजबद्दल त्यास 'महान' हें पद देणें योग्य आहे.

**५. सय्यद घराणें, ( स. १४१६–१४५० ).**—तयमूरच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा शहारुखमीर्झा, त्याच्या विस्तृत राज्याचा मालक झाला. पण तें राज्य इतक्या उतावळीनें जिंकलें गेलें होतें, कीं त्यास व्यवस्थित रूप येण्यास अवकाश मिळाला नाहीं. तयमूरच्या राज्यकारभाराचे बरेवाईट परिणाम त्याजबरोबरच लयास गेले. एखादा वणवा पेटून वाऱ्याच्या जोरानें वाढत जातो, त्यांत झाडेंझुडपें जळून खाक होतात, तथापि आग विझल्यावर जमीन लवकरच हिरवीगार दिसूं लागते, त्यांतलाच प्रकार तयमूरच्या राज्याचा झाला. समर्कंद येथें सुद्धां तयमूरचा वंश शंभर वर्षांवर टिकला नाहीं. पूर्वींच्या वणव्यांतील राहिलेले निखारे कांहीं दिवस धुमसत होते, पण त्यांस तैयमूरसारख्या बलवान उद्दीपकाची मदत न मिळाल्यानें ते हळू हळू विझून गेले. तयमूरचा फक्त एक दुर्बल अवशेष कांहीं दिवस अफगाणिस्थानांत धुगधुगी धरून होता; त्यालाच पुढें नवीन जीवन प्राप्त होऊन त्याची पुढें हिंदुस्थानांत जोराची वृद्धि झाली. तो अवशेष बाबर होय.

तयमूर गेल्यानंतर दोन महिनेपर्यंत दिल्ली शहरांत सर्व अंदाधुंदी चालली होती. दुष्काळ व रोगांच्या सांथी ह्यांचाही त्या वेळेस सुकाळच होता. दिल्लीचें वैभव जें ह्या वेळेस लयास गेलें, तें पुढें दोनशें वर्षांनीं मोगलबादशहांच्या वेळेस पुनः चमकूं लागलें. पुष्कळसा रक्तपात झाल्यावर पूर्वींचा वजीर मल्लू इक्बालखान ह्यानें अंदाधुंदी मोडून बरीच व्यवस्था केली. तेव्हां शहरांत शांतता होऊन पुष्कळ लोक परत आले. शहराशिवाय दुआब प्रांतही इक्बालखानानें आपल्या हाताखालीं घेतला. वास्तविक रीत्या दिल्लीच्या अफाट राज्याचा एवढाच भाग काय तो आतां शिल्लक राहिला होता. बाकीचे सर्व प्रदेश निरनिराळे अंमलदार व अनेक हिंदु राजे बळकावून बसले. गुजराथेंत मुजफरखान; अयोध्या वगैरे पूर्वेकडील प्रांतांत ख्वाजाजहान; काल्पी, महोबा वगैरे ठिकाणीं महंमदखान; पंजाबाकडे खिजरखान सय्यद वगैरे अंमलदार स्वतंत्रपणें कारभार करूं लागले. इक्बालखानानें ही संधि साधून स्वतः बादशाही पद बळकाविण्याचा यत्न केला. प्रथमतः त्यानें सुलतान महंमूद

तुघ्लख गुजराथेंतून माळव्याकडे गेला होता, त्यास परत बोलाविलें. महंमूद बिचारा आला. पण इक्बालखानानें सर्व सत्ता स्वतःचे हातीं ठेविल्यामुळें त्यास बरें न वाटून कनोज प्रांताची सुभेदारी घेऊन तो तेथें जाऊन स्वस्थ बसला. पुढें ह्या उभयतांचा कनोज येथें युद्धप्रसंग झाला. पण कोणासही कांहीं फलनिष्पत्ति झाली नाहीं. पुढें इक्बालखानानें मुलतानचा सुभेदार खिजरखान ह्याजबरोबर झगडा चालविला. पण १४०५ त इक्बाल पराभव पावून मारला गेला.

तेव्हां दिल्लींतील कामगार दौलतखान लोदी ह्यानें महंमूद तुघ्लखास परत बोलावून तख्तनशीन केलें, (सन १४०५). परंतु महंमुदाचा अंमल पुनः नीट बसला नाहीं. त्याच्या व खिजरखान ह्याच्या एकसारख्या लढाया चालू होत्या. शेवटीं अनेक संकटांनीं घेरल्यामुळें तापानें आजारी पडून हा दुर्दैवी महंमूद तुघ्लख दिल्लीचा शेवटचा तुर्क सुलतान मरण पावला, (सन १४१२); आणि त्याजबरोबरच हिंदुस्थानावर राज्य करणाऱ्या तुघ्लख व तुर्क घराण्यांचा शेवट झाला. महंमुदानें एकंदर वीस वर्षे राज्यकारभार केला; पण तेवढ्या वेळांत बिचाऱ्यास सुखाचा लवलेश मिळाला नाहीं. महंमूद तुघ्लखानंतर दौलत लोदीनें दिल्लीचें तख्त स्वीकारिलें. पण तयमूरलंगाच्या वतीनें खिजरखान त्याजबरोबर झगडूं लागला. शेवटीं सन १४१६ त त्यास पदच्युत करून खिजरखानानें बादशाही पद बळकाविलें, आणि सय्यद घराण्याची स्थापना केली.

खिजरखानानें तयमूलंगाची मर्जी संपादन केल्यामुळें त्याचा राज्यकारभारांत प्रवेश झाला. दौलतखान लोदीपासून राज्य बळकाविल्यावरही त्यानें स्वतः राजचिन्हें धारण केलीं नाहींत. त्यानें तयमूरच्या नांवानेंच नाणीं पाडवून खुत्बा वाचविला. तयमूर मरण पावल्यावर त्याचा मुलगा शहारुख मिर्झा समर्कंदच्या तख्तावर आला, त्यास खिजरखान कधीं कधीं खंडणी पाठवी. त्याच्या राज्याचा अगदींच संकोच झाला होता, आणि त्यांतला सुद्धां वसूल दरसाल स्वारी केल्याशिवाय होत नसे. सात वर्षे शांततेनें कारभार करून खिजरखान सन १४२७ त मरण पावला. नीति, औदार्य, व परहितेच्छा या गुणांमुळें लोक त्यास फार चाहत असत. आपला पुत्र मुबारिक यास त्यानें आपला वारस नेमिलें होतें.

मुबारिक हा सज्जन असून राज्यकारभाराच्या कामीं लायक होता. पण त्याचा शांतताप्रिय स्वभाव त्या घालमेलीच्या काळास साजणारा नसल्यामुळें त्यास मिळावें तसें यश मिळालें नाहीं. चारही बाजूंचे अंमलदार त्यास एकसारखा त्रास देत, म्हणून त्यांजबरोबर झगडण्यांत त्याचा पुष्कळ काळ गेला. न्यायी व दयाळु असल्यामुळें प्रजेची त्याजवर फार भक्ति होती. सरूर-उल्मुल्क ह्या नांवाचा त्याचा वजीर होता, त्याजवर कांहीं कारणामुळें शहाची इतराजी झाली. त्यास हा अपमान सहन न होऊन एके दिवशीं मुबारिक मशिदींत प्रार्थना करीत असतां, त्यास त्या दुष्टबुद्धि प्रधानानें कपटानें मारेकरी घालून ठार केलें, (सन १४३५). त्या प्रसंगीं सर्व रयतेस फार दुःख झालें.

मग त्या वजिरानें मुबारिकचा महंमद म्हणून एक मुलगा होता, त्यास सिंहासनावर स्थापन करून स्वतःचे हातीं सर्व कारभार ठेविला. कांहीं दिवस त्या दोघांचें सख्य होतें. पण ह्या वजिरानें लवकरच स्वतःचीं माणसें कारभारावर नेमून पूर्वीच्यांस घालवून दिलें. तेव्हां राज्यांत सुलतान व वजीर ह्या दोघांसही मारण्याचे कट होऊन उघड लढाई जुंपली. अशा प्रसंगीं ह्या दुष्टबुद्धि वजिरास सोडून देऊन लोकांचे पक्षास मिळणें महंमदास भाग पडलें. अर्थात् हे उभयतां शत्रु बनून एकमेकांचा जीव घेण्याच्या उद्योगास लागले. शेवटीं सुलतानाचा बेत तडीस जाऊन सरूर-उल्मुल्क् मारला गेला. पुढें कांहीं दिवस महंमदास शांतता मिळाली. पण तो स्वभावतः विषयासक्त असल्यामुळें त्याच्या हातून राज्याचा बंदोबस्त होईना. सरहिंद येथें बुह्लोल लोदी म्हणून एक अफगाण होता. तो पंजाब प्रांत बळकावून बसला. तो इतका बलवान झाला, कीं सुलतान महंमदास त्याची मदत मागावी लागली. एक दोन प्रसंगीं त्यानें चांगली मदत केली. पण पुढें त्या उभयतांत कलह लागला. बुह्लोल हा दिल्लीपद बळकाविण्यास टपला होता. इतक्यांत महंमद सय्यद आजारी पडून मरण पावला, (सन १४४५).

महंमदाचा मुलगा अला-उद्दीन सय्यद तख्तनशीन झाला. पण बुह्लोल यानें आपला प्रयत्न सोडून दिला नव्हता. अला-उद्दीन बापापेक्षांही दुर्बळ निघाल्यामुळें दिल्लीपतीची सत्ता राजधानीच्या शहराबाहेर फारशी उरली नाहीं. तयमूरलंग गेल्यावर पुष्कळ सुभेदार स्वतंत्र झाले, तरी राजधानीचे

सभोंवार बराच मुलुख राहिला होता. पण तोही आतां गेला. तशांत बुह्लोलसारखा कावेबाज मनुष्य अनुकूल प्रसंगाची वाट पाहत होता. बदाऊन म्हणून अलाउद्दीननें स्वतः वसविलेलें व त्याच्या आवडीचें एक शहर होतें. तेथील हवा त्यास ज्यास्त पथ्यकर वाटली, म्हणून दिल्ली सोडून तो तेथें जाऊन राहिला. अशी गोष्ट करूं नये म्हणून हमीद नामक त्याच्या वजिरानें त्यास पुष्कळ सांगितलें, पण त्यास तें रुचलें नाहीं. अखेरीस वजिराचें व त्याचें वांकडें आलें. त्या वजिरानें बुह्लोल लोदी ह्यास आपल्या मदतीस बोलाविलें. बुह्लोल कांहीं कमी नव्हता. त्यानें अलाउद्दिनास कळविलें, कीं मी वजिराचें पारिपत्य करण्यास दिल्लीस जात आहें. त्या वेळीं अलाउद्दिनास स्वस्थता इतकी प्रिय वाटली, कीं त्यानें स्वतःच खुशीनें सर्व राज्य बुह्लोलच्या स्वाधीन करून आपण बदाऊन येथें राहण्याचें कबूल केलें. त्याप्रमाणें तो बदाऊन येथें स्वस्थ राहिला. तेथें सन १४७८त त्याचा अंत झाला.

सय्यद घराण्याचा अंमल स.१४१६ पासून १४५० पर्यंत चालला. एकंदरींत ह्या घराण्याचे राजे दुर्बळ व सत्ताहीन झाले. अलाउद्दीन खिलजीनें वाढविलेल्या मुसलमान बादशाहीचे तुकडे होऊन दिल्लीच्या सुलतानाचे हातीं कांहींच प्रदेश राहिला नाहीं. सर्वत्र दंगेधोपे व अस्वस्थता चालू होती. त्यांतून हे नामधारी सुलतान कशी तरी वेळ मारून नेत होते. हिंदु राजे तरी प्रत्यक्ष स्वारी अंगावर आली म्हणजे सुलतानास शरण जात, खंडणी देण्याचें कबूल करीत, आणि किल्ले किंवा शहरें खालीं करून देत. पण सुलतानाची फौज परत गेल्यावरोबर लगेच पुनः तीं ठिकाणें परत घेऊन स्वतंत्रपणें वागूं लागत. ह्यावरून मध्यवर्ती सुलतानांची सत्ता किती दुर्बल झाली होती हें दिसून येतें. हिंदूंस बळजबरीनें भराभर मुसलमान बनविण्याचा जो सपाटा चालला, त्या योगानें मुसलमान समाजाचें पूर्वींचें प्रखर पाणी कायम राहिलें नाहीं. म्हणून हिंदुस्थानच्या बाहेरून ताज्या दमाची नवीन भर आल्याशिवाय येथच्या येथें त्यांचें राज्य कायमचें टिकणें अशक्य झालें. मुसलमानांच्या अडचणींचें थोडेसें वर्णन वर कलम १ ह्यांत आलें आहे.

६. लोदी घराणें, (स. १४५०–१५२६).—लोदी हे अफगाणच होते. त्यांचा पूर्वापर धंदा व्यापाराचा होता. इराण व हिंदुस्थान ह्या

देशांशीं व्यापार करून ते श्रीमंत झाले होते. फिरोज तुघ्लखनें ह्यांस चांगला आश्रय दिला होता. बुह्लोलचा आजा मुलतानचा सुभेदार होता. सय्यदांच्या कार्कीर्दींत त्याचा बाप व चुलते लष्करांत सरदार होते. सय्यद महंमदानें ह्या लोकांचा फार छळ केला. शेवटीं बुह्लोल यानें सरहिंद घेऊन सर्व पंजाब प्रांत हाताखालीं घातला. सन १४५० त राज्यपद मिळाल्यावर त्यानें सय्यदांचा वजीर हमीर ह्यास घरीं बसविलें. पंजाब प्रांत त्याच्या ताब्यांत असल्यामुळें त्याच्या राज्याची मर्यादा बरीच वाढली. तो स्वतः चांगला शूर व उदार होता, म्हणून लोकांची भक्ति त्याजवर विशेष होती. जोनपूरच्या शर्की राजांशीं त्यास एकसारखें झगडावें लागलें. शेवटीं तें स्वतंत्र झालेलें राज्य जिंकून त्यानें दिल्लीस मिळविलें, (सन १४७८). अव्याहत परिश्रम करून त्यानें पंजाबपासून बंगालपर्यंत उत्तरहिंदुस्थानचा बहुतेक भाग आपल्या राज्यांत सामील केला. ह्याप्रमाणें एकंदर अडतीस वर्षें पराक्रमानें व सुखानें राज्य करून बुह्लोल लोदी सन १४८८त मरण पावला. बुह्लोलखान ह्यास नऊ मुलगे होते. त्याचा वृद्धापकाळ होत चालला, तसतशीं त्यानें आपल्या मुलांच्या हातांत पुष्कळ राज्यसत्ता दिली. ह्याचा परिणाम चांगला झाला नाहीं. श्रम करून जोडलेल्या राज्याचे पुनः विभाग पडले. एका सोनाराच्या सुंदर मुलीशीं बुह्लोल ह्यानें लग्न केलें होतें. तिजवर त्याची प्रीति विशेष असल्यामुळें तिच्या पोटचा मुलगा निजामखान ह्यानें आपल्यामागें राज्यारोहण करावें असें मरणसमयीं बुह्लोल ह्यानें ठरवून ठेविलें. परंतु त्याच्या वडील नातवाचा राज्यावर ज्यास्त हक्क होता. कांहीं काळ तक्रारी चालून निजामखानानें राज्य बळकाविलें, आणि तो आपणास सिकंदरशहा असें म्हणवूं लागला. बुंदेलखंड व उत्तर माळवा वगैरे प्रांतांतील हिंदु राज्यें जिंकण्यांत त्यानें कित्येक मोहिमी केल्या. तसेंच बहार प्रांत जिंकण्याचें बापानें अर्धें टाकिलेलें काम सिकंदरनें तडीस नेलें. तसेंच धोलपूर, चंदेरी, ग्वालेर, इत्यादि हिंदु राज्यें जिंकिल्यामुळें, दिल्लीच्या राज्याचा विस्तार पुनरपि बहुतेक हिंदुस्थानभर झाला. पुढें त्याचे कार्किर्दींत एकंदरीनें निर्वेध शांतता होती. त्यानें आपला सर्व वेळ दक्षतेनें राज्यकारभार करण्यांत घालविला. तो स्वभावाचा दयाळु व परोपकारी होता. लोकांच्या संरक्षणार्थ त्यानें

पोलीस खात्याची व्यवस्था केली; घोड्यांची टपाल ठेविली आणि रस्ते वगैरे दळणवळणाचीं पुष्कळ नवीन साधनें तयार केलीं. तो स्वतः विद्वान्, कवित्वगुणसंपन्न व कायदेपंडित असल्यामुळें, लोकांस न्याय वेळच्या वेळेस मिळून सौख्य झालें.

तरी धर्माच्या बाबतींत त्याचें मन फार कोतें होतें. हिंदुधर्माचा तर तो विशेष द्वेष करी. हिंदुस्थानांतील कडव्या धर्माभिमानी राजपुरुषांमध्यें त्याची गणना आहे. आपल्या राज्यांतील हिंदूंचीं देवालयें त्यानें मोडून टाकिलीं; आणि त्यांच्या यात्रा बंद केल्या. पर्वणीच्या दिवशीं नदीतीर्थांच्या पवित्र ठिकाणीं स्नानें करण्याची त्यानें मनाई केली. पुष्कळ मुसलमान साधूंनींही ह्या दुष्ट कृत्यांबद्दल त्याचा निषेध केला, पण कांहीं उपयोग झाला नाहीं.

सन १४९९ च्या सुमारास लखनौ जवळच्या एका गांवीं बुद्ध म्हणून एक ब्राह्मण होता. 'कोणताही धर्म मनापासून आचरिला असतां ईश्वरास सारखाच मान्य आहे,' असें त्यानें प्रतिपादिलें, म्हणून मुसलमानांनीं त्यास फार त्रास दिला. त्यानें आपला पक्ष इतका स्पष्ट करून दाखविला, कीं त्याजपुढें लखनौच्या काजीनेंही हात टेंकिले. शेवटीं अधिकाऱ्यांनीं तो कज्जा संबळ येथें सुलतानाकडे पाठविला. तेथें एक मोठा दरबार भरवून सिकंदरखानानें नऊ विद्वान् मौलवींकडून त्याच्याशीं पुष्कळ वाद करविला, तरी शेवटीं तो आपलें म्हणणें सोडीना, तेव्हां 'मुसलमान हो, नाहींतर शिरच्छेद होईल,' अशी त्याला धमकी मिळाली. तीही ब्राह्मणानें जुमानिली नाहीं. अखेरीस शहानें त्याचा शिरच्छेद करविला. अशा प्रकारचीं शहाण्या पण आग्रही राज्यकर्त्यांचीं उदाहरणें इतिहासांत वारंवार सांपडतात.

सिकंदर न्याय करण्यांत विशेष कुशल होता. न्याय करण्याच्या चातुर्याविषयीं त्याच्या अनेक गोष्टी लोकांत प्रसिद्ध आहेत. त्याच्या कारकिर्दीत सन १५०५ जुलई ता० ५ रोजीं आग्रा येथें एक मोठा धरणीकंप झाला, तेणेंकरून पुष्कळ पर्वत चलन पावले, गांवें व देवळें मोडलीं, आणि पुष्कळ लोकांचा संहार झाला. सिकंदर सन १५०७ त मरण पावला, आणि त्याचा मुलगा इब्राहीमखान तख्तावर आला. त्या वेळीं कोठें कांहीं गडबड झाली नाहीं.

लोदींच्या वेळेस राज्यविस्तार जरी बराच वाढला, तरी राज्यांत बंधन म्हणून राहिलें नव्हतें. निरनिराळ्या प्रांतांतील कामदार, जमीनदार व लहानलहान अंमलदार सुद्धां, दिल्लीच्या सुलतानाची परवा न ठेवितां मनास वाटेल तसा स्वतंत्र कारभार करीत. रयतेस देखील मुख्य सुलतानाची परवा वाटत नसे. प्रत्यक्ष जवळ मानेवर येऊन बसलेला जो इसम असे, त्याजपुरती रयत लोक काळजी ठेवीत. सारांश, सर्व राज्य कायद्यानें चालत नव्हतें, व्यक्तीकडे पाहून चालत होतें. अफगाण लोक शिरजोर होते, त्यांजला पूर्ण मुभा दिल्याशिवाय लोदींचें चालणारें नव्हतें. तेव्हां सर्व राज्यांत अफगाणांचा भरणा होऊन ते वाटेल तसा कारभार करूं लागले. अशा शिरजोर अंमलदारांस दाबांत ठेवणें कठीण असतें. सबब त्यांच्या समजुतीकरितां त्यांस अनेक सवलती दिलेल्या होत्या, त्या इब्राहीमनें सर्व बंद केल्या. तसेंच दरबारांत इतर मंडळींना सुद्धां अफगाणांसारखाच मान मिळावा असें फर्माविलें. दरबारांत सर्व लोक उभे असतां आफगाणांस मात्र खालीं बसण्याची मुभा असे. इब्राहीमखानानें हा प्रचार बंद करून अफगाणांचा शिरजोरपणा कमी करण्याचा प्रयत्न केला. तेव्हां सर्व अफगाण सरदार त्याजवर संतापून उठले, आणि जलालखान म्हणून इब्राहीमचा एक भाऊ होता, त्यास जाऊन मिळाले. जलालखानानें जोनपूर येथें स्वतंत्र राज्यपद धारण केलें. परंतु जलालखानाकडूनही त्यांची इच्छा तृप्त न होऊन ते पुनः इब्राहिमास मिळाले. इब्राहीमनें जलालखानाशीं युद्ध करून त्यास व पुष्कळ अफगाणांस ठार मारिलें. येणेंप्रमाणें एका बंडाची समाप्ति झाली.

कुरा प्रांताचा सुभेदार इस्मईलखान म्हणून होता. त्याचें जलालखानाशीं सख्य असल्यामुळें जलालच्या मृत्यूचा सूड घेण्याच्या विचारानें त्यानें बंड उभारिलें. त्याचा बंदोबस्त इब्राहीमखानाच्या हातून होईना. उभयतांनीं फौजेची चांगली जमवाजमव केली. शेख राजू बुखारी म्हणून त्या वेळेस एक प्रसिद्ध साधु होता. त्याच्या मध्यस्थीनें कांहीं दिवस तहाचें बोलणें चाललें. पण इब्राहीम नुसती फौज येण्याची वाट पाहत होता. ती आल्यावर तो आपल्या शत्रूंवर चालून गेला. तेव्हां बराच युद्धप्रसंग होऊन बंडवाले पळून गेले.

**७. लोदी घराण्याची समाप्ति.**—(स. १५२६). कांहीं दिवस इब्राहीम यास जिकडे तिकडे निर्धास्त वाटलें. पण अशी स्थिति फार दिवस टिकली नाहीं. बहारचा सुभेदार मरण पावल्यावर त्याचा मुलगा बहादूरखान आपणास स्वतंत्र म्हणवूं लागला. त्याजला पुष्कळ जोडीदार मिळाले. एक लाख स्वार त्याजपाशीं जमले. त्यानें अनेक प्रसंगीं दिल्लीच्या फौजेचा पराभव केला. लाहोरास दौलतखान लोदी म्हणून सुभेदार होता. आरंभीं तो इब्राहीमचा दोस्त होता. परंतु कांहीं निमित्तानें दोघांत वैमनस्य पडल्यामुळें दौलतखानास आपलें जीवित सुरक्षित वाटेना. त्या वेळीं बाबर नांवाचा एक मोगलवंशी पुरुष काबूलचें राज्य करीत होता. त्याजबरोबर दौलतखानानें पत्रव्यवहार चालवून त्यास आपल्या मदतीस बोलाविलें. बाबरचाही डोळा पुष्कळ दिवस हिंदुस्थानावर होताच. दौलतलोदीचें आमंत्रण त्याच्या चांगलें पथ्यावर पडलें. इब्राहीमचा भाऊ अला-उद्दीन भावाशीं नाराज होऊन बाबरजवळ राहत होता. त्याच्या मार्फतीनें हिंदुस्थानच्या खऱ्या स्थितीची बाबरनें चांगली माहिती करून घेतली. प्रथमतः बाबरनें अला-उद्दीन यास हिंदुस्थानांत पाठविलें. त्यास दौलतखान व दुसरे पुष्कळ सरदार मिळाले. चाळीस हजार फौजेनिशीं ते दिल्लीवर चाल करून आले. इब्राहीमखानाची व त्यांची लढाई झाली. अला-उद्दीन यास प्रथमतः जय मिळून त्याचे लोक लुटीच्या पाठीस लागले. इतक्यांत इब्राहीमनें संधि साधून त्यांजवर हल्ला करितांच ते अस्ताव्यस्त होऊन पळाले. पुष्कळांची कत्तल उडाली. अला-उद्दीन जीव घेऊन परत पंजाबांत पळून गेला; आणि इब्राहीमनें विजयोत्साहानें दिल्लींत प्रवेश केला. पण त्याचा तो आनंद फार वेळ टिकला नाहीं. अला-उद्दीनच्या पराभवाचें वर्तमान ऐकून बाबर त्वरेनें सिंधुनदी उतरून अलीकडे आला. त्याची व इब्राहीमखान लोदी याची गांठ तारीख २१ एप्रिल, सन १५२६ रोजीं पानिपतच्या समरभूमीवर पडली. त्या वेळीं तुंबळ रणकंदन होऊन इब्राहीम मारला गेला, आणि दिल्लीचें पद बाबरास मिळालें. ह्याप्रमाणें लोदी वंशाची समाप्ति होऊन हिंदुस्थानांत प्रबळ मोगल सत्तेची स्थापना झाली. इब्राहीमबरोबरच अफगाण व पठाणवंशी सुलतानांचा शेवट झाला.

१३-७९५-२०००

इब्राहीम लोदी राज्यकारभार चालविण्यास लायक नव्हता. त्यानें पुष्कळांशीं निष्ठुर वर्तन केल्यामुळें ते त्याजवर उठून शत्रूंस मिळाले. स्वतःच्या पदरच्या लोकांची त्यानें नानातऱ्हेनें मानहानि केली. तो शूर होता म्हणून त्यानें इतके दिवस तरी टिकाव धरिला.

मोगल वंशाचे इतिहासास सुरुवात करण्यापूर्वी आजपर्यंत मुसलमानी अंमलाची व एकंदर देशाची त्या काळीं स्थिति कशी होती हें समजणें जरूर आहे. पण त्यापूर्वी हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं जीं अनेक स्वतंत्र मुसलमानी व हिंदु राज्यें स्थापन झालीं होतीं, त्यांचा त्रोटक इतिहास समजल्याशिवाय तत्कालीन देशस्थितीचें पर्यालोचन करणें योग्य नाहीं. सन ७११त मुसलमान लोकांचा ह्या देशांत प्रवेश झाल्यापासून सन ११९३त शहाबुद्दीन महंमद घोरीनें दिल्लीपद काबीज केलें, तेथपर्यंत सुमारें पांचशें वर्षें ह्या देशावर आपला अंमल बसविण्यास मुसलमान लोक पाहत होते. शहाबुद्दीन घोरीच्या वेळेपासून त्यांचें कायमचें राज्य ह्या देशांत सुरू झालें. पुढें शंभर वर्षांनीं अला-उद्दीन खिलजीनें बहुतेक सर्व देशावर बादशाही अंमल स्थापिला. पण त्याचेमागून आलेले राज्यकर्ते दुर्बळ निघाल्यामुळें सन १५२६ त बाबर येईपर्यंत मुसलमानी राज्यांच्या अनेक शाखा स्वतंत्रपणें नांदत होत्या. त्यांच्या हकीकतीस आतां सुरुवात करूं.

---

# प्रकरण अकरावें.

## गुजराथचा इतिहास.

### सन ९४२—१५७२.

१. पूर्व-वृत्तान्त, (इ.स. ९४२ पर्यंत). २. चालुक्य-वंश, (स. ९४२–१२१५). ३. वाघेल-वंश, (स.१२१५–१२९६). ४. अला-उद्दीन व राजाकर्ण, (स.१२९७). ५. दिल्लीच्या सुलतानांचा अंमल. ६. स्वतंत्र सुलतान, (स.१३९६–१५७२). ७. गुजराथच्या इतिहासाचें पर्यालोचन.

**१. पूर्ववृत्तान्त.**—गुजराथ प्रांताचा प्राचीन इतिहास देण्याचें हें स्थल नव्हे. हल्लींच्या भावनगराजवळच वल्लभीपूर म्हणून एक प्राचीन

काळीं नांवाजलेलें शहर होतें. त्या शहरीं अशोकवंशी बुद्धधर्मी राजे राज्य करीत होते. ह्या राजवंशाची समाप्ति इसवी सनाच्या चवथ्या शतकाच्या प्रथमार्धात झाली. तदनंतर सुमारें चारशें वर्षेपर्यंत पंचासर नांवाचे ठिकाणीं 'चावडा' कुळांतील पुरुषांचें राज्य चाललें. कल्याणच्या चालुक्यवंशी राजांनीं इ. स. ७४६च्या सुमारास चावडा वंशाचा पाडाव केला. तेव्हां त्या चावडावंशी पुरुषांनीं अन्हिलवाडा हें शहर स्थापन करून तेथें कांहीं दिवस राज्य केलें. इ. स. ९४२त चालुक्य किंवा सोळंखी वंशांतला प्रथम पुरुष मूळराज हा अन्हिलवाडचा राजा झाला. त्यानें अनेक युद्धें करून सभोंवतालच्या राजांस जिंकून त्यांस आपले मांडलिक केलें. त्यानेंच महाराष्ट्र देशावर स्वारी करून कल्याणचें राज्यही आपल्या ताब्यांत घेतलें. मूळराज इ. स. ९९७ त परलोकवासी झाला.

**२. चालुक्य-वंश, (९४२–१२१५). चामुंड, (९९७–१०२६).**— मूळराजानंतर त्याचा पुत्र चामुंड हा राज्यासनावर बसला. त्यानें आपलें राज्य मोठ्या शहाणपणानें व नीतीनें चालविलें; आणि राज्यसंपत्ति, व कीर्ति वाढवून मूळराज यानें दिलेल्या राज्याचें चांगल्या प्रकारें रक्षण केलें. ह्याच्याच कारकिर्दींत गज्नवी महंमुदानें सोमनाथपट्टणावर स्वारी केली. चामुंड रायाची त्याजबरोबर लढण्याची तयारी नसल्यामुळें तो राजधानी सोडून पळून गेला. महंमूद सोमनाथास गेल्यावर चामुंडाचा वडील पुत्र वल्लभसेन व नातू भीमदेव हे मोठ्या फौजेनिशीं त्याजबरोबर लढण्यास आले. त्या लढाईत भीमदेवाचा पराजय झाला, तरी त्यानें तीन हजार मुसलमान लोक कापून काढिले. हा राग मनांत धरून सोमनाथाचें देवालय काबीज केल्यावर महंमूद अन्हिलवाड्यास गेला. महंमुदानें चामुंडाचें राज्य काबीज करून त्याजवर त्याचा दुसरा मुलगा दुर्लभसेन यास स्थापिलें, आणि आपण स्वदेशीं निघून गेला. महंमुदाच्या ह्या स्वारीविषयीं हिंदु इतिहासलेखांत बरेंच भिन्न वर्णन आढळतें. अन्हिलवाड्याचे गादीवर त्या वेळेस भीमदेव होता असें हिंदु इतिहासकार लिहितात, आणि चामुंड होता असें मुसलमान इतिहासकार लिहितात.

दुर्लभसेनानें राज्य चांगल्या प्रकारें चालविलें. तो केवळ साधुवृत्तीनें राहत असे. ह्या वेळचे बहुतेक राजे वृद्धापकाल झाला म्हणजे

पुत्रांस सिंहासनीं स्थापून, राहिलेलें आयुष्य तीर्थयात्रेंत घालवीत. तसेंच त्यांच्यांत मुलींच्या स्वयंवराचा प्रघात होता.

**भीमदेव,** (स. १०२६–१०७२).–भीमदेव फार पराक्रमी राजा झाला. त्यानें सभोंवारच्या पुष्कळ राजांवर आपला वचक बसविला. त्याचा समकालीन परमारवंशी प्रसिद्ध भोजराजा माळव्यांत धारा नगरीस राज्य करीत होता. भोजराजा दानशूर व भीमदेव रणशूर अशी त्या वेळेस सर्वत्र प्रसिद्धि होती. आबूच्या पहाडावरील अनेक प्रख्यात जैनमंदिरें, तसेंच पालिठाणा व चंद्रावती येथील सुंदर देवालयें भीमदेवानें बांधिलीं. पंजाबांत गज्नवी महंमुदानें अंमल स्थापिला, तो उठविण्यासाठीं अजमीरचा चव्हाण राजा वीसलदेव ह्यानें भीमदेवाचें साह्य मागितलें. अन्हिलवाडा व अजमीर येथील राजांमध्यें सदा वैर असे. वरील प्रसंगीं भीमदेवानें वीसलदेवास मदत केली नाहीं, तेणेंकरून मुसलमानांचा अंमल हिंदुस्थानांत चिरस्थायी होत गेला. या उभय राजाचें वैर न मिटतां, वीसलदेवानें गुजराथेवर स्वारी केली. तींत वीसलदेवास जय मिळून त्यानें वीसलनगर म्हणजे वीसनगर शहर स्थापिलें; आणि भीमदेवाकडून खंडणी घेऊन परत गेला. भीमदेवानें पुष्कळ वर्षें शांततेनें राज्य केलें. त्याच्या ठायीं प्रजावात्सल्य विशेष होतें. उदयामती राणीच्या पोटीं झालेल्या कर्ण नामक मुलास गादीवर स्थापून भीमदेव तीर्थयात्रेस निघून गेला.

**कर्णराज,** (स. १०७२–१०९४ ).—कर्णराजानें बावीस वर्षें शांततेनें राज्य केलें. त्याला लढाई वगैरे करण्याचा प्रसंग आला नाहीं. लोकोपयोगी अनेक कृत्यें करून त्यानें रयतेची प्रीति संपादिली. कर्णसागर नांवाचा एक अतिविस्तृत तलाव ह्यानें बांधिला. वऱ्हाडांतील चंद्रपूर ऊर्फ चांदा शहरचा राजा जयकेशी ह्याची कन्या मैनलदेवी इच्याशीं कर्णराजानें लग्न लाविलें. तिच्या पोटीं त्यास पुत्र झाला, त्याचें नांव सिद्धराज जयसिंग असें ठेवण्यांत आलें. हा मुलगा अल्पवयी असतांच कर्णराज मरण पावला.

**सिद्धराज जयसिंग,** ( सन १०९४–११४३ ).—सिद्धराज लहान असल्यामुळें त्याची आई मैनलदेवी राज्यकारभार पाहत असे. जयसिंग मोठा झाल्यावर तो फार हुशारीनें राज्य चालवूं लागला. त्यानें अनेक

तलाव बांधिले आणि प्रजेचें सुख वाढविण्याचे पुष्कळ प्रयत्न केले. माळव्याचे राजांबरोबर त्याचे वारंवार युद्धप्रसंग झाले. त्याचप्रमाणें सौराष्ट्र देशही त्यानें जिंकिला. हेमचंद्र नांवाचा एक विद्वान् जैनधर्मी साधु त्याचे दरबारीं होता. ह्याशिवाय आणखीही पुष्कळ विद्वानांस त्याचा आश्रय होता. त्याच्या वेळेस जैनधर्माचा प्रभाव विशेष होता. मुसलमान लोक जयसिंगाच्या वेळेस गुजराथेंत आले नाहींत.

सर्वगुणसंपन्न असतांही जयसिंगाच्या अंगीं स्त्रीलंपटपणा हा एक दुर्गुण होता. त्याजबद्दल कविजनांनीं त्याची पुष्कळ निंदा केली आहे. फोर्ब्स् आपल्या ' रासमाला ' नामक ग्रंथांत लिहितो, कीं ' जयसिंगांत पाहिजे तसे दुर्गुण होते, तरी तो हिंदु लोकांत एक श्रेष्ठ राजा होऊन गेला. तो शूर व बलवान असून मोठमोठीं चांगलीं कामें करण्यास सदा आतुर असे. भाट लोक त्यास ' गुजराथ देशाचें भूषण ' आणि ' चालुक्य वंशाचा कुलदीप ' असें म्हणतात, तें वाजवी आहे.' त्याच्या राज्याचा विस्तार मोठा होता.

**कुमारपाल सोळंखी, ( सन ११४३–११७४ ).**—सिद्धराज जयसिंग ह्यास पुत्रसंतति नसल्याकारणानें त्याच्या गादीवर, प्रधान कान्हादेवाच्या मदतीनें, क्षेमराजाचा नातू कुमारपाल हा बसला. अनेक जैनधर्मी लोकांचें त्यास विशेष साहाय्य झालें असल्यामुळें, त्यानें त्या धर्मास पुढें चांगलें उत्तेजन दिलें. आसपासच्या राजांशीं त्यानें पुष्कळ युद्धप्रसंग केले. कोंकण प्रांतावरही त्यानें स्वारी केली होती. विद्वान् साधु हेमचंद्र ह्यास कुमारपाल उत्तम प्रकारें भजत असे. कुमारपालानें पुष्कळ देवळें व इमारती बांधिल्या. साधु हेमचंद्र सूरी व राजा कुमारपाल हे उभयतां थोड्याच दिवसांच्या अंतरानें मरण पावले. कुमारपालानें विद्वान् लोकांस चांगला आश्रय दिला, आणि पुस्तकालयें स्थापिलीं, त्या पुस्तकांचा संग्रह अद्याप पाटण येथें आहे. सिद्धराजासारखाच हा पराक्रमी होता. पुतण्या अजयपाल ह्यानें कुमारपालास विष घालून ठार मारिलें.

**अजयपाल, ( सन ११७४–११७९ ).**—अजयपाल हा महीपालाचा पुत्र. हा शैवपंथी असून जैनधर्माचा द्वेष करी. लोकांवर त्यानें नानातऱ्हेचे जुलूम केले, त्यांस त्रासून त्यांनीं संधि साधून राजाचा खून

केला. त्याचे पश्चात् अजयपालाचा पुत्र मूळराज हा पाटणचे गादीवर बसला. मूळराज अल्पवयस्क असल्यामुळें त्याची आई नैकीदेवी ही सर्व कारभार पाहत असे. तिचा भाऊ भीमदेव हा सेनापति होता. हा मोठा शूर असे. दोन वर्षांच्या आंतच बाळराजा मूळराज मरण पावला.

**भीमदेव भोळा,** ( सन ११७९–१२१५ ). भोळ्या भीमदेवाची हकीकत विशेषतः चंदभाटाच्या रासाग्रंथांत आढळते. दिल्लीचा राजा पृथ्वीराज चव्हाण हा त्याचा समकालीन होता. त्या वेळेस भीमराजा महाबलाढ्य म्हणून गणला जात असे. त्याचें सैन्य फार मोठें असून सिंध देशापर्यंत त्याचीं जहाजें वावरत असत. जैनधर्मी प्रसिद्ध विद्वान् गृहस्थ अमरकोशाचा कर्ता अमरसिंह त्याच्याच दरबारीं होता.

हिंदुस्थानच्या दुर्दैवानें गुजराथचा राजा भीमदेव व दिल्लीचा राजा पृथ्वीराज यांजमध्यें हाडवैर माजलें. ह्या वैरामुळेंच परदेशीय मुसलमानांस हा देश हस्तगत करितां आला. भीमदेव व पृथ्वीराज ह्या वीर्यशाली पुरुषांचें उग्र क्षात्रतेज एकमेकांशीं लढण्यांतच खर्ची पडलें. तेंच जर मुसलमानांचा प्रतीकार करण्यांत खर्च झालें असतें, तर हिंदुस्थान देशाचें स्वातंत्र्य आणखी कांहीं दिवस कायम राहण्याची आशा होती. ह्या उभयतांचें वैर जडण्याचें कारण पाहूं गेल्यास अगदीं क्षुल्लक आहे. आबूगडचा राजा जैत परमार यास इच्छनीकुमारी नामक एक रूपवती मुलगी होती. तिची भीमदेवानें मागणी केली. पण तिचा भाऊ सलख याचा सारा ओढा पृथ्वीराजाकडे होता. भीमदेवाविषयीं पृथ्वीराजाचें मन त्यानें बिघडविलें, आणि ‘तूं स्वतः जाऊन इच्छनीकुमारीस वर,’ असें सलखनें पृथ्वीराजास सांगितलें. त्यामुळें सर्व रजपुतान्यांत कलहाग्नि पेटला. उभयतांनीं युद्धाची सिद्धता केली. आपसांत वैर माजवूं नये, म्हणून या दोनही राजांस आसपासच्या स्नेही मंडळीनें नानातऱ्हेचा बोध केला. पण दुर्दैवानें तो बोध कोणींच ऐकिला नाहीं. शहाबुद्दीन घोरी गृहकलह पेटण्याची संधिच पाहून होता. ह्या युद्धांत पृथ्वीराजानें भीमदेवास ठार मारिलें, असें कित्येक ग्रंथांत लिहिलें आहे, पण तें खरें असेलसें संभवत नाहीं. पृथ्वीराजास जय मिळाला ही गोष्ट खरी आहे. भीमराजाचा पराजय केल्यावर लवकरच मुसलमानांची गदा दिल्लीवर आली. शहाबुद्दीन घोरीनें दिल्ली व कनोज येथील राजांचा पाडाव केला. सन ११९४ त

शहाबुद्दीनचा प्रसिद्ध सरदार कुत्ब्-उद्दीन गुजराथ प्रांत जिंकण्याकरितां मोठी फौज घेऊन अन्हिलपट्टणास आला. लढाई होऊन भीमदेव पळाला. इतक्यांत गुजराथ जिंकण्याचें काम तसेंच सोडून कुत्ब्-उद्दीन पुनरपि गुजराथेंत आला, आणि ह्या प्रसंगीं सर्व रजपूत राजांचा पराभव करून तो दिल्लीस परत गेला. महंमद घोरी व कुत्ब्-उद्दीन हे लवकरच मरण पावल्यामुळें, गुजराथेंतून मुसलमानांचें ठाणें रजपूत राजांनीं लवकरच उठवून दिलें. भीमदेव सन १२१५ त मरण पावला. भीमदेवाबरोबरच सोळंखी वंशाचा अंत झाला. ह्यास इतिहासांत भोळा भीम असें नांव आहे.

**३. वाघेल वंश, ( सन १२१५–१२९६ ).**—सोळंखी राजा कुमारपाल ह्याचा अरुणराज ऊर्फ आनाक म्हणून एक मावसभाऊ होता. कुमारपालानें त्यास वाघेल वगैरे कित्येक गांवांची जहागीर देऊन आपल्या दरबारीं सामंत करून ठेविलें होतें. अरुणराजास एक मुलगा झाला, त्याचें नांव लवणप्रसाद. स्वपराक्रमावर वाढतां वाढतां हा भीमदेवाच्या कार्कि-र्दीत प्रधानाचे पदापर्यंत येऊन पोंचला. वाघेल व धोलका हे परगणे त्याच्या ताब्यांत होते. लवणप्रसाद व त्याचा पुत्र वीरधवल ह्या दोघांनीं गुजराथ व सौराष्ट्र ह्या प्रांतांत लुटालूट व युद्धसंग्राम करून आपली योग्यता वाढविली. त्यांत वीरधवल तर फारच शूर व धाडसी होता. महाराष्ट्र देशांतील देवगिरीचे यादवराजे व उत्तरेकडील रजपूत राजे यांनीं या दोघां वाघेल योद्ध्यांवर एकदम हल्ले केले; पण त्यांनीं युक्तीनें आपला बचाव करून सर्व शत्रूंस मागें हटविलें. ह्याप्रमाणें पट्टणचें राज्य वीरधवल ह्यास मिळालें. वस्तुपाल नामक एक चतुर मंत्री वीरधवलापाशीं होता. त्यानें दिल्लीच्या मुसलमान सुलतानांस जाग्यावर बसवून गुजराथेंत येऊं दिलें नाहीं.

वीरधवलानें आपलें स्वतःचें राज्य फारच न्यायानें व कर्तबगारीनें चालवून रयतेस सुख दिलें. तो दयाळु, सत्यप्रतिज्ञ व धर्मनिष्ठ होता. तो मरण पावला तेव्हां त्याच्याबरोबर १८० सेवकांनीं आपल्याला त्याच्या चितेवर जाळून घेतलें. वस्तुपाल व तेजपाल हे दोघे भाऊ वीरधवलाचे मंत्री होते. ते जैनधर्मी वाणी होते. त्यांनीं अनेक देवळें व वाडे बांधिले. वस्तुपाल विद्वान् व कल्पक होता, आणि तेजपाल विशेष शूर होता.

गिरनार पर्वतावर त्यानें अनेक देवालयें बांधिलीं आणि विहिरी खोदिल्या, त्या अद्यापि आहेत.

वीरधवलाचे पश्चात् त्याचा मुलगा वीसलदेव वाघेलचा राज्याधिकारी झाला. त्याच्या कार्कीर्दींत सिंधप्रांतांत दुष्काळ पडल्यामुळें तेथील सोडा नांवाचे रजपूत हे प्रथम सौराष्ट्रांत येऊन राहिले. वीसलदेवाचा वीरम म्हणून एक भाऊ होता. त्यानें वीरमगांव शहराची स्थापना केली. वीसल-देवाच्या मागून अर्जुनदेव वाघेल हा राजा झाला. तो शिवभक्त असून अन्हिलवाड येथें राज्य करीत होता. अर्जुनामागून लवणराजा व सारंगदेव असे अनुक्रमानें राजे झाले.

सारंगदेवाचे पश्चात् कर्ण वाघेल नांवाचा राजा अन्हिलवाडचे गादीवर बसला. सन १२९६त या कर्णाचें राज्य दिल्लीचा पराक्रमी सुलतान अला-उद्दीन खिलजी यानें हिरावून घेतलें. याप्रमाणें गुजराथेंतील हिंदु-राज्याची समाप्ति झाली.

४. अला-उद्दीन व राजा कर्ण, ( सन १२९६–१३१६ ).— अला-उद्दीन खिलजीनें हिंदुस्थानांतील अनेक राज्यांचा पाडाव करून अपरंपार द्रव्य कमाविलें, ही हकीकत मागें येऊन गेलीच आहे. स. १२९७ त त्यानें आपला भाऊ आलफ्खान व वजीर नुस्रतखान यांस गुजराथ काबीज करण्याकरितां पाठविलें. त्यांच्या अवाढव्य फौजेनें गुजराथ देशाची अतिशय पायमल्ली केली. अन्हिलवाडचा किल्ला घेऊन तेथें मुसलमानांनीं आपलें ठाणें बसविलें. तेथील राजा कर्ण वाघेल दक्षिणेंत रामदेवराव यादव याचे आश्रयास जाऊन राहिला.

मुसलमानांच्या टोळधाडीपुढें एका मागून एक सर्व हिंदु राज्यें हात-टेंकीस येऊन आटपलीं, ह्याचें कारण मुसलमानांचा कडवेपणा हें तर एक आहेच, पण त्याजबरोबरच हिंदु राजांची नीतिमत्ता बिघडलेली होती, हें आपल्यास मोठ्या दुःखानें कबूल करावें लागतें. गुजराथच्या कर्ण राजाची गोष्ट अशीच आहे. भाट लोकांनीं कर्णाच्या अनाचाराचें पुष्कळ वर्णन केलें आहे. माधव नांवाचा एक नागरब्राह्मण कर्णाचा मुख्य प्रधान होता. तो कोठें बाहेर गेला असतां, त्याच्या रूपवती पत्नीस कर्णानें बलात्कार करून आपल्या वाड्यांत नेलें. तिला सोडविण्याचा

प्रयत्न माधवाचा भाऊ केशव ह्यानें केला, पण त्यांत तो मारला गेला. परत आल्यावर माधवास ही हकीगत कळली. पण त्याला या दुष्कृत्याचा सूड स्वतः घेतां येईना, तेव्हां तो तसाच दिल्लीचा सुलतान अला-उद्दीन याजकडे गेला. तेथें कर्ण राजाच्या जुलुमाची कची हकीगत अला-उद्दिनास सांगून, गुजराथदेशावर स्वारी करण्याविषयीं माधवानें सुलतानाचें मन वळविलें. कर्णाच्या ठिकाणीं कांहींच पराक्रम नसल्यामुळें लढाईची तजवीज करण्याचें सोडून त्यानें बायकांप्रमाणें शहरचे सर्व दरवाजे बंद करून स्वतःस व नगरवासी लोकांस आंत कोंडून घेतलें. माधवाच्या माथींही स्वामिद्रोहाचा दोष येतो. त्यानें मुसलमानांस देशांत आणिल्यामुळें गुजराथदेशाचा नाश होऊन लोक देशोधडीस लागले; सर्वत्र अशांति, असुख व अस्वास्थ्य माजलें; आणि स्वराज्य व स्वसत्ता ह्यांचें सर्वांशीं निर्मूलन होऊन सर्वांच्याच वांट्यास हीन पारतंत्र्य आलें.

कर्णानें बायकामुलें व संपत्ति ह्यांचा लोभ सोडून केवळ क्षणभंगुर जिवाकरितां पलायन केलें. पाठीमागें त्याचें राज्य व घरदार मुसलमानांचे स्वाधीन झालें. त्यांत कर्णाची रूपवती स्त्री कमलादेवी हीही त्यांचे हातीं सांपडली. तिची रवानगी अला-उद्दीनकडे झाली. तिच्याशीं लग्न लावून त्यानें तिला आपल्या जनानखान्यांत ठेविलें. अन्हिलपट्टण घेतल्यावर, आलफ्खान व नुस्रतखान हे खंबायतेवर गेले. खंबायत हें त्या वेळीं विशेष भरभराटीचें व मातबर शहर होतें. ह्या ठिकाणीं नुस्रतखानास एक गुलाम मिळाला, तो त्यानें बादशहास नजर केला. तोच गुलाम पुढें मलीक काफूर म्हणून अला-उद्दीनचा कलिजा होऊन बसला. खंबायत लुटल्यावर मुसलमानांची धाड सोमनाथावर गेली. तेथील देवळांची त्यांनीं महंमूद गज्नवीप्रमाणें फिरून धूळधाण केली. सन १३०४त अला-उद्दीननें आलफ्खानासच गुजराथचा सुभेदार नेमिलें. आलफ्खानानें पट्टणास एक भव्य मशीद बांधिली, ती अद्यापि आहे.

मलीक काफूर यास अला-उद्दीननें दक्षिण देश जिंकण्यास पाठविलें, तेव्हां गुजराथची फौज घेऊन त्याच्या मदतीस जाण्याविषयीं आलफ्खानासही हुकूम झाला. कमलादेवीची मुलगी देवलदेवी हिचा शोध लावून तीस दिल्लीस पाठवावी, असाही मलीक यास हुकूम होता. कर्ण राजा देवलदेवीसह बागलाणांत राहत होता. कर्ण आपल्या मुलीस खुषीनें

मलीकचे स्वाधीन करीना. तेव्हां दोघांचा संग्राम सुरू झाला. दोन महिनेपर्यंत कर्णानें मुसलमानांस दाद दिली नाहीं. इतक्यांत देवगडच्या राजाचा मुलगा शंकरदेव ह्यानें देवलदेवीची कर्णराजाकडे मागणी केली. मराठ्यांचें कुळ आपल्याहून हलकें असें समजून ही मागणी कबूल करण्याचा कर्णाचा विचार नव्हता. पण प्रस्तुतच्या बिकट प्रसंगाकडे नजर देऊन त्यानें शंकरदेवाचें म्हणणें कबूल केलें. देवलदेवीची रवानगी देवगडास होत आहे, हें ऐकून त्या दोघां मुसलमान सरदारांस धास्ती पडली, कीं देवलदेवी हातची गेल्यामुळें बादशहाची आपणांवर इतराजी होईल. म्हणून ते दोघेही पाळतीवर राहून कर्णाच्या पाठोपाठ देवगडास जाऊं लागले. बराच पल्ला काढिला, तरी देवलदेवीचा पत्ता लागेना. तिजविषयीं मुसलमानांची अगदीं निराशा झाली. एके दिवशीं दोनतीनशें लोकांची एक टोळी वेरूळचीं लेणीं पाहून परत येत असतां वाटेंत शंकरदेवाचे कांहीं स्वार भेटले. त्यांजपाशीं देवगडचें निशाण होतें. हे लोक देवलदेवीस घेऊन जात असतील असें वाटून मुसलमानांनीं त्यांस अडविलें. पुढें युद्धप्रसंग होऊन देवलदेवी मुसलमानांस सांपडली. आलफ्खानानें तिला दिल्लीस रवाना केलें. तिला पाहून कमलादेवी व अला-उद्दीन यांस परमानंद झाला. देवलदेवीचें लग्न शहाजादा खिजरखान याजबरोबर झालें. इकडे राजा कर्ण दुर्धर यातना व दुःखें ह्यांनीं पीडिलेला असा लवकरच अज्ञातवासांत मरण पावला.

ज्या अन्हिलवाड शहरांत स्वराज्य असल्यामुळें स्वतंत्रता व लक्ष्मी मूर्तिमंत नांदत होत्या, त्या शहराची ह्या वेळीं जी दुर्दशा झाली, तिचें वर्णन करणें अशक्य आहे. पूर्वी सुखांत व चैनींत असलेल्या लोकांचें वैभव व ऐश्वर्य नष्ट होऊन ते भिकेस लागले. मुसलमानांच्या लुटीनें व बळजबरीनें सर्व शहर कंगाल व उजाड होऊन गेलें. अन्हिलपट्टणांत जीं मोठमोठीं सुंदर देवालयें व राजमंदिरें होतीं तीं दरोबस्त मोडून पडलीं. त्यांचे जागीं मशिदी व रोजे उभे झाले.

अला-उद्दीननें अपल्या राज्याचा विस्तार पुष्कळ केला, पण गुजराथ प्रांत त्याचे हातांत फार दिवस टिकला नाहीं. त्याच्या सुभेदारांनींच तो बळकाविण्याचा अनेक वेळां प्रयत्न केला, आणि वास्तविक रीत्या ह्या काळीं तेच ह्या प्रांताचा स्वतंत्र उपभोग घेत होते.

**५. दिल्लीच्या सुलतानांचा अंमल, (सन १३१६–१३९१).**— मुसलमानांनीं गुजराथेंत बराच मुलूख काबीज केला, तरी पुष्कळ भाग रजपुतांचे अमलाखालींच होता. साबरमतीच्या पश्चिमचा विस्तृत प्रदेश वाघेल राजांकडे असून उत्तरेकडील डोंगरी प्रदेश परमार व राठोड यांचे ताब्यांत होता. कच्छचें रण व खंबायतचें अखात ह्या भागांत झाला लोकांचें राज्य होतें. पावनगड व त्याचे पूर्वेकडील प्रांत, त्याचप्रमाणें गिरनार, जुनागड वगैरे ठिकाणें खेंगार वंशांतील राजांचे ताब्यांत होतीं.

दिल्लीचें पद अला-उद्दीनचा मुलगा मुबारिक ह्याच्या ताब्यांत आल्यावर, त्यानें कमालुद्दीनखान व ऐनुल्मुल्क् मुलतानी यांस फौज देऊन गुजराथच्या बंदोबस्तास पाठविलें. त्यांपैकीं कमालुद्दीनखान मारला जाऊन मुलतानी हा एकटाच सरदार गुजराथेंत राहिला. तो थोडा बहुत बंदोबस्त करीत आहे, इतक्यांत दिल्लीहून मुबारिक खिलजीनें आपला सासरा मलीक दिनार यास जाफरखान असें नांव देऊन गुजराथच्या सुभ्यावर पाठविलें. परंतु थोडेच दिवसांत जाफरखानास सुलतानानें परत बोलावून ठार मारलें. नंतर दिल्लीचा कारभारी खुस्रूखान याचा भाऊ हिसामुद्दीन यास गुजराथची सुभेदारी मिळाली. हिसामुद्दीन हा मूळचा हिंदु होता. त्यानें मोठ्या युक्तीनें मुसलमानांचा गुजराथेंतून उठाव करण्याचा गुप्त प्रयत्न चालविला. ही बातमी दिल्लीस कळतांच मलीक वजेउद्दीन खुरेशी याची गुजराथच्या सुभ्यावर नेमणूक झाली. हा मोठा चलाख व शूर होता. त्यानें आपलें वजन गुजराथेवर चांगलें बसविलें. पण त्यालाही लवकरच परत जावें लागलें.

पुढें दिल्लीस राज्यक्रान्ति होऊन सुलतानी तख्त तुघ्लख वंशाकडे गेलें. ग्यासुद्दीन तुघ्लखनें ताजुल्मुल्क नांवाचा कोणी एक सरदार गुजराथचे सुभ्यावर पाठविला. पुढें सन १३२५ त महंमद तुघ्लख तख्तावर येऊन त्यानें महंमद अमाझ नांवाच्या एका गृहस्थास गुजराथची सुभेदारी दिली. नंतर ह्या प्रांतांत बंड झाल्यामुळें सुलतान स्वतः मोठ्या फौजेनिशीं त्यावर आला; आणि सुरत व खंबायत हीं शहरें लुटून व पाटण येथें कांहीं दिवस मुक्काम करून परत गेला. तरी पुनः इकडे एकसारखे बंडावे सुरू होते, ते मोडीत तो सिंधप्रांतांत गेला असतां ठठ्ठा शहरीं मरण

पावला. महंमदानें आपल्या कित्येक भरंवशाच्या मुसलमान सरदारांस गुजराथेंत जमिनी देऊन ठेविलें.

फिरोज तुघ्लखच्या कारकिर्दींत गुजराथचा बंदोबस्त विशेष चांगला झाला नाहीं. सन १३७६ मध्यें सुलतानास असें आढळलें, कीं गुजराथचा वसूल कमी कमी होत चालला आहे, तेव्हां त्यानें पूर्वीचा सुभेदार जाफरखान यास परत बोलावून शम्सुद्दीन दमघानी नांवाच्या सरदारास गुजराथच्या सुभ्यावर पाठविलें. पण त्याच्या हातूनही कांहीं विशेष चांगला बंदोबस्त होईना. गुजराथेंत एकसारखीं बंडें चालू होतीं. अखेरीस फऱ्हतुल्मुल्क रास्तीखान हा गुजराथचा अंमलदार झाला. दिल्लीस वरचेवर भानगडी झाल्यामुळें गुजराथेंत ह्या सरदारास चांगलें फावलें. त्यानें हिंदु जमीनदारांच्या मदतीनें गुजराथ प्रांत स्वतंत्र करण्याचा विचार चालविला. ह्या हकीकती दिल्लीस कळल्यावर सुलतानानें सन १३९१त मूळचा हिंदु असून मुसलमान झालेला असा एक शूर गृहस्थ पाहून त्यास मुज्फरखान हा किताब व हिंदु रीतीचीं छत्रचामरादि राजचिन्हें देऊन गुजराथेंत पाठविलें. त्याची व रास्तीखानाची सिद्धपूर नजीक लढाई झाली. तींत रास्तीखान पराभव पावून मारला गेला, आणि मुज्फरखान हा विजयी होऊन कायमचा सुभेदार झाला, (सन १३९१).

ह्या काळीं एक सुभेदार काढून दुसरा नेमण्याची मोठी पंचाईत होती. लढाई झाल्याशिवाय पहिला सुभेदार आपला अधिकार सोडीत नसे, आणि अशा घालमेलीचा परिणाम सर्वदा रयतेस भोगावा लागे. उभय सुभेदारांच्या फौजांस दाणावैरण पुरविण्याकडे हजारों लोक खपत. गांवच्या लोकांस उपाशीं राहून फौजांकडे धान्य वगैरेचा पुरवठा करावा लागे. पाहिजे त्या इसमांस वेगारीस व वेठीस धरून नेत. जिकडे तिकडे दंगेधोपे चालत. तशांत मुसलमान फौज अत्यंत निर्दय व बेकैद असे.

**६. गुजराथचे स्वतंत्र सुलतान, (१३९६-१५७२). मुज्फरशहा.**— मुज्फरखान ह्यानें लवकरच आसपासच्या सर्व राजांस जिंकिलें. हिंदुधर्माची त्यानें विशेष पायमल्ली केली. ईडरचा राजा रणमल्लजी याजबरोबर सन ११९३त युद्ध करून त्यानें मोठा जय मिळविला.

त्याचप्रमाणें खानदेश व माळवा येथील सुलतनांकडूनही त्यानें करभार मिळविला. मुज्फरखान हिंदु धर्माचा पक्का द्वेष्टा होता. हिंदूंच्या देवालयांचा विध्वंस करणें वगैरे अनेक दुष्ट कृत्यें त्यानें केलीं. सोमनाथच्या देवळाचे दगड काढून त्यानें ते मशिदीला लाविले. सन १३९६ पासून 'मुज्फरशहा' असें नांव घेऊन तो गुजराथेंत स्वतंत्रपणें राज्य करूं लागला. उत्तरहिंदुस्थानांत त्या वेळेस विशेष धामधूम चालली होती. तयमूरलंगानें दिल्लीचें तख्त बळकाविलें होतें. ही संधि मुज्फरशहाचे पथ्यावर पडली. त्यानें आपल्या नांवाचें नाणें पाडून व आपली द्वाही फिरवून मशिदींतून आपल्या नांवानें खुत्वा वाचविला. तातारखान म्हणून त्याचा एक पराक्रमी पुत्र होता. त्यानेंही राज्यवृद्धि करण्याच्या कामीं बापास पुष्कळ कुमक केली. एकदां तर ह्या बापलेकांचें पटेनासें होऊन तातारखानानें बापास कैद करून स्वतः राज्य बळकाविलें. पण दुर्दैवानें तो लवकरच मरण पावला, आणि मुज्फरशहा पुनः कारभार करूं लागला. त्याचा नातू म्हणजे तातारखानाचा मुलगा अहंमदखान हाही मोठा पराक्रमी निघाला. बापाप्रमाणेंच त्यानें आजोबास कैद करून विषाचा पेला पिण्यास पाठवून दिला. असल्या दुष्ट नातवाचें सुद्धां अभीष्ट चिंतून व त्याचें 'ईश्वरा कल्याण कर' असें मागणें मागून मुज्फरखान तें विष प्याला, आणि लगेच मरण पावला, (इ. स. १४११).

**सुलतान अहंमदशहा, ( १४११-१४४३ ).**—अहंमदशहा आपल्या वयाच्या एकविसावे वर्षी गुजराथच्या राज्यावर बसला. फिरोजखान नामक त्याच्या चुलतभावानें आरंभींच आपल्यास राज्य मिळण्याविषयीं भडोच येथें बंड केलें. उभयतांचें युद्ध होऊन फिरोजखानाचा पराभव झाला. त्या स्वारीहून पट्टणास परत येत असतां रस्त्यावर एक नवीन शहर बसवून त्यास त्यानें आपलें नांव दिलें, (सन १४१२), तें अहंमदाबाद या नांवानें अद्यापि प्रसिद्ध आहे. पट्टण येथून आपलें तख्त उठवून अहंमदशहानें तें अहंमदाबादेस आणिलें. तेव्हांपासून अहंमदाबाद शहर गुजराथची राजधानी झालें. हें शहर ज्याच्या मसलतीनें वसलें, त्याचें नांव शेख महंमद खतु गंजबक्ष असें होतें. पूर्वी त्या ठिकाणीं जीं शहरें होतीं त्यांचीं नांवें कर्णावती व श्रीनगर अशीं होतीं. अहंमदाबाद शहर साबरमतीच्या पूर्वकांठीं आहे. साबरमतीचें पौराणिक नांव 'साभ्रमती' असें

होतें. 'पद्मपुराणांत' ह्या नदीचें माहात्म्य पुष्कळ वर्णिलें आहे. पूर्वी अहंमदाबाद शहराची वस्ती वीस लाख होती असें सांगतात. हल्लीं शहराबाहेर पडित भाग पुष्कळ दिसतात, त्यावरून वीस लाख वस्तीचें जरी हें शहर नसलें, तरी हल्लींच्या पेक्षां पुष्कळ मोठें असावें असें दिसतें. मुसलमानी रियासतींत हें शहर भरभराटींत होतें. मराठ्यांच्या अमलांत तेथील वस्ती बरीच खालावली. अलीकडे त्याची पुनः वृद्धि होऊं लागली आहे. मुसलमानी राज्यकर्त्यांचें हें राजधानीचें शहर असल्यामुळें, त्या वेळच्या वैभवाचीं व संपत्तीचीं दर्शक अशीं पुष्कळ स्थळें अद्यापि ह्या शहरांत आहेत. मोठमोठ्या इमारती, मशिदी वगैरे प्रेक्षणीय आहेत. सभोंवार सात मैल घेराचा विस्तीर्ण कोट असून भद्र ऊर्फ भद्दर नांवाचा एक अंतरकोट आहे. मोगल बादशहांचे सुभेदार अहंमदाबादेसच राहत.

अहंमदशहा पराक्रमी होता. त्यानें माळवा, सौराष्ट्र वगैरे सभोंवारच्या प्रांतांवर आपली खंडणी बसविली. तरी हिंदु धर्माचा पाडाव करण्याकरितां विशेष इलाज घेऊन त्या कामीं त्यानें आपलें नांव अजरामर करून ठेविलें आहे. गुजराथ देश मूळचा निव्वळ हिंदूंचा होता. ह्यापूर्वी राज्यकर्त्यांस त्या धर्माचा उच्छेद करण्यास सवड मिळाली नाहीं. अहंमदशहानें सन १४१४ त ताजुल्मुल्क नामक एक मोठा धर्माभिमानी गृहस्थ मुसलमानी धर्मवृद्धीच्या स्वतंत्र खात्यावर मुख्य नेमून, त्यास हिंदूंच्या देवालयांचा व मूर्तींचा दरोबस्त नाश करण्याची सक्त ताकीद दिली. ताजुल्मुल्कानें हे हुकूम मोठ्या बहादुरीनें अमलांत आणिले. त्या वेळीं सर्व देशभर देवळें पाडण्याची जी धामधूम उडाली तिचें वर्णन करणें अशक्य आहे. जिकडे पाहवें तिकडे देवळें पडत आहेत आणि त्या ठिकाणीं मशिदी उठत आहेत. त्याचप्रमाणें राज्यें खालसा करण्याचा सपाटाही कमी चालला नव्हता. अनेक लहान लहान जमीनदारांस व गिरासिये लोकांस त्यानें आपल्या अमलाखालीं आणिलें. सन १४२० पासून बरींच वर्षे स्वस्थ बसून अहंमदानें विश्रांति घेतली. कारकिर्दीचे अखेरीस महाराष्ट्रांतील बहामनी सुलतानांबरोबर उत्तरकोंकण प्रांतीं ह्याचे युद्धप्रसंग चालले. तींत बहुशः अहंमदशहासच जयप्राप्ति झाली. सन १४४३त जुलईच्या ४ थ्या तारखेस अहंमदशहा अहंमदाबाद येथें मरण पावला.

अहंमदशहा हा मोठा न्यायी होता अशी त्याची कीर्ति आहे. त्यानें रजपुतांशीं शरीरसंबंध केले. त्याचे पश्चात् त्याचा पुत्र महंमदशहा गुजराथच्या तख्तावर बसला.

**महंमदशहा, ( सन १४४३–१४५१).**—आरंभींच ईडरचे राजाचा व ह्याचा तंटा लागला. कांहीं दिवस युद्धप्रसंग चालून ईडरचे राजानें आपली मुलगी सुलतानास दिली आणि त्याचें समाधान केलें. स.१४४९ त चांपानेरचा रावळ गंगादास ह्याचा त्यानें पराजय केला. इतक्यांत गंगादासच्या वतीनें माळव्याचा सुलतान महंमद खिलजी ह्यानें अहंमदाबादेवर स्वारी करण्याची तयारी चालविली. महंमदशहा आपल्या लोकांस प्रिय नव्हता. दरबारच्या कांहीं मंडळीनें गुप्त बेत करून त्यास विषप्रयोगानें ठार मारिलें, ( सन १४५१ ).

**कुत्बुशहा, ( सन १४५१–१४५८ ).**—महंमदशहा मरण पावल्यावर त्याचा मुलगा कुत्बुशहा तख्तनशीन झाला. माळव्याचा सुलतान महंमद खिलजी यानें कुत्बुशहावर स्वारी करून त्याचा पराभव केला. पुढें उभयतांनीं तह करून दोघांनीं मिळून मुसलमानी धर्म वाढविण्याची खटपट करण्याचें ठरविलें. परंतु हा ठराव अमलांत आला नाहीं. मेवाडचा कुंभराणा त्या वेळीं हिंदु राजांत अत्यंत प्रबळ व चतुर होता. त्यानें रजपुतान्यांत अनेक किल्ले बांधिले. हा स्वतः उत्तम कवि असून त्याची प्रियभार्या मीराबाई ही तर आपल्या कवनशक्तीनें साधुवर्गांत प्रसिद्ध होऊन गेली आहे. मीराबाईचा मठ द्वारकेस प्रसिद्ध आहे. कुंभराण्याच्या प्रतापापुढें आसपासच्या मुसलमानी राज्यकर्त्यांचें कांहीं चाललें नाहीं. तथापि कुंभराण्यास बुडविण्यास सर्व मुसलमान टपून बसले होते. नागोर येथें कुत्बुशहानें कुंभराण्याचा स. १४५८ त पराभव केला. नंतर कुत्बुशहाही त्याच वर्षी मरण पावला.

**महंमूद बेगडा, ( सन १४५८–१५११ ).**—कुत्बुशहाचे मागून त्याचा चुलता दाऊदखान राज्यकारभार पाहूं लागला. पण एक महिन्यांतच तो नालायक ठरून त्याचा सावत्र भाऊ महंमूद हा तख्तनशीन झाला. त्यानें त्रेपन्न वर्षें राज्यकारभार करून गुजराथच्या इतिहासांत मोठा नांवलौकिक संपादन केला. ह्यास मुसलमानी इतिहासकार महंमूद बेगडा असें म्हणतात. त्याची आख्यायिका अशी आहे, कीं जुनागड व पावागड

हे दोन गड त्यानें काबीज केले, तेव्हांपासून 'बेगडा' असें त्याचें नांव पडलें. सन १४६१ त माळव्यावर फौज पाठवून त्यानें तेथच्या राजापासून बहामनी राज्याचें संरक्षण केलें. सन १४६८ त कडेकोट तयारीनिशीं त्यानें सौराष्ट्रदेशावर स्वारी केली, आणि पुष्कळ प्रांत काबीज करून गिरनारचा किल्ला घेऊन तो अहंमदाबादेस परत आला. पुनः एकवार हिंदु धर्म बाटविण्याच्या इराद्यानें त्यानें सौराष्ट्रावर स्वारी केली. गिरनारच्या राजानें आपल्या प्रजेस उपद्रव न होऊं देण्याबद्दल होते तेवढे प्रयत्न केले, पण महंमूद बेगडा कांहीं केल्या ऐकेना. शेवटीं त्यानें त्या राजास बाटवून मुसलमान केलें. तेव्हांपासून जुनागड येथें बादशहा स्वतः पुष्कळ दिवस राहूं लागला. म्हणून अहंमदाबादेप्रमाणेंच त्या शहरास नवीन वैभव प्राप्त झालें. जुनागडाहून कच्छ, सिंध, बलुचिस्तान येथपर्यंत महंमूदशहानें स्वाऱ्या करून विजय संपादन केले. राणपूरचा जमेदार राणजी गोहेल ह्याची बायको व महंमूदशहाची बायको ह्या सख्या बहिणी होत्या. राणजीच्या बायकोस बाटवून मुसलमान करण्याचा महंमूदशहानें घाट घालून राणपूरवर चाल केली. राणजीनें रजपुतास योग्य अशा बाण्यानें पुष्कळ दिवसपर्यंत आपला बचाव केला. पण अखेरीस त्याचा पराभव होऊन तो धारातीर्थी पतन पावला. त्याच्या पतिनिष्ठ भार्येनें त्याजबरोबर सहगमन केलें. अशा प्रकारें ह्या मुसलमानांचा जाच हिंदूंस सोसावा लागे. आणखी अनेक जमेदारांस महंमूदशहानें जबरदस्तीनें मुसलमानी धर्मांत ओढिलें. द्वारका, खंबायत, सुरत वगैरे ठिकाणीं चांचे लोकांचा विशेष उपद्रव असे. महंमूदशहानें चांचे लोकांचा राजा भीमदेव यास पकडून, हाल करून अहंमदाबाद शहरांत ठार मारिलें, ( सन १४८२ ). तेणेंकरून चांचे लोकांचा चांगला बंदोबस्त झाला.

सन १४८३ मध्यें सुलतानानें चांपानेर शहरास वेढा घातला. चांपानेरास त्या वेळेस रजपूत रावळ पटाई जयसिंह हा राज्य करीत होता. रजपूत लोक जिवावर उदार होऊन लढले. अखेरीस किल्ला व शहर मुसलमानांच्या हस्तगत झालें. जयसिंग रावळ यास अहंमदाबादेस नेऊन तो मुसलमान होत असतांही, त्याचें म्हणणें कबूल न करितां सुलतानानें त्यास ठार मारिलें. चांपानेर हें पुरातन काळचें विख्यात शहर पावनगडच्या पायथ्याशीं होतें. त्याचा मुसलमानांनीं विध्वंस केला, तेव्हां

तेथचे सर्व लोक व कारागीर गुजराथ प्रांताच्या इतर शहरांत पसरले. हल्लीं ह्या शहराचा पडका भाग पावागडच्या पायथ्याशीं दिसून येतो, आणि गडावर कालिकामातेची यात्रा भरत असते.

पोर्तुगीझ लोकांनीं पंधराव्या शतकाच्या अखेरीस हिंदुस्थानांत प्रवेश केला. सन १५०७ त गुजराथच्या किनाऱ्यावर ते आले. महंमूदशहानें आपलें आरमार त्यांजवर पाठविलें. एक दोन लढाया झाल्या; पण सुलतानाच्या हातून ह्या पाश्चात्यांचा बंदोबस्त न होतां, दमण, दीव, माहीम वगैरे ठिकाणें त्यांनीं काबीज केलीं. ह्या प्रसंगीं तुर्कस्तानचा बादशहा बायझीद याजकडून अहंमदाबादच्या सुलतानास पोर्तुगीझ लोकांशीं लढण्यासाठीं मदत आली होती.

गुजराथ प्रांत उत्तरेकडील वालुकामय मैदानांनीं व इतर बाजूंस डोंगराळ रांगांनीं तुटलेला असल्यामुळें, तो आरंभीं एकाएकीं मुसलमानांच्या हस्तगत झाला नाहीं. समुद्रमार्गानें मात्र तो सुगम आहे; आणि ह्या सोयीमुळेंच त्याचें महत्त्व वाढलें आहे. सुपीक जमीन व माफक हवा ह्यांच्या योगानें व्यापारदृष्ट्या गुजराथ प्रांताचें महत्त्व प्राचीन काळापासून अतोनात होतें. खंबायत, दीव, सुरत व भडोच हीं बंदरें प्राचीन काळीं सुद्धां व्यापाराकरितां नांवाजलेलीं होतीं. हिंदुस्थानचा परदेशाशीं व्यापार ह्या गुजराथ प्रांतांतूनच विशेषतः चालत होता. ह्या व्यापाराच्या निमित्तानें आरब व पोर्तुगीझ ह्यांचे झगडे किती निकराचे झाले, आणि त्यांचा संपर्क युरोपीय राष्ट्रांस कसा पोंचला, त्याचें वर्णन, तसेंच अहंमदाबादच्या सुलतानांचे व पोर्तुगीझांचे जे व्यवहार घडले त्यांचें वर्णन, ब्रिटिश रियासतींत आलें आहे.

सन १५१०त सुलतानानें पाटणवर स्वारी केली. तेथून परत आल्यावर तो लवकरच मरण पावला. ह्या सुलतानाची कीर्ति गुजराथेंत विशेष प्रसिद्ध आहे. रजपुतांमध्यें जसा सिद्धराज जयसिंग तसाच मुसलमानांत महंमूद बेगडा पराक्रमी होता असें इतिहासकार लिहितात. पराक्रम, शक्ति, न्यायाचरण, जनहितेच्छा, धर्माभिमान यांजविषयीं महंमूद चांगला स्तुतीस पात्र आहे. परंतु तापट व चपल स्वभावाचा असल्यामुळें, मुसलमानेतर लोकांस त्याजपासून पुष्कळ त्रास झाला. गुजराथेंत ज्या कांहीं प्रसिद्ध प्रसिद्ध इमारती आज विद्यमान आहेत, त्या बहुतेक महंमुदाच्या

१४–७९१–२०००

हातच्या आहेत. अहंमदाबादेनजीक महंमुदाबाद म्हणून जें शहर आहे तें ह्या सुलतानानें स्थापिलें. त्या ठिकाणीं तो वारंवार जाऊन राहत असे.

**दुसरा मुज्फरशहा, ( सन १५११–१५२६ ).**—महंमूद बेगडा ह्याचा मुलगा खलील हा आपणास मुज्फरशहा असें नांव घेऊन त्याचे पश्चात् तख्तनशीन झाला. आरंभींच त्यास माळव्याच्या सुलतानाच्या मदतीस जावें लागलें. मागें ईडरच्या रजपूत राजानें बंड करून मुसलमानांचा अंमल झुगारून देण्याचा प्रयत्न केला. पण त्यांत रजपुतांचा पराजय होऊन मुज्फरशहानें ईडर शहराचा विध्वंस केला. पुढें ह्या शहरांत भारमल्ल व रायमल्ल ह्या दोघां हक्कदारांमध्यें तंटा उपस्थित होऊन मुज्फरशहानें भारमल्लास मदत दिली. रायमल्लास मेवाडच्या संगराण्याची मदत असून तो संगराण्याचा जांवई होता. हे युद्धप्रसंग पुष्कळ दिवस चालून अखेरीस भारमल्लास ईडरचें राज्य प्राप्त झालें.

अहंमदाबादेस मुज्फरशहा राज्य करीत असतां, मेवाडांत चितोडगडावर प्रसिद्ध शूर पुरुष राणासंग राज्य करीत होता. त्यास चिडविण्याकरितां म्हणून ईडरच्या मुसलमान ठाणेदारानें आपल्या दारांत एक कुत्रा बांधून त्याचें नांव संगराणा असें ठेविलें. त्या नांवानें तो त्या कुत्र्यास हांक मारी. दुसऱ्याही अनेक प्रकारांनीं संगराण्यास मुसलमानांनीं चिडविलें होतें. त्याचा सूड घेण्याच्या उद्देशानें संगराण्यानें मोठ्या फौजेनिशीं ईडरवर चाल केली. ह्या प्रसंगीं त्या शूर राण्यानें मुसलमानांचा अनेक ठिकाणीं खरपूस समाचार घेतला, आणि आजपर्यंत हिंदूंस दिलेल्या नाहक त्रासाचा सूड उगविला. त्या वेळीं परमेश्वर आपणांस सोडविण्यास आला असें सर्व हिंदूंस वाटलें. हिंदु लोकांस ह्या स्वारीनें बिलकुल त्रास झाला नाहीं, किंवा त्यांच्या वित्ताचें हरण कोणीं केलें नाहीं. मुसलमानांवर विजय संपादून आपला यशोदुंदुभी वाजवीत व कीर्तिध्वज फडकावीत, संगराणा मोठ्या थाटानें चितोडगडास परत गेला, ( सन १५१९ ).

परंतु ईडरप्रांत रजपुतांच्या ताब्यांत फार दिवस राहिला नाहीं. संगराणा परत जातांच मुज्फरशहानें फौज पाठवून तो परत घेतला. पुढें लवकरच संगराणा व मुज्फरशहा यांचा तह ठरला. त्यामुळें गुजराथेंत कांहीं दिवस युद्धसंग्राम झाला नाहीं. इराणच्या शहाचा ह्या सुलता-

नाशीं विशेष स्नेहभाव होता, आणि त्याजकडून ह्यास पुष्कळ नजराणेही आले होते. सन १५२४ त मुज्फरशहाचा थोरला मुलगा बहादूरशहा हा बापावर रुसून दिल्लीस जाऊन राहिला. त्यामुळें उदासीनता प्राप्त होऊन मुज्फरशहा सन १५२६त मरण पावला.

बहादूरशहा, ( सन १५२६—१५३६ ).—मुज्फरशहानंतर त्याचा दुसरा मुलगा सिकंदरशहा तख्तारूढ झाला; पण लवकरच त्याचा खून झाल्यामुळें राज्याचा खरा वारस बहादूरशहा हा दिल्लीहून येऊन अहंमदाबादचा सुलतान झाला. तो मोठ्या उदार स्वभावाचा व दयाळु होता. गुजराथेंत मोठा दुष्काळ पडला असतां, सुलतानानें जिकडे तिकडे अन्नसत्रें व सदावर्तें घातलीं. दीव, जुनागड, खंबायत वगैरे ठिकाणीं फिरून त्यानें आपला अंमल कायम केला. सन १५२९त त्यानें निजामशाहीची राजधानी अहंमदनगर शहर लुटिलें, आणि तसाच माळव्यांत जाऊन तेथचा सुलतान महंमद खिलजी व त्याचे सहा मुलगे ह्यांस पकडून अहंमदाबादेस आणिलें. त्याचप्रमाणें उज्ज-नीचा राजा शिलादित्य यालाही स्वारी करून बहादूरशहानें पक-डिलें. पण शिलादित्याचा भाऊ लक्ष्मणसिंह हा रायसेनच्या किल्ल्यावर होता. त्यास घेऊन येतों असें शिलादित्यानें वचन देऊन तो निघून भावाकडे गेला. पुढें ह्या दोघां भावांस चितोडच्या राण्याची मदत आली, आणि तिच्या योगानें ते चितोडगडास सुखरूप पोंचले. इकडे रायसेन किल्ला व दुसरीं पुष्कळ ठिकाणें बहादूरशहानें सर केलीं. पुढें चितोडगडावर फौज पाठवून तेथच्या राण्याचाही त्यानें पाडाव केला. याप्रमाणें बहादूरशहा दिवसेंदिवस प्रबळ होत चालला. आणखीही तो प्रबळ झाला असता, पण तितक्यांत दिल्लीचा मोगल बादशहा हुमायून यानें गुजराथेवर स्वारी केली. खुरासानच्या सुलतानाचा नातू महंमद जमान मीर्झा हा कांहीं दिवस हुमायूनजवळ येऊन राहिला होता, तो पुढें हुमायुनास सोडून अहंमदाबादेस बहादूरशहाचा आश्रय करून राहिला. त्यास हुमायूनकडे परत पाठविण्याचें बहादूरशहानें नाक-बूल केल्यामुळें, हुमायूननें गुजराथवर स्वारी केली. तसेंच चितोडगड काबीज करणारा रुचीखान नामक गुजराथचा पराक्रमी सरदार धन्यावर रुसून हुमायूनकडे जाऊन राहिला होता, त्याच्या माहितीनें हुमायूननें

गुजराथप्रांत सर केला. तेव्हां बहादूरशहा प्रथम मांडवगडास व तेथून चांपानेरास पळून गेला. पण दोनही ठिकाणीं निभाव न लागल्यामुळें तो दीव बंदराकडे निघून गेला. हुमायूननें सर्व प्रांत घेऊन अहंमदाबादेस आपला भाऊ हिंदाल यास ठेविलें, आणि पाटण व चांपानेर येथें दुसरे दोन सुभेदार नेमून, दिल्लीकडे शेरखान नामक सरदारानें बंडावा केल्याची वार्ता आल्यामुळें, गुजराथचा बंदोबस्त अर्धवट टाकून, हुमायून उतावळीनें दिल्लीस परत गेला, ( इ. स. १५३६ ).

पुढें बहादूरशहानें फौजेची जमवाजमव करून दिल्लीच्या फौजेशीं सामना केला, आणि तिचा पराजय करून नऊ महिन्यांचे आंत आपलें सर्व राज्य परत मिळविलें.

इकडे दीव बंदरीं पोर्तुगीझ लोकांनीं फारच पुंडाई माजविली. ते लोक कोंकणपट्टीतील मुलूख भराभर काबीज करीत चालले. बहादूरशहानें आपली फौज त्यांजवर पाठविली. बरेच दिवस युद्धप्रसंग होऊन कांहींच निष्पन्न झालें नाहीं. अखेरीस उभयतांचा तह झाला. तेव्हां बहादूरशहास फिरंग्यांनीं आपल्या गलबतांवर भेटीस बोलाविलें; सुलतान भेटीस आल्यास आपणही परतभेटीस येण्याचें त्यांनीं कबूल केलें. ते येतील तेव्हां आपण त्यांचा नाश करूं असा बहादूरशहाचा विचार होता. पण बहादूरशहा प्रथम त्यांजकडे गेला असतां, त्यांनीं कपट लढवून त्यास व त्याच्या लोकांस समुद्रांत लोटून ठार मारिलें. येणेंप्रमाणें बहादूरशहाचा अंत झाला, ( सन १५३६ ).

**दुसरा महंमूदशहा,** ( स. १५३६–१५५४ ).–बहादूरशहाचा पुतण्या महंमूदशहा हा अकरा वर्षांचा असतां तख्तनशीन झाला. नऊ दहा वर्षेंपर्यंत दरबारांत दोघां सरदारांचे तंटे चालू होते. अखेरीस दोघांचाही बंदोबस्त करून महंमूदशहानें सन १५४५त राज्यकारभार आपल्या हातीं घेतला, आणि मोठमोठ्या कामांवर लायक माणसांची नेमणूक केली. लवकरच हाताखालच्या जहागीरदार लोकांचीं उत्पन्नें ह्यानें भराभर खालसा केलीं. त्यांत रजपूत व दुसरे हिंदु यांचें नुकसान झाल्यामुळें त्यांनीं बंडें केलीं. तेव्हां त्यांजवर सुलतानानें एकसारखें शस्त्र चालविलें; म्हणून सर्व हिंदूंत दारिद्र्य, दुर्मुखता व कंगालपणा शिरला,

आणि राजा व प्रजा यांजमध्यें बेबनाव होऊन ते एकमेकांचे शत्रु बनले. सरदार व कामदार लोकांतील तंटे एकसारखे चालूच होते. शेवटीं विश्वासू वजीर बुन्हाण-उल्मुल्क् बाबी ह्यानें एके दिवशीं रात्रीं बादशहाचा खून केला, आणि स्वतः सुलतानपद बळकाविलें. पण तें त्यास फार दिवस पचलें नाहीं. शेरखान नामक दुसऱ्या एका अमिरानें बुऱ्हाण यास ठार मारिलें.

**दुसरा अहंमदशहा, (सन १५५४–१५६१).**—पुढें राजघराण्यांतील अहंमदखान नांवाच्या एका पुरुषास तख्तावर बसवून सय्यद मुबारिक या सरदारानें आपणाकडे वजिरी घेतली. तरी सुलतान अल्पवयी असल्यामुळें दरबारचे तंटे मुळींच मिटले नाहींत, उलट ते ज्यास्तच वाढले. इतक्यांत खानदेशच्या सुलतानानें गुजराथेवर स्वारी केली. पण गुजराथच्या फौजेनें त्यास मागें हटविलें. सन १५६१त उमराव लोकांकडून सुलतानाचा खून झाला.

**तिसरा मुज्फरशहा, ( सन १५६१–१५७२).**—उमरावांनीं राजघराण्यांतील कोणा एका मुलास मुज्फरशहा असें नांव देऊन अहंमदाबादच्या तख्तावर बसविलें. वास्तविक पाहिलें, तर या वेळीं गुजराथेंत सर्व झोटिंगशाही माजली होती. सुलतानाच्या हातांत काडी इतकी सुद्धां सत्ता उरली नव्हती. सर्व राज्याचे तुकडे होऊन ते निरनिराळे सरदार बळकावून बसले होते. हिंदु प्रजेस तर कोणीच विचारीनासें झालें. दुकानदारी व मजुरी ह्यांशिवाय दुसरा धंदा त्यांस राहिला नव्हता. दरोबस्त फौज मुसलमानांनीं भरलेली होती. हिंदूंनीं गंध लाविलेलें सुद्धां मुसलमानांस खपत नसे. मुसलमान वस्तींत जाण्याची व घोड्यावर बसण्याची देखील हिंदु लोकांस बंदी होती. सारांश, गुजराथची बादशाही उलथून पडण्याची वेळ येऊन ठेपली. सर्व त्रासांतून रयतेस सोडविणारा कोणी पराक्रमी पुरुष आतां पाहिजे होता.

तयमूरलंगाचा वंशज सुलतान हुसेन मीर्झा ह्याचे तिघे मुलगे दिल्लींत अकबर बादशहाशीं भांडून गुजराथेंत येऊन राहिले. अशा संधीस इतिमादखान नामक एका उमरावानें अकबर बादशहास गुजराथेवर येण्याविषयीं पाचारण केलें. सन १५७२त अकबर बादशहा मोठ्या

फौजेनिशीं डीसा येथें येऊन उतरला, आणि तेथून एकदम अहंमदाबादेस गेला. मुज्फरशहा पळून गेला होता, त्यास त्यानें बंदोबस्तानें पकडून आणिलें. पुढें सर्व बंडखोर सरदार अकबरास शरण आले. आपण विजयी झालों आणि आतां आपली अंमलदारी व बादशाही सर्व लोकांस समजली पाहिजे, ह्या हेतूनें त्यानें हत्तीवर बसून अहंमदाबाद शहरांत मोठ्या थाटाची स्वारी काढिली. अहंमदाबादच्या रियासतींतील सर्व सरदारांस त्या स्वारींत त्यानें आपणाबरोबर घेतलें. नंतर मोठा दरबार भरवून आपल्या नांवचें नाणें पाडण्याचा ठराव केला. इतःपर दिल्लीच्या बादशहाचे अंमलाखालीं शांततेनें नांदण्याविषयीं त्यानें सर्व सरदारांस ताकीद दिली. कित्येक दंगेखोर होते त्यांचे जामीन घेतले; आणि तंटे-बखेडे केल्यानें सर्व देशाची धूळदाण कशी होते हें सर्वांस समजावून सांगितलें. ह्याप्रमाणें सन १५७२, नोवेंबर ता. १८ रोजीं अहंमदाबादचें राज्य अकबराकडे गेलें, आणि त्यानें सर्व प्रकारचा बंदोबस्त केला. ह्यापुढचा गुजराथचा इतिहास मोगल बादशहांचे कार्किर्दीत येईल.

७. **गुजराथच्या इतिहासाचें पर्यालोचन.**—अर्वाचीन काळच्या इतिहासाची सुरुवात अकराव्या शतकापासून धरिली आहे. त्या अनुरोधानें इसवी सन ९४२ त चालुक्य वंशाच्या स्थापनेशीं सुरुवात करून सन १५७२ त अकबर बादशहानें गुजराथ प्रांत जिंकिला, तेथपर्यंत त्या प्रांताचा इतिहास थोडक्यांत वर दिला आहे. अन्हिलपट्टण येथें चालुक्य म्हणजे सोळंखी वंशाची सत्ता इ. स. ९४२ पासून १२१५ पर्यंत होती. सन १२१५ पासून १२९५ पर्यंत वाघेलवंशी राजांनीं गुजराथेंत राज्य केलें. सन १२९६ त दिल्लीचा सुलतान अला-उद्दीन खिलजी ह्यानें गुजराथ देश जिंकून दिल्लीच्या अमलाखालीं आणिला. सुमारें शंभर वर्षें हा प्रांत दिल्लीच्या सुलतानांकडे होता. सन १३९६ त मुज्फरखान नामक दिल्लीच्या सुभेदारानें गुजराथप्रांतांत स्वतंत्र राज्याची स्थापना केली, तेव्हांपासून सन १५७२ पर्यंत मुसलमानांचें स्वतंत्र राज्य ह्या प्रांतावर होतें. पुढें हा प्रांत मोगल बादशाहींत सामील झाला.

अर्वाचीन काळचा हिंदुस्थानांतल्या कोणत्याही भागाचा इतिहास घेतला, तरी लढाया, हल्ले, खून, जुलूम ह्यांपलीकडे इतिहासकारास ज्यास्त कांहीं नमूद करितां येत नाहीं ही मोठ्या दिलगिरीची गोष्ट

होय. ह्या काळांत सामाजिक, राजकीय व इतर बाबतींत हिंदुस्थानचा ऱ्हास तीव्र वेगानें होत चालला होता, आणि ह्या काळाची भरंवसेलायक माहिती उपलब्ध नाहीं. हिंदूंवर मुसलमान राज्यकर्त्यांनीं धर्माच्या बाबतींत जुलूम केल्यास त्याजबद्दल मुसलमान इतिहासकार त्यांची तारीफच करितात. उलट राज्यकर्त्यानें अशा बाबतींत निष्पक्षपात दाखविल्यास ते त्यास दूषणें देतात. तथापि सारासार मानानें विचार करितां असें दिसतें, कीं गुजराथेंतील लोकांत जी एक प्रकारची विशिष्ट निःसत्त्वता व निर्वीर्यता आजकाल दिसून येते, तिचें मूळ कारण हा दोनतीनशें वर्षांचा मुसलमानी अंमल होय. गुजराथच्या लोकांवर मुसलमानी राज्यकर्त्यांनीं कसकसे जुलूम केले, त्यांचें वर्णन जागजागीं आलेंच आहे. ह्या प्रांताच्या आसपासही मुसलमानी राज्येंच ह्या काळांत होतीं. महाराष्ट्रांत बहामनी राज्य होतें. सिंध व माळवा ह्या प्रांतांवरही मुसलमानांचीच सत्ता होती. या राज्यकर्त्यांचे वारंवार झगडे चालत. त्यांत गुजराथ देश विशेष सुसंपन्न असल्यामुळें त्याजवर सर्वांची धाड येई. तीनशें वर्षांच्या काळांत लढाई व धामधूम झाल्याशिवाय दहा वर्षेंसुद्धां सुखानें गेलीं नाहींत; किंवा लोकांस आपल्या शेतांतील पिकें शांततेनें घरीं आणितां आलीं नाहींत. कित्येक सुलतान फार नामांकित व पराक्रमी झाले खरे, तरी पण त्यांचा सर्व लौकिक हिंदु लोकांचा व हिंदु धर्माचा पाडाव करण्यांतच दिसून आला. अकबर बादशहाप्रमाणें सर्व लोकांच्या ठिकाणीं समान दृष्टि ठेवून एखादें कृत्य केल्याचें उदाहरण गुजराथच्या इतिहासांत सांपडत नाहीं. हिंदु लोकांच्या मुलींशीं कित्येकांनीं लग्नें लाविलीं, पण तसें करण्यांत पुढें अकबर बादशहानें धारण केलेला सद्धेतु त्यांच्या मनांत नव्हता. केवळ हिंदूंचा अपमान करण्याकरितांच त्यांनीं तशी गोष्ट केली. गुजराथ प्रांत आरंभापासून हिंदु व जैन ह्या धर्मांच्या पुष्टीस अत्यंत योग्य असा होता. गुजराथेंत अनेक मंदिरें, देवस्थानें व तीर्थें होतीं. असें असतां त्या सर्वांचा लय होऊन प्रत्येक ठिकाणीं मुसलमानी धर्म गाजूं लागला. प्राचीन काळापासून आख्या पावलेली गुजराथची शिल्पकला व गृहरचनासौंदर्य यांस एक प्रकारचें विशिष्ट मुसलमानी स्वरूप प्राप्त झालें. सर्वांहून अतिशय जें राष्ट्राचें नुकसान झालें तें असें, कीं तीनशें वर्षांच्या ह्या अवधींत

पराक्रम गाजविण्याचे प्रसंग लोकांस प्राप्त न झाल्यामुळें ते सदैव दास्य-स्थितींत राहिले! मात्र असे प्रसंग बुद्धया आणावे लागतात, तसे ते आणण्याचा प्रयत्न हिंदूंनीं केलेला दिसत नाहीं. मुसलमानांच्या फौजेंत एकाही हिंदूचा शिरकाव होत नसे. लोक अज्ञानस्थितींत राहिले आणि चोरीचपाटीशिवाय त्यांस दुसरा धंदा उरला नाहीं. मुसलमानांत तरी ऐक्य होतें असें नाहीं. दरबारांतील सर्व कामदारांत दुष्मनगिरी मूर्तिमंत वसत होती. त्यामुळें परस्थांचें मात्र चांगलें फावलें. पोर्तुगीझ लोकांनीं हिंदुस्थानांत प्रवेश करून गुजराथचा किनारा व कोंकणपट्टी व्यापिली. त्यांचा प्रतिकार मुसलमानांच्यानें करवला नाहीं. युद्धकलेंत हिंदूंपेक्षां मुसलमान श्रेष्ठ, आणि मुसलमानांपेक्षां युरोपियन श्रेष्ठ असा प्रकार दिसून येतो.

---

## प्रकरण बारावें.

### बहामनी राज्य.*

१. हिंदु-मुसलमानांचे दक्षिणेंतील कलह. २. दक्षिणेंतील बंडाचें अंतस्थ कारण. ३. हसनगंगू ऊर्फ अला-उद्दीन,(१३४७). ४. महंमदशहा, (१३५८–१३७५). ५. महंमदशहानंतर झालेले सुलतान. ६. फिरोजशहा, (१३९७–१४२२). ७. अहंमदशहा वली, (१४२२-१४३५). ८. अला-उद्दीनशहा, (१४३५–५७). ९. हुमायूनशहा व निजामशहा,(१४५७). १०. महंमदशहा, २रा, (१४६३-१४८२). ११. वजीर महंमद गवान, (१४०३–८१). १२. महंमूदशहा, (१४८२–१५१८). १३. बहामनी राज्याचें समालोचन.

**१. हिंदु व मुसलमान यांचे दक्षिणेंतील कलह.**—दक्षिणहिंदु-स्थानांत मुसलमानी सत्तेची स्थापना झाली, तिची हकीकत वाचली

---

* वास्तविक बहामनी राज्याचा इतिहास हा महाराष्ट्राच्या इतिहासाचा भाग आहे. तथापि हें राज्य मुसलमानी असल्यामुळें त्याचा वृत्तान्त मुसलमानी रियासतींत देणें इष्ट आहे. बहामनी राज्य स्थापन होण्यापूर्वीचा महाराष्ट्राचा इतिहास मराठी रियासतींत दिला आहे.

म्हणजे हिंदु व मुसलमान यांजमधील विरोध स्पष्ट कळून येतो. मुसलमानांची सत्ता पंजाब व दिल्ली या प्रांतांच्या पुढें पसरली नव्हती, तोंपर्यंत त्यांच्यांत निश्चयी व कडव्या मुसलमानांची मध्यआशियाखंडांतून भरती होऊन, त्यांच्या अंगचें प्रखर तेज जागृत राहत होतें. हिंदुधर्माशीं त्यांचा संबंध फारसा आला नव्हता. दिल्लीच्या दरबारीं हिंदूंचें वजन नसून हिंदु स्त्रियांशीं लग्न करणें मुसलमानांस प्रशस्त वाटत नव्हतें. परंतु दक्षिणेंत त्यांचा प्रवेश होऊं लागला, तेव्हांपासून त्यांच्या धर्माचें व राज्यकारभाराचें स्वरूप बदलत चाललें. अपरिचित देश व भिन्न भाषा यांत त्यांचें दळणवळण सुरू झाल्यामुळें, उत्तरेकडील मुसलमानांचें व त्यांचें मूळचें नातें तुटत चाललें. हिंदूंचे आचारविचार त्यांस ग्राह्य करावे लागले. हिंदु स्त्रियांशीं त्यांनीं लग्नें लाविलीं. अर्थात् हिंदूंच्या संस्थांचा परिणाम त्यांजवर होऊं लागला. यामुळें दिल्लीच्या सुलतानांच्या ताब्यांत राहणें त्यांस दुःसह वाटून त्यांतून आपली मुक्तता करून घेण्यास ते उत्सुक झाले. ही वस्तुस्थिति दिल्लीदरबारानें समजून घेतली नाहीं. दक्षिणेंतील ह्या भेदबुद्धीचा संपर्क दिल्लीसही पोंचला, पण तेथील करड्या मुसलमानी फौजेपुढें त्या संपर्काचें वजन पडलें नाहीं. जी आग दिल्लींत मुरली, ती दक्षिणेंत उमटली. तेणेंकरून दिल्लीचे सुलतान दक्षिणदेशास मुकले.

ह्या बंडाची हकीकत राज्यकारभार चालविणारांस फार उपयोगाची आहे. मुसलमानी धर्माचा औत्तरीय प्रवाह हिंदुधर्मरूपी दक्षिणमहासागरांत घुसला. त्या सागराकडून त्यास अडथळा झाल्यामुळें संगमाच्या ठिकाणीं ह्या नवीन प्रवाहांतील गाळ सांचून मूळ जमिनीपासून हा भाग अलग झाला. ह्या गोष्टीबद्दल आगाऊ इशारा मिळाला नव्हता असें नाहीं. सन १३२० सालीं खुस्रूच्या वेळेस दिल्ली शहरांत जें बंड झालें तें ह्या भावी परिणामाचें सूचक होतें. तथापि हा इशारा त्या राज्यकर्त्यांनीं जुमानिला नाहीं. महंमद तुघ्लखचा जुलूम व दररोज सुटणारे त्याचे नवीन हुकूम ह्यांच्या योगानें सन १३२० पासून धुमसत असलेल्या असंतोषांत भर पडून, त्याचा स्फोट सन १३४७त झाला. ह्या दोन्ही बंडांची हकीकत एकसमयावच्छेदेंकरून ध्यानांत घेतली पाहिजे.

सन १३२० सालीं दिल्ली शहरांत जें हिंदूंचें बंड झालें, त्यांत दक्षिणेंतील राजांचें अंग होतें. दिल्लींत बंड झाल्याबरोबर दक्षिणच्या राजांनीं

उचल घेतली. ग्यासुद्दीन तुघ्लखनें दिल्लीचा बंदोबस्त केल्यावर आपला मुलगा जो महंमद तुघ्लख म्हणून पुढें प्रसिद्धीस आला, त्यास दक्षिणेच्या बंदोबस्तास पाठविलें. त्यानें देवगडचा बंदोबस्त केला; परंतु वरंगूळचे राजाकडून पराभव पावून त्यास जीव घेऊन देवगडास परत यावें लागलें. असा प्रकार होण्याचीं कारणें जरा गूढ आहेत. आशियाखंडांतील लोक धन्यावर सहसा उठावयाचे नाहींत, पण यःकश्चित् गांवगप्प ऐकिली, कीं तिजवर त्यांचा लागलाच भरंवसा बसतो. वरंगुळास शहाजादा पोंचल्यावर त्यास एक महिनाभर दिल्लीचें वर्तमान कांहींच समजलें नाहीं. तेव्हां तिकडे सुलतान मेल्याची बातमी उठली. त्याबरोबर मोगल फौजेची पुनः कत्तल होणार असें फौजेंत कळलें. शहाजाद्याबरोबर बरीच फौज मोगल होती. तींतील लोक घाबरून त्यास सोडून गेले. कित्येक हरामखोर फितूर होऊन हिंदु फौजेस जाऊन मिळाले. वरंगूळच्या राजानें शहाजाद्याचा निकट पाठलाग केला. पुढें शहाजाद्यानें मुसलमानांची एक नवीन फौज तयार करून वरंगूळचा पाडाव केला हें मागें आलेंच आहे.

ह्या गोष्टीस पंचवीस वर्षें लोटलीं. दक्षिणेंतील बंड मोडलें, तरी त्याचें निर्मूलन झालें नव्हतें. अर्थात् अनुकूळ संधि येतांच, त्याचा पुनरपि उद्भव झाला. बंड केल्याबद्दल आपल्या वडिलांस पूर्वीं काय शिक्षा भोगाव्या लागल्या हें त्यांचीं मुलें विसरून गेलीं. पुनः त्यांचे मनांत बंड करण्याची प्रेरणा झाली. सन १३२० व १३४७ ह्या दोनही सालांत एकच प्रकार घडला. मुसलमानी लष्करास महंमदाची भीति पडली. हिंदु राजांस आपलें स्वातंत्र्य परत मिळविण्याची संधि प्राप्त झाली. लष्करानें बंड केलें त्यास तेथच्या राजांनीं मदत केली. लष्कराच्या लोकांनीं आपल्या अधिकाऱ्यांस ठार मारून सरकारी तिजोऱ्या लुटल्या. महंमद तुघ्लखाच्यानें ह्या बंडाचा नाश करवेना. अर्थात् हसनगंगू नांवाच्या गृहस्थास दक्षिणेंत मुसलमानांचें नवीन राज्य स्थापितां आलें.

अशा प्रकारचीं बंडें दक्षिणेंतच झालीं असें नाहीं. बंगाल्याकडे गेलेल्या मुसलमानांनीं हिंदूंच्या मसलतीनें स्वतंत्र राज्य स्थापण्याचे प्रयत्न केले. परंतु बंगाल्यांत हिंदु लोकांनीं बंडखोरांस मदत दिली नाहीं. दक्षिणचे हिंदु पाणीदार होते. त्यांस स्वातंत्र्याची अभिरुचि विशेष होती. बंगालचे

हिंदु मुसलमानांस वचकून असत. स्वधर्माचें वारें त्यांच्यांत प्रखरपणें खेळत नसल्यामुळें ते धर्माविषयीं बेपर्वा असत. पुष्कळांस तर मुसलमानांचा शियापंथच ज्यास्त आवडला.

**२. दक्षिणेंतील बंडाचें अंतस्थ कारण.**—शिया व सुनी यांजमधील विरोध हेंच ह्या बंडाचें अंतस्थ कारण होय. शिया व सुनी यांजमधील मतभेद मागें* सांगण्यांत आलाच आहे. हिंदुस्थानांत ह्या मतभेदास चमत्कारिक स्वरूप प्राप्त झालें. सुनी पंथाचा हिंदु धर्माशीं अत्यंत विरोध आहे. शिया पंथाचा कल हिंदुधर्माशीं कांहीं अंशीं मिळता आहे. एवढा भेद लक्षांत ठेविला म्हणजे ह्या वेळच्या मुसलमानी इतिहासाचें स्वरूप विशेष स्पष्ट होतें. सुनी लोक मादिना येथील धर्मसभेनें निवडिलेल्या पहिल्या चार खलीफांस मानितात. परमेश्वराचें स्वरूप व पुनर्जन्म वगैरे प्रश्नांवरील त्यांचीं मतें हेकेखोरपणाचीं नाहींत. महंमदाच्याच वंशजांत दैविक अंश आहे असें त्यांस वाटत नाहीं. हिंदुधर्म म्हणजे निव्वळ मूर्तिपूजा असें ते मानितात. शियापंथी मुसलमानांचा कल वेगळा आहे. ते पहिल्या चार खलीफांस मानीत नाहींत. ते ज्यास्त देवभोळे व आग्रही आहेत. महंमदाच्या औरस वंशास सय्यद असें म्हणतात. सय्यदांच्या शरीरांतील धमन्यांतून महंमद पैगंबराचें शुद्ध रक्त अद्यापि खेळत आहे असें शिया मुसलमान समजतात. त्यांचीं धर्मसंबंधीं व इतर मतें हिंदूंच्या मतांशीं बरींच मिळतीं आहेत. आरंभीं मोहरमचे पहिले पंधरा दिवस सर्व मुसलमानांत मोठे सणाचे होते. पण त्या महिन्याच्या दहाव्या दिवशीं हुसेनाचा खून झाल्यामुळें, हिंदूंच्या मूर्तिपूजेच्या धर्तीवर शिया मुसलमान ताबुतांत हुसेनाचें भजन करितात. ही एक प्रकारची मूर्तिपूजाच होय. दक्षिणेंतील मुसलमानी राज्याशीं शिया पंथाचा निकट संबंध आहे. आरंभीं दक्षिणेंत आलेले मुसलमान सुनी होते. दक्षिणेंत जन्मलेले लोकही सुनीच. म्हणून सुनीपंथी लोकांस बहामनी राज्याचे वेळेस दक्षणी असें नांव मिळालें. पण लष्करांत मोगलांचा भरणा विशेष असे. हे मोगल बहुशः शियापंथी होते. तसेंच इराणांतून आलेले पुष्कळ लोक शियापंथीच असत. त्यांचा भरणा बहामनी राज्यांत

---

* प्रकरण २ कलम ५ पहा.

विशेष होता. हे बाहेरून आलेले असल्यामुळें त्यांस परदेशी असें नांव प्राप्त होऊन, ह्या दोन पक्षांचे तंटे त्या राज्यांत सतत चालू असत. फार तर काय, ह्या तंट्यांची हकीकत नीट समजली तरच बहामनी राज्याचा इतिहास चांगला समजेल.

तथापि मुसलमानांच्या जातीवरून त्यांचा धर्म ओळखतां येण्याजोगा नाहीं. ज्याच्या त्याच्या मर्जीप्रमाणें त्यास शिया किंवा सुनी धर्म स्वीकारण्याची मुभा असते. बहामनी राज्यसंस्थापक हसनगंगू हा शियापंथी असून त्याचाच मुलगा महंमदशहा हा सुनी होता. बहामनी राज्यांत पुष्कळ आरब व हबसी लोकांचा भरणा होता, म्हणून परदेशी असूनही ते दक्षणी पंथांत गणले जात. तसेंच खुद्द दक्षिणचे पुष्कळ लोक बाटून शियापंथी झाले, त्यांचा समावेश परदेशी पक्षांत होई.

**३. हसन गंगू ऊर्फ अल्लाउद्दीनशहा, (सन १३४७–१३५८).**— हसन गंगूची पूर्वपीठिका माहीत नाहीं. तो दिल्लीस गंगू नामक ब्राह्मणाच्या घरीं वाढला होता. सुलतान झाल्यावर त्यानें त्या ब्राह्मणास आपल्या पदरीं खजिनदारीचें काम सांगितलें. धर्माचे बाबतींत हसन आग्रही नव्हता. मलीक काफूर व खुस्रूखान यांप्रमाणेंच तो खुशामतीनें मोठ्या पदास चढला. त्यांच्याप्रमाणेंच धर्माच्या बाबतींत कांहीं कपट करून दक्षिणेंतील हिंदु राजांना त्यानें आपल्या पक्षास वळविलें. शियापंथी आब्बसी खलीफांप्रमाणें त्यानें आपल्या शिरावर कृष्णछत्र धारण केलें.

गंगू ब्राह्मणावर महंमद तुघ्लखाची मेहेरबानी असे. त्याजपाशीं हसन हा गुलाम होता. हसनचें इमानी वर्तन पाहून, त्यास गंगू ब्राह्मणानें कांहीं जमीन व एक बैलांची जोडी दिली. ती जमीन नांगरीत असतां तींत हसनास एक मोहोरांचा हांडा सांपडला. तो त्यानें नेऊन आपल्या धन्यास नजर केला. ह्या इमानीपणाबद्दल ब्राह्मणानें हसनची सुलतानापाशीं तारीफ केली. सुलतानानें खुष होऊन हसनास दहा हजार स्वारांची सरदारी दिली. ब्राह्मणानें त्याची जन्मपत्रिका पाहून भविष्य केलें, कीं 'तुला राज्यप्राप्ति होईल.' तसें झाल्यास स्वतःच्या नांवास गंगू हें पद जोडून, आपणास फडणिशीचें काम देण्याचें ब्राह्मणानें हसनाकडून वचन घेतलें. पुढें सुलतानानें हसनास दक्षिणच्या सुभेदाराच्या मदतीस पाठविलें. गुजराथेंतील बंड

सुलतानानें मोडल्यावर तेथच्या कित्येक बंडखोरांस दक्षिणच्या सुभेदारानें आश्रय दिला, ह्याबद्दल बादशहा सर्वांसच शासन करणार, असें ऐकून तें बादशहावर उठले. त्यांनीं दौलताबादचा किल्ला हस्तगत करून इस्मई-लखान यास नासिरुद्दीन हा किताब देऊन आपला सुलतान केलें. ह्या समयीं हसन यास जाफरखान हा किताब मिळाला. पुढें महंमदानें ह्या बंडवाल्यांवर स्वारी केली. पण दिल्लीस बंड झाल्याचें वर्तमान आल्यामुळें दक्षिणेंतील काम तसेंच सोडून महंमद तुघ्लख दिल्लीस गेला. मागें राहिले-ल्या त्याच्या सैन्यावर जाफरखानानें स्वारी करून, त्याची दाणादाण केली, आणि बेदर व कंधारी हे किल्ले काबीज केले. नंतर जाफरखान दौलताबादेस गेल्यावर, नासिरुद्दीननें राज्याचा कारभार खुशीनें सोडून, जाफरखान यास दिला, (ता. १२ आगस्ट, सन १३४७). जाफरखानानें अला-उद्दीन हसन असा किताब धारण केला आणि आपल्या नांवचीं नाणीं पाडिलीं. कलबुर्गा शहरास हसनाबाद असें नांव देऊन त्यानें आपली राजधानी केली. अला-उद्दीन हा फार हुशार व धोरणी असून वेळ पडेल तसें वागणारा होता. प्रथम त्यानें हिंदु राजांचा चांगला स्नेह संपादिला, आणि आपला कार्यभाग उरकतांच, तो त्यांजवर उलटला. गज्नीच्या महंमुदासारखा तो हिंदुधर्म-द्वेष्टा नव्हता. कोणत्याही प्रकारानें राज्यप्राप्ति व्हावी एवढीच त्याची इच्छा होती. मुसलमानांचा कडवेपणा त्यानें आपल्या वर्तनांत दाखविला असता, तर त्याचें काम साधलें नसतें. तथापि केवळ स्वार्थावर दृष्टि देऊन, आपणास साहाय्य करणाऱ्या हिंदु राजांशीं तो कृतघ्नपणानें वागला हें अनुचित होय. त्याचें राज्य दिवसेंदिवस वाढत गेलें. मलीक सैफुद्दीन घोरी यास त्यानें आपली वजिरी दिली. गंगू ब्राह्मणास दिलेलें वचन न विसरतां, त्यानें आपल्या नांवास गंगू—बहामनी असा किताब जोडिला, आणि त्या ब्राह्मणास दिल्लीहून आणवून आपल्या पदरीं इतमामानें ठेविलें. पुढें अकरा वर्षेंपर्यंत न्यायानें व सदाचरणानें राज्य करून बहामनी राज्याचा हा संस्थापक इसवी सन १३५८ ह्या वर्षीं ६७ वर्षांचा होऊन मरण पावला.

ह्या नवीन राज्याचा विस्तार मुख्यतः सर्व महाराष्ट्र देशास व्यापून होता. त्याच्या उत्तरेस नर्मदा नदी, पश्चिमेस सह्याद्रि पर्वत, दक्षिणेस कृष्णा नदी आणि पूर्वेस तैलंगणचें राज्य व गोंडवणचें रान, अशा त्याच्या

चतुःसीमा होत्या. ह्या राज्यास आरंभीं समुद्रकिनारा नव्हता. सरहद्दी-वर माळव्यांत व खानदेशांत नवीनच मुसलमानी राज्यें स्थापन झालीं होतीं. इतर बाजूंस हिंदु राज्यें असून बहामनी राज्याची प्रजा मुख्यत्वें-करून हिंदु होती. ह्यामुळें हिंदु चालीरीतींचें विशेष वजन ह्या राज्यांत होतें. कृष्णेच्या दक्षिणेस तुंगभद्रा नदीच्या कांठीं विजयनगर येथें वरंगूळच्या राजघराण्यांतील एका पुरुषानें नवीन हिंदु राज्याची स्थापना केली, त्याची हकीकत आलाहिदा आहे. हेंच राज्य पुढें बलाढ्य होऊन त्याचें बहामनी राज्याशीं वैर जुंपलें. बहामनी राज्याची राजधानी कलबुर्गा शहर विजयनगरच्या उत्तरेस व वरंगूळच्या पश्चिमेस, दीडशें मैलांवर होतें. म्हणून ह्या दोन राज्यांमध्यें झगडा अपरिहार्य झाला.

**४. महंमदशहा, ( १३५८–१३७५ ).**—अला-उद्दीन यास दाऊद व महंमद असे दोन मुलगे होते. महंमद हा हुशार असून, त्यानेंच पुढें गादीवर बसावें, असें बापानें ठरवून ठेविलें होतें. ह्या राजानें आपल्या नांवचीं नवीं चौकोनी नाणीं पाडिलीं. पहिलीं असलेलींच नाणीं राहवीं, असें हिंदु लोकांच्या मनांत असल्यामुळें, हीं नवीं नाणीं ते वितळवून टाकीत; ह्याबद्दल शहानें पुष्कळ हिंदु लोकांस कडक शिक्षा केल्या. विजयनगरचा व तैलंगणचा राजा हे एक होऊन, कौलास वगैरे आपले गेलेले प्रांत परत घेण्याविषयीं महंमदशहाबरोबर लढण्यास आले. तैलंगणचे राजाचा मुलगा विनायकदेव हा त्यांचा सेनापति होता. कौलास प्रांताचा सुभेदार बहादूरखान यानें त्यांचा पराभव केला, तरी पुनः युद्ध सुरू होऊन शहा स्वतः फौज घेऊन तैलंगणांत वेलंपट्टण म्ह० हल्लीं वेलमकोंडा नांवाचें शहर आहे त्यावर गेला. तेथें विनायकदेवास त्यानें ठार मारिलें. लूट घेऊन परत येत असतां, त्याचे फार हाल झाले आणि बहुतेक लोक मेले. ह्या सुमारास हिंदु राजांस आपली चूक दिसून आली. दिल्लीचे बादशहाविरुद्ध हसन गंगू यास मदत करून त्यांनीं आपल्या दाराशीं एक नवीन शत्रु आणून उभा केला. या अडचणीच्या प्रसंगीं हिंदु राजांनीं दिल्लीचा सुलतान फिरोज तुघ्लख यास उत्तरेकडून स्वारी करण्याविषयीं भर दिली, पण त्यानें तें मनावर घेतलें नाहीं. पुनः युद्ध सुरू होऊन बहामनी सुलतानानें तैलंगणावर स्वारी केली; तेव्हां तेथच्या

राजानें ३३ लाख रुपये व गोंवळकोंड्याचा किल्ला महंमदशहास देऊन तह केला, आणि इतःपर त्यानें आपणाला त्रास देऊं नये, असा करार लिहून घेऊन वरंगूळचे राजानें तख्त-इ-फेरोज ( अस्मानी तख्त ) नांवाचें एक रत्नजडित सिंहासन महंमदशहास नजर केलें; तेंच सिंहासन पुढें बहामनी शहांनीं घेतलें. त्याची किंमत चार कोट रुपये असून तें नऊ फूट लांब व तीन फूट रुंद होतें. ह्यापुढें विजयनगरचे राजाशीं युद्ध सुरू झालें. विजयनगरचा राजा ह्या सुमारास फार प्रबळ असून बहुतेक दक्षिण हिंदुस्थान त्याचे ताब्यांत होतें. त्यानें मुसलमानांशीं अत्यंत चिकटपणानें टक्कर दिली. मुसलमानांचा मुद्गलचा किल्ला सरहद्दीवर होता, तो त्यानें घेतला आणि तेथील सर्व लोकांची कत्तल केली; त्यामुळें संतापून एक लाख हिंदूंस ठार मारण्याची महंमदशहानें प्रतिज्ञा केली. दोनही फौजांची तोंडातोंडी होतांच हिंदु लोकांचा पराजय होऊन सत्तर हजार लोक ठार झाले. ह्या लढाईत हिंदु लोकांनीं तोफांचा उपयोग केला असें म्हणतात. ह्या विजयानें लढाई संपली नाहीं. अध्वनीनजीक पुनः एक निकराची लढाई झाली. विजयनगरच्या राजानें भोजमल्ल यास आपल्या सेनेचें आधिपत्य दिलें होतें. ह्या लढाईंत तोफखाना होता. भोजमल्लास जखम लागली आणि तो पळून गेला; तेव्हां हिंदु लोक आपला जमाव सोडून निघून गेले, ( १३६६ ). पुढें कांहीं दिवस युद्धसंग्राम चालून उभयतांमध्यें तह झाला. ह्या लढाईनंतर महंमदशहाचे कांहीं दिवस अंतर्गत बंडें मोडण्यांत गेले. महंमदशहानें चोर, रामोशी इत्यादि दुष्ट लोकांचा बंदोबस्त करून मुलखाचा बंदोबस्त केला.

एकंदरींत महंमदशहानें राज्य फार शहाणपणानें केलें. तो लोकांची दाद घेण्यासाठीं वारंवार प्रांतांतून फिरत असे. त्याच्या दरबारचें वैभव मोठें होतें. सतरा वर्षें राज्य करून हा शहा सन १३७५त मरण पावला. मलीक सैफ्-उद्दीन घोरी हा त्याचा दिवाण होता.

**५. महंमदशहानंतर झालेले सुलतान.**—या पुढील राजकर्त्यांचें महत्त्व ऐतिहासिक दृष्ट्या विशेष नाहीं. कित्येक सुलतान सद्गुणी व कित्येक दुर्वृत्त निघाले. त्यांच्या कार्किर्दींत हिंदु व मुसलमान यांजमध्यें एकसारखे युद्धप्रसंग चालू होते. शिया व सुनी, किंवा परदेशी व दक्षणी ह्या दोन पक्षांतील कलह कधींही मिटले नाहींत. मुसलमानी धर्मावर

हिंदूंची छाप विशेष बसत चालली, आणि मुसलमान लोक आपला मूळचा कडवेपणा विसरत चालले.

**मुजाहिद्शहा, ( सन १३७५–७८ ).**—सैफ-उद्दीनची मुलगी महंमदशहास दिली होती, तिच्या पोटीं मुजाहिद्शहाचा जन्म झाला. हा मोठा शूर, धीट व बळकट होता. तो १९ व्या वर्षी तख्तावर बसला. लवकरच विजयनगरच्या राजाबरोबर युद्ध सुरू झालें. उभयतांनीं लढाईची जंगी तयारी केली. पण मुसलमानांची कडेकोट तजवीज पाहून, हिंदु लोकांच्या सैन्यानें पळ काढिला. त्यांचा पाठलाग शहानें चालविला, आणि शेवटीं दोनही फौजा विजयनगरांत आल्या. अनेक लढाया होऊन त्यांत मुजाहिद्शहाच्या अद्वितीय पराक्रमामुळें मुसलमान विजयी झाले. ह्या वेळीं मुसलमानांस अपार संपत्ति व पुष्कळ मुलूख मिळाला. मार्गांतील कित्येक किल्ले घेऊन शहा राजधानीस परत आला. शहाचा चुलता दाऊदखान यानें राज्यलोभानें मुजाहिद्शहास मारेकरी घालून ठार मारिलें, ( सन १३७८ ).

**दाऊदशहा, ( सन १३७८ ).**—दाऊद नांवाचा महंमदशहाचा भाऊ कलबुर्गा येथील किल्ल्यावर कैदेंत होता. तो तेथून सुटून राज्य मिळविण्याची खटपट करूं लागला. पिढीजाद वजीर व राज्याचा आधारस्तंभ मलीक सैफ्-उद्दीन यानें दाऊदशहाची सत्ता कायम होण्याबद्दल पुष्कळ प्रयत्न केले. पण ह्या कृत्यास वजिराच्या मुलीची मुलगी व मुजाहिद्शहाची बहीण रूपवर आघा इनें मात्र रुकार दिला नाहीं. पुढें घोरी रजा मागून घरीं बसला. दोन महिन्यांच्या आंत रूपवर आघानें शहाचा खून करविला.

**महंमूदशहा, ( सन १३७८–१३९७ ).**—रूपवर आघानें दाऊदशहाच्या मुलाचे डोळे काढिले; आणि अला-उद्दीनचा कनिष्ठ पुत्र महंमूद खास तख्तावर बसवून, त्याचे नांवची द्वाही फिरविली. हा शहा दयाशील, सद्गुणी व न्यायी होता. त्यानें घोरी यास पुनः वजिरी दिली. पूर्ववत् जिकडे तिकडे स्वस्थता झाली. हा शहा विद्वान् होता. त्यास कवितेची अभिरुचि होती. त्यानें एकपत्नीव्रत पाळिलें. इराण, आरबस्तान या देशांतून मोठमोठे विद्वान् गृहस्थ दक्षिणेंत येत, त्यांस शहा

चांगलें उत्तेजन देई. सर्व मोठमोठ्या शहरांतून त्यानें शालागृहें, व अनाथ-बालगृहें स्थापन केलीं. आंधळ्या लोकांस नेमणुकी बांधून दिल्या, आणि राज्यांत मुसलमानी धर्मोपदेशक नेमिले. दुष्काळ पडला असतां स्वतः दहा हजार बैल ठेवून, सर्वांस स्वस्त दरानें धान्य देण्याची तजवीज केली. तो गरिबांचा चांगला परामर्ष घेई. त्याची कार्कीर्द शांततेची झाली. त्यास दक्षिणचा ॲरिस्टॉटल अशी संज्ञा मिळाली होती. तो इसवी सन १३९७ त मरण पावला. त्याच्यामागून दुसऱ्याच दिवशीं तख्ताचा आधारस्तंभ प्रसिद्ध वजीर मलीक सैफ्-उद्दीन-घोरी हाही मरण पावला.

महंमूदशहाचे मागून त्याचे दोन मुलगे तख्तावर आले, पण थोड्याच काळांत दरबारांतील कांहीं मंडळींच्या गुप्त कारस्थानांत सांपडून ते पद-च्युत झाले. नंतर दाऊदखानाचा मुलगा फिरोजशहा तख्तावर बसला.

६. **फिरोजशहा**, ( सन १३९७–१४२२ ).–या शहाच्या कार्कीर्दींत बहामनी राज्याचे वैभवाचा कळस झाला. त्यानें विजयनगरचे राजाच्या मुलीशीं बळजबरीनें लग्न लाविलें; आणि मुसलमानी धर्मास पुष्कळ उत्तेजन देऊन सभोंवारच्या प्रदेशांवर स्वाऱ्या करून राज्याची मर्यादा वाढविली. तो उदार होता. दारू पिण्याशिवाय इतर गोष्टींत तो अगदीं धर्मशास्त्रा-प्रमाणें वागत असे. खासगी मंडळींत तो सर्वांशीं साधेपणानें वागे. ज्यानें त्यानें आपल्या मर्जीप्रमाणें वर्तन करावें अशी त्याची इच्छा असे. राज्यकारभाराचे विषय व दुसऱ्याची पाठीमागें निंदा करणें, ह्या दोन गोष्टींचें बोलणें मात्र त्यानें मना केलें होतें. त्याचा शिक्षक मीर फैज्-उल्ला अंजू ह्यास त्यानें आपला वजीर नेमिलें. शहानें परदेशांतून मोठमोठे विद्वान् स्वतःच्या खर्चानें आणविले. त्यास पुष्कळ भाषा अवगत असून परकीय विद्वानांशीं तो त्यांच्याच भाषेंत बोलण्याचा प्रयत्न करी. त्याची स्मरणशक्ति चांगली होती. अंजूचें घराणें दक्षिणेंतील प्रसिद्ध सय्यद वंशांतील होतें. ह्या घराण्याशीं शहानें प्रथमतः शरीरसंबंध केले. ह्याचा जनानखाना मोठा होता. त्यात सर्व देशांतल्या स्त्रिया होत्या. भिमेच्या कांठीं फिरोजाबाद नांवाचें एक शहर त्यानें वसविलें, आणि तेथें जनान-खान्याकरितां तटबंदी वाडा बांधिला, तो अद्यापि आहे. ह्या राजाच्या रंगेल स्वभावामुळें त्याचें नांव लोकांच्या तोंडीं अजून निघतें. तो सर्व

धर्मांशीं प्रेमानें वागे. क्रिस्ती धर्मशास्त्र वाचण्याचा नाद त्यास विशेष होता. कलबुर्गा शहरांत त्यानें बांधिलेले वाडे आतां पडून गेले आहेत. स्पेनदेशच्या धर्तीवर बांधलेली एक मशीद मात्र हल्लीं आहे.

नेहमींप्रमाणें विजयनगरचे राजाशीं कलह सुरू होतेच. विजयनगरच्या देवरायानें रायचूर दुआबावर स्वारी केली, आणि केरळ देशचा राजा नरसिंहराय ह्यानें वऱ्हाडावर स्वारी केली. फिरोजशहा प्रथम देवरायावर चालून गेला. दोनही फौजा कृष्णेच्या दोन कांठांवर उतरल्या होत्या. फिरोजशहास नदी उतरून देवरायाच्या फौजेवर जातां येत नव्हतें. तेव्हां सिराज नांवाचा एक कसबी काजी देवरायाच्या छावणींत शिरून एका कलावंतिणीबरोबर राजपुत्राच्या गोटांत गेला, आणि बायकोच्या वेषानें सुरे वगैरे घेऊन रात्रीं राजपुत्रासमोर आपला नाच दाखवूं लागला. नाच पाहण्यांत राजपुत्र तल्लीन झाला असतां, ह्या कपटवेषी काजीनें एकदम त्यास वार करून कापून काढिलें. तेव्हां हिंदु सैन्यांत एकच गोंधळ झाला. दुसरे दिवशीं फिरोजशहा आपल्या फौजेसह नदी उतरून अलीकडे आला; आणि अस्ताव्यस्त झालेल्या हिंदु सैन्याचा पाठलाग करीत विजयनगरपर्यंत गेला. तेव्हां देवराय टेंकीस येऊन त्यानें पुष्कळ दंड भरून फिरोजशहाशीं तह केला. अशा प्रकारें हिंदूकडील राजपुत्रांनीं ऐन युद्धाच्या प्रसंगीं विलासांत निमग्न राहवें, आणि तेणेंकरून वारंवार पराभव पावावें; हा प्रकार हिंदूंच्या त्या वेळच्या निकृष्ट स्थितीची चांगली साक्ष देतो.

केरळचा राजा नरसिंहराय ह्यानें वऱ्हाडप्रांतावर स्वारी केली होती. त्याजवर फिरोजशहानें आपला भाऊ खानखानान व मीर फैज्-उल्ला ह्यांस रवाना केलें. आरंभीं हिंदूंस जय मिळाला, पण पुढें मुसलमानांनीं निकरानें हल्ले केले, ते त्यांस सहन न होऊन, नरसिंहराय धरला गेला, आणि त्यास फिरोजशहापुढें आणिलें. नरसिंहरायानें फिरोजशहाचा मांडलिकपणा कबूल करून तह केला, ( सन १३९९ ); आणि आपली एक मुलगी शहाच्या जनानखान्यांत पाठविली. ह्याच सुमारास तयमूरलंगानें दिल्लीवर स्वारी केली, आणि तो सर्व हिंदुस्थानदेश काबीज करणार अशी वदंता ऐकूं आली. त्याचा प्रतिकार करण्यासाठीं फिरोजनें आपले वकील तयमूरलंगाकडे पाठवून त्याचें सार्व-

भौमत्व कबूल केलें. तयमूरलंगानेंही खुष होऊन शहास नजराणे पाठविले. या कृत्यामुळें गुजराथ व माळवा येथील मुसलमान शहांस फिरोजशहाविषयीं मत्सर उत्पन्न होऊन, त्यांनीं विजयनगरच्या राजाशीं गुप्त संधान लाविलें आणि फिरोजशहाशीं कटकट सुरू केली. ह्यास आणखी विशेष कारण असें झालें, कीं मुद्गल शहरीं एका सोनाराची निहाल नांवाची एक रूपवती मुलगी होती. विजयनगरच्या राजानें बापाकडे तिची मागणी केली. मुलीस ती गोष्ट पसंत पडली नाहीं. तेव्हां राजानें मुलीस पकडण्यासाटीं फौज घेऊन मुद्गल शहरावर हल्ला केला. पण निहाल पळून गेली. तो मुलूख फिरोजशहाचा असल्यामुळें त्यास मोठा राग आला आणि मोठें सैन्य घेऊन तो विजयनगरावर चालून आला. देवरायानें गुजराथ, माळवा, खानदेश वगैरे राजांकडून मदत मागितली, पण ती आली नाहीं. शेवटीं सन १४०६ मध्यें मुसलमानांनीं हिंदूंस अगदीं जर्जर केलें. तेव्हां देवरायानें आपली कन्या व बंकापूरचा किल्ला शहास देऊन तह केला. शहाचें व ह्या मुलीचें लग्न मोठ्या थाटानें विजयनगरास झालें. निहालबाईचें लग्नही शहाजादा हसनखान याजबरोबर झालें. पुढें सन १४१७ सालीं शहानें तैलंगणच्या मुलुखावर हल्ला केला, त्यांत वजीर मीर फैज़्-उल्ला हा पडल्यामुळें मुसलमानांची हिंदूंनीं खोड मोडिली; आणि पूर्वीच्या वैराचा सूड उगविला. ह्याच अपजयामुळें शहा भ्रमिष्ट झाला. त्या भ्रमांत त्यानें आपला पराक्रमी भाऊ खानखानान हा पुढें राज्यावर हक्क सांगेल, म्हणून त्याचे डोळे काढण्याचा बेत केला. त्यामुळें खानखानान पळाला आणि त्यानें लढाईची तयारी केली. युद्ध होऊन शहाचाच पराभव झाला. ह्या कामीं आग्रह धरणें वेडेपणाचें आहे असें पाहून, फिरोजशहानें आपला मुलगा हसनखान ह्यास आपल्यामागें राज्य मिळूं नये, म्हणून स्वतःच्या देखत भाऊ खानखानान ह्यास अहंमदशहा बहामनी असें नांव देऊन तख्तावर बसविलें, आणि आपण सर्व कारभार सोडिला. नंतर दहा दिवसांनीं फिरोजशहा मरण पावला (सन १४२२).

७. अहंमदशहा वली, (सन १४२२—१४३५).—वली म्हणजे साधु. बहामनी शहांनीं विद्येस उत्तेजन देण्याकरितां अनेक पाठशाळा बांधिल्या; आणि अनेक साधूंस इनामें करून दिलीं. अहंमदशहा

हा विद्वान व साधु लोकांस फार मान देत असे, म्हणून त्यास वली हें नांव मिळालें. सय्यद महंमद जिसू दुराज ह्या साधूच्या घराण्यास त्यानें मोठमोठीं इनामें करून दिलीं, माजी शहाच्या प्रधानास त्याच्या पहिल्या जागेवर कायम केलें आणि फौजेची शिस्त सुधारली. तसेंच पुतण्या हसन यास फौजेंत असामी व राहण्यास स्वतंत्र वाडा दिला. येणेंप्रमाणें अनेक सत्कृत्यांनीं या शहानें रयतेची प्रीति संपादन केली. नेहमींप्रमाणें विजयनगर व केरळ येथील राजांनीं शहाबरोबर युद्ध आरंभिलें. अहंमदशहा हाही फौज घेऊन लढाईस गेला. एके दिवशीं छापा घालून देवरायास मुसलमानांनीं कैद केलें. पण तो सुटून पळून गेला. तेव्हां मुसलमानांनीं नाना प्रकारें विजयनगरच्या मुलखास त्रास दिला. तेव्हां शहाचा पाडाव करण्याच्या हेतूनें हिंदु लोकांनीं हरतऱ्हेचे प्रयत्न केले, पण त्यांत त्यांस यश आलें नाहीं. पुढें नेहमींप्रमाणें देवरायानें पुष्कळ ऐवज देऊन शहाशीं तह केला. सन १४२३ सालीं दक्षिणेंत मोठा दुष्काळ पडला. सन १४२४ सालीं वरंगुळच्या राजावर अहंमदशहानें स्वारी केली आणि राजास ठार मारून, बहुतेक सर्व प्रांत जिंकिला. तसेंच त्यानें अनेक हिंदु लोकांस ठार मारिलें, आणि बायका पोरांस बाटवून मुसलमान केलें. ह्या स्वारींत शहास एक हिऱ्यांची खाण सांपडली. सर्व मुलखांत हिंदु लोकांचीं असलेलीं देवळें पाडून तेथें त्यानें मशिदी बांधविल्या, आणि त्यांच्या खर्चास उत्पन्नें बांधून दिलीं. वऱ्हाड प्रांतांतील गाविलगड व नरनाळा हे दोन जुने किल्ले शहानें दुरुस्त केले. सन १४२६ सालीं माळव्याच्या सुलतानाशीं लढाई करून, त्याचा अहंमदशहानें पराभव केला. नंतर बेदरनजीक शहा शिकारीस गेला असतां, तेथें एक नवीन शहर वसवावें असें मनांत येऊन, त्यानें अहंमदाबाद बेदर नांवाचें शहर वसविलें. बेदर ही पूर्वी हिंदु राजांची राजधानी होती. याच शहरीं राजा भीमसेन होऊन गेला, त्याची कन्या दमयंती निषधदेशच्या नळराजास दिलेली होती, अशी कथा आहे. बेदरास अहंमदशहानें खडकावर एक किल्ला बांधिला, तो अत्यंत बळकट म्हणून नांवाजलेला होता. हें नवीन शहर त्यानें आपली राजधानी केली. नंतर कित्येक दिवसपर्यंत कोंकणपट्टी व गुजराथ ह्या प्रांतांत शहाच्या स्वाऱ्या चालू होत्या. मेसापोटेमियाप्रांतांत कर्बेला म्हणून १४ सय्यदांचें ठिकाण आहे. त्या ठिकाणचे

सय्यदांस शहानें अनेक दानधर्म केले. त्यानें इराण वगैरे देशांतून पुष्कळ साधूस इकडे आणविलें. सन १४३५ त अहंमदशहा मरण पावला.

**८. अलाउद्दीन शहा,** ( सन १४३५–१४५७ ).—हा बेदर येथें तख्तावर बसला. विजयनगरच्या राजानें खंडणी देण्याचें बंद केल्यामुळें, त्याजवर फौज पाठवून तिकडून ह्यानें पुष्कळ संपत्ति आणिली. धाकटा भाऊ महंमदखान यानें बंड केलें, तें मोडून त्यास क्षमा करून शहानें रायचूर परगणा त्यास राहण्यास दिला. सन १४३६ त कोंकणपट्टी जिंकण्यासाठीं दिलावरखानाचे हाताखालीं मोठें सैन्य रवाना केलें. रायरी व सोनखेड येथील राजे लवकरच शरण आले. दिलावरखानानें सोन-गडच्या राजाची सुंदर कन्या शहाकरितां नजर आणिली. तिच्यावर शहाची अत्यंत मर्जी बसली, आणि तीस त्यानें परिचेर ( परी-चेहेरा ) असें नांव दिलें. सन १४३७ त खानदेशचा सुलतान नशीरखान ह्यानें बंड केलें, त्यास गुजराथचा राजा सामील झाला. आणीबाणीच्या प्रसंगीं मलीक-उत्-तुजार नामक सरदारास शहानें फौजेसह त्याजवर पाठवून, बंडखोरांचें पारिपत्य केलें.

विजयनगरच्या राजास आपला वरचेवर होत असलेला अपमान सहन होईना. कांहीं तरी युक्तीनें मुसलमानांचा पाडाव करण्याचा त्याचा विचार होता. त्यानें पुष्कळ मुसलमान लोक आपल्या नोकरीस ठेविले. त्यांच्याकरितां विजयनगर शहरांत एक मशीद बांधिली. हिंदु राजांस मुजरा करणें मुसलमानांस अशास्त्र वाटेल, ही शंका दूर करण्याकरितां आपल्या सिंहासनापुढें एका उंच पीठावर त्यानें कुराणाचें पुस्तक ठेविलें. त्यामुळें स्वतःचा मान राहून मुसलमान लोक कुराणास मुजरा करितात असा प्रकार बाह्यतः दिसे. अशा उपायांनीं मोठी फौज जमा करून, सन १४४३त तुंगभद्रा उतरून विजयनगरच्या राजानें मुद्गलच्या किल्ल्यास वेढा दिला, आणि सभोंवारचा पुष्कळ मुलूख तो उद्ध्वस्त करूं लागला. अला-उद्दिनास ही खबर कळतांच तो त्याच्या पारिपत्यास निघाला. पुढें तीन मोठमोठ्या लढाया होऊन शहास जय प्राप्त झाला. तेव्हां देवरायानें पुष्कळ पैसा भरून तह केला.

या शहानें पुष्कळ धर्मकृत्यें केलीं. बेदर येथें भिक्षागृहें स्थापन करून, लोकांस औषधपाणी देण्याकरितां हिंदु व मुसलमान वैद्य ठेविले. दारू

पिण्याची सक्त मनाई केली. मुलकी व लष्करी खातीं सुधारलीं. तथापि हिंदु लोकांस पुष्कळ जाच होई. ब्राह्मणांशीं शहा बोलत सुद्धां नसे, किंवा त्यांस कामावर नेमीत नसे.

पुढें लवकरच शहा व्यसनासक्त झाला. तेव्हां समुद्रकिनाऱ्यावरच्या कोंकणांतील लोकांनीं आपलें प्रदेश परत घेण्याचा विचार चालविला. त्यांजवर जाण्यासाठीं मलीक-उत्-तुजार ह्याची सन १४५३त नेमणूक झाली. तुजारनें प्रथमतः शिर्के नांवाच्या एका प्रमुख राजास जिंकिलें. ह्याच कोंकणच्या स्वारींत कित्येक भानगडी घडून आल्या, त्यांमुळें दरबारच्या मंडळींत तंट्याचें बीज पेरिलें जाऊन, त्यायोगें अखेरीस बहामनी राज्याचा अंत झाला. तुजारनें शिर्क्यास असा आग्रह केला, कीं ' तूं मुसलमान हो, नाहीं तर तुझा जीव घेतों.' अशा आणीबाणीच्या प्रसंगीं त्या धूर्त सरदारानें मोठ्या नम्रतेनें संकट टाळून, स्वतःचा बचाव केला. खेळणा म्हणून एक परगणा कोंकणांत आहे. त्यांत विशाळगड व त्याखालील सर्व जंगली प्रदेशाचा समावेश होत असे. शंकरराय नांवाचा एक हिंदु राजा या खेळणा परगण्यावर राज्य करीत होता. ' तो माझा शत्रु आहे, प्रथम आपण दोघे त्यास मुसलमान करूं, नंतर मी मुसलमान होईन,' असें शिर्क्यानें तुजार यास सांगितलें. खेळणा परगण्यांत जाणें फार अवघड आहे, अशी हरकत तुजारानें दाखविली; पण तें काम आपण पत्करितों, असें शिर्क्यानें कबूल केल्यावर, तुजार त्या गोष्टीस कबूल झाला. तुजार हा मूळचा परदेशी व्यापारी होता. दक्षिणचे सर्व मुसलमान लोक मूळचे इराणी व तुर्की होते. पण इकडे आल्यावर त्यांची पुष्कळ वृद्धि झाली होती. तसेंच हबशी लोकही त्यांच्या पक्षास होते. परंतु परदेशीय लोकांस मोगल अशी संज्ञा त्या वेळच्या इतिहासकारांनीं दिलेली असून, त्यांत बहुतेक सय्यद लोक होते. ते व्यापाराच्या उद्देशानें इकडे आले होते. त्यांचें व दक्षिणच्या मुसलमानांचें वांकडें असे. आजपर्यंत अनेक मोहिमांत तुजार ह्यानें दक्षणी व हबशी यांची मदत घेतली नव्हती. प्रस्तुत प्रसंगीं खेळण्याच्या अवघड प्रदेशांत शिरण्याचें दक्षणी व हबशी कामगारांनीं नाकबूल केलें, आणि ते आपल्या फौजांसह तुजारास सोडून मागें राहिले. शिर्क्याच्या मसलतीनें तुजार हा अत्यंत अवघड

जंगली प्रदेशांतून खेळणा प्रदेशाच्या अगदीं निबिड अरण्यांत शिरला. तेथील हवा अतिशय खराब असल्यामुळें लोकही पुष्कळ आजारी पडले. अशा स्थितींत शिर्क्यानें शंकररायास एकदम येऊन हल्ला करण्याविषयीं खबर दिली. शंकरराय मोठी फौज घेऊन निघाला. त्यानें एकाएकीं छापा घालून सर्व मुसलमानांची कत्तल केली. तुजारहि मारला गेला. कांहीं लोक वांचले ते परत जाऊन दक्षणी फौजेस मिळाले, आणि तेथून सर्व लोक चाकणच्या किल्ल्यावर गेले.

वरील अपजयामुळ दक्षणी व परदेशी या दोन पक्षांमध्यें ज्यास्तच तंटे माजले. परदेशीय सय्यद लोकांचा संपूर्ण नाश करण्याकरितां, दक्षणी कामगारांनीं शहाकडे भलभलत्या हकीकती लिहून पाठविल्या; आणि त्याजकडून सर्व परदेशी अंमलदारांस पकडण्याचा हुकूम आणिला. हे परदेशी अंमलदार चाकणच्या किल्ल्यांत कोंडले गेले. शेवटीं उभयतांचें युद्ध होऊन त्यांतून कांहीं मोगल बचावून शहाकडे गेले. तेथें शहास त्यांनीं खरी हकीकत कळवून त्याजकडून दक्षणी लोकांचा सूड घेवविला, (सन १४५३). ह्या कार्किर्दीच्या अखेरीस अनेक ठिकाणीं बंडें उद्भवलीं, पण तीं शहानें मोडिलीं. खाजेखान महंमद गवान हा प्रथमतः या शहाच्या लष्करांत उदयास आला. पायांवर व्रण होऊन त्या योगानें इ. स. १४५७ या सालीं अल्लाउद्दीनशहा मरण पावला.

अला-उद्दीनशहा मोठा वक्ता, धूर्त राज्यकर्ता व विद्येचा भोक्ता होता.

**९. हुमायूनशहा जालीम व निजामशहा, (१४५७–१४६३).**— अलाउद्दीनशहाचा मुलगा हुमायून हा तख्तनशीन झाला. त्यानें खाजेखान महंमद गवान यास मलीकउत्तुजार असा किताब देऊन, आपला वजीर केलें. प्रथमतः शिकंदरखान नामक सरदारानें केलेलें बंड शहानें मोडिलें, आणि नवलगुंदचा किल्ला घेतला. राजधानींत त्याचा भाऊ हसनखान यानें गादी मिळण्यासाठीं बंड केलें. त्या वेळीं अत्यंत क्रूरपणानें शहानें हसनखानाचा वध केला, आणि त्याच्या सात हजार अनुयायी मंडळींस अतिशय हाल करून ठार मारिलें, ( सन १४६० ). शेवटीं त्याचा कोप इतका अनावर झाला, कीं कोणासही त्याच्या भेटीस जाणें झाल्यास, मरणाची तयारी करून बायकापोरांचा निरोप घेऊन जावें लागे. परंतु लवकरच सन १४६१त शहा मरण पावला.

नंतर हुमायूनशहाचा मुलगा निजामशहा तख्तावर बसला. तेव्हां तो आठ वर्षांचा होता. बापाच्या इच्छेनुरूप त्याची आई सर्व कारभार पाहत असे. खाजेखान महंमद गवान हाच मुख्य वजीर होता. त्याच्या सल्ल्यानें ती कारभार करी. आरंभीं ओढ्याप्रांतांच्या राजानें राजमहें-द्रीच्या रस्त्यानें शहाच्या मुलखावर स्वारी केली. परंतु तींत त्याचाच पराभव झाला. पुढें माळव्याच्या सुलतानानें दक्षिणदेशावर स्वारी केली, तींत शिकंदरखान तुर्क या सरदाराच्या भित्रेपणामुळें निजाम-शहास अपयश आलें, आणि तो राजधानी बेदर येथें पळून आला. पुढें माळव्याच्या सुलतानानें त्याचा पाठलाग करून बेदर राजधानी घेतली. परंतु इतक्यांत गुजराथच्या सुलतानानें निजामशहास मदत पाठविली, त्यामुळें माळव्याचा सुलतान परत गेला. वाटेंत त्यास महंमद गवानानें अत्यंत जेरीस आणिलें. बहामनी राजघराण्यांत मुलांमुलींचीं लग्नें फार लहानपणींच होत असत, त्याप्रमाणें निजामशहाच्या आईनेंही आपल्या मुलाचें लग्न लहानपणींच मोठ्या थाटानें केलें. ज्या दिवशीं लग्न झालें त्याच दिवशीं शहा मरण पावला, ( सन १४६३ ).

१०. **महंमदशहा दुसरा, (सन १४६३-१४८२).**—निजामशहाचा भाऊ महंमदशहा यास मुत्सद्दी मंडळीनें तख्तावर बसविलें. तोही नऊ वर्षांचाच होता. लहानपणापासून त्याच्या शिक्षणाची व्यवस्था चांगली ठेविल्यामुळें, पुढें तो फार विद्वान झाला. बहामनी शहांत फिरोज-शहाच्या खालोखाल हाच विद्वान होता. आरंभींच अधिकारासंबंधानें ख्वाजाजहान व महंमद गवान ह्या दोघां मुत्सद्यांत स्पर्धा उत्पन्न झाली. शहाची आई विचारी बायको होती. तिनें ख्वाजाजहान यास ठार मारून तंट्याचें मूळ मिटविलें; तेव्हां महंमद गवान हाच मुख्य कारभारी झाला. ह्या वेळेपासून दक्षणी तटाचें पारडें हलकें होऊन गवानाचा परदेशी पक्ष महत्त्वास चढला. सन १४६७मध्यें माळव्याच्या सुलतानानें दक्षिणदेशा-वर स्वारी केली. तेव्हां कित्येक दिवस युद्ध होऊन माळव्याच्या सुलता-नाचा पराभव झाला, आणि दोघांमध्यें अखेरीस सलोख्याचा तह ठरला.

कोंकणपैकीं दाभोळ, चौल, व त्याच्या वरचे जुन्नर चाकण कोल्हापूर, वाई वगैरे प्रांत बहामनी राज्याच्या अमलाखालीं आले होते. तथापि कोंकणांत कांहीं हिंदु राजांचा अंमल चालू होता. सन १४६९ त

खेळणा उर्फ विशाळगड येथील राजा शंकरराय यास व इतर शिरजोर राजांस जिंकण्याकरितां महंमद गवान मोठी फौज घेऊन निघाला. शंकररायाचा अंमल समुद्रापर्यंत असून त्याजजवळ तीनशें जहाजांचें आरमार नेहमीं लढाईस तयार असे, त्याच्या मदतीनें तो मुसलमान व्यापाऱ्यांस फार उपद्रव देई. महंमद गवान आपणांवर चालून येतो असें समजतांच, सर्व हिंदु राजे एकत्र होऊन लढाईस सिद्ध झाले. महंमद गवान पहाडी पायदळ घेऊन खेळण्यावर आला. त्यानें बरसातीच्या दिवसांत कोल्हापुरास मुक्काम करून दोन वर्षेंपर्यंत मोहीम चालविली, आणि शेवटीं खेळणा किल्ला हस्तगत केला. थोडे दिवसांनीं त्यानें विजयनगरच्या ताब्यांतील गोवें शहरही घेतलें, (सन १४७३). येणेंप्रमाणें आजपर्यंत अजिंक्य मानलेली कोंकणपट्टी बहामनी राज्याच्या ताब्यांत गेली.

ह्या विजयामुळें गवानचा लौकिक फार वाढला. त्याचा शहानें बहुमान केला. परंतु गवान हा विरक्त बुद्धीचा असल्यामुळें त्यानें आपली सर्व दौलत गरिबांस वाटून दिली. तो नेहमीं साधा व हलक्या किंमतीचा पोषाख घालून गरिबीनें वागत असे.

ओढ्याप्रांताचा राजा अंबरराय यास त्याचा भाऊ मंगलराय उपद्रव देत होता. सन १४७१ सालीं अंबररायास शहानें मदत करून कंडापिली व राजमहेंद्री हीं ठिकाणें मिळविलीं. ह्या मोहिमेंत पुष्कळ नवीन सरदार प्रसिद्धीस आले. आणि त्यांस ह्या कारकिर्दींत मोठमोठीं हुद्यांचीं कामें मिळालीं. तैलंगणच्या सुभेदारीवर मलीक हसन बहिरी ऊर्फ निजाम-उल्-मुल्क् हा सरदार कायम झाला. वऱ्हाडच्या सुभेदारीवर दर्याखान ऊर्फ इमाद-उल्-मुल्क् हा कायम झाला. यूसुफ आदिलखान नामक दुसरा एक शूर गृहस्थ गवानच्या मर्जींतला होता, त्यास दौलताबादची सुभेदारी मिळाली. या यूसुफनें खानदेशांतले वगैरे पुष्कळ मुलूख काबीज करून बहामनी राज्यास जोडिले. हे सर्व सरदार परदेशांतून आलेले होते. त्यांच्या उत्कर्षाविषयीं दक्षिणच्या मुसलमानांस फार वैषम्य वाटूं लागलें.

पुढील वर्षी (स. १४७२), बेळगांवचा वीरकर्णराय हा विजयनगरच्या राजाच्या वतीनें गोवें परत घेण्याचा प्रयत्न करूं लागला. त्याजवर

शहानें स्वारी करून बेळगांव घेतलें. या स्वारीहून परत येत असतां महंमदशहाची हुशार आई माईराणी मरण पावली. ही स्त्री त्या वेळच्या भरभराटीस पुष्कळ कारण झाली होती. पुढें दोन वर्षेंपर्यंत दक्षिणेंत भयंकर दुष्काळ पडला; पर्जन्य मुळींच नाहीं; असंख्य लोक प्राणांस मुकले. बेदर येथील यवन राजाच्या पदरीं असलेल्या दामाजीपंत कारकुनानें सरकारी धान्याचीं कोठारें लुटवून लोकांचे जीव वांचविले, त्या प्रसिद्ध दामाजीची गोष्ट ह्याच दुष्काळांतील असावी. सन १४७७त ओढ्या प्रांतावर पुनः स्वारी होऊन, तेथील राजा भीमराज याचा पुष्कळ मुलूख शहाच्या फौजेनें जिंकून घेतला. तसेंच शहानें कर्नाटक व तैलंगण येथील हिंदु राजा नरसिंहराय याजवर स्वारी करून त्याचा बराच मुलूख घेतला. ह्या स्वारींत एका किल्ल्याची डागडुगी करणें होती, ती महंमद गवाननें त्वरित करवून शहाची मर्जी इतकी संपादन केली, कीं महंमदशहा म्हणूं लागला, 'मोठें विस्तीर्ण राज्य व महंमद गवानासारखा नोकर, ह्या दोन अपूर्व देणग्या अल्लानें उदार होऊन मला दिल्या आहेत.' शहानें कांची येथील देवळांवर स्वारी करून अपार संपत्ति मिळविली. या सर्व स्वाऱ्यांत महंमद गवानच्या शहाणपणामुळें यश येत गेलें. त्यामुळें त्याचें वजन फार वाढलें. पण पुष्कळ सरदार त्याचा द्वेष करूं लागले. हा द्वेष वाढण्यास आणखीही कित्येक कारणें झालीं. अलीकडे महंमद गवान याजकडे कारभार आल्यापासून राज्याचा विस्तार अतोनात झाला होता. तेव्हां अलाउद्दीन हुसेन गंगूनें केलेल्या व्यवस्थेंत फेरफार करणें फार अवश्य झालें. राज्याचे चार सुभे होते ते महंमद गवानानें आतां आठ केले; लष्करच्या व्यवस्थेचे व त्यास वेळेवर पगार देण्याबद्दलचे नियम ठरविले, आणि त्यांची अंमलबजावणी सक्तीनें केली. परंतु अशीं बंधनें स्वतंत्रतेनें वागण्यास संवकलेल्या सरदारांस रुचलीं नाहींत.

महंमद गवान हा महंमदशहाचा मुख्य वजीर होता. तो बहामनी राज्याचा अत्यंत इमानी व हुशार नोकर असून, त्यानें राज्यकारभारांत फारच उत्तम सुधारणा केली. न्याय, लष्कर, शिक्षण वगैरे राज्यांतील सर्व खात्यांत त्यानें सुधारणा केल्या, इतकेंच नाहीं, तर जमिनीची नवीन मोजणी करून, त्यानें सरकारदेण्याचे दर कायमचे ठरवून दिले. ह्या पद्धतीचे अवशेष अद्यापि महाराष्ट्रांत दिसून येतात. सन १४७० त

बहामनी लष्करास मिळत असलेला पगार सन १८३० च्या इंग्रजी लष्करास मिळत असलेल्या पगारापेक्षां पुष्कळ ज्यास्त होता. शिवाय पैशाची किंमत त्या वेळीं हल्लींच्यापेक्षां फार ज्यास्त होती, तें वेगळेंच. ५०० घोडेस्वारांच्या पथकाचा स. १४७० तील वार्षिक खर्च ३,१५,००० रुपये होता. एवढ्याच इंग्रजी लष्कराचा १८३० सालचा खर्च २,१९००० रुपये होता. स्वतःचा घोडा व हत्यारें बाळगणाऱ्या शिलेदारास त्या वेळेस महिना ४० रुपये पगार मिळे. इंग्रजी राज्यांत अशा नोकरास २० रुपये पगार असे. एकंदरींत राज्यांतील सर्व खात्यांचें काम चांगल्या रीतीनें चाललें होतें असें दिसतें. राज्यव्यवस्थेच्या निरनिराळ्या शाखांचा एकमेकांवर दाब इतका व्यवस्थित होता, कीं अन्याय करण्यास जागा नव्हती.*

गवानची व्यवस्था महत्त्वाकांक्षी लोकांस आवडली नाहीं. लोकांत असंतोष आहे, हें गवानास कळे. पण आपण केलेले नियम सार्वजनिक कल्याणाचे आहेत, असें समजून तो स्वस्थ बसला. अशा स्थितींत गवानचा नाश करण्याकरितां दुष्ट लोकांनीं एक गुप्त बेत केला. गवानचा मदतगार यूसुफ आदिलखान हा नरसिंहरायावर तैलंगणांत गेला आहे, अशी संधि साधून ते आपली मसलत पार पाडण्याच्या कामास लागले. गवान हा परदेशी पक्षांतला होता; आणि निजाम्-उल्मुल्क्, इतर दक्षणी व हबशी मंडळी त्याजवर उठलेली होती. या मंडळीनें गवानच्या मोर्तबाचें असें एक बनावट पत्र ओढ्याच्या राजास महंमदशहाविरुद्ध लिहिलें, आणि तें आपण रस्त्यांत पकडलें असें सांगून, शहाच्या हातांत दिलें. शहा दारू पिऊन गुंग झाला असतां त्यानें एकदम गवान यास आपल्यासमोर आणवून अविचारानें त्यास ठार मारविलें, (स. १४८१). त्या वेळीं गवानचें वय ७८ वर्षांचें होतें.

महंमद गवानचें नांव केवळ बहामनी राज्यांतच नव्हे, तर जगांतील कोणत्याही देशाच्या उपलब्ध असलेल्या इतिहासांतील थोर पुरुषांच्या नांवांत साजण्यासारखें असल्यामुळें, त्याची विशेष हकीकत देणें अवश्य वाटतें.

---

* वरील मजकूर टेलरच्या इतिहासांतून घेतला आहे.

**११. वजीर महंमद गवान,** (स. १४०३-८१).—गवानचे पूर्वज इराणांत वजिरीच्या कामावर फार दिवस होते. पुढें त्याच्या घराण्यास राज्यप्राप्ति झाल्यावर महंमद गवान याचा जन्म झाला. सुलतान तह्मास्प आपणास कांहीं दगा करील, या भीतीनें तो स्वदेश सोडून व्यापाराच्या उद्देशानें बाहेर निघाला. फिरत असतां त्यानें प्रत्येक देशांतील प्रसिद्ध विद्वान लोकांचा परिचय करून घेतला. पुढें आपल्या वयाच्या ४३ व्या वर्षी दक्षिणेंतील विद्वान मंडळीच्या भेटी घेण्याकरितां तो जलमार्गानें दाभोळ बंदरीं आला, आणि तेथून बेदरास गेला. बेदराहून पुढें दिल्लीस जाण्याचा त्याचा विचार होता. दुसरा अलाउद्दीनशहा यानें त्याचे अलौकिक गुण पाहून त्यास आपले पदरीं सरदारी दिली. तेव्हांपासून शहाणपणानें हा हळूहळू वाढत गेला. तो सुनी पंथाचा होता. महंमदशहावर त्याची अकृत्रिम निष्ठा होती. गवानच्या औदार्याची कीर्ति दूरवर पसरली असून, विद्वानांस त्याचा लाभ मिळाला नाहीं असें एकही शहर नव्हतें. त्याचा स्वभाव मनमिळाऊ असून, त्याची न्याय करण्याची पद्धत निर्दोष होती. दक्षिणेंत त्याच्या औदार्याची साक्ष देणारीं कामें पुष्कळ आहेत. बेदर येथें त्यानें एक भव्य पाठशाळा स्थापिली. हा स्वतः कवि होता. गणितांत त्याचा हात धरणारा त्या-वेळेस कोणी नव्हता.

मरणसमयीं आपण निर्दोषी आहों अशी शहाची खात्री करण्याचा त्यानें पुष्कळ प्रयत्न केला. शेवटीं मरण सुटत नाहीं हें पाहून तो शहास बोलला, 'अशा कृत्यानें तुमच्या नांवास काळिमा लागून तुमचें राज्यही लयास जाईल.' शेवटीं तसें झालें. बादशहाचें बोलावणें आल्यावर त्याजकडे जाऊं नये असें त्यास पुष्कळ स्नेही सांगत असतां, आपल्या खरेपणावर भरंवसा ठेवून तो बादशहाकडे गेला. पण तेथें त्याचा विपरीत परिणाम झाला.

महंमद गवानची योग्यता त्या वेळीं सर्व लोकांत मोठी होती इतकेंच नाहीं, पण हिंदुस्थानांतील त्या वेळपर्यंतच्या सर्व मुसलमानांमध्यें इतका थोर व शहाणा मनुष्य निपजला नाहीं असें समजतात. स्वदेशाची नोकरी करितांना स्वार्थ साधण्याची किंवा स्वतः मोठेपणास चढण्याची त्यास यत्किंचित् इच्छा नव्हती. राजावर त्याची भक्ति अगदीं पूर्ण व

अकृत्रिम होती. दोन अल्पवयी व अप्रबुद्ध राजांचें त्यानें संगोपन केलें, पण त्यांस बाजूस सारून स्वतःचा तळीराम गार करण्याचा अधमपणा त्यानें केला नाहीं. त्यानेंच थोरपणास चढविलेले सरदार पुढें लवकरच अधिकार बळकावून स्वतंत्र होऊन बसले, तर तीच गोष्ट त्यास करण्यास फारशी दुर्घट नव्हती. औदार्य व निष्पक्षपात कायम ठेवून त्यानें केलेल्या सुधारणा, युद्धकलेंत दिसून आलेलें त्याचें चातुर्य व धीटपणा, त्याची अप्रतिम न्यायबुद्धि आणि खासगी व सरकारी संबंधांत परोपकार करण्याची इच्छा, इत्यादि अनेक गुणांनीं इतिहासांत त्याचें नांव अजरामर झालें आहे. बेदरच्या पाठशाळेंत तो दररोज जात असे. त्याच्या थोरपणाच्या अनेक गोष्टी बहामनी राज्याच्या इतिहासकारांनीं लिहून ठेविल्या आहेत. कोंकणच्या स्वारींतून परत आल्यावर राजा व राणी ह्यांनीं मुद्दाम जाऊन त्याची भेट घेतली. राजानें तर त्या वेळेस स्वतःच्या अंगावरचा झगा काढून त्याच्या अंगावर घातला. राजा निघून गेल्यावर गवान आपल्या खोलींत जाऊन जमिनीवर अंग टाकून रडूं लागला. कांहीं वेळानें त्यानें बेदरच्या लोकांस बोलावून आणिलें, आणि जवळ असलेली सर्व संपत्ति त्यांस वांटून दिली. पुढें लोकांनीं असें करण्याचें कारण त्यास विचारिलें, तेव्हां तो म्हणाला, 'जेव्हां राजा माझ्या भेटीस आला आणि प्रत्यक्ष राणीनें मला आपला भाऊ म्हणून हांक मारिली, तेव्हां माझ्या मनांत दुष्टवासना उत्पन्न होऊन माझी विवेकबुद्धि गुंग होऊन गेली. त्यामुळें अत्यंत दुःख होऊन त्या दुःखाचें कारण जी संपत्ति ती मी सर्व वांटून टाकीत आहें.' दरशुक्रवारीं तो वेष पालटून लोकांस दानधर्म करीत शहरांत फिरे; आणि 'हें तुम्हांस राजानें दिलें आहे,' असें सांगून तो धर्म करी. दूरदूरच्या मुसलमानी राज्यांतील विद्वानांस त्याच्या औदार्याचा प्रसाद मिळत असे.

राजानें अधमपणानें ज्याचा खून केला त्याची योग्यता इतकी मोठी होती. गवानचा खजीनदार त्याचें द्रव्य दाखवितांना राजास बोलला, 'गवानला मारण्यापेक्षां हजारों मनुष्य तुम्हीं स्वसंरक्षणार्थ मारिले असते तरी हरकत नव्हती; परंतु ओढ्याच्या राजाला पाठविलेलें पत्र खरोखर कोणीं लिहिलें ह्याचा तपास तुम्हीं कां बरें केला नाहीं?'

गवानपाशीं अगणित संपत्ति आहे अशी शहाची समजूत होती. गवानास ठार मारिल्यानंतर त्याच्या खजानजीस त्यानें त्याची संपत्ति दाखविण्यास सांगितलें. त्यानें जीवदान मिळण्याचें वचन घेऊन शहास संपत्ति दाखविली. गवानजवळ दोन खजिने होते. एक शहाचा खजिना, त्यांत फौजेच्या वगैरे खर्चाकरितां सुमारें १५००० रुपये शिल्लक होते. दुसरा गरिबांचा खजिना, त्यांत तीनशें रुपये होते. बंगल्यांत सामान कायतें निजण्याच्या चटया व स्वयंपाक करण्याचीं मातीचीं भांडीं इतकेंच सांपडलें. पुस्तकालयांत तीन हजार पुस्तकें होतीं, पण तीं सर्व पाठशाळेस दिलेलीं होतीं. त्यानें इराणांतून ४० हजारांची रक्कम आपणाबरोबर आणिली होती, तिचा तो व्यापार करी व मुद्दल कायम राखून जो फायदा होई, त्यांतून तो दररोज दोन रुपये स्वत:च्या खाण्याकडे व दोन रुपये पोषाख वगैरेकडे खर्च करी. याप्रमाणें त्याचा खासगी वर्तनक्रम पाहून शहास व गवानच्या शत्रूंस फार आश्चर्य वाटलें. शहास तर कृतकर्माचा इतका पश्चात्ताप झाला, कीं त्यामुळें तो झुरणीस लागून पुढें लवकरच मरण पावला. गवान मेल्यावर त्याचे साथीदार होते ते शहास सोडून दूर राहूं लागले. त्यांस संतोषविण्यास शहानें पुष्कळ उपाय केले, पण ते सफल झाले नाहींत. आपल्यामागून मुलगा महंमूद यानें तख्तावर बसावें असा ठराव करून, सन १४८१ त महंमद-शहा मरण पावला.

१२. महंमूदशहा, (सन १४८२–१५१८)—गादीवर बसला तेव्हां महंमूदशहाचें वय बारा वर्षांचें होतें. त्यानें पुष्कळ वर्षें राज्य केलें. त्याच्या कार्किर्दींत दक्षणी व परदेशी या दोन पक्षांचे तंटे विकोपास जाऊन एकसारखे दंगेधोपे चालू राहिले, आणि त्यांतच राज्याचा अंत झाला. ह्या वेळीं निजामुल्मुल्क बहिरी हा दक्षणी तटाचा पुढारी असून वजीर होता, आणि यूसुफ आदिलखान हा गवानच्या मागून परदेशी तटाचा पुढारी झाला होता. बहिरी हा मूळचा बाटलेला हिंदु होता, आणि यूसुफ हा तुर्क गुलाम होता. यूसुफ हा विजापूरचा सुभेदार होता. तिकडे त्यानें आपला अधिकार पुष्कळ वाढविला. त्यास त्या कामा-वरून दूर करण्याकरितां शहानें पुष्कळ प्रयत्न केले. निजामाच्या हातांत शहा हा केवळ बाहुल्याप्रमाणें होता. त्याच्यानें दोन

पक्षांतील तंट्यांचा बंदोबस्त झाला नाहीं. हे तंटे विकोपास जाऊन राजधानींत वीस दिवस सारखा रक्तपात चालला होता. उभय पक्षांचे पुष्कळ लोक मेले. शहाच्या मनांत त्या दक्षणी वजिराविषयीं वांकडें येऊन त्यास ठार मारण्याचा त्यानें प्रयत्न केला, तो सफळ झाला नाहीं. पुढें परदेशी लोकांचा कट जास्त बळकट होऊन त्यांनीं वजीर निजाम्-उल्मुल्क यास ठार मारिलें. तेव्हां शहा निर्धास्त होऊन चैनबाजींत निमग्न झाला. तख्त-इ-फिरोज फोडून त्याचे त्यानें चहा पिण्याचे पेले केले. नंतर दक्षिणी व हबशी लोकांनीं शहास ठार मारण्याचा घाट केला. वाड्यांत मोठा दंगा उसळला. पण शेवटीं परदेशी लोकांच्या मदतीनें शहा वांचला. ह्यानंतर शहाच्या दुर्व्यसनाचा कळस झाला. सर्व रयतेनेंही तोच कित्ता उचलिला. पाठशाळेंतील शिक्षकही हातांत पेले घेऊन झिंगूं लागले. तेव्हां शहाचा अधिकार कोणी जुमानीनासें झालें. निरनिराळे सुभेदार स्वतंत्र झाले. मयत निजाम्-उल्मुल्क ह्याचा मुलगा मलीक अहंमद बहिरी यानें अहंमदनगर नांवाचें शहर वसविलें. विजापूरचा सुभेदार यूसुफ आदिलखान व वऱ्हाडचा सुभेदार फत्तेउल्ला इमाद्-उल्मुल्क यांस त्यानें आपआपल्या जागीं स्वतंत्र होण्यास भर दिली; तेव्हां तेही लवकरच स्वतंत्र झाले, ( सन १४९३ ). त्याचप्रमाणें तैलंगणचा सुलतान कुली ऊर्फ कुत्ब्-उल्मुल्क हाही स्वतंत्र झाला. बेदरचा सुभेदार कासीम बेरीद हा शहास नामशेष करून स्वतंत्रतेनें सर्व कारभार करूं लागला. ह्या वेळेपासून म्हणजे सन १४९३ च्या सुमारास बहामनी राज्य समाप्त झालें, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

बहादूरखान नामक एक सरदार मिरज, पन्हाळा, कोल्हापूर, दाभोळ, चौल व इतर कोंकणांतील मुलूख बळकावून बसला होता. त्याजवर शहानें स्वारी करून त्यास ठार मारिलें, आणि त्या प्रांतीं दुसरा एक सरदार कायम केला. वरच्या स्वतंत्र सरदारांपैकीं कित्येक सरदार मरण पावले, आणि त्यांचे अधिकार त्यांच्या मुलांस प्राप्त झाले. पुढें इ.स. १५१८ त दुर्दैवी महंमूदशहा बहामनी मरण पावला. त्याचें सर्व आयुष्य हाल अपेष्टेंत गेलें. त्यानें सदतीस वर्षें राज्य केलें.

**अहंमदशहा, (सन१५१८–१५२०).**—मयत शहाचा मुलगा अहंमद यास राजधानीच्या प्रांताचा सुभेदार अमीर बेरीद, कासीम बेरीदचा मुलगा, ह्यानें तख्तावर बसवून राज्यकारभार चालविला, आणि शहाच्या निर्वाहास त्यानें थोडीशी नेमणूक करून दिली. अशा दैन्यावस्थेंत दोन वर्षें घालवून स. १५२० त शहा मरण पावला.

**अला-उद्दीनशहा, (सन १५२०–२१).**—पुढें अहंमद शहाचा भाऊ अला-उद्दीन गादीवर बसला, पण वजीर अहंमद बेरीद ह्यानें त्यास पदच्युत करून वल्ली-उल्ला यास तख्तावर बसविलें, ( स. १५२१–२४ ). शहाच्या राणीवर फिदा होऊन अमीर बेरीदनें त्यास ठार मारिलें. यानंतरचा शहा कलीम-उल्ला ( स. १५२४–१५२६ ) हा आमरण अहंमदनगरच्या बुऱ्हाण निजामशहाकडे राहत होता.

**१३. बहामनी राज्याचें समालोचन.**—प्रसिद्ध वजीर महंमद गवान मरण पावल्यावर बहामनी राज्य लवकरच मोडून त्याचीं पांच राज्यें झालीं तीं येणेंप्रमाणें:—१ विजापूरचें आदिलशाही; २ गोवळकोंड्याचें कुत्बशाही; ३ वऱ्हाडचें इमादशाही; ४ अहंमदनगरचें निजामशाही; आणि ५ अहंमदाबाद बेदरचें बेरीदशाही. बहामनी राज्य सन १३४७ पासून सन १५२६ पर्यंत सरासरी १७९ वर्षें चाललें. त्याच्या अंतः-स्थितीचें थोडेंसें वर्णन देणें अवश्य आहे.

यादवांच्या* मागून महाराष्ट्रांत प्रबळ राज्य असें हेंच झालें. विजय-नगरचें हिंदु राज्य मात्र ह्याच्या तोडीचें होतें. शिवाय वरगूळ, ओढ्या, कोंकणपट्टी, येथें लहान लहान हिंदु राज्यें होतीं त्या सर्वांस जिंकून, बहामनी शहांनीं नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यंत आपला अंमल बसविला होता. गुजराथ व माळवा ह्या देशांवर स्वतंत्र मुसलमान राजे राज्य करीत होते. त्या काळच्या हिंदुस्थानांतील सर्व राज्यांत बहामनी राज्य बळकट असून, संपत्तीनें व ऐश्वर्यानें दिल्लीच्या तत्कालीन मुसलमानी बादशाहीच्या बरोबरीचें होतें. दिल्लीच्या बादशहास बहामनी राजांकडे वांकड्या नजरेनें पाहण्याची छाती नव्हती. ह्या राज्याची व्यवस्था आरंभीं

---

* यादव व इतर प्राचीन मराठी राजे यांचा इतिहास दुसऱ्या भागाच्या आरंभीं दिला आहे.

चांगली होती. पण कालांतरानें क्षुल्लक कारणांवरून परमुलखांवर स्वाऱ्या करून बहामनी राजे राज्यविस्तार करूं लागले; आणि जिंकिलेल्या प्रांतांची नीट व्यवस्था करण्याकडे कोणीं फारसें लक्ष दिलें नाहीं. महंमद गवानच्या वेळेपर्यंत ह्या राज्याच्या चार तर्फा किंवा चार सुभे होते. गवाननें एकंदर राज्याच्या आठ तर्फा केल्या. तर्फांवर नेमिलेले अधिकारी एक प्रकारचे स्वतंत्र राजेच असतात. दिवाणी, मुलकी, फौजदारी व लष्करी वगैरे सर्व अनियंत्रित अधिकार त्यांजकडे असतात. तर्फदारांस जहागिरी नेमून दिलेल्या असत; रोकड वेतनें नसत. प्रत्येक तर्फदार आपापल्या शक्तीप्रमाणें हुजूरच्या हुकुमाची अवज्ञा करूं लागला. असें करितां करितां त्याचे अधिकार हळू हळू वाढत गेले. जोंपर्यंत शहाचें दरबार जोरांत होतें, तोंपर्यंत तर्फदारांचें कांहीं चाललें नाहीं. पण शहाचें वजन कमी पडतांच तर्फदारांस जोर आला. निजामशहा व महंमदशहा अल्पवयी असल्यामुळें, त्यांच्याच वेळेस हें राज्य मोडावयाचें, पण महंमद गवानच्या शहाणपणानें तें कांहीं दिवस टिकलें. गवाननें जी व्यवस्था केली तीमुळें तर्फदारांस स्वतंत्र अधिकार वापरितां येईनात; म्हणून ते सर्व या व्यवस्थेच्याविरुद्ध होते. ज्या सालीं बहामनी राज्याची समाप्ति झाली, त्याच सालीं बाबरनें मोगल राज्य हिंदुस्थानांत स्थापिलें. बाबरच्या वंशजांनीं ह्या बहामनी राज्याच्या शाखांचा शेवटीं अंत केला. बुडत चाललेल्या पेशवाईस तारणारा नाना फडनवीस, आणि हीन दशेस पावलेल्या बहामनी राज्याला पुनः ऊर्जित दशेस आणणारा महंमद गवान, ह्या उभयतांच्या कर्तबगारींत पुष्कळ साम्य आहे. राष्य स्थापन झाल्यापासून कांहीं दिवस तें सुरळीत चालून वृद्धिंगत व्हावयाचें, आणि वाढतां वाढतां शेवटीं त्याच्या स्वतंत्र शाखा बनून त्यांचाही पुढें लय व्हावयाचा, हा राज्यनियम मोगल बादशाही, मराठेशाही व जुनें चालुक्याचें राज्य ह्या सर्वांस सारखाच लागू पडतो. बहामनी राज्याच्या नाशाचीं कारणें येणेंप्रमाणें.

( १ ) सरदारांस मोठमोठ्या जहागिरी वंशपरंपरा नेमून देणें; ( २ ) मोठमोठ्या सुभ्यांवर स्वतंत्र अधिकार देऊन कायमचे कामगार नेमणें; ( ३ ) सर्व नोकरांस व रयतेस सारखे लागू पडणारे कायदे व नियम यांचा अभाव असणें; ( ४ ) कामदारांच्या नियमित पायऱ्या बांधून

१६-७६१-२०००

नियमानुसार सर्वांस वर चढण्यास सारखी सवड ठेविल्यानें दरबार ही मुत्सद्दी बनविण्याची एक शाळाच होते, अशी व्यवस्था केलेली नसणें.

बहामनी राजे प्रजेस सुख देत, आणि जरी हिंदूंस विनाकारण त्रास देत नसत, तरी हिंदूंस दरबारांत मोठेमोठे अधिकार मिळत नसत. एवढ्या इतिहासांत वर लिहिलेल्या हकीकतींत हिंदु अंमलदारांचीं नांवें फार थोडीं आहेत. फौजेंत हिंदूंस जागा थोड्याच मिळत, आणि मुसलमानांचें वर्चस्व हिंदूंवर असे. हिंदु लोक हलक्या नोकऱ्या व शेतीभाती करून स्वस्थ असत. त्यांस आपल्या धर्माप्रमाणें आचरण करण्यास प्रतिबंध नसे. बहामनी राज्यांत इतकीं बंडें झालीं, इतक्या लढाया झाल्या, व इतक्या राज्यक्रांती झाल्या, पण कोणत्याही खटपटींत हिंदु लोक अग्रेसर असल्याचें आढळत नाहीं. त्यांनीं बंडें केलीं नाहींत; आणि सामान्यतः दुष्ट कृत्यास साह्य केलें नाहीं. जरी बहामनी राज्यांत हिंदूंचीच मुख्यतः वस्ती होती, तरी हबशी, तुर्की, इराणी, मोगल वगैरे असंख्य परदेशी लोक इकडे येत, आणि त्यांसच राजाश्रय व इनामें मिळत. हल्लींच्या दक्षिणेंतील मोठमोठ्या मुसलमान घराण्यांची उत्पत्ति बहामनी राजांच्या वेळची आहे. अशीं घराणीं वाढत गेल्यानें व त्यांस राजाश्रय असल्यानें हिंदूंचें महत्त्व कमी कमी होत गेलें. विजयनगरचें राज्य शेजारीं नसतें तर हिंदूंचा निःपात ह्याहूनही जबरदस्त झाला असता.

बहामनी राज्याच्या वेळेस परदेशाशीं हिंदुस्थानचा व्यापार व दळणवळण वाढत गेलें. व्यापार बहुतेक कारवानांच्या हातीं होता. व्यापारी लोक युरोपांतील आणि उत्तर व पश्चिमआशियांतील हरएक माल दक्षिणेंत आणीत. नृत्यगायनादि राजाश्रयानें वाढणाऱ्या कला भरभराटींत होत्या. त्या वेळच्या हकीकतींवरून असें कळतें, कीं रस्त्यांवर चोरांचें भय नसून प्रवास करणारांस उपद्रव होत नसे. बहामनी राजे तोफांचा उपयोग करीत असत. त्या राजांनीं बांधिलेल्या कित्येक इमारती पाहण्यालायक आहेत. कलबुर्गा व बेदर हीं त्यांचीं राजधानीचीं शहरें होतीं. बेदरची पाठशाळा वर्णनीय होती. ह्या राज्यांत सर्व जातींच्या लोकांस शिक्षण मिळण्याच्या जरी सोयी नव्हत्या, तरी मुसलमान लोकांस शिक्षण देण्याची व्यवस्था प्रत्येक खेड्यांत केलेली होती. फारशी व आरबी या

भाषा बिनखर्चानें शिकतां येत असत. ह्या राज्यांत मुसलमान जातीच्या विद्वान्, कवि व पंडित लोकांस राजाश्रय चांगला मिळे.

हिंदु लोकांची ग्रामसंस्था ह्या राज्यांत दिवसेंदिवस दृढ होत चालली होती. अथेनेसियस नितिकिन ह्या नांवाचा रशियांतील आर्मिनिया प्रांतांतला एक व्यापारी सन १४७०त बेदर शहरास आला होता. त्यानें तेथली कांहीं हकीकत लिहून ठेविली आहे. दरदोन मैलांच्या अंतरानें हल्लींच्या प्रमाणेंच त्या वेळेस गांवें वसलेलीं असत. रस्त्यांवर चांगला बंदोबस्त असून प्रवास करणारांस भीति नसे. बेदरची हवा फार चांगली असून तें शहर सुरेख होतें. बहामनी राजांनीं बांधिलेले किल्ले हेच त्यांचें चिरकाल राहणारें स्मारक आहे. त्यांनीं सपाटीवरचे, व डोंगरी वगैरे सर्व प्रकारचे मजबूत किल्ले बांधिले. गाविलगड, व नरनाळा, हे मजबुदीची साक्ष आजमितीस देत आहेत. मोठमोठ्या गांवांतून मशिदी असून त्यांस सरकारांतून नेमणुका करून दिलेल्या असत. प्रत्येक मशिदींत एक मुल्ला नेमिलेला असे. तोच शालाशिक्षकाचेंही काम पाही. मोठमोठया शहरांतून पाठशाला असून त्यांस मोठाल्या नेमणुका करून दिलेल्या असत. तैलंगणप्रांतांत बहामनी राजांनीं बांधिलेले पुष्कळ तलाव हल्लीं शाबूद आहेत.

---

## प्रकरण तेरावें.

## बेरीदशाही, इमादशाही व निजामशाही.

### सन १४८९–१६३७.

१. बेरीदशाही, (स.१४९२–१६५६). २. इमादशाही, (स. १४८४–१५७२). ३ निजामशाही, (स.१४८९–१६३७). ४. चांदबिबी व मोगलांशीं युद्ध, (१५९४). ५. मलिकंवरचा कारभार, (१५४६). ६. निजामशाहीची अखेर, (स.१६३३). ७. शहाजी भोसले याची अखेरची धडपड.

**१. बेदरची बेरीदशाही, ( सन १४९२–१६५६ ).—कासीम बेरीद, ( सन १४९२–१५०४ ).**—बहामनी राज्याची राजधानी

बेदर येथें कासीम बेरीद नांवाचा पुरुष स्वतंत्र राज्यकारभार करूं लागला, हें मागें सांगितलेंच आहे. कासीम हा प्रथम महंमदशहापाशीं गुलाम होता. त्या सुलतानाच्या कारकिर्दीत मराठ्यांनीं बंड केलें तें कासीम यानें मोडिलें, तेव्हां शहानें त्यास योग्यतेस चढविलें. तो स. १४९२त बेदर येथें स्वतंत्र झाला, आणि बारा वर्षें कारभार करून सन १५०४त मरण पावला.

**अमीर बेरीद, ( सन १५०४–१५४९ ).**—आसपासच्या राजांशीं लढून स्वतःचें संरक्षण करण्यांत ह्याचे दिवस गेले. सन १५२९त विजापूरच्या राजानें बेदरवर हल्ला करून, अमीर बेरीद याचें बहुतेक राज्य हिरावून घेतलें. बेदर व त्याच्या सभोंवारचा चार पांच लाखांचा मुलूख मात्र त्याजकडे राहिला. अमीर बेरीद सन १५४९ त मरण पावला.

**अली बेरीदशहा, ( सन १५४९–१५९२ ).**—अलीनेंच प्रथमतः शहा हा किताब धारण केला. पण अहंमदनगरच्या निजामशहानें त्याच्या राज्याचा बराच भाग हल्ला करून घेतला. हा सन १५६२ त मरण पावला. नंतर त्याचा पुत्र इब्राहीम बेरीदशहा यानें सन १५६९पर्यंत, इब्राहीमचा धाकटा भाऊ दुसरा कासीम बेरीद ह्यानें सन १५७२पर्यंत, आणि नंतर कासीमचा पुत्र मीर्झा अली बेरीद, ह्यांनीं बेदरास राज्य केलें. हळूहळू बेदरचें राज्य कमी होत चाललें होतें. असें होतां होतां पुढें स. १६५६ सालीं दाक्षिणदेशचा मोगल सुभेदार औरंगजेब व त्याचा सरदार मीर जुम्ला ह्यांनीं विजापुरावर स्वारी केली. त्या वेळेस त्यांनीं बेरीदशाहीच्या तख्तावर असलेल्या पुरुषापासून बेदरशहर व किल्ला घेतला, आणि त्याच वेळीं, सन १४७८ त, महंमद गवाननें स्थापिलेली बेदरची पाठशाला दारू भरून उडवून दिली. येणेंप्रमाणें बेरीदशाहीचा अंत झाला.

**२. वऱ्हाडची इमादशाही, ( सन १४८४–१५७२ ). फत्तेउल्ला इमादशहा, ( सन १४८४ ).**—हा मूळचा तैलंगी ब्राह्मण. ह्याचा बाप विजयनगरांत राहत असे. विजयनगरच्या राजाबरोबर चाललेल्या लढाईंत कैद होऊन तो मुसलमानांच्या हातीं लागला, आणि त्यास मुसलमानी धर्माची दीक्षा मिळाली. तेव्हांपासून तो महंमद गवानच्या

मेहेरबानीनें हळूहळू योग्यतेस चढला. पुढें त्यास इमाद-उल्मुल्क हा किताब, व वऱ्हाडची सुभेदारी मिळाली. सन १४८४ त इमादशहा असें नांव धारण करून तो आपल्या सुभ्याचा कारभार स्वतंत्रपणें करूं लागला. पुढें तो त्याच वर्षी मरण पावला.

अलाउद्दीन इमादशहा, (सन १४८४–१५२७) —ह्यानें गाविलगड ही आपली राजधानी केली. हा किल्ला बिकट ठिकाणीं बांधिलेला असून मजबूद आहे. तेथें त्या वेळची एक मशीद अद्यापि हयात आहे. महंमदशहा बहामनी बेदरहून पळाला, तो कांहीं दिवस अला-उद्दीनकडे येऊन राहिला होता. पण कांहीं दिवसांनीं तो पुनः वजीर अमीर बेरीद याजकडे गेला. कित्येक कारणांवरून अहंमदनगरच्या निजामशहाशीं अला-उद्दीनचें वैर जडलें, आणि त्याशीं युद्ध करण्याकरितां खानदेश, व गुजराथ येथील राजांची त्यास मदत घ्यावी लागली. त्यासाठीं गुजराथच्या राजास त्यानें आपला बराच मुलूख दिला. सन १५२७त अला-उद्दीन मरण पावला, आणि त्याचा ज्येष्ठ पुत्र दर्या इमादशहा तख्तावर बसला.

दर्या इमादशहानें निजामशहाच्या घराण्याशीं सोयरीक केली. त्याच्या अंमलांत दंगेधोपे न होतां राज्यांत शांतता होती. त्याचा मुलगा बुऱ्हाण इमादशहा लहान असतांच गादीवर आला. त्याच्या अल्पवयांत तोफलखान नामक एका धाडशी व धूर्त सरदारानें सर्व अधिकार बळकाविला. सन १५७२ ह्या वर्षी तोफलखानावर मूर्तुझा निजामशहानें स्वारी केली. तोफलखान नरनाळा किल्ल्यांत जाऊन राहिला. मूर्तुझा निजामशहा व त्याचा दिवाण जंगीझखान यांनीं तोफलखान व इमादशहाचा वंशज ह्यांस जिंकून ठार मारिलें, आणि वऱ्हाडचें राज्य अहंमदनगरच्या निजामशाहीस जोडिलें. मोगल बादशहा अकबर ह्यास ही गोष्ट न आवडून, त्याच्या मनांत निजामशहाविषयीं द्वेषभाव उत्पन्न झाला, ती गोष्ट अकबराच्या कार्किर्दींत येईल. इमादशाहीचा शेवट वर लिहिल्याप्रमाणें झाला.

**३. अहंमदनगरची निजामशाही, (स.१४८९–१६३७).—अहंमद निजामशहा, (स. १४८९–१५०८ ).**—विजयनगरास तिमाप्पा बहिरू ( बहिरव ? ) नामक एक ब्राह्मण होता. मलीक नाईब निजामुल्मुल्क् बहिरी हा त्या तिमाप्पाचा मुलगा होय. अहंमदशहाच्या फौजेनें विजय-

नगरच्या राजाबरोबर लढाई करून त्या मुलास कैद करून आणिलें. पुढें तो मुसलमान झाला. महंमदशहाच्या पदरीं महंमद गवानच्या वेळेस हा उदयास आला. त्याचा मुलगा अहंमद यानें अहंमदनगरच्या निजामशाहीची स्थापना केली. स्वतंत्र होण्यापूर्वी त्यानें कित्येक किल्ले घेतले. त्यांतच शिवनेरी किल्ला होता; त्यांत त्यास पुष्कळ धन सांपडलें. नंतर त्यानें चंदनवंदन, लोहगड, तोरणा वगैरे दक्षिणचे बहुतेक किल्ले काबीज केले; आणि राजापुरापर्यंत कोकणप्रांत जिंकिला. तो जुन्नरास राहत असे. त्यानें आपल्या मुलखाची व्यवस्था इतकी उत्तम ठेविली होती, कीं त्याच्या राज्यांत एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत काठीला सोनें बांधून लोकांनीं खुशाल फिरावें. त्याच्या हुकमाशिवाय राज्यांत पान देखील हालत नसे. बहामनी शहानें त्याजवर स्वारी केली, तींत त्या शहाचाच पराभव झाला. त्याचा शिरजोरपणा कमी करण्यासाटीं शहानें पुष्कळ उपाय केले, पण त्यास यश आलें नाहीं. अखेरीस अहंमद हा निजामशहा या नांवानें स्वतंत्रतेनें राज्य करूं लागला. दौलताबाद व जुन्नर ह्यांचे दरम्यान बिंकर म्हणून खेडें होतें, तें त्यास सोयीचें वाटल्यावरून तेथें अहंमदनगर नांवाचें शहर त्यानें बसविलें, ( सन १४९४ ). ह्या वेळेस मराठे लोक दक्षिणेंत पुंडाई करूं लागले होते. अहंमद निजाशहानें दौलताबादचा किल्ला वेढा घालून घेतला. पुढें अनेक पराक्रम करून हा सुलतान सन १५०८ सालीं निवर्तला. अहंमदशहाच्या अंगचे सद्गुण वर्णन करण्यास आपण असमर्थ आहों, असें फेरिस्ता म्हणतो. त्यानें एकपत्नीव्रत पाळिलें. द्वंद्वयुद्ध करून तंट्याचा निकाल करण्याची चाल ह्यानेंच दक्षिणेंत पाडिली. राजाचें अनुकरण करून सर्व लहान थोर लोकांत खेड्यापाड्यांतून सुद्धां ह्या खेळाची अभिरुची वाढून, जिकडे तिकडे तलवारीचा पट्टा व बोथाटी खेळण्याचे आखाडे स्थापन झाले.

**बुऱ्हाण निजामशहा, ( स. १५०८–१५५३ ).**—अहंमदशहाचा मुलगा बुऱ्हाण हा सात वर्षांचा असतांना गादीवर बसला. मखमलखान नामक हुशार व राज्यकार्यधुरंधर प्रधानाच्या देखरेखीखालीं बुऱ्हाणशहाचा अभ्यास फार चांगला झाला. दहा वर्षांचा असतांच तो फारशी भाषेमध्यें सुरेख निबंध लिहीत असे. विजापूरचा राजा ईस्मईल आदि-

लशहाच्या मुलीशीं ह्याचें लग्न झालें. पुढें इस्मईलशीं बुऱ्हाणशहाचें युद्ध होऊन, बुऱ्हाणचा पराभव झाला. इमादशहाशीं युद्ध करूनही बुऱ्हाणचाच पराभव झाला. शेवटीं सर्व राजांमध्यें तह ठरला. कंवरसेन नांवाचा ब्राह्मण बुऱ्हाणशहाच्या दरबारीं फार दिवस मुख्य प्रधानाचें काम पाहत होता. त्यानें फार हुशारीनें कारभार केला. एकदां गुजराथचा बहादूरशहा व बुऱ्हाण निजामशहा ह्यांच्या भेटी मोठ्या समारंभानें गुजराथेंत होऊन दोघांचा स्नेह दृढ झाला. ह्या कार्किर्दींत मराठे लोक प्रसिद्धीस येऊं लागले. संभाजी चिटणीस यास प्रतापराव असा किताब मिळून त्याची परराज्यांतील वकिलातीच्या कामावर नेमणूक झाली. शहा ताहीर नांवाचा एक विद्वान् मुत्सद्दी बुऱ्हाणशहाच्या पदरीं होता. त्याच्या सल्ल्यानें शहानें आपल्या मुलखांत जबरदस्तीनें शिया धर्माची स्थापना केली, त्यामुळें सुनी लोकांनी दंगा चालविला, आणि गुजराथ, खानदेश, व विजापूर येथील राजे सुनी धर्माचा प्रसार करण्याच्या हेतूनें एकत्र झाले. त्या वेळीं बुऱ्हाणशहानें दिल्लीच्या हुमायून बादशहाकडे मदत मागितली. पण हुमायून धांदलींत असल्यामुळें त्यानें मदत दिली नाहीं. हे धर्मसंबंधीं तंटे फार वाढले. विजापूरच्या आदिलशहाशीं दोन वेळ युद्ध होऊन त्यांत बुऱ्हाणशहाचा पराजय झाला. विजयनगरच्या रामराजाची मदत घेऊन त्यानें विजापूरच्या राज्यावर अनेक स्वाऱ्या केल्या. येणेंप्रमाणें बुऱ्हाणशहाची बहुतेक कार्कीर्द लढण्यांत गेली. ४७ वर्षें राज्य करून बुऱ्हाणशहा सन १५५३त मरण पावला. त्यास पांच पुत्र होते. डोंगरी मुलखांतून राहणारे मराठे लोक प्रजेस त्रास देत, त्यांचा ह्या कार्किर्दींत बंदोबस्त होऊन त्यांस मोठमोठ्या हुद्यांच्या जागा मिळाल्या. ह्या कामीं त्याच्या ब्राह्मण दिवाणाची त्यास फार चांगली मदत झाली.

**हुसेन निजामशहा, (स. १५५३–१५६५).**—हा सुलतान गादीवर बसल्याबरोबर भावाभावांत तंटे उपस्थित झाले. विजापूर, गोवळकोंडें, व विजयनगर येथील राजे एकत्र होऊन अहंमदनगरावर चालून आले, आणि त्यांनीं त्या राजधानीस वेढा घातला. तेव्हां हुसेनशहानें सर्वांशीं तह केला. तरी हे तंटे पुष्कळ दिवस मिटले नाहींत. विजयनगरचा राजा ह्या वेळेस फार प्रबळ झाला होता. सर्व मुसलमान राजांस तो त्रास देऊं

लागला. त्याचा समूळ उच्छेद करावा, ह्या हेतूनें सर्व मुसलमान राजे एकत्र झाले. सन १५६४ सालीं तालिकोट येथें हिंदु व मुसलमानांची जंगी लढाई झाली, तिचें वर्णन विजयनगरच्या इतिहासांत यावयाचें आहे. वस्तुतः ह्या वेळेपासूनच मुसलमानांचा अंमल थेट दक्षिणेपर्यंत सुरू झाला. ह्या वेळेसच पराक्रमी बादशहा अकबर दिल्लीहून सर्व हिंदुस्थान आक्रमीत चालला होता. तालिकोटच्या लढाईंत हुसेन निजामशहाच्या तोफखान्यानें उत्तम कामगिरी बजाविली. त्याजवळ ६०० तोफा असून, त्यांजवर चलीबी रूमीखान नामक एक मुसलमान सरदार मुख्य होता. हा आशियामायनरांतील राहणारा असून, युरोपांतील लष्करी खात्यांत तोफखान्याचें काम शिकून निपुण झाला होता. तालिकोटच्या लढाईंत रामराय मारला गेला, आणि हिंदूंचें सैन्य पळून गेलें. लढाईहून परत आल्यावर हुसेन निजामशहा आपल्या वयाच्या २४ वे वर्षी मरण पावला. त्यास पुष्कळ मुलें होतीं.

**मूर्तुजा निजामशहा,** (सन १५६५–१५८६ ).—हा गादीवर बसला, तेव्हां लहान असल्यामुळें त्याची आई खुजा सुलताना राज्यकारभार पाहत असे. हिनें मोठमोठे सरदार दूर करून त्यांच्या जागीं स्वतःच्या आप्तांस मोठीं कामें दिलीं. विजयनगरचें जिंकिलेलें राज्य कसें वांटून घ्यावें, ह्याविषयीं वाद चालून शेवटीं मुसलमानी राजांच्या आपसांत लढाया सुरू झाल्या. त्याच संधीस राणीस कारभारांतून काढण्याचा गुप्त बेत झाला. तो राणीस कळून, तिनें त्यांत सामील असलेल्या मंडळीस पकडून कैदेंत टाकिलें. सन १५६९ त मूर्तुजानें राज्यकारभार आपल्या हातीं घेतला. त्यानें विजापूरच्या कीश्वरखान नामक सरदारावर स्वारी करून त्यास ठार मारिलें; आणि विजापूरचा धारूर नामक किल्ला हस्तगत केला. नंतर त्याचा विजापूर दरबाराशीं तह झाला. ह्या समयास पोर्तुगीज लोक हिंदुस्थानांत येऊन ते पश्चिमकिनारा बळकावीत चालले होते. रेवदंड्यास त्यांनीं वेढा घातला, आणि निजामशहाच्या सरदारांस दारूच्या बाटल्या नजर करून त्यांनीं तेथें प्रवेश केला. ह्याच सुमारास वऱ्हाडच्या इमादशहास दूर करून, तें राज्य तोफलखान नामक सरदार बळकावून बसला होता, सबब तें व बेदरचें राज्य अशीं दोनही जिंकावीं, असा निजामशहा व विजापूरचा आदिलशहा

ह्यांनीं गुप्त बेत करून, ते त्या उद्योगास लागले. मूर्तुजाचा जंगीझखान नामक हुशार दिवाण होता, त्याची ही सर्व खटपट होती. वऱ्हाडप्रांतावर स्वारी करून मूर्तुजानें तोफलखान व इमादशाही घराण्याचा वंशज ह्यांस ठार मारून वऱ्हाडचें राज्य आपल्या राज्यास जोडिलें. खानदेशचा सुलतान मिरन महंमदखान फरूकी ह्यानें ह्या कृत्यास प्रतिबंध केल्यामुळें, त्याचाही मूर्तुजानें पराजय करून त्याजकडून खंडणी घेण्याचें ठरविलें. बेदरचें राज्य जिंकण्याचें जंगीझखान याच्या मनांत फार होतें. तेव्हां बेदरच्या शहानें आपला वकील जंगीझखानास लांच वगैरे देऊन वश करण्याकरितां पाठविला. पण जंगीझखान पक्का राजनिष्ठ असल्यामुळें तो ह्या लालुचीस वश झाला नाहीं. तेव्हां बेदरच्या वकिलानें हरयुक्ति करून मूर्तुजा निजामशहाच्या मनांत जंगीझखानाविषयीं वाईट भरविलें. तेव्हां मूर्तुजानें विषप्रयोग करून त्या वजिरास ठार मारिलें. पुढें खरा प्रकार शहाच्या नजरेस येऊन त्यास कृतकर्माचा अत्यंत पश्चात्ताप झाला. आपल्यास खरें खोटें समजण्याची शक्ति नाहीं, त्या अर्थीं आपण राज्य करण्यास नालायक आहों, असें समजून भरदरबारांत त्यानें सर्व राज्यभार चार हुशार कामगारांस सोंपविला, आणि आपण एकांतवासांत जाऊन ईश्वरभजनांत काळ घालवूं लागला. साहेबखान नामक एका इसमाशिवाय दुसऱ्या कोणासही तो भेटत नसे. हा साहेबखान पुढें फार अनीतीचें आचरण करून लोकांवर जुलूम करूं लागला. तेव्हां दरबारच्या मंडळीनें त्यास ठार मारिलें. पुढें सलाबतखान नामक सरदार मुख्य दिवाण झाला. पण ह्या वेळेपासून शहास बहुतेक वेड लागल्यासारखें झालें होतें. तो आपल्या स्वतःच्या मुलाचा प्राण घेण्यास टपला होता. ह्या कामीं त्याचे दिवाण त्यास मदत करीनात, म्हणून त्यानें त्यांस वारंवार बदलिलें. शहाचा मुलगा मिरन हुसेन ह्यास तख्तावर स्थापण्याचा सर्व मुत्सुद्दी मंडळीनें घाट करून त्यास शहरांत आणिलें. तेव्हां शहास त्रास होऊन तो मरण पावला, (स. १५८६).

**मिरन हुसेन व इस्माईल निजामशहा, (स.१५८६–१५९१).**— मिरनची बहुतेक कारकीर्द दरबारच्या भानगडींतच निघून गेली. तो स्वभावानें अत्यंत क्रूर होता. त्यांतही दक्षणी व परदेशी ह्या दोन पक्षांमध्यें पुनः तंटे उद्भवून विकोपास गेले. दक्षणी लोक शिरजोर होऊन

त्यांनीं परदेशी लोकांची कत्तल केली. मीर्झाखान नामक वजिराचाही त्यांत वध झाला. पुढें बंडवाल्यांनीं शहाचा वध करून इस्मईल नामक दुसऱ्या इसमास तख्तावर बसविलें, ( स. १५८८ ).

इस्मईल हा मूर्तुजाचा धाकटा भाऊ व बुऱ्हाणनिजामशहाचा मुलगा होता. हा बुऱ्हाण अकबर बादशहाच्या आश्रयास जाऊन राहिला होता. इस्मईल हा लोहगडावर कैदेंत होता. इस्मईल राज्य करूं लागला, तेव्हां जमालखान नामक दक्षणी पक्षाच्या वजिराच्या हातांत बहुतेक सत्ता होती. हा जमालखान महदी पंथाचा होता. महदी पंथ मूळ चमत्कारिक रीतीनें निघाला. हनूफी पंथांतील सय्यद महंमद नांवाचा एक इसम लोकांस असें सांगूं लागला, कीं 'मला एक नवीन पंथ काढण्यासाठीं ईश्वरानें प्रेरणा करून पाठविलें आहे.' तो इसम महदी असें नांव धारण करून आपल्या नवीन पंथांचा प्रसार करूं लागला. हिंदुस्थानचे पुष्कळ मुसलमान ह्या पंथाचे अनुयायी बनले. त्यांपैकीं जमालखान हा महदी पंथाचा कट्टा अनुयायी होता. सर्व गोष्टी अनुकूल असल्यामुळें त्यानें ह्या पंथाचा विस्तार करण्याचा झपाट्यानें यत्न चालविला. तेव्हां सलाबतखान नामक सरदाराच्या आश्रयानें महदी लोकांस हांकून लावण्यासाठीं दुसरा एक पक्ष उत्पन्न झाला. जमालखानानें त्या पक्षांतील लोकांचा पराभव केला. सलाबतखान तर लवकरच मरण पावला. असे तंटे राजधानींत चालू असतां, शहाचा बाप बुऱ्हाण हा अकबर बादशहाची मदत घेऊन दिल्लीहून आला. त्यानें लढाई करून जमालखानास ठार मारिलें, आणि मुलास कैद करून निजामशाहीचें राज्य काबीज केलें.

८. **बुऱ्हाण निजामशहा,** [ दुसरा ] ( सन १५९१–१५९४ ).— बुऱ्हाणशहाच्या कारकिर्दींत मागील व्यवस्थेची उलटापालट झाली. बुऱ्हाणशहा शियापंथी होता. त्यानें महदी लोकांचा अत्यंत छळ केला. त्याच्या कारकिर्दींत रेवदंडा येथील पोर्तुगीझ लोकांवर स्वारी झाली ती प्रसिद्ध आहे. ह्या वेळीं कुर्ला येथें मुसलमान लोकांनीं एक किल्ला बांधिला. त्या ठिकाणीं राहून ते पोर्तुगीझ लोकांशीं झगडूं लागले. अखेरीस मुसलमानांचा पराजय झाला. शहा आजारी पडून लवकरच मरण पावला. नंतर त्याचा मुलगा इब्राहीम निजामशहा गादीवर बसला. हा दुर्व्यसनी होता. दरबारांत दुफळी होऊन विजापुराशीं युद्ध सुरू झालें,

त्यांत शहा मारला गेला. त्यानें चारच महिने राज्य केलें. नंतर दिवाण मिआन अंजू ह्यानें अहंमद नामक एका मुलास गादीवर बसविलें.

**४. चांदबिबी व मोगलांशीं युद्ध, ( स. १५९४–१६०० ).**—अहंमद निजामशहा हा निजामशाही वंशांतील खरा वारस नाहीं, असा वाद उत्पन्न झाला, आणि तंटे चालू असतां वजीर मिआन अंजूनें प्रथमतः अकबर बादशहाचा मुलगा मुराद गुजराथचा सुभेदार होता, त्याजकडे मदत मागितली. मुराद फौज घेऊन आला, आणि अहंमदनगरास त्यानें वेढा दिला. तेव्हां निजामशाही बुडण्याचा प्रसंग आला. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं चांदबिबी नामक एका शूर स्त्रीनें अहंमदनगरचें संरक्षण करून दक्षिणच्या इतिहासांत आपलें नांव अजरामर करून ठेविलें.

सन १५६४ त विजयनगरच्या रामराजाविरुद्ध मुसलमानांचा मोठा जमाव झाला, त्याच्या पूर्वी थोडे दिवस हुसेन निजामशहानें आपली चांदबिबी नांवाची मुलगी विजापूरचा राजा अली आदिलशहा यास दिली होती. त्याजबद्दल निजामशहाकडून सोलापूरचा किल्ला तिला आंदण मिळाला. अली आदिलशहा मारला गेल्यावर, त्यास संतान नसल्यामुळें त्याचा पुतण्या इब्राहीम आदिलशहा गादीवर बसला. त्याचा सर्व सांभाळ चांदबिबीकडे होता. पुढें वजिरांचें व तिचें वांकडें आल्यामुळें, तिनें धिट्टाई करून वजिरास ठार मारविलें. पण जो दुसरा इसम वजीर झाला त्यानें तीस पकडून, सातान्यास कैदेंत ठेविलें. थोड्याच दिवसांनीं तीस सोडविण्याकरितां म्हणून कित्येक लोक बंड करून सातान्यास गेले. त्यांनीं तिला कैदेंतून मुक्त करून पहिल्या अधिकारावर स्थापिलें. परंतु पुनः लवकरच तिचा सर्व अधिकार गेला. सन १५८४ ह्या वर्षी आदिलशहाची बहीण खुजा सुलताना हिचें लग्न मूर्तुजा निजामशहाबरोबर झालें. त्या वेळेस मुलीस सांभाळण्यासाठीं तिची चुलती चांदबिबी अहंमदनगरास माहेरीं आली, ती पुढें तेथेंच राहिली. येथपर्यंतची तिची हकीकत विजापूरच्या इतिहासांत येते.

अहंमद यास चांदबिबीनें अहंमदनगरचा सुलतान असें कबूल केलें नाहीं. बहादूर नांवाच्या मुलास तख्तावर बसविण्याचा घाट करून मोगलांस अहंदनगरांत शिरूं न देण्याचा तिनें प्रयत्न चालविला. वरील

अहंमदाशिवाय ह्या वेळेस आणखी तीन इसम राज्यावर आपला हक्क सांगत होते. चांदबिबी, एकलासखान, नेहंगखान हबशी व मिआन अंजू असे चार सरदार त्या चौघांचे पुरस्कर्ते झाले. ह्यांपैकीं एकलासखानाचा गोदावरी नजीक मोगल फौजेनें पराभव केला. नेहंगखानानें मोगल सैन्याची फळी फोडून किल्ल्यांत प्रवेश केला, आणि तो राणी चांदबिबीस येऊन मिळाला. इतक्यांत विजापूर व गोवळकोंडा येथून अहंमदनगरच्या मदतीस फौजा रवाना झाल्या.

मोगल शहाजादा मुराद ह्यानें तीन मुख्य दरवाजांखालीं भुयारें खोदून तीं दारूनें भरविलीं; त्यांस ठिणगी लागतांच अहंमदनगरचा किल्ला उडून गेला असता. सुरुंगवाल्यानीं राणी व तिच्या लोकांस स्वाधीन होण्याविषयीं सांगितलें. तसें न केल्यास पुढें काय भयंकर प्रसंग येईल याची त्यांनीं तीस समजूत दिली. परंतु राणीनें धीर सोडिला नाहीं. ती स्वतः मजुरांबरोबर काम करूं लागली, आणि मोगलांनीं भरलेलीं दोन भुयारें तिनें रिकामीं केलीं. तिसरें भुयार खुलें करीत असतां त्यास कोणी बत्ती लावून दिली आणि तें उडालें, त्याबरोबर थोडासा तट पडला. त्या वेळीं राणीच्या कामगारांनीं तीस पळून जाण्याची विनंति केली, पण तिनें त्यांचें न ऐकतां अंगांत चिलखत चढविलें, आणि हातांत तरवार व तोंडावर बुरखा घेऊन, जेथें तट पडून लोक आंत शिरत होते, तेथें तोंडाशीं उभी राहून लोकांस कापून काढूं लागली. तिचा आवेश पाहून स्फुरण चढलेले दुसरेही कित्येक लोक तिजबरोबर गेले. मोगलांनीं संध्याकाळीं हल्ला केला. पण ह्या आवेशी व शूर राणीपुढें इलाज न चालतां त्यांस परत फिरणें भाग पडलें. त्या वेळीं एकच गर्दी उडाली. सर्व खंदक प्रेतांनीं भरून गेला. पुनः पुनः मोगल वेगानें हल्ला करीत, आणि दरखेपेस फार नुकसान होऊन त्यांस परत फिरावें लागे. राणीनें इतक्या अवकाशांत सर्व तट पुनः बांधिला. तरी आपला मोगलांपुढें टिकाव लागणार नाहीं, हें जाणून तिनें त्वरा करून विजापूरच्या फौजेस मदतीस बोलाविलें. तिचीं पत्रें मुरादच्या हातांत पडलीं. मुरादनें 'लवकर या. आम्ही सर्वांचा समाचार घेण्यास तयार आहों,' असा ज्यास्त मजकूर त्या पत्रांत लिहून तीं पुढें विजापुरास पाठविलीं. त्याप्रमाणें विजापूरचा सरदार सोहलखान फौजेसह येऊन दाखल झाला. ह्या फौजेनें मोगलांस दाणापाण्याचा

इतका तोटा पाडिला, कीं 'वऱ्हाड स्वाधीन करा, म्हणजे आम्ही निघून जातों,' असें मुराद ह्यानें चांदबिबीपाशीं बोलणें लाविलें. मोगलांशीं टक्कर देण्याइतकें सामर्थ्य आपणांत नाहीं, हें जाणून तिनें हें मागणें कबूल केलें, आणि मुराद निघून गेला (१५९४). थोड्याच दिवसांनीं सर्वांच्या मतें तिनें बहादूरशहास तख्तनशीन केलें, आणि आपण सर्व कारभार पाहूं लागली. अहंमद यास विजापूरच्या राजानें जहागीर देऊन ठेविलें. चांदबिबीच्या वरील पराक्रमामुळें अहंमदनगरच्या इतिहासांत तिचें नांव अजरामर झालें आहे.

चांदबिबीनें महंमदखान यास मुख्य वजीर नेमिलें; पण त्यानेंच सर्व कारभार बळकाविला. तेव्हां तिनें इब्राहीम आदिलशहाची मदत मागितली. सोहलखान फौज घेऊन आला होता, त्यानें अहंमदनगरास वेढा घातला. महंमदखान वजिरानें मोगलांची फौज वऱ्हाडांत होती तीस परत बोलाविलें. तेव्हां इतर सर्व सरदारांनीं मिळून महंमदखानास पकडून चांदबिबीच्या स्वाधीन केलें. यामुळें तिचा अधिकार पूर्ववत् चालूं लागला. इकडे मोगल वऱ्हाड प्रांत घेऊन स्वस्थ बसले नव्हते. ते उत्तरोत्तर निजामशाहीचा मुलूख काबीज करीत चालले. चांदबिबीनें बोलाविल्यावरून विजापूर, व गोवळकोंडें येथील राजांच्या फौजा मदतीस आल्या. येणेंप्रमाणें दक्षिणच्या मुसलमानांची एकंदर साठ हजार फौज उत्तरेच्या मोगलांशीं लढण्याकरितां तयार झाली.

अहंमदनगरच्या निजामशाही घराण्याचीं शंभर वर्षें भरलीं. वरील उभय फौजांमध्यें तुंबळ युद्ध झालें. दोन दिवस युद्ध चालू होतें. दोनही पक्षांनीं शिकस्त केली. अखेरीस मोगलांस जय मिळाला. ही लढाई तारीख १६ जानेवारी सन १५९७ रोजीं गोदावरीचे कांठीं सुपें सोनपत येथें झाली. ह्या वेळीं मोगल सरदार खानखानान व विजापूरचा सरदार सोहलखान यांनीं आपआपल्या पराक्रमाची पराकाष्ठा केली.

विजय प्राप्त झाल्यावर मोगल सरदारांत वाद पडला. अहंमदनगरावर एकदम चाल करावी, असें मुरादचें म्हणणें होतें, आणि खानखानानच्या मतें प्रथम वऱ्हाड प्रांतांतील कित्येक मजबूद ठिकाणें परत घ्यावीं असें होतें, ह्यामुळें कलह माजून मुरादनें खानखानान यास

परत बोलाविण्याविषयीं बापास लिहिलें. तेव्हां त्यास परत बोलावून अकबर बादशहानें आपल्या मर्जींतील सरदार अबुल् फज्ल् ह्यास दक्षिणेंत पाठविलें.

इकडे अहंमदनगरासही चांदबिबी व नेहंगखान ह्यांमध्यें कारभारासंबंधी तंटा सुरू झाला होता. गृहभेद असल्याशिवाय परशत्रूचा शिरकाव व्हावा तरी कसा ? नेहंगखानानें फौज गोळा करून अहंमदनगरावर हल्ला केला. बरसातीचे दिवस व मोगली फौज दूर आहे असें पाहून, दक्षिणच्या बंदोबस्तास जी मोगली फौज होती, तिजवर हल्ला करून बीड येथें अहंमदनगरच्या फौजेनें तिचा पराभव केला. इकडे मुराद मरण पावला, आणि अकबर बादशहा अबुल् फज्ल्च्या बोलण्यावरून स्वतः दक्षिणेंत बऱ्हाणपुरास आला. त्यानें आपला दुसरा मुलगा दानियाल मीर्झा व खानखानान ह्यांस दक्षिणची कामगिरी दिली, (स. १५९९). तेव्हां मोगलांची फौज विनहरकत नगरावर चालून आली. नेहंगखान जुन्नरास पळून गेला. ह्या प्रसंगीं चांदबिबीजवळ भरंवशाचें एकही माणूस नव्हतें. हमीरखान खोजा म्हणून एक तृतीयप्रकृति अधिकारी होता, त्यास काय करावें म्हणून तिनें सल्ला विचारिला. लढाई करून किल्ल्याचा बचाव करावा असें त्यानें सांगितलें. राणी म्हणाली, कीं 'प्रसंग कठीण असल्यामुळें किल्ला मोगलांस देऊन आपण बालराजासह जुन्नरास जावें.' हें तिचें भाषण ऐकून तो दुष्ट खोजा फार खवळला, आणि बाहेर जाऊन लोकांस सांगत सुटला, कीं सुलताना ही आंतून मोगलांस सामील आहे. नंतर कित्येक दुष्ट लोकांस बरोबर घेऊन तो किल्यांत शिरला, आणि तिच्या महालांत जाऊन त्यानें तिचा खून केला. नंतर थोड्याच अवकाशांत मोगलांनीं किल्ल्यास खिंडारें पाडून तो सर केला. बहादूरशहास अकबरानें आग्र्यास कैदेंत ठेविलें, आणि दक्षिणचा कारभार दानियालकडे दिला, (स. १६००).

निजामशाहीच्या सरदारांनीं अलीशहाचा पुत्र मूर्तुजा ह्यास परिंडा येथें निजामशाहीच्या तख्तावर स्थापिलें, आणि कित्येक वर्षें खटपट करून ह्या घराण्याचें नांव आणखी कांहीं काळ कायम राखिलें.

दक्षिणहिंदुस्थानांत आजपर्यंत जीं पराक्रमी माणसें निपजलीं, त्यांत चांदबिबीची गणना मुख्यत्वानें आहे. तिच्यासारखीं स्त्रीरत्नें तर फारच थोडीं

सांपडतील. ती स्वरूपानें सुंदर असून अल्पवयांत भर्तृवियोग झाला असतां तिनें आपलें वर्तन अखेरपर्यंत निर्मळ ठेविलें. विजापूर व अहंमदनगर येथील घडामोडींत स्वकर्तव्य बजावण्यांत तिनें कसूर केली नाहीं. तिच्या अप्रतिम शौर्याची पारख अनेक प्रसंगीं झाली. तिचा शेवट दुःखमय झाला हें ऐकून सर्व लोक हळहळतात आणि आजतागाईत संमानपुरःसर तिचें स्मरण करितात.

**५. मलिकंबराचा कारभार,** (स.१६००–१६२६).—ह्या वेळीं मोगल सैन्य जरी दक्षिणेंत जिकडे तिकडे पसरलें होतें, तरी दोन तीन पुरुषांनीं निजामशाहीची बाजू बरीच संभाळिली. मिआन राजू व मलिकंबर हे दोघे हुशार मुसलमान मुत्सद्दी त्या संकटसमयीं निजामशाहीस लाभले. त्यांनीं दहा बारा वर्षांत बहुतेक निजामशाही मुलूख परत मिळविला. परंतु हे दोघे एकमेकांचा हेवा करूं लागले. ही संधि साधून मोगल सरदार खानखानान यानें त्यांजवर फौज पाठविली. तिजवर मलिकंबर चालून गेला, त्यानें मोगलांचा पराभव केला. परंतु पुढें लौकरच मलिकंबराचा पराभव झाला. मलिकंबर हा फार धूर्त व साहसी पुरुष होता. त्याच्यावर लोकांची भक्ति फार होती. वरील लढाईंत त्यास पुष्कळ जखमा झाल्या. प्रसंग कठीण आहे, असें पाहून त्यानें मोगलांशी तह केला. येणेंकरून मूर्तुजाशहा व इतर सरदार यांच्या मनांत त्याच्या राजनिष्ठेविषयीं संशय उत्पन्न झाला, तरी फौज जमवून त्यानें शहास परिंड्याच्या किल्ल्यांत नेऊन सुरक्षित ठेविलें. तेव्हां मिआन राजूनें तंटा चालवून मलिकंबरावर स्वारी केली. मलिकंबरानें मोगलांची मदत मागितली. पण इतक्यांत शहाजादा दानियाल मरण पावला, आणि खानखानान यानें राजूस मदत दिली. अशा संधीस मलिकंबरानें मोठ्या शहाणपणानें निजामशाही घराण्याचा अभिमान धरून राजूस पकडून कैद केलें, आणि बराच मुलूख मूर्तुजाच्या अंमलाखालीं आणिला. निजामशाही घराण्याचा फेरिस्त्यानें लिहिलेला इतिहास इतकाच झाला आहे. कारण ह्याच संधीस हा प्रसिद्ध व विद्वान् इतिहासकार मरण पावला. त्यानें लिहिलें आहे, कीं 'मलिकंबरचें वजन व वर्चस्व दिवसेंदिवस वाढत आहे. सर्व राज्यकारभार तो मोठ्या हुशारीनें व दक्षतेनें चालवीत आहे. तरी मोगल बादशहा तें घशांत टाकण्यास टपून बसला असल्यामुळें तें लवकरच लयास जाईल.'

फेरिस्ता इराणांतील एका थोर कुळांत स.१५७०त जन्मला. लहानपणींच बापानें त्यास हिंदुस्थानांत आणिलें. तेव्हांपासून तो अहंमदनगरास निजामशहांच्या पदरीं राहिला. तरुण असतांच त्यानें आपला इतिहास लिहिण्यास सुरुवात केली. विजापूरच्या आदिलशाहीचा इतिहास त्यानें स.१५९६त संपूर्ण केला. निजामशाहीचा इतिहास त्यानें स. १६०७ च्या पुढें लिहिला असावा. स. १६११ च्या पुढची हकीगत त्यांत नाहीं, सबब त्या सालाच्या सुमारास फेरिस्ता मरण पावला. इतिहास लिहिण्याची आवड मुसलमानांत विशेष दिसून येते, आणि जे कित्येक चांगले इतिहास मुसलमानांनी लिहिलेले आहेत, त्यांत फेरिस्त्याचा ग्रंथ मोडतो. हिंदुस्थानांतील मुसलमानी राज्यांची व विशेषतः दक्षिणेंतील राज्यांची हकीगत फेरिस्त्यानें दिली असून, तिचे अनेक तर्जुमे झाले आहेत.

**वजीर मलिकंबर,** (स.१५४६–१६२६).—मलिकंबर हा जातीचा हबशी असून पहिल्या मूर्तुजा निजामशहाचा इमानी दिवाण जो जंगीझखान त्याजपाशीं नोकरी करून, राज्यकारभाराच्या कामांत फार तरबेज झाला होता. अहंमदनगर मोगलांच्या ताब्यांत गेल्यावर, दौलताबादेपासून सहा मैलांवर खडकी नामक शहरीं मोठमोठ्या हवेल्या बांधून तेथें त्यानें निजामशाहीची राजधानी केली. त्या ठिकाणीं राहून मलिकंबर सर्व राज्यकारभार पाहत असे. ह्याच शहरास पुढें औरंगजेबानें औरंगाबाद असें नांव दिलें. मलिकंबराच्या पदरीं पुष्कळ मराठे सरदार होते. सिंदखेडचे देशमूख जाधवराव, व मालोजी भोंसले हे सरदार पूर्वीपासून निजामशाहींत होते. अहंमदनगर व विजापूर या दोन ठिकाणीं लष्करी खात्यांत पुष्कळ मराठे सरदार ह्या वेळेस उदयास आले. अकबर बादशहा आणखी कांहीं वर्षे वांचता, तर निजामशाही साफ बुडाली असती. पण जहांगीर गादीवर बसण्याच्या घालमेलींत मलिकंबरानें फौज जमा करून, निजामशाहीचा मुलूख परत घेतला,खानखानान याचा पराभव करून अहंमदनगर हस्तगत केलें, आणि त्या मोगल सरदारास बऱ्हाणपूरपर्यंत घालवून दिलें. इतकें झाल्यावर तो देशस्थिति सुधारण्याच्या कामास लागला. राज्यकारभारांत त्यानें केलेल्या सुधारणांवरून त्याचें नांव दक्षिणेंतील लोकांच्या तोंडीं अद्यापि निघतें.त्यानें निजामशाही मुलखाची जमीन मापून सरकारघेण्याचे दर ठरविले, आणि उत्तरेंतील तोडरमल्लाची पद्धत दक्षिणेंत सुरू केली. ह्या कामीं

कित्येक मराठे सरदारांची त्यास चांगली मदत होती. साबाजी आनंदराव, शिवाजीपंत मुत्सद्दी, व सखाराम मोकाशी वगैरे कित्येक गृहस्थ त्याचे मदतगार होते. उत्तरहिंदुस्थानांत तोडरमल्लाची ख्याति आहे, त्याचप्रमाणें दक्षिणहिंदुस्थानांत मलिकंबरची आहे. इजाऱ्यानें जमिनी देण्याची चाल त्यानें अगदीं बंद केली, आणि वसुलाचें काम ब्राह्मण कारकुनांच्या हातीं दिलें. सर्व शेतांची मापणी व पाहणी करून मागील कित्येक वर्षांच्या उत्पन्नाची सरासरी काढून, प्रत्येक शेतावर सरकारचें नक्त देणें ठरविलें, आणि तें पिकाच्या मानानें कमी ज्यास्त देण्याची सवड ठेविली. कांहीं वर्षे लोकांस साऱ्याची माफी देऊन त्यानें नवीन जमिनी लागवडीस आणिल्या. ह्या सुधारणांमुळें अंमलदारांचा रयतेवर चालत असलेला जुलूम नाहींसा झाला, आणि देशांत आबादानी झाली. मलिकंबर खर्च फार करी, तरी नियमित वेळीं वसूल आल्यानें त्याची खर्चाच्या कामीं कधीं ओढाताण होत नसे. मलिकंबरनें देशांत इतकी स्वस्थता केली, कीं लवकरच मोगलांशीं टक्कर देण्यास तो समर्थ झाला.

जहांगीर बादशहानें निजामशाहीचा मुलूख परत घेण्यासाठीं मोठमोठ्या फौजा रवाना केल्या. त्यांत गुजराथचा मोगल सुभेदार अब्दुल्खान हा दिल्लीची फौज येण्यापूर्वी एकटाच मलिकंबरवर चालून गेल्यामुळें, त्याचा मलिकंबरनें चांगलाच समाचार घेतला. मलिकंबरची लढण्याची रीत थेट मराठ्यांसारखी होती. समोरासमोर सामना न करितां आड राहून तो शत्रूंस जेरीस आणी. सन १६१७ सालीं जहांगीर आपला मुलगा शहाजहान यास पुढें पाठवून, आपणही निजामशाही जिंकण्याकरितां चालून आला. शहाजहाननें विजापूरच्या राजास व कित्येक मराठे सरदारांस मलिकंबरचे कटांतून फोडिलें. तेव्हां निरुपाय होऊन मलिकंबर शहाजहानास शरण गेला, आणि त्यानें अहमदनगर व सभोंवतालचा प्रांत मोगलांस दिला. पुढें शहाजहान काश्मिराकडे गेल्यावर मलिकंबरनें पुनः मोगली फौजेस हांकून देऊन आपले प्रांत परत घेतले. हें ऐकून शहाजहान पुनः दक्षिणेंत आला, आणि मलिकंबरचा पराभव करून त्यानें ते प्रांत परत मिळविले. ह्यापुढें मलिकंबर मोगलांशीं स्नेहानें वागला, आणि अशा रीतीनें त्यानें निजामशाहीचें होईल तितकें हित केलें. मोठमोठीं प्रजाहिताचीं कामें

१७-७९१-२०००

करून हा महान पुरुष सन १६२६ सालीं मरण पावला. त्या वेळीं त्याचें वय ८० वर्षांचें होतें. दौलताबादेस त्यानें एक मोठा घुमट बांधिला होता, तेथें त्याचें दफन करण्यांत आलें. त्याची जमाबंदीची पद्धति अद्यापि दक्षिणच्या लोकांस पसंत वाटते. त्याचें राज्यकारभाराचें चातुर्य, न्यायी वर्तन, ईश्वरभक्ति, औदार्य व शौर्य या गुणांविषयीं दक्षिणेंत त्याची फार आख्या आहे.

६. **निजामशाहीची अखेर,** ( स. १६३३).—मलिकंबर मरण पावल्यानंतर त्याचा मुलगा फत्तेखान हा कांहीं दिवस निजामशाहीचा कारभार पाहत होता. पण तो बापासारखा शहाणा नव्हता. तरी तो निजामशाही राखण्याविषयीं प्रयत्न करीत असतां, इतर सल्लागारांच्या सांगण्यावरून त्यास निजामशहानें कैदेंत टाकिलें. तेव्हां अर्थात्च निजामशाहीच्या सर्व एकनिष्ठ सरदारांस अत्यंत भीति पडली. लखुजी जाधवराव म्हणून एक वजनदार मराठा सरदार दरबारांत होता. मोगलांच्या हल्ल्याचें निवारण कसें करावें ह्या विचारांत असतां, तो त्या सरदारांस सामील आहे अशा समजुतीनें, बुऱ्हाण निजामशहानें त्यास कैद करविलें, आणि कांहीं दिवसांनीं त्यास व त्याचा मुलगा आचलोजी ह्यांस ठार मारविलें. ह्या गोष्टीनें निजामशहाच्या पदरचे सर्व लोक चिडून गेले. जाधवरावाचा भाऊ भेताजीराव हा मोगलांकडे पळून गेला. त्याचा जांवई शहाजी भोंसले हा तर पुण्याच्या आसपास निजामशहाच्या व आदिलशहाच्या मुलखांवर साधेल तितका हात मारून स्वतंत्रपणें कारभार करूं लागला. तेव्हां निजामशाहीचा लय होण्याचा समय समीप येऊन ठेपला. राजधानींत मोगलांचा प्रवेश झाला होता, तरी बाहेरच्या मुलखावर त्यांचा ताबा बसला नव्हता. म्हणून प्रांतांत जे कामदार होते, तेच आपापल्या ताब्यांतील मुलखांवर स्वतंत्र अंमल करूं लागले. त्यांत विशेषतः सह्याद्रीचे पूर्वेकडील बहुतेक डोंगरी मुलूख मराठे मंडळीच्या ताब्यांत होता. जाधवरावाच्या मरणानंतर निजामशाहींतील मराठे कामदार थोडेबहुत एकचित्त झाले. त्यांत शहाजी भोसले प्रमुख होता. जुन्नर येथें श्रीनिवास नांवाचा एक अंमलदार सरनाईक होता, तो शहाजीस मिळाला. ह्या उभयतांनीं मिळून शामगड किल्ला हस्तगत करून युक्तिप्रयुक्तीनें फौज जमविली, आणि संगमनेरपासून अहमदनगर व दौलताबादपर्यंत सर्व

मुलूख हस्तगत केला. शहाजीनें विजापूरकरांचाही कांहीं मुलूख बळकाविला होता. म्हणून आदिलशहानें मुरारराव नांवाच्या आपल्या सरदारास शहाजीवर पाठविलें. मुराररावानें पुणें वगैरे शहाजीचे प्रांत घेऊन त्याचें बरेंच नुकसान केलें. ह्याच मुराररावाच्या हाताखालीं बाजी दळवी म्हणून एक कामगार होता, तो मुराररावाच्या हुकुमानें तळ कोकणांत शिरून महाडकडील निजामशाहीचा मुलूख जिंकीत होता, हें वर्तमान निजामशहास समजतांच, त्यानें फौज पाठवून बाजी दळवी यास युद्धांत ठार मारून आपले प्रांत पुनः परत मिळविले. ह्याच संधीस खानजहान लोदी उत्तरहिंदुस्थानांत शहाजहान बादशहाविरुद्ध बंड करून दक्षिणेंत आला. त्यास शहाजी भोसले व दुसरे मराठे सरदार अनुकूळ झाले. पण बादशाही फौज खानजहानच्या पाठीवर असल्यामुळें, शहाजी लवकरच त्याचा पक्ष सोडून शहाजहानास शरण गेला. बादशहानें त्यास ५००० स्वारांची सरदारी दिली. तेव्हां लोदीनें मूर्तुजाशहाचा आश्रय केला. त्यावरून मोगलांनीं निजामशहाशीं युद्ध करून त्याचा पराभव केला. ह्याच सुमारास म्ह० स. १६२९ त दक्षिणेंत भयंकर दुष्काळ पडून निजामशाहीवर दुसरें अरिष्ट आलें. दोन वर्षें सारखें अवर्षण पडलें. त्यामुळें लोक मुलूख सोडून गेले आणि बहुतेक मरण पावले. वैरण न मिळून गुरांढोरांचाही फन्ना उडाला. प्रांतचे प्रांत ओसाड पडले. मागाहून महामारी येऊन लोकांच्या विपत्तीचा कळस झाला. ह्याच वेळीं मोगलांची आणखी मोठी फौज दक्षिणेंत आली. मूर्तुजा व दिवाण फत्तेखान यांचें बनेनासें होऊन फत्तेखान कैदेंत होता, त्यास सोडवून पुनः आधिकारापन्न करितांच त्यानें मूर्तुजास कैद करून, त्यास व त्याच्या पक्षाच्या अनेक सरदारांस ठार मारिलें, आणि आपण सर्व निजामशाही ताब्यांत घेऊन मोगलांस शरण गेला. मूर्तुजाचा हुसेन नांवाचा दहा वर्षांचा मुलगा होता, त्यास त्यानें निजामशाहीच्या तख्तावर स्थापिलें. ह्या कृत्याचा शहाजी भोसले यास फार तिटकारा आला. त्यानें विजापूरच्या राजाशीं सख्य करून मोगलांचा दौलताबाद किल्ला फत्तेखानापासून घेण्याकरितां विजापूरची फौज आणिली. तेव्हां फत्तेखानानें दिल्लीहून मोगलांची फौज आणविली. शहाजहाननें महाबतखान नामक सरदारास दौलताबादचा किल्ला घेण्यास पाठविलें. विजापूरच्या फौजेचा व मोगली

फौजेचा दौलताबादच्या समोर सामना होऊन विजापूरकरांचा पराभव झाला. तरी फत्तेखानास फितवून त्यास विजापूरच्या राजानें साहाय्य करून मोगलांशीं लढाई चालविली. ह्यामुळें महाबतखान फारच चिडून गेला. त्यानें दौलताबादेवर निकराचा हल्ला केला. अठ्ठावीस दिवसपर्यंत तुंबळ युद्ध झालें आणि अखेरीस किल्ला मोगलांच्या हातीं गेला. फत्तेखान व बालराजा यास कैद करून त्यानें दिल्लीस पाठविलें, आणि निजामशाहीचा सर्व मुलूख काबीज केला. येणेंप्रमाणें अहंमदनगर येथें निजामशाहीची स्थापना झाल्यापासून सुमारें दीडशें वर्षांनीं म्हणजे सन १६३३ त त्या राज्याची समाप्ति झाली. फत्तेखान व त्याचा भाऊ जंगीझखान यांस शहाजहानकडून उत्तरहिंदुस्थानांत नेमणुका मिळाल्या.

**७. शहाजी भोसले ह्याची अखेरची धरपकड, (१६३३-३७).**— इतकें झाल्यावरही शहाजी भोसले ह्या पराक्रमी मराठे सरदारानें निजामशाहीचा उद्धार करण्याची दोन तीन वर्षें जिवापाड मेहनत केली. ह्या वेळीं ह्या शूर पुरुषानें जें आचरण केलें, जीं धोरणें बांधिलीं, व जी शिताफी दाखविली, तीच त्याचा अल्पवयी मुलगा शिवाजी ह्यास कित्ता होऊन, त्यापासून मराठशाहीची संस्थापना करण्याची त्यास शक्ति आली. निजामशाहीखालीं मोडणारा सह्याद्रीवरचा डोंगराळ प्रदेश शहाजीनें ताब्यांत घेऊन तेथील अवघड किल्ल्यांच्या साह्यानें मोगलांशीं टक्कर देण्याची तयारी चालविली. बरीच जमवाजमव केल्यावर शहाजीनें एक मुलगा निजामशाहीच्या गादीवर बसविला, आणि कित्येक हुशार ब्राह्मण नोकरीस ठेवून त्यांच्या सल्ल्यानें तो निजामशाहीचा कारभार चालवूं लागला. असें करितां करितां कोकणपट्टी सुद्धां पुष्कळ मुलूख शहाजीच्या ताब्यांत आला. दक्षिणेंतील युद्धाचा पुनः पहिलाच दिवस आला असें पाहून शहाजहान बादशहानें स्वतः कंबर बांधिली, आणि मोठमोठे सरदार पुढें पाठवून मागाहून आपणही स्वतः आला. शहाजीस विजापूरचा दिवाण मुरारपंत व मुख्य सरदार रणदुल्लाखान यांची चांगली मदत होती. बादशहानें विजापूरकरांस कळविलें, कीं ' शहाजीचा पक्ष सोडा; नाहीं तर तुमचाही संहार करूं. ' आदिलशहानें तें बोलणें मान्य केलें नाहीं, म्हणून शहाजहाननें आपल्या फौजेचे निरनिराळे भाग करून युद्ध सुरू केलें. सर्व ठिकाणीं मोगलांनीं शहाजीस जेरीस आणिलें. पुढें मोगल विजापूरच्या

मुलखांत शिरून त्रास देऊं लागले, तेव्हां आदिलशहानें त्याजशीं तह केला. नंतर शहाजी कोंकणांत गेला. तेथेंही आपला निभाव लागत नाहीं असें पाहून, स. १६३७ त तो शहाजहानास शरण गेला, आणि आपणास पदरीं ठेवण्याविषयीं त्यानें बादशहास विनंति केली. शहाजहाननें ती मान्य केली नाहीं; तरी विजापूरकरांच्या पदरीं राहण्यास शहाजीस त्यानें परवानगी दिली. शहाजीनें गादीवर बसविलेल्या निजामशहास व त्याच्या इतर साथीदारांस शहाजहाननें आग्र्यास नेऊन कैदेंत ठेविलें. ह्याप्रमाणें निजामशाहीचा शेवट झाला, ( सन १६३७ ).

---

# प्रकरण चौदावें.

## विजापूरची आदिलशाही.

### सन १४८९—१६८६.

१. अबुल् मुज्फर यूसुफ् आदिलशहा. २. इस्माईल आदिलशहा,(१५१०-३४).
३. इब्राहीम आदिलशहा, [ पहिला ]. ४. अली आदिलशहा, (१५५७–८०).
५. इब्राहीम आदिलशहा, [ दुसरा ]. ६. महंमद आदिलशहा,(१६२६-५६).
७. अली आदिलशहा, [ दुसरा ]. ८. सिकंदर आदिलशहा,(१६७२-८६).
९. आदिलशाहीचें समालोचन.

**१. अबुल् मुज्फर यूसुफ् आदिलशहा, ( सन १४८९–१५१० ).**— ह्या तुर्कस्तानांतील एका सुलतानाचा पुत्र असून इराणांत वाढला होता. तो सन १४५९ त हिंदुस्थानांत दाभोळ बंदरीं येऊन उतरला, आणि महंमद गवानच्या पदरीं राहून मोठ्या योग्यतेस चढला. विजापूरच्या कारभारावर असतां महंमदशहा बहामनी निवर्तल्यावर, तो विजापुरास स्वतंत्रपणें कारभार पाहूं लागला. विजापूर हें प्राचीन काळापासून नामांकित शहर होतें. आदिलशहानें तेथें आपली राजधानी करून, सुंदर इमारती बांधून तें फार सुशोभित केलें. त्याचा बहुतेक काळ लढाया करण्यांतच गेला. त्यानें आपल्या राज्याची मर्यादा पुष्कळ वाढविली. विजापूरच्या दरबारीं शियापंथाची स्थापना ह्यानें प्रसिद्धपणें केली, त्यामुळें पुष्कळ

सुनी लोक नोकऱ्या सोडून गेले. पुढें सन १५१०त पोर्तुगीझ लोकांचा सरदार आल्बुकर्क यानें विजापूरच्या ताब्यांतील गोवें शहर घेतलें; तें यूसुफ्नें स्वतः स्वारी करून परत मिळविलें. एकवीस वर्षें राज्य करून यूसुफ् आदिलशहा सन १५१० त मरण पावला, तेव्हां त्याचें वय ७५ वर्षांचें होतें. त्यानें मुकुंदराव नामक एका शूर मराठे सरदाराच्या बहिणीशीं लग्न केलें; तिचें नांव त्यानें बुबुजीखान असें ठेविलें. तिच्यावर त्याची प्रीति विशेष होती. तिचा मुलगा इस्माईल हाच पुढें तख्तावर बसला.

दक्षिणेंतील सर्व राजांमध्यें यूसुफ् आदिलशहाशीं तुलना करण्याजोगा समकालीन पुरुष दुसरा कोणी नव्हता. शौर्य, विद्या, व्यवहारचातुर्य व राजकीय मसलत यांत यूसुफ्ची बरोबरी करणारा महंमद गवानशिवाय दुसरा कोणी झाला नाहीं. तो कारकुनी कामांतही निष्णात असून, धर्मसंबंधांत त्याची समदृष्टि तारीफ करण्याजोगी असे. हिंदूंवर व विशेषतः मराठ्यांवर त्याची मेहेरनजर असे. दरबारचें काम तो नियमानें करी. हिंदूंस त्यानें मोठ्या दर्जाच्या कामांवर नेमिलें. त्याच्या वेळेस सर्व दप्तर मराठी भाषेंत होतें. त्यानेंच विजापूरचा मजबूद तट बांधिला.

**२. इस्माईल आदिलशहा,** ( सन १५१०–१५३४ ).—बाप वारला तेव्हां हा नऊ वर्षांचा होता. बापानें कमालखान नामक सरदारास त्याचा सांभाळ करण्याकरितां नेमिलें होतें. कमालखानाच्या मनांत स्वतःच राज्य बळकवावें असें येऊन, त्यानें शेजारच्या राजांस अनुकूळ करून घेतलें, आणि राणीस व बालराजास मारण्याचा यत्न चालविला. हें राणीस समजतांच तिनें मोठ्या युक्तीनें यूसुफ् तुर्क नांवाच्या गृहस्थाकडून कमालखानास ठार मारविलें. पुढें कमालखानाचा मुलगा सफ्तरखान यानेंही दंगा केला, पण परदेशी स्वारांच्या मदतीनें राणीनें त्याचा मोड करून त्यास ठार मारिलें. इस्माईलशहानें लहान असतांच सर्व कारभार आपल्या हातीं घेतला. दक्षणी व हबशी लोकांस घालवून देऊन, त्यानें लष्करांत व दरबारांत परदेशी लोकांचा भरणा केला. विजापुरांतील हे घोटाळे पाहून अमीरबेरीद, अहंमदनगर व वऱ्हाडचे राजे, आणि बहामनी राजे सर्व एक होऊन, विजापूर हस्तगत करण्याकरितां आले. पण त्या सर्वांस युक्तीनें फोडून इस्माईलशहानें त्यांचा पराभव केला. इकडे

पोर्तुगीझ लोकांनीं गोवें शहर परत घेतलें. पुढें स. १५१४ पासून १५१९ पर्यंत राज्यांत शांतता होती. रायचूर दुआब हा मूळचा विजापूरच्या ताब्यांतील असून तो विजयनगरच्या राजानें घेतला होता. तो परत घेण्यासाठीं इस्माईलशहानें स्वारी केली, पण तींत त्यास यश आलें नाहीं. सन १५२५ त अहंमदनगरच्या बुऱ्हाण निजामशहानें विजापुरावर हल्ला केला. दोन तीन वर्षें युद्ध चालू होतें. तींत आसदखानाच्या साहाय्यानें आदिलशहानें बुऱ्हाणचाच पराजय केला. सन १५२८–२९ सालीं अमीर बेरीदची एकवार चांगली खोड मोडावी, म्हणून इस्माईल-शहानें बेदरवर स्वारी केली, बेदरचा किल्ला घेऊन अमिरास पकडिलें, आणि त्याचें सर्व वित्त हरण करून तें आपल्या लोकांस वांटून दिलें. नंतर अमीर बेरीद यास कांहीं जहागीर देऊन त्यानें आपल्या पदरीं ठेविलें. पुढें लवकरच रायचूर दुआब घेण्यासाठीं विजयनगरच्या राज्यावर इस्माईलशहानें हल्ला केला. त्यांत अमीरबेरीदनें चांगली मदत केल्यामुळें त्यास त्याचें बेदरचें राज्य परत दिलें. परंतु अशा प्रकारें स्वातंत्र्य मिळून फार दिवस झाले नाहींत, तोंच तो दुसऱ्या राजांस इस्माईल-शहाविरुद्ध उठविण्याची खटपट करूं लागला. त्याचा परिणाम असा झाला, कीं बुऱ्हाण निजामशहा व आदिलशहा यांची निकराची लढाई होऊन, बुऱ्हाणचा अगदीं पराजय झाला. पुढें उभयतांची सरहद्दी-वर भेट होऊन असा तह ठरला, कीं विजापूरकरांनीं कुत्बशहाचा मुलूख जिंकून आपल्या राज्यास सामील करावा; आणि निजामशहानें इमादशाही जिंकून घ्यावी. हा तह अमलांत येण्यापूर्वींच इस्माईलशहाची तबियत बिघडून, तो स. १५४४ त मरण पावला. त्यानें पंचवीस वर्षें राज्य केलें.

इस्माईलशहा न्यायशील, दूरदर्शी, दयावान व उदार होता. मोठमोठ्या राजद्रोही अपराध्यांस सुद्धां वारंवार क्षमा करणें, चहाडखोरांच्या तोंडून चुगल्या न ऐकणें, ऐनरागाच्या भरांत देखील कोणास टाकून न बोलणें, हे त्याचे स्वाभाविक गुण होते. तो फार रसिक असून संगीत व काव्य यांची त्यास फार आवड असे. व्यवहारांतील पुष्कळ गोष्टी त्यास स्वतः करितां येत होत्या. त्यास सज्जनांची आवड असून विद्वानांस तो फार चाहत असे. समयोचित व खुबीदार भाषण करण्यांत तर त्याची बरो-

त्वरी कोणासही होत नसे. तो दक्षिणी मुसलमानांचा फार द्वेष करी. त्याची लष्करावर अत्यंत मेहेरनजर होती. शिपायांबरोबर तो त्यांच्यासारखे कष्ट करी व भूक तहान सोशी. त्याची राज्यकारभार करण्याची पद्धत चांगली असून त्याच्या वेळेस मुलूख बराच भरभराटींत होता. त्याचा वडील मुलगा मल्लू हा त्याच्यामागून तख्तावर बसला. परंतु तो अत्यंत दुर्व्यसनी असल्यामुळें प्रमुख सरदार आसदखान व त्याची आजी बुबुजीखान ह्यांनीं त्यास पदच्यूत करून, त्याचा भाऊ इब्राहीम ह्यास तख्तावर बसविलें. तेणेंकरून सर्वांस संतोप झाला.

३. **इब्राहीम आदिलशहा,** [ पहिला ], (सन १५३४–१५५७).— ह्याची कारकीर्द एकंदरींत फारशी महत्त्वाची झाली नाहीं. इब्राहीमनें राज्यकारभार हातीं घेतल्याबरोबर त्यानें शियापंथ मोडून सुनीपंथाची स्थापना केली आणि बहुतेक परदेशी लोकांस फौजेंतून काढून दक्षणी व मोगल लोकांस नोकरीस ठेविलें. ह्यांपैकीं पुष्कळ परदेशी मुसलमान विजयनगरच्या राज्यांत जाऊन नोकरी पत्करून राहिले. आसदखान हा मुख्य वजीर होता, त्यानें शहाची बाजू बरीच सांभाळिली. त्याजवरही कित्येक वेळां शहाची इतराजी झाली होती. पण तो अत्यंत राजनिष्ठ होता, म्हणून आणीबाणीच्या प्रसंगीं इब्राहीमशहास त्याची मदत चांगली होई. मागील कारकिर्दीत सर्व दप्तर फारशींत ठेवण्याची वहिवाट पडली होती, ती त्यानें बंद करून मराठी भाषा चालू केली, आणि ब्राह्मण, मराठे वगैरे पुष्कळ लोक निरनिराळ्या खात्यांतून नोकरीस ठेविले. तेव्हांपासून मराठ्यांचें वजन फार वाढलें.

आरंभींच विजयनगरवर स्वारी करण्याची इब्राहिमास पाळी आली. विजयनगर येथें पुष्कळ वर्षे हिंदूंचें प्रबळ राज्य चालत आलें होतें. अलीकडचे बरेच राजे अल्पवयी झाल्यामुळें सर्व सत्ता तिमराज नामक पराक्रमी प्रधानानें हरण केली होती. तिमराज मरण पावल्यावर त्याचा मुलगा रामराय ह्यानें कारभार हातीं घेतला, आणि हळूहळू स्वतःच राज्यपद बळकाविण्याचा यत्न चालविला. राजवंशांतील एका पुरुषानें आपली सत्ता परत मिळविण्याकरितां रामरायाविरुद्ध आपणास मदत करण्यास इब्राहिम आदिलशहास बोलाविलें. आसदखानास घेऊन इब्राहीमशहा सन १५३५ त विजयनगरास गेला. तेव्हां रामराय त्यास

शरण गेला. पण इब्राहीमशहा परत गेल्याबरोबर रामरायानें बंड केलें. इब्राहीम रायचुरास होता, त्यानें आसदखानास अद्वनी किल्ल्यास वेढा घालण्यास पाठविलें. आसदखानानें रामरायाचा भाऊ व्यंकटाद्रि ह्याचा पराभव केला. पुढें उभयतांमध्यें तह होऊन इब्राहीम-शहा विजापुरास परत आला. परत आल्यावर, आपला पराक्रमी वजीर आसदखान याचा त्यानें पुष्कळ गौरव केला. थोड्याच दिवसांनीं कोंकणच्या अंमलदारानें बंड केलें तें शहानें स्वतः जाऊन मोडिलें.

कांहीं वर्षें शांततेनें कारभार केल्यानंतर आसदखानाच्या प्रामाणिक-पणाविषयीं दरबारच्या मंडळीचे मनांत हेवा उत्पन्न होऊन, त्यांनीं हळू हळू शहाचें मन त्या थोर पुरुषाविषयीं कलुषित केलें. त्यास ठार मारण्याचा प्रयत्न शहानें अनेक वेळां केला; पण तो निष्फळ झाला. राजा व प्रधान यांचें असें वांकडें पडलेलें पाहून शहाच्या शत्रूंनीं उचल घेतली; आणि निजामशहा व जमशीद कुत्ब्‌शहा, व विजयनगरचा रामराय हे सर्व एक होऊन विजापूरकरांशीं सामना करण्यास आले, ( स. १५४३ ). पण आसदखान हा एकनिष्ठ होता; तो दूर राहूनही आदिलशहाचें कल्याण चिंतून वरील शत्रूंस दाद न देण्याचा प्रयत्न करीत होता. पुढें आसदखानाच्या प्रामाणिकपणाविषयीं शहाची खात्री होऊन त्यानें त्यास अधिकारापन्न केलें. आसदखानानें युक्तीनें विजयनगर व अहंमदनगर येथील राजांशीं तह करून, गोवळकोंड्याच्या कुत्ब्‌शहाशीं लढाई करून त्याचा भराभव केला; आणि त्यास त्याच्या राजधानीस पिटाळून लाविलें. ह्या वेळीं लागलेल्या जखमांनींच कुत्ब्‌शहा पुढें लवक-रच मरण पावला. पुढच्या वर्षी अहंमदनगरच्या राजाचाही आसदखानानें पराभव केला. तरी युद्ध संपलें नाहीं. लवकरच निजामशहानें इब्राहीम-शहाचा पुनः पराभव केला. त्या वेळेपासून शहाचा स्वभाव अगदीं बदलला. तो हिंदु व मुसलमान ह्या सर्वांस क्रूरतेनें वागवूं लागला. तेव्हां दरबारच्या मंडळीनें त्यास पदच्यूत करून त्याचा भाऊ अब्दुल्ला यास तख्तावर स्थापण्याचा गुप्तपणें बेत केला. हा बेत उघडकीस आल्यामुळें अब्दुल्ला गोव्यास पोर्तुगीझ लोकांकडे पळाला. ह्या वेळीं पोर्तुगीझ लोकांनीं त्यास आश्रय देऊन विजापुरावर फौज पाठविली असती, तर दक्षिणेंत त्यांचा शिरकाव होऊन त्याच वेळेस त्या पाश्चात्य लोकांचें राज्य हिंदु-

स्थानांत स्थापन झालें असतें, पण पोर्तुगीझ लोकांनीं अब्दुल्लास कांहींच मदत केली नाहीं; तेव्हां तो गोवळकोंडा व अहंमदनगर येथील राजांकडे मदत मागण्यासाठीं गेला. पण आसदखान जिवंत असल्यामुळें ह्या खटपटीचा कांहीं उपयोग झाला नाहीं. त्यानें शहाणपणानें बंडाचा पुरा मोड केला. पुढें सन १५४९ सालीं आसदखान मरण पावला.

आसदखान हा मूळचा तुर्क असून इस्माईल आदिलशहाच्या पदरीं वाढला. त्याचें मूळचें नांव खुसृ. इस्माईलशहा लहान असतां, विजापुरावर जीं संकटें आलीं, त्यांचें निवारण आसदखानाच्या पराक्रमानें झालें. त्या पराक्रमाबद्दल शहानें त्यास आसद हा किताब व बेळगांव परगणा जहागीर दिला. पुढें वजीर व सेनापति अशीं दोनही कामें त्यानें फार दिवस केलीं. फेरिस्ता त्याची फार वाखाणणी करितो. आसदखानची राहणी महंमद गवानसारखी साधी नव्हती. तो मोठ्या थाटानें राही. आदिलशहांस त्याचा वचक मोठा असून, ते हंमेश पत्रें व नजराणे पाठवून त्याचा गौरव करीत. त्यास दुखविण्याची त्यांची छाती नसे. पोर्तुगीझ लोक मात्र त्याचा अत्यंत द्वेष करीत. त्याची कपटी वर्तणूक व खटपटी स्वभाव ह्यांचा त्यांस फार राग येई. तो कोणत्या वेळेस काय करील ह्याचा त्यांस भरंवसा वाटत नसे.

मुसलमान बादशाहींत महंमद गवानच्या खालोखाल ह्या महान पुरुषाची कीर्ति आहे. मरणसमयीं त्याचें वय शंभर वर्षांचें होतें. केवळ आसदखानच्या एकनिष्ठेनेंच विजापूरचें राज्य एवढ्या योग्यतेस चढलें. तो अत्यंत यशस्वी होता. कोणत्याही कामांत त्यास अपयश असें कधींच आलें नाहीं. तसेंच त्याचें घरचें ऐश्वर्यही मोठें होतें. इब्राहीमशहास त्याची मुलगी दिली असून तिचाच मुलगा पुढें राज्यारूढ व्हावयाचा होता. त्याच्याइतके मोठे पुरुष दक्षिणेंत फार थोडे झाले.

इब्राहीमशहाच्या कार्किर्दीचीं शेवटचीं कांहीं वर्षें निजामशहाशीं लढण्यांत गेलीं; त्यांत निजामशहास विजयनगरच्या रामरायाचें साहाय्य होतें. त्यांनीं सोलापूरनजीक इब्राहीमशहाचा पराजय केला. तेव्हां इब्राहीमच्या राज्यांत पुष्कळ बंडें झालीं. तो आजारी पडला, आणि चहूंकडून संकटांनीं घेरल्यामुळें वेड लागून वैद्य लोकांसही ठार मारूं लागला. अशा विपन्नावस्थेंत इब्राहीमशहा सन १५४७ त मरण पावला. त्याचें

दफन त्याचा बाप व आजा ह्यांच्या शेजारीं झालें. तो बराच पराक्रमी होता. विद्वान् व गुणिजनांस त्यानें आश्रय दिला होता. तरी कारकिर्दीच्या अखेरीस त्याचा स्वभाव विलासी व क्रूर बनल्यामुळें त्याच्या कीर्तीस पुष्कळ कलंक लागला.

४. अली आदिलशहा, ( सन १५७७–१५८० ).—अलीच्या मनाचा कल लहानपणापासून शियापंथाकडे होता. राज्यकारभार हातीं आल्याबरोबर त्यानें सुनीपंथ मोडून शियापंथ पहिल्याप्रमाणें पुनः चालू केला. इब्राहीमशहा मरण पावल्यावर, आसदखानचा मुलगा कीश्वरखान ह्याच्या साहाय्यानें त्यास राज्य प्राप्त झालें. अली हा पहिल्यानें मिरजेस राहत असे. तेथून विजापुरास येत असतां रस्त्यांत त्यानें मुक्काम करून नवीन शहर वसविलें; त्यास शहापूर असें म्हणातात. अलीस लहानपणींच चांगलें शिक्षण मिळालें असून तो सुस्वभावी होता. कल्याणी, व सोलापूर हे दोन किल्ले मूळचे आदिलशहाचे असून ते हुसेन निजामशहानें घेतले होते, ते परत मिळविण्याचा त्यानें विचार करून त्या कामीं विजयनगरच्या राजाचें साहाय्य घेण्याचें योजिलें. त्या हेतूनें विजयनगरास जाऊन तेथच्या राजास तो भेटला. ही भेट मोठ्या थाटाची झाली. रामरायानें अलीची बरदास्त उत्तम प्रकारें ठेविली. त्या वेळच्या राजे लोकांच्या अशा भेटीचें वर्णन वाचून त्यांच्या अप्रतीम वैभवाची कल्पना मनास गुंग करून सोडिते. पुढें रामरायाची कुमक घेऊन अलीनें सन १५५८ सालीं निजामशाहीच्या मुलखावर स्वारी केली, आणि सर्व मुलूख उद्ध्वस्त केला. तेव्हां निजामशहानें कल्याणीचा किल्ला अलीस देऊन तह केला. ह्या स्वारींत हिंदूंनीं फार अनीतीचें आचरण केलें; क्रूरपणाची सीमा केली; मोठमोठ्या इमारती व मशिदी फोडिल्या, आणि घरें जाळिलीं. पुढच्या वर्षी हुसेनशहानें अलीशीं पुनः युद्ध केलें. तेव्हां अलीशहानें रामरायास मदतीस बोलाविलें. कुत्बशहाही आदिलशहासच मिळाला. तेव्हां हे त्रिवर्ग मिळून हुसेनशहाचा पाठलाग करीत, थेट अहंमदनगरवर चालून आले. विजयनगरच्या हिंदु फौजेनें ह्या प्रसंगीं पहिल्यापेक्षां फारच अनर्थ केला, आणि मुसलमानांस चीड येण्याजोगीं कृत्यें केलीं. त्यावरून सर्व मुसलमान राजांनीं मोठी एकी करून विजयनगरवर स्वारी केली, आणि सन १५६५ त तालिकोटची लढाई

जिंकून त्या राज्याचा कायमचा नाश केला. ती हकीकत विजयनगरच्या प्रकरणीं येईल.

तालिकोटनंतर दोन तीन वर्षांनीं निजामशहाचें आदिलशहाशीं वांकडें येऊन लढाया झाल्या; आणि विजापूरचे कित्येक प्रांत मूर्तुजा निजामशहानें घेतले. सन १५७१ सालीं आदिलशहा व निजामशहा ह्या दोघांनीं मिळून किनाऱ्यावरील पोर्तुगीझ लोकांस घालवून देण्यासाठीं फौजेसह स्वाऱ्या केल्या. गोव्यावर अली आदिलशहानें स्वारी केली; आणि चौल ऊर्फ रेवदंडा बंदरावर निजामशहानें स्वारी केली. पण उभयतांसही पोर्तुगीझ लोकांच्या हातून पराभव पावून मागें परतावें लागलें. सन १५७२ त अश्वनीचा मजबूद किल्ला अलीनें घेतला. ह्या वेळीं पूर्वीचे विजयनगरच्या ताब्यांतील कित्येक सरदार व किल्लेदार आपापल्या ठाण्यांत स्वतंत्र झाले होते, त्यांवर अलीनें शस्त्र धरून त्यांस आपला तावा कबूल करण्यास लाविलें. दक्षिणेंत कित्येक स्त्रीराज्यें होतीं तीं सुद्धां आदिलशहानें जिंकिलीं. त्याच्या लष्करचें काम मुस्तफाखानाकडे होतें. सर्व वसुलाच्या कामावर शहानें एका ब्राह्मणाची नेमणूक केली होती.

सन १५८० सालीं अली आदिलशहाचा एका खोजानें खून केला. त्यास विजापुरींच पुरिलें. त्याच्या कबरेस रोझा अली असें म्हणतात. जुम्मामशीद, शहराचा तट व रस्तोरस्तीं पाण्याचे नळ, हीं कामें त्याच्या कारकिर्दीत झालीं. हा शहा विद्वान्, धर्मनिष्ठ व परोपकारी होता.

**इब्राहीम आदिलशहा, [ दुसरा ] ( स. १५८०–१६२६ ).**— अली आदिलशहाचा भाऊ शहा तह्मास्प् म्हणून होता. त्याचा मुलगा इब्राहीम यानें आपल्यामागून तख्तावर बसावें, असें मरण समयीं अलीनें ठरवून ठेविलें होतें. इब्राहीम केवळ नऊ वर्षांचा होता. कामिलखान व चांदबिबी यांजकडे सर्व कारभार होता. पण कामिलखानानें सर्व सत्ता बळकाविण्याचा प्रयत्न केल्यामुळें, त्यास कैद करून कीश्वरखान याजकडे तिनें सर्व कारभार दिला. ह्या कीश्वरखानाचें वर्तन कामिलखानासारखेंच होतें. त्यानें मुस्तफाखान यास ठार मारिलें आणि चांदबिबीस साताऱ्याच्या किल्ल्यावर ठेवून सर्व कारभार स्वतःकडे घेतला. पुढें तो लवकरच लोकांस अप्रिय होऊन त्यांच्या रागाच्या तडाक्यांत

सांपडणार होता. पण संधि साधून प्रथम तो अहंमदनगरास पळून गेला. तेथें आश्रय न मिळाल्यामुळें तो गोवळकोंड्यास गेला. तेथें मुस्तफाखानाच्या एका नातलगानें त्यास ठार मारिलें. नंतर इख्लास-खान व दुसरे हबशी सरदार यांनीं राणीस मुक्त करून तिच्या हातांत कारभार दिला. तरी विजापूरचा गोंधळ संपला नाहीं. अहंमदनगर व गोवळकोंडा येथील राजांस ही संधि चांगली वाटून ते विजापूरवर चाल करून आले. विजापूरचें राज्य बुडून तें या दोघां राजांच्या हातीं जाणार असा रंग दिसूं लागला. त्याच वेळीं किल्ल्याची थोडीशी भिंत पावसानें पडली.

अशा वेळीं अबुल् हुसेन नांवाच्या इसमानें शर्थ करून शहर बचा-विलें. दिलावरखान म्हणून दुसरा एक शूर सरदार होता, त्यानें शत्रूंस मागें हटविण्याची पुष्कळ खटपट केली. एक वर्षभर विजापुरास वेढा पडला होता; पण सरते शेवटीं निजामशहा व कुत्व्शहा ह्यांचें कांहीं एक न चालतां त्यांस परत जावें लागलें. दिलावरखानानें पुढें अबुल् हुसेन यास ठार करून आपण मुख्य प्रधान झाला. पुढें पुष्कळ दिवसपर्यंत त्यानें राज्यकारभार चांगल्या रीतीनें केला. सन १५८४त शहाची बहीण खुजा सुलताना इचें निजामशहाच्या मुलाशीं लग्न होऊन तिजबरोबर चांदबिबी अहंमदनगरास गेली, ती पुनः विजापुरास आली नाहीं. सन १५९६ मध्यें गोवळकोंड्याच्या राजाच्या मुलीशीं शहाचें लग्न झालें, पण हा संबंध निजामशहास पसंत पडला नाहीं. पुढें शहा जसजसा वयांत येऊं लागला, तसतसा राज्यकारभार स्वतःच्या हातीं घेण्याविषयीं तो उत्सुक झाला; पण दिलावरखान त्यास अधिकार देईना. शहावर सक्त पाहरे असत. ते सर्व चुकवून शहा रात्रीं वाड्यां-तून पळून ऐन्-उल्मुल्क् नामक सरदाराच्या छावणींत गेला. दिलावर-खानानें त्यास पकडण्याविषयीं केलेले यत्न निष्फळ झाल्यावर, तो वृद्ध कारभारी पळून अहंमदनगरास गेला. त्याबरोबर प्रसिद्ध इतिहासकार फेरिस्ता होता. तो कांहीं दिवसांपूर्वी इब्राहीमशहाकडे येऊन राहिला होता. अहंमदनगरकडे आश्रय न मिळाल्यावर दिलावरखान भटकूं लागला, त्यास इब्राहीमशहानें फसवून विजापुरास आणिलें, आणि अंध करून साताऱ्यास कैदेंत ठेविलें. तेथें तो पुढें दहा वर्षांनीं मरण पावला, तेव्हां त्याचें वय नव्वद वर्षांचें होतें.

सन १५९६ त शहाचा भाऊ इस्माईल ह्यानें स्वतःस विजापूरचें राज्य मिळण्यासाठीं बंड केलें. शहानें त्यास पकडून तोफेच्या तोंडीं दिलें. सन १५९४ त अहंमदनगरशीं लढाई होऊन निजामशहा मारला गेला. पुढें इब्राहीमशहानें निजामशहाशीं तह केला. ह्यानंतर अहंमदनगर व विजापूर ह्यांजमध्यें युद्ध झालें नाहीं.

इब्राहीमशहाची कारकीर्द अखेरीस फार भरभराटीची व प्रजेस हितावह अशी झाली. ह्याच वेळेस अकबर बादशहा आपलें सैन्य घेऊन दक्षिणेवर आला. तेव्हां अहंमदनगरच्या राजास मदत करण्याकरितां इब्राहीमनें आपली फौज पाठविली; पण सुपें येथें अकबराच्या सैन्यानें तिचा पराभव केला. सन १६०३मध्यें आदिलशहानें अकबरास पुष्कळ नजराणे वगैरे देऊन तह केला; आणि त्यानें आपली मुलगी अकबराचा मुलगा दानियाल ह्यास दिली. ह्या सर्व सलोख्याच्या वर्तनानें अहंमदनगरप्रमाणें विजापूरवर मोगलांची धाड ह्या वेळेस आली नाहीं. इब्राहीमशहा सन १६२६ त मरण पावला. त्या वेळीं त्याचें वय ५६ वर्षांचें होतें.

विजापूरच्या सर्व शहांमध्यें हा फार मोटा व यूसुफ्शहानंतर पुष्कळ पराक्रमी व लोकप्रिय झाला. तो कलहप्रिय नव्हता. त्यानें आपला काळ राज्यसुधारणेंत घालविला. तोडरमल्लानें मोगली राज्यांत जी वसुलाची पद्धत बांधून दिली होती, तीच ह्यानें विजापूरचे राज्यांत चालू केली. जमिनीची मोजणी करून ह्या वेळेस जे दर त्यानें ठरविले, त्यांचे अवशेष अजूनही कोठें कोठें दृष्टीस पडतात. ह्यानें तख्तावर बसल्याबरोबर शियापंथ मोडून सुनीपंथ चालू केला होता; तरी धर्माच्या बाबतींत हा अतिशय समबुद्धि असून सर्वांस सारखें वागवीत असे. त्याच्या कारकिर्दींत हिंदूंस त्रास झाला नाहीं, इतकेंच नाहीं, तर लष्करी व इतर खात्यांत ब्राह्मण व मराठे ह्यांचाच पुष्कळ भरणा होता. पोर्तुगीझ लोकांस जिंकणें दुरापास्त आहे असें पाहून त्यांजशीं त्यानें सख्य ठेविलें. पोर्तुगीझ व्यापारी विजापुरास पाहिजे तो व्यापार मोकळेपणानें करीत. वाडे वगैरे रंगविण्यासाठीं पोर्तुगीझ चित्रकार ठेविलेले होते. क्रिस्ती लोकांच्या धर्मोपदेशकांस त्यानें चांगला आश्रय दिला. इब्राहीमची अशी कीर्ति आहे, कीं अकबरापेक्षांही धर्माच्या बाबतींत तो कांकणभर

ज्यास्त उदार होता. त्यानें आपल्या राज्यांत बांधिलेलीं क्रिस्ती देवळें अद्यापि हयात आहेत. हल्लीं तीं गोवें येथील धर्माध्यक्षाच्या ताब्यांत आहेत.

त्याच्या वेळेस मोठमोठ्या प्रेक्षणीय इमारती बांधल्या गेल्या. त्याची स्वतःची मशीद विजापुरास आहे, ती अद्यापि त्या वेळच्या कारागिरींतील नैपुण्याची साक्ष देत आहे. तिचें काम छत्तीस वर्षे चाललें असून, तिला बावन लाख रुपये खर्च झाला. विजापूर शहराचा विस्तारही त्या वेळेस फार झाला.

मृत्युसमयीं शहाच्या खजिन्यांत मुबलक द्रव्य होतें. त्याजपाशीं ऐशीं हजार स्वार सदैव लढण्यास तयार असत. त्याच्या राज्याची सीमा म्हैसुरास भिडली होती. इब्राहीमच्या पश्चात् त्याचा मुलगा महंमद हा तख्तावर बसला.

**७. महंमद आदिलशहा, ( स. १६२६–१६५६ ).**—ही कारकीर्द दक्षिणच्या इतिहासांत फार महत्त्वाची आहे. कारण दक्षिणेंतलि मुसलमानी राज्यें जिंकून तेथें आपला अंमल दिल्लीचे पराक्रमी मोगल बादशहा बसवीत असतां, फार वर्षे परचक्राखालीं त्रास पावलेले दक्षिणचे पाणीदार मराठे लोक ह्या वेळेस स्वराष्ट्रोन्नतीसाठीं झगडूं लागून उदयास आले. म्हणून ह्या वेळची हकीगत सविस्तर देणें इष्ट आहे. इब्राहीमशहा मरण पावल्यावर त्याच्या इच्छेनुरूप त्याचा मधला मुलगा महंमद हा आदिलशाही तख्तावर बसला. त्यानें आपल्या वडील भावास अंध करून व इतरांचीं बोटें वगैरे तोडून, त्यास राज्याचे निरुपयोगी करून टाकिलें. ज्यांनीं त्यास मदत केली होती त्यांस त्यानें इनामें, किताब वगैरे दिले. आरंभींच निजामशहानें विजापूरचे मुलखावर एक दोन स्वाऱ्या केल्या, पण त्यांत त्यांचाच पराभव झाला.

बंकापूर येथें कदमराव म्हणून एक विजापूरचा मांडलिक होता. त्यानें बंड केलें, म्हणून शहानें मीर्झा अलीस फौज देऊन त्याजवर पाठविलें. मीर्झा अलीनें कदमरावास पकडून, सन १६२८ त ठार मारिलें, आणि आपण विजापुरास परत आला.

ह्याच संधीस जहांगीर बादशहा मृत्यु पावून, त्याचा पराक्रमी पुत्र शहाजहान दिल्लीच्या तख्तावर बसला. सर्व हिंदुस्थान मोगल बाद-

हीच्या ताब्यांत आणण्याचा त्याच्या आजाचा उद्देश त्याचे मनांत सतत घोळत होता. स्वतः दक्षिणेंत फार दिवस राहिला असल्यामुळें, त्याचा हा विचार फारच दृढ झाला. मलिकंबराच्या मागून निजामशाहीस कोणी त्राता राहिला नाहीं हें त्यास कळून चुकलें होतें. इकडे विजापूरचा महंमद आदिलशहा हा मोगलांशीं सख्य करून निजामशाही बुडवून तिचा कांहीं भाग मिळविण्यास इच्छीत होता. कदमरावाशिवाय मुरारराव नामक दुसरा एक मराठा जहागीरदार आदिलशहाच्या पदरीं होता. निजामशाही बुडविण्यास आपण कारण होऊं नये, असें मुरारराव व दुसरे सरदार यांच्या मनांत होतें, पण आदिलशहाचा मुख्य सल्लागार मुस्तफाखान हा असून त्याची महत्त्वाकांक्षा अनावर होती. शहाजहान हा आदिलशहासही मोजीत नव्हता. सवड सांपडेल त्याप्रमाणें सर्व दक्षणी राज्यें जिंकण्यास त्यानें मोठी फौज रवाना केली. प्रथमतः खानजहान लोदीनें दक्षिणेंत बादशहाविरुद्ध बंड उभारलें होतें. तें मोडण्याची ह्या फौजेस ताकीद होती. खानजहान लोदी मारला गेल्यावर मोगल सैन्य निजामशाहीवर आलें. मूर्तुजा निजामशहानें आदिलशहापाशीं मदत मागितली. पण मदत जाण्यापूर्वींच त्याचा खून होऊन फत्तेखान मोगलांस मिळाला. नंतर मोगल फौजेनें विजापुरावर चाल केली. ह्या फौजेचा मुख्य नूरजहानचा भाऊ आसफखान हा होता, त्यानें विजापुरास वेढा घातला. पण आदिलशाही फौजेनें मोगलांची पुरी खोड मोडिली. मुराररावानें हल्ले करून त्यांस इतकें जेरीस आणिलें, कीं ते विजापूरच्या मुलखांतून पाय काढून पळून गेले. मुरारराव परिंड्याचे किल्ल्यावर गेला. त्या किल्ल्यावर मुल्क्-इ-मैदान (रणभूमीचा राजा) नांवाची प्रसिद्ध तोफ होती. आतां ती महांकाळी नांवानें प्रसिद्ध आहे. पूर्वीं हा किल्ला निजामशहाच्या ताब्यांत होता, त्या वेळीं ही तोफ चलीबी रूमीखाननें निजामशहाचे हुकुमावरून अहंमदनगरापासून एक कोशावर ओतली असून, तालिकोटच्या लढाईंत रामरायावर जातांना हुसेन निजामशहानें बरोबर घेतली होती. ही अष्ट धातूंची ओतलेली आहे. हिचें वजन ६० खंडी आहे असें म्हणतात. पण एका इंग्रज कामगाराचें मत असें आहे, कीं तिचें वजन ४० खंडी किंवा बत्तीस हजार रत्तल आहे. लांबी १४ फूट व परीघ तितकाच आहे. तोंडाच्या पोक-

ळीचा व्यास बरोबर २ फूट ४ इंच आणि जाडी १ फूट आहे. हिच्या तोंडास सिंहाच्या जबड्याचा आकार आहे, आणि त्यानें तोंडांत हत्ती धरिला आहे असें दाखविलें आहे. औरंगजेबानें विजापूर घेतलें, तेव्हां हिच्यावर कांहीं लेख कोरून ठेविला आहे. भाविक लोक अजून तिची पूजा करितात. लोकांनीं वरचेवर हात फिरविल्यामुळें ती साफ चकचकीत होऊन तिच्यांत पाहणाराचें रूप दिसतें. ही तोफ महंमद आदिलशहानें हुकूम पाठवून मुराररावाकडून परिंड्याहून विजापुरास आणविली. दुसरी कडकबिजली म्हणून एक तोफ होती, ती आणण्यासही त्यास हुकूम झाला होता; पण आणतांना ती रस्त्यांत कृष्णा नदींत बुडाली, ती अद्यापि तेथें दिसते.

आसफखानाचा पराभव झालेला ऐकून शहाजहाननें महाबतखानास दक्षिणेंत पाठविलें. त्यानें दौलताबादचा किल्ला घेऊन निजामशाही बुडविली. त्या वेळींही आदिलशहानें मुरारराव व रणदुल्लाखान या सरदारांस पाठवून निजामशहास मदत केली. ह्या कृत्याचा शहाजहानास अत्यंत त्वेष येऊन त्यानें आपल्या फौजेचा मोर्चा विजापूरवर फिरविला. अशा अडचणीच्या प्रसंगीं शहाजीसारख्या मसलती सरदाराचें आपणास पाठबळ असावें अशी महंमद आदिलशहास इच्छा उत्पन्न झाली. शहाजी फार हुशार, महत्त्वाकांक्षी, व रणधुरंधर होता. तो ह्या वेळेस निजामशाहीचा पुनः उद्धार करण्याच्या खटपटींत होता. जुन्नरचा कारभारी श्रीनिवासराव यास पकडून शहाजीनें त्याचे सर्व प्रांत आपणाकडे घेतले, बारा हजार स्वार नोकरीस ठेवून आपली मोठी मजबुदी केली, आणि निजामशहास आपल्या ताब्यांत घेतलें. महाबतखान शहाजीवर फौज घेऊन आला, पण विजापूरकरांच्या मदतीनें शहाजीनें महाबतखानास परत लाविलें. येणेंप्रमाणें शहाजी हा वेळ पडेल तसा निजामशाही मुलूख अंगाखालीं घालून, विजापूरकरांशीं सख्य ठेवून स्वतःचें वर्चस्व कायम राखीत होता.

सन १५३५ सालीं विजापूरचा दिवाण खवासखान व त्याचा अंकित मुरारराव हे दोघेही आपणास भारी आहेत, असें समजून आदिलशहानें दोघांचाही वध करविला. ह्या खवासखानानें शहाजहान बादशहास विजापूरवर येण्याविषयीं आमंत्रण पाठविलें होतें. शहाजी प्रबळ

१८-७९१-२०००

झाला आहे त्याचा मोड केला पाहिजे, आणि खवासखानानें कळविल्या-प्रमाणें विजापूरवर आपला हात फिरविला पाहिजे; अशा उद्देशानें शहाजहान स. १५३५त स्वतः दक्षिणेंत आला; आणि त्यानें खान दौरान नामक आपला शूर सरदार विजापूरवर पाठविला. शहाजी भोसले व रणदुल्लाखान ह्या दोघांनीं हरप्रयत्न करून, मोगल फौजेचें कांहीं एक चालूं दिलें नाहीं. रणदुल्लाखानानें तर मोगल फौजेस अन्नपाणी सुद्धां मिळूं दिलें नाहीं. पण त्यामुळें मोगलांनीं विजापूरचा पुष्कळ प्रदेश ओसाड पाडिला; तेव्हां महंमदशहानें शहाजहानबरोबर तह केला. ह्या तहानें निजामशाहीच्या मुलखापैकीं पुष्कळ मुलूख त्यास मिळाला, आणि आदिलशहानें दरसाल शहाजहानास खंडणी देण्याचें कबूल केलें. त्याच वेळेस शहाजी राजे भोसले ह्यानें निजामशहास मोगलांच्या स्वाधीन करून शहाजहानच्या परवानगीनें आदिलशहाची नोकरी पत्करिली.

मोगलांशीं तह झाल्यानंतर अहंमदशहानें आपला काळ राज्यव्यवस्था करण्यांत घालविला. तसेंच थेट दक्षिणेकडील कित्येक लोक खंडणी वगैरे वेळेवर देत नसत, ती त्यांजकडून वसूल करण्याचे कामीं रणदु-ल्लाखान व शहाजी भोसले यांचें त्यानें साहाय्य घेतलें. शहाजी कर्नाट-कांत कामगिरीवर असतां त्याचा मुलगा शिवाजी पुण्याकडे होता. त्या पराक्रमी मुलानें घांटमाथ्यावरील पुष्कळ किल्ले बळकाविले. विजापूरकरांस हें सहन झालें नाहीं. इकडे मुस्तफाखान व शहाजी यांचेंही वांकडें आलें, तेव्हां बाजीराव घोरपडे नामक सरदारास त्याजवर पाठवून मुस्तफाखानानें शहाजीस कैद करविलें, आणि त्याची मालमत्ता जप्त केली. तो दोन तीन वर्षें कैदेंत होता. पुढें शिवाजीनें मोगलांचा शह आणवून बापाची सुटका केली, ही हकीकत मराठ्यांच्या भागांत यावयाची आहे.

सन १६५६त महंमद आदिलशहा मरण पावला. त्यानें राज्य चांगल्या प्रकारें केलें. त्याच्या कार्किर्दींत विजापूर शहर अत्यंत विस्तृत व शोभिवंत झालें. तो स्वतः विलासी होता, तरी त्याचें सर्व लक्ष प्रजा-रक्षणाकडे असे. परदेशचे राजे त्यास फार मान देत. त्याजपाशीं ऐशीं हजार स्वार, दोन लक्ष पन्नास हजार पायदळ, व पांचशें हत्ती इतकी

फौज जय्यत असे. त्याच्या राज्याचा वसूल वीस कोटी होता. त्यानें एक मशीद बांधिली, तिच्या घुमटाइतकें मोटें घुमट दुसऱ्या कोठेंही नाहीं. ज्या शास्त्रीय पद्धतीवर तें बांधिलें आहे ती युरोपच्या पद्धतीहूनही वरचढ आहे, असें त्या शास्त्रांतील पंडित मि. फर्ग्युसन ह्यानें लिहून ठेविलें आहे.

**७. अली आदिलशहा, [दुसरा], (स. १६५६–१६७२).**—मागील शहाचा मुलगा अली आदिलशहा हा तख्तावर आला, त्या वेळेस शहाजहानचा पराक्रमी पुत्र औरंगजेब दक्षिणेंत होता. आपल्या परवानगीशिवाय अलीनें राज्यपद स्वीकारिलें ह्या सबबीवर औरंगजेबानें मीर जुम्ला यास विजापूरवर पाठविलें. मोगल फौजेनें विजापुरास वेढा घातला. तें शहर त्याच वेळेस मोगलांचे ताब्यांत गेलें असतें, पण वेढा चालू असतां दिल्लीस शहाजहान बादशहा आजारी पडला, तेव्हां विजापूरकरांशीं कसाबसा तह करून, औरंगजेब दिल्लीस निघून गेला, ( स. १६५७ ).

वास्तविक पाहतां आदिलशाहीस ह्या वेळेस दोन मोठे शत्रू उत्पन्न झाले होते, एक शिवाजी भोसले, व दुसरा दिल्लीचा मोगल बादशहा. निजामशाहीची शहाजहाननें वांटणी केली, त्यांत कोकणचा बहुतेक प्रांत आदिलशहाचे वांटणीस आला होता. त्यापैकींच पुणें व सुपें हे दोन परगणे शहाजीस जहागिरीदाखल दिलेले होते. शहाजीची कर्नाटक प्रांताकडे नेमणूक झाली, तेव्हां ह्या परगण्यांची वहिवाट शिवाजी करीत होता. ह्याच ठिकाणीं राहून शिवाजीनें आपले पुढचे सर्व बेत रचिले. शिवाजीचा बंदोबस्त वेळींच करावा, ह्या हेतूनें आदिलशहानें अफ्झलखान नामक सरदारास मोठी फौज देऊन त्याजवर पाठविलें. त्याच्याबरोबर मोठी फौज असल्यामुळें, उघड रीतीनें लढाई करून आपला निभाव लागणार नाहीं असें पाहून, शिवाजीनें त्यास नम्रतादर्शक एक पत्र लिहून कित्येक प्रांत परत दिले. त्यानें अफ्झलखानाकडे वकील पाठवून नम्रतापूर्वक विनंति करून, त्यास प्रतापगडावर मेजवानीस बोलाविलें. तो गाफीलपणानें किल्ल्यावर येतांच, त्याजवर शिवाजीनें हत्यारबंद लोकांनिशीं चालून जाऊन त्यास ठार मारिलें. तें समजतांच

त्याची सर्व फौज पळून गेली.* दुसऱ्या वर्षी सीदी जौहर नामक सरदाराची शिवाजीवर नेमणूक झाली. पण तो आंतून शिवाजीशीं सलोख्यानें वागूं लागला; तेव्हां आदिलशहानें स्वतः शिवाजीवर कूच केलें. पन्हाळा किल्ला शहाचे हातांत आला; आणि शिवाजी डोंगरी रस्त्यानें पळून गेला, तो त्यास सांपडेना. तेव्हां अशा बिकट जागेंत आपल्या सैन्याच्या हातून शिवाजीचा शोध लागणार नाहीं असें पाहून, त्याचा नाद सोडून शहा विजापुरास परत गेला.

पुढें सीदी जौहरनें बंड केलें त्याजवर बादशहानें स्वतः स्वारी केली. तो अनेक ठिकाणीं पळाला व शेवटीं मरण पावला. बेदनूरचा अधिकारी भद्रनाईक यानें बंड केलें होतें, तेंही शहानें मोडिलें. इकडे शिवाजीची पुंडाई फार माजली. विजापूरकर व मोगल या दोघांसही त्याचा धाक पडत चालला. तेव्हां औरंगजेबानें विजापुरास वकील पाठविले, कीं उभयतांनीं मिळून शिवाजीवर दोहोंकडून फौज पाठवावी. तें आदिलशहानें कबूल करून वकील परत पाठविले. तेव्हां औरंगजेबानें जयसिंहास मोठ्या फौजेनिशीं दक्षिणेंत रवाना केलें. तसेंच विजापूरहून खवासखान नांवाचा सरदार शिवाजीवर आला. दोनही फौजा एकत्र होण्यापूर्वींच खवासखान शिवाजीवर आल्यामुळें, एका अवघड जागीं उभयतांची निकराची लढाई झाली. मराठ्यांनीं विलक्षण पराक्रम केला, पण अखेरीस त्यांस रणांगण सोडून पळून जावें लागलें. इतक्यांत जयसिंह येऊन ठेपलाच. शिवाजी पुरंदर किल्ल्यावर होता. त्यास जयसिंहानें वेढा घातला. आतां आपला इलाज नाहीं असें पाहून शिवाजीनें जयसिंहास कळविलें, कीं 'मोगलांस जर आदिलशाही व दाक्षिण देश जिंकणें असेल, तर त्यांनीं माझ्या सारख्याशीं दोस्ती करावी; म्हणजे मी हें काम तेव्हांच फत्ते करून देईन.' जयसिंहानें ही गोष्ट कबूल केली, शिवाजीशीं स्नेह केला, आणि पुरंदरचा वेढा उठवून विजापूरचा मुलूख लुटण्यास सुरुवात केली. अली आदिलशहास

---

* अफ्जलखानाच्या मरणाची हकीकत विजापूरच्या इतिहासांत अशा प्रकारची आढळते. विजापूरच्या इतिहासापुरताच येथें ह्या गोष्टीचा उल्लेख केला आहे. तिचें विस्तृत विवेचन मराठ्यांच्या भागांत येईल.

मोगलांच्या वचनभंगाचा मोठा चमत्कार वाटला. त्यानें मोगलांशीं लढण्याची जंगी तयारी केली. एक दोन लढाया झाल्या, त्यांत जयसिंहाचा पराजय झाला. सलाबतखान म्हणून एक सरदार दिल्लीहून येत होता, त्याचाही सर्जाखान नामक विजापूरच्या सरदारानें पराभव केला. पुढें गोवळकोंड्याच्या कुत्बशहाकडून आदिलशहास मदत आली. ह्या दोन फौजांनीं जयसिंहास अगदीं जेरीस आणिलें. जयसिंहास तोंड दाखविण्यास जागा उरली नाहीं. दिल्लीहून पत्रें येत, कीं ' जयप्राप्ति न झाल्यास तुम्हांस शिक्षा करण्यांत येईल.' सर्जाखान, व खवासखान हे विजापूरचे सरदार कट्या अभिमानानें लढत होते. एके दिवशीं सर्जाखानाचा मुलगा अडचणींत सांपडला असतां तो त्याचे मदतीस गेला. विजापूरच्या फौजेस जयप्राप्ति झाली; पण त्यांत सर्जाखान घोड्यावरून पडून मरण पावला, म्हणून विजापूरकरांची बाजू पुष्कळ खचली आणि जयसिंहास धीर आला. पण पुनः एक निकराचा युद्धप्रसंग होऊन जयसिंह मरतां मरतां वांचला आणि पळ काढून दिल्लीकडे गेला.

ह्याप्रमाणें अली आदिलशहानें स्वतःच्या कार्किर्दींत शिकस्त करून विजापूरचें संरक्षण केलें. हा विषयी होता, तरी नियमितपणानें वागून प्रजापालनाच्या कामीं त्यानें चांगलें लक्ष पुरविलें. तो स्वतः कवि असून विद्वानांस चांगला आश्रय देई. त्याच्या जवळ अनेक फारशी कवि होते. दरबारांत पुष्कळ वैमनस्यें होतीं, पण तो जिवंत असतांना तीं उघडकीस आलीं नाहींत. धर्माजी पंडित वगैरे कित्येक हुशार दक्षणी गृहस्थ त्याचे पदरीं होते. अली आदिलशहा इ. स. १६७२ त मरण पावला. त्यानें हसनी महाल, आरसेमहाल, वगैरे इमारती बांधिल्या, आणि विजापूरची शहापेठ वसविली.

**८. सिकंदर आदिलशहा, ( स. १६७२–१६८६ ).**—अनुभविक मुत्सद्दी अब्दुल महंमद घरीं बसला; आणि खवासखानानें अलीचा पांच वर्षांचा मुलगा सिकंदर ह्यास तख्तावर बसवून कुलमुखत्यारी आपणाकडे घेतली. ह्यामुळें दरबारांत सर्वत्र घोटाळे उत्पन्न होऊन शत्रूंचें आयतेंच साधलें. विजापूरकरांचा पहिला शत्रु शिवाजी ह्यानें पन्हाळा किल्ला परत घेतला. तेव्हां त्याजवर बुहलोलखान लोदीची रवानगी झाली. त्यानें शिवाजीच्या फौजेचा चांगलाच समाचार घेतला. दुसरा शत्रु औरंग-

जेब. त्यानें बहादूरखानास दक्षिणचा सुभेदार नेमिलें होतें. खवासखानानें युक्तीनें बहादूरखानाशीं तह केला. पण विजापूरच्या दरबारीं अनेक घोटाळे झाल्यामुळें शांतता फार दिवस टिकली नाहीं. पठाण लोकांचा पगार तुंबला होता, त्यासाठीं त्यांनीं दंगा केला. तसेंच चिंतो चिमणाजी नांवाच्या एका ब्राह्मणानें शहरांत कहर उडवून दिला. तो वाटेल त्या इसमापासून पैसे उपटूं लागला, तें कोणाच्यानेंही बंद करवेना. दिल्लीचा सरदार दिलेरखान ह्यानें विजापूर जिंकण्याच्या कामीं होते तितके प्रयत्न केले, ते तडीस गेले नाहींत. त्यामुळें दिलेरखानाची अपकीर्ति होऊन तो पुढें लवकरच मरण पावला.

सन १६८३ सालीं औरंगजेब दक्षिणदेश जिंकण्यासाठीं स्वतः फौज घेऊन आला. विजापूरकरांस संभाजीची मदत होती. आदिलशाही जिंकण्याच्या इराद्यानें औरंगजेब सर्व फौजेसह विजापूरवर आला. ह्या वेळीं विजापूरच्या गादीवर सिकंदर आदिलशहा असून तो फक्त सोळा वर्षांचा होता. त्याजपाशीं चतुर मुत्सद्दी कोणी नव्हते. औरंगजेबानें शहरास वेढा दिला, तेव्हां आंत आकांत उडाला. सर्व लोक भयभीत झाले. पुरातनपासून चालत आलेली बादशाही आतां बुडणार आणि लढाई करण्याची ताकद कोणांत नाहीं, असें पाहून सिकंदरशहा औरंगजेबास शरण गेला. औरंगजेबानें त्यास सालीना एक लाखांची नेमणूक करून देऊन औरंगाबादेस अटकेंत ठेविलें; आणि विजापूरचें राज्य मोगल राज्याखालीं आणिलें, (ता. १५ ऑक्टोबर, १६८६ ). सन १७०१ सालीं सिकंदरशहास औरंगजेबानें विष घालून मारिलें. विजापूरचें राज्य १९७ वर्षें मोठ्या भरभराटीनें चाललें.

९. **आदिलशाहीचें समालोचन.***—यूसुफ् बेगनें कुस्तंतुनियाच्या राजवंशांत जन्म घेऊन, गुलाम मंडळींत जागा मिळवून, आपल्या प्रारब्धाचे कित्येक दिवस इराणांत कंठिले, व कालांतरानें हिंदुस्थानांतील दाभोळसारख्या बंदरीं येऊन, बेदरच्या बहामनी राजाकडे चोपदारी पत्करिली. पुढें आपल्या बाहुबलानें हजारों जेठींस जिंकून ब्रीद बांधून आलेल्या पहिलवानांस चीत करून, त्यानें पांच गांवांची सनद मिळविली.

---

* प्रो. बा. प्र. मोडक यांच्या विजापूरच्या इतिहासावरून.

नंतर सरदारी संपादन करून, आपल्या राज्यकारस्थानपटुत्वानें बहामनी राज्यांतील बेबंदशाही मोडून, विजापूरसारख्या शहरीं आदिलशाही राज्याची स्थापना केली, व आपल्या वंशजांस राज्यप्राप्ति करून दिली. कित्येक बाजार व व्यापारासाठीं पेठा वसवून आणि अनेक अजस्र तट बांधून शहरास शोभा आणिली. तेवीस वर्षें सुखानें राज्य केलें. बेदर, अहंमदनगर, सोलापूर, परिंडा, मिरज इत्यादि किल्ल्यांचीं विशाल व मजबूद कामें ह्या कारकिर्दीत होऊन, आदिलशाहीचा कीर्तिसूर्य उगवला. त्याच्यामागून इस्माईलच्या कारकिर्दीत तर तो कीर्तिसूर्य बराच वर आला. सव्वीस वर्षें राज्य करून, नानाप्रकारचे विलास भोगून, व बंडें मोडून शांतता करीत असतां, त्यानें समरभूमीस देह समर्पण केला. त्यानें चंपामहाल व मुद्गल हे किल्ले बांधिले. त्याच्यामागून थोडे दिवस मल्लूनें राज्य केल्यानंतर, इब्राहीम गादीवर येतांच, गोव्यापासून मिरजेपर्यंत गांवेंच्या गांवें जाळून पोळून उजाड करणाऱ्या पोर्तुगीझ लोकांचा त्यानें चांगला बंदोबस्त केला. अर्क किल्ल्यास उत्तम दगडी कोट बांधून, इब्राहीमपूर शहर वसविलें. ह्याचे वेळीं निंबाळकर, घाडगे, घोरपडे, डफळे, माने, सावंत इत्यादि अनेक मराठे सरदार उदयास आले. ह्यानें पंधरा वर्षें राज्योपभोग घेतल्यानंतर अलीशहा तख्तनशीन झाला. विजयनगरचें प्राचीन, संपन्न व बलाढ्य राज्य नाहींसें करून, रामरायासारख्यास त्यानें बंदीवान केलें. सत्कर्मांत अपार संपत्तीचा विनियोग केला. गगनमहाल, जुम्मामसीद, शहाबुरूज, महाबुरूज ह्यांसारखीं सुंदर कामें उठविलीं. ह्यानें एकवीस वर्षें राज्योपभोग घेतला. पुढें विलासी व गाण्याचा शोकी, परंतु शूर व शहाणा इब्राहीमशहा तख्तावर येऊन त्यानें ईश्वरकृपेनें 'जगद्गुरु' हें नांव मिळविलें, व ४७ वर्षांच्या मोठ्या कारकिर्दीत नवरसपूर, नवरसमहाल, सात मजली माडी, आनंद महाल, आरसे महाल, अशीं सुंदर व रम्य स्थळें बांधून, त्यांवर जणूं काय आपल्या माध्यान्ह कुलकीर्तिसूर्यास विसावा दिला. त्याचा अनुगामी सुलतान महंमद ह्यानें मुल्क्-इ-मैदानसारख्या भयंकर तोफांचीं तोंडें शत्रुवक्षःस्थल विदारण्यास तयार ठेवून, मोगलांसारख्यांच्या प्रचंड प्रतापास दाद दिली नाहीं. बाले घुमटासारख्या उत्तम इमारती तयार करविल्या. ह्याच्यापुढें नवरत्नखचित

शिरपेंच लटकलेले हजारों मानकरी, सरदार, अमीर उमराव आणि वडे लोक लीनतेनें उभे असत. रत्नभूषणांनीं शृंगारिलेले शेंकडो हत्ती सज्ज असत. हा नुसता शहरांत फिरावयास गेला, तरी ह्याजवर लोक सोन्यारुप्याचीं फुलें उधळीत. ह्याच्याबरोबरच्या जिलिबीच्या हजारों घोड्यांच्या जिनांस हिरे, मोत्यें, पाच, माणकें वगैरे लटकलेलीं असत. वारंवार द्रव्याची तुळा करून तें तो गोरगरीब व फकीर ह्यांस वांटी. अशा थाटमाटांत व विलासांत शत्रूंचा फडशा पाडून, यानें आपली कार्कीर्द लोटल्यावर अलीस राज्यपदप्राप्ति झाली. अलीच्या कार्किर्दींत अवघ्या विजापूर प्रांतांत सोन्याचा धूर निघत होता. ह्याच्या हाताखालीं कित्येक शूर, धीर, उदार व शहाणे मुत्सद्दी आणि राजकरणचतुर पुरुष विराजमान झाले. शिवाजीस दाद न देतां ह्यानें मोगलांस घाबरें केलें. कर्नाटक व चंदीसारखीं अफाट राज्यें खालसा करून घेतलीं. तरी ह्याच्याच १९ वर्षांच्या कार्किर्दींत आदिलशाहीचा कीर्तिसूर्य अस्ताचलाप्रत जाऊं लागला. त्याचाच अनुगामी सिकंदर आदिलशहा ह्यास, अवघीं दहा वर्षें बाळपणांत राज्योपभोग घेऊन, एवढें अफाट, श्रीमान, बलाढ्य, मजबूद, व शोभिवंत राज्य औरंगजेब बादशहाच्या हवालीं करून, पदरीं असलेलें द्रव्य व जडजवाहीर खंदकांत ओतीत व दानधर्म करीत औरंगजेबाच्या तंबूंत जावें लागावें, आणि दांतीं तृण धरून कीर्तिसूर्यास अस्ताचलीं पोंचविण्याचा प्रसंग यावा ही केवढी दुःखाची गोष्ट!!! तस्मात् ‘ भवितव्यता बलीयसी ’ हेंच म्हणणें खरें. मानवी प्राण्यानें ऐश्वर्यमदानें धुंद होऊन जाऊं नये; व सर्व शक्तिमान् परमेश्वराच्या अप्रतिहत इच्छेवर भरंवसा ठेवून, इहपरहित संपादण्यांत स्वशक्तीचा व्यय करावा, हें सत्तत्त्व त्या वैभवोत्तुंग शिखरास पोंचून प्रस्तुत जीर्णावस्थेस आलेल्या आदिलशाही राजधानीचें प्रत्यक्ष दर्शन घेणारांच्या व तिचा इतिहास वाचणारांच्या मनांत ठसल्यावांचून राहवयाचें नाहीं.

---

# प्रकरण पंधरावें.

## गोवळकोंड्याची कुत्व्शाही.

### सन १२१५–१६८७.

१. कुत्व्शाही,प्रस्ताव,(१५१२–१६८७.) २. कुली कुत्व्शहा, (१५१२–१५४३.)
३. जमशीद कुत्व्शहा,(१५४३–५०.) ४. इब्राहीम कुत्व्शहा,(१५५०-१५८०.)
५. महंमद कुली कुत्व्शहा, (१६११.) ६.अब्दुल्ला हुसेन कुत्व्शहा,(१६११-५८)
७. अबू हुसन कुत्व्शहा, ( स. १६५८–१६८७.)

**१. गोवळकोंड्याची कुत्व्शाही–प्रस्ताव, ( १५१२–१६८७ ).—** कलबुर्गा येथें बहामनी राज्याची स्थापना झाल्यावर त्याचा विस्तार हळू हळू पूर्वेकडे होत चालला. त्या बाजूस वरंगळचें हिंदु राज्य होतें. तें सन १४२३ सालीं बहामनी राजा अहंमदशहा वल्ली ह्यानें जिंकिलें. वरंगळच्या राज्याच्या पूर्वबाजूस ओढयाप्रांताचें हिंदु राज्य होतें. आरंभीं ह्या राज्याची बहामनी राजांस फारशी माहिती नव्हती. तेथें समुद्रकांठ असून जमीन फार सुपीक होती. महाराष्ट्रदेश व ओढयाप्रांत यांजमध्यें एक पर्वताची रांग असून, तिचे माथ्यावर निबिड अरण्यें होतीं. त्या अरण्यांत राहणारे रानटी लोक हिंदु व मुसलमान ह्या दोघांसही फारसे माहीत नव्हते. सन १४७७ सालीं बहामनी राजांनीं उत्तरेस थेट राजमहेंद्रीजवळील समुद्रकांठापर्यंत, व दक्षिणेस कृष्णानदीपर्यंत प्रवेश केला. हा दक्षिणचा प्रदेश त्यांनीं नरसिंहराय नांवाच्या हिंदु राजापासून जिंकून घेतला. त्या प्रदेशांत पाळेगार वगैरे पुष्कळ लहान लहान स्वतंत्र राजे होते; आणि त्यांजवर विजयनगर वगैरे आसपासच्या राजांचा थोडाबहुत ताबा होता. तरी मुसलमानांचा अंमल कृष्णेच्या पलीकडे गेला नव्हता. महंमूदशहा बहामनीनें कांची किंवा कांचीवरं ह्या शहरावर सन १४७९ सालीं स्वारी केली, तरी त्यामुळें त्याच्या राज्यांत विशेष भर पडली नाहीं. बहामनी राज्याचा पूर्वेकडील मुलूख गोवळकोंड्याच्या सुभ्याखालीं मोडत असे. हा प्रांत विस्तृत व चांगला उत्पन्नाचा होता. प्राचीन काळच्या हिंदु राजांनीं ह्या प्रदेशांत पुष्कळ कालवें वगैरें बांधून शेतकीसाठीं पाण्याची सोय चांगली केली होती; आणि पुढें

वरंगळच्या आंध्र राजांनीं व इतर राज्यकर्त्यांनीं पूर्वीची कामें दुरुस्त ठेविलीं होतीं. ह्या सुपीक प्रांतावर वजीर महंमद गवान ह्यानें कुली-कुत्ब-उल्मुल्क् ह्या नांवाचा सुभेदार नेमिला.

**२. कुली कुत्ब्शहा, ( स. १५१२–१५४३ ).**—कुली हा इराणांतील एका प्रमुख कुळांत जन्मला होता. लहानपणासून तो मोठा हुशार व चलाख असे. तो इराणांतून हिंदुस्थानांत आला, तेव्हां त्यास बहामनी सुलतान महंमदशहा ह्यानें आश्रय दिला. एका प्रसंगीं त्यानें शहाचा बचाव केल्यामुळें त्याजवर शहाची मर्जी बसली. बहामनी राज्याचे इतर सर्व सुभेदार स्वतंत्र होईपर्यंत, त्यानें आपली ताबेदारी उत्तम प्रकारें बजाविली. कासीम बेरीदचा अंमल त्यास सहन न होऊन, सन १५१२ सालीं गोवळकोंडा येथें शहा ही पदवी घेऊन तो स्वतंत्रतेनें राज्यकारभार करूं लागला.

कुली हा मोठा पराक्रमी पुरुष होता. त्यानें पुष्कळ वर्षें पराक्रमानें व शहाणपणानें राज्य करून, आपल्या मुलखाचा विस्तार केला. गोवळ-कोंडा हें प्रथम एक लहानसें खेडें होतें, तें त्यानें मजबूद बांधून लष्करी ठाणें केलें. पूर्वतैलंगणप्रांत त्यानें हळूहळू जिंकून, आपले राज्याची सीमा समुद्रास मिळविली. एवढ्या प्रदेशांत ६०।७० किल्ले त्यानें हस्तगत केले, आणि सर्व प्रांतांत मुसलमानी धर्म चालू केला. त्यामुळें सर्व हिंदु राजे एकत्र होऊन मुसलमानांस मागें हटविण्याची पराकाष्ठा करूं लागले, पण त्यांत त्यांस यश आलें नाहीं. कमामेतचा राजा सीतापति, कंडापिलीचा राजा रामचंद्रदेव, व ओढ्या प्रांतांतील विडियाद्रि व हरिश्चंद्र, हे राजे कुलीबरोबर लढण्यांत प्रमुख होते. विजय-नगरचा राजा कृष्णराय व त्याचा जांवई शिवराय ह्यांचाही कुलीनें पराभव केला. त्याचप्रमाणें बेरीदशहा व आदिलशहा यांच्याशीं त्यानें अनेक झगडे केले. सन १५३४ त त्यानें केविलकोंड्यास वेढा घातला असतां, त्याच्या तोंडावर एक जबरदस्त जखम लागून तो अगदीं कुरूप झाला. आपल्या कार्किर्दीचीं शेवटचीं कांहीं वर्षें त्यानें राज्यकारभारांत घालविलीं. गोवळकोंड्यास एक भव्य व शोभिवंत मशीद बांधण्याचें काम त्यानें चालविलें. त्याचा मुलगा जमशीद यानें बंड केलें, म्हणून त्यास कुलीनें अटकेंत ठेविलें होतें. एके दिवशीं कुली हा वरील मशि-

दीची देखरेख करण्यासाठीं गेला असतां, शहाजादा जमशीद याच्या शिकवणीवरून शहरचा कोतवाल मीर महंमद हमदानी ह्यानें जंबिया खुपसून सुलतान कुली कुत्ब्‌शहा याचा प्राण घेतला. त्या वेळीं त्याचें वय नव्वद वर्षांचें होतें. त्यानें साठ वर्षांतून १६ वर्षे बहामनी शहाच्या वतीनें व ४४ वर्षे स्वतंत्र रीतीनें कारभार केला. त्याचा वडील मुलगा कुत्बुदीन ह्याचे डोळे काढून जमशीदनें त्यास अंधारकोठडींत टाकिलें आणि स्वतः कुत्ब्‌शाहीचें तख्त बळकाविलें.

**३. जमशीद कुत्ब्‌शहा, (स. १५४३–१५५०).**—जमशीदचा कारभार फलद्रूप झाला नाहीं. विजापूरवर स्वारी करण्यासाठीं त्यानें बुऱ्हाण निजामशहास मदत केली. पण विजापूरचा सेनापति आसदखान यानें त्याचा चांगला पराभव केला. नंतर तो इतरांच्या भानगडींत विशेष पडला नाहीं. लहानमोठे पुष्कळ हिंदु राजे त्यानें आपल्या ताब्याखालीं आणिले. शेवटीं शेवटीं तो एकसारखा नानाप्रकारच्या विलासांत निमग्न राहूं लागला, आणि कांहीं भयंकर दुखणें येऊन स. १५५०त मरण पावला. सैफ्‌ उल्‌-म्लुक्‌ व जगदेवराव ह्या नांवाचे दोन शूर सरदार त्याचे मदतगार असत. जमशीदच्या मरणानंतर त्याचा सात वर्षांचा मुलगा सुभान कुली ह्यास गादीवर बसवून, सैफ्‌खानानें कारभार चालविला; पण त्याचा अंमल सर्वांस दुःसह होऊन, जमशीदचा धाकटा भाऊ इब्राहीम विजयनगरच्या रामरायाकडे जाऊन राहिला होता, त्यास दरबारच्या मंडळींनें बोलावून आणून तख्तावर बसविलें.

**४. इब्राहीम कुत्ब्‌शहा, ( स. १५५०–१५८० ).**—ह्या राजाची कार्कीर्द ऐतिहासिक दृष्ट्या स्मरणीय आहे. कारण, ह्या कार्किर्दीत विजयनगरच्या बलाढ्य राज्याचा, व त्याबरोबरच हिंदूंच्या स्वातंत्र्याचा संपूर्ण नाश होऊन, मुसलमानांचा अंमल दक्षिणेंत चालू झाला. दुसरें कारण असें, कीं ह्या राजानें आपल्या मुलखावर अंमल करितांना प्रजेच्या सुखाकडे विशेष लक्ष पोंचविलें.

तख्तावर बसतांच हा चौकस रीतीनें सर्व कारभार पाहूं लागला. सभोंवारच्या राजांनीं त्यास अभिनंदनपर पत्रें पाठविलीं. विशेषतः हुसेन निजामशहाचा व ह्याचा चांगला स्नेह जमला. इब्राहीमचा पुष्कळ काळ-

पर्यंत विजयनगरच्या रामरायानें सांभाळ केला असल्यामुळें, रामरायाचे त्याजवर उपकार झाले होते. रामरायाचा व विजापूरच्या आदिलशहाचा स्नेह होता. त्या वेळीं आसपासच्या सर्व राजांचा एकमेकांशीं स्नेहभाव असल्यामुळें विनाकारण एकानें दुसऱ्यावर शस्त्र धरिल्यास इतर राजे त्याचा निषेध करीत. असें एक उदाहरण ह्या वेळीं घडलें. निजामशहाशीं सख्य करून इब्राहीमनें बेरीदशाही बुडविण्याचा यत्न चालविला. त्या वेळीं विजयनगरच्या राजानें पुढील पत्र इब्राहिमास लिहिलें. 'विजापूर व अहंमदनर येथील राजे हे आज पुष्कळ दिवस एकमेकांशीं झगडत आहेत, हें आपणास ठाऊक आहेच. ह्या झगडयांत दोघांची बरोबरी इतकी दिसून आली आहे, कीं एकसारखे लढत असतां कोणासही कांहीं फायदा झाला नाहीं. परंतु हल्लीं आम्हांस असें कळलें आहे, कीं आपले वडील ह्या तंटयापासून अगदीं अलिप्त राहिले असून, आपण विजापूरच्या राजाविरुद्ध निजामशहास मदत करण्यास तयार झालां आहां. इब्राहीम आदिलशहा हे आमचे दोस्त असून त्यांनीं आपणांस कोणत्याही तऱ्हेनें दुखविलें नाहीं. आपली व आमची दोस्तीही फार दिवस चालत आली असल्यामुळें, आपणापुढें ह्या गोष्टी मांडणें आम्हांस युक्त वाटतें. परापहरण करण्यासाठीं आपण जो कट केला आहे तो सोडून द्यावा, असें आमचें मागणें आहे. आपण आपलें सैन्य परत बोलावून दोहों पक्षांशीं सारखा स्नेह ठेवावा, म्हणजे त्या उभयतांमध्यें सलोखा होऊन हें फार दिवस चाललेलें युद्ध संपेल.'

अशा प्रकारचे पत्रव्यवहार सोळाव्या शतकांत हिंदुस्थानांतील राजे एकमेकांशीं करीत असत. वरील पत्राचा उपयोग होऊन इब्राहीम कुत्बशहानें रामरायाची भेट घेऊन सर्वांची एकी करून दिली. पुढें ऐनप्रसंगीं रामरायास इब्राहीम कुत्ब्‌शहानें मदत करून त्याच्या भावांनीं केलेलें बंड मोडिलें.

ह्या कारकिर्दीत मराठ्यांचा उत्कर्ष पुष्कळ झाला असें दिसतें. इब्राहीम कुत्ब्‌शहास राज्यपद मिळवून देण्याच्या कामीं जगदेवराव नामक सरदार फार उपयोगी पडला होता. त्याचे उपकार स्मरून शहानें त्यास आपला दिवाण केलें. त्याच्या हाताखालीं रायराव नांवाचा दुसरा एक हुशार सरदार होता. ह्या दोघांच्या वर्चस्वामुळें सर्व दरबारांत व

लष्करांत मराठ्यांचा भरणा पुष्कळ झाला. हें मुसलमान सरदारांस न रुचून, त्यांनीं जगदेवरावाविरुद्ध पुष्कळ तक्रारी शहाकडे केल्या. शहानें कांहीं दिवस तिकडे कानाडोळा केला. पण अखेरीस त्यानें रायरावास ठार मारिलें. तेव्हां जगदेवराव आपला बचाव करून गोवळकोंड्याहून निघाला, तो सर्व प्रांत उजाड पाडीत वऱ्हाडांत आला. त्यास कांहीं काळपर्यंत बुऱ्हाण निजामशहानें आश्रय दिला. पण त्यासही तो डोईजड झाला. सर्व मुलूख हस्तगत करून मुसलमानांस पादाक्रांत करण्याची जी इच्छा पुढें मराठ्यांस झाली, तिचीं पूर्वचिन्हें ह्या वेळेपासून दिसूं लागलीं होतीं. वऱ्हाडचे इमादशहास कांहीं त्रास न देतां जगदेवराव पुनः कुत्‌शहाचे मुलखांत आला. त्याजबरोबर पुष्कळ दक्षणी पायदळ आणि आरबी, इराणी, व हबशी फौज होती. कुत्‌शहानें मुस्तफाखानास जगदेवरावावर पाठविलें. युद्ध होऊन जगदेवाचा भाऊ व्यंकटराव पडला, आणि पुष्कळ लोक जखमी होऊन त्याचा पराभव झाला. नंतर जगदेवराव विजापूरच्या राजाकडे गेला. हुसेन निजामशहा व इब्राहीम कुत्‌शहा यांनीं विजापूरच्या मुलखावर स्वारी केली असतां, विजापूरच्या राजानें रामरायाचें साहाय्य मागितलें. त्या वेळीं रामरायाचा भाऊ व्यंकटाद्रि व जगदेवराव हे एक झाले. त्यांनीं कुत्‌शहा व निजामशहा यांच्या फौजेस जर्जर करून सोडिलें. जगदेवानें तर देशांतील नाईक लोकांच्या मदतीनें कुत्‌शहाचे तैलंगणांतील बहुतेक किल्ले काबीज केले. जगदेवाची कुत्‌शहास इतकी धास्ती पडली, कीं त्याचा पाडाव करण्याचा नाद सोडून देण्याविषयीं त्यानें आपला सरदार मुस्तफाखान यास हुकूम पाठविला, आणि हरयुक्तीनें जगदेवाशीं तह करण्यास सांगितलें. जगदेवानें गणपुरा व पानगल हे दोन किल्ले आपल्या ताब्यांत घेऊन मोठ्या शिताफीनें सर्व राजांचे तंटे मिटवून युद्ध बंद केलें. जगदेवरावाचें पुढें काय झालें, तें कळत नाहीं. त्यास नाईक लोकांची चांगली मदत होती.

सन १५६७त कुत्‌शहानें पटापूर व राजकुंडी येथील राजा सीतापति व राजमहेंद्रीचा राजा विदियाद्रि, यांस जिंकिलें. या कामीं रिफतखान नामक मुसलमान सरदार कुत्‌शहानें योजिला. ओढ्याप्रांतांतील वेलप राजा व चंद्रुरवारचे नरसिंह व सुरसिंह, ह्या राजांस जिंकून त्यांपासून

खंडणी घेण्याचें रिफतखानानें ठरविलें. कंडूदेवपल्ली येथें वैजनाथदेव नांवाचा हिंदु राजा होता. त्याचा पराभव होऊन तो खंडणी देण्यास कबूल झाला. ह्या सर्व हकीकतींवरून हिंदु राजांचा कसकसा नाश होत गेला हें स्पष्ट कळून येईल.

पुढें सर्व मुसलमान राजांचीं आपापसांत युद्धें सुरू झालीं. विजापूरच्या सैन्यांत पुष्कळ मराठे सरदार असत, आणि ते हरहंमेश कुत्व्‌शाहीच्या मुलखास उपद्रव देत. परंतु इब्राहीमशहाच्या चांगल्या शिस्तीमुळें इतर मुसलमानी राजांचें त्याजपुढें कांहीं चाललें नाहीं. पुनः हिंदु राजांवर कुत्व्‌शहानें शस्त्र धरिलें. कारण विजयनगरचे अवशेष म्हणून जे कित्येक सरदार राहिले होते, ते शहास वेळेवर खंडणी पोंचवीत नसत. पण मुसलमानी फौजेपुढें कोणाचाच टिकाव लागला नाहीं. इब्राहीम कुत्व्‌-शहाच्या लढाया विशेषेंकरून विजापूर, मराठे व दाक्षिणदेशचे हिंदु राजे यांजबरोबर झाल्या.

या कार्किर्दीच्या अखेरीस मुराररावं नामक एक ब्राह्मण कुत्व्‌शहाचा दिवाण होता. हा सर्व राज्यांत अग्रगण्य झाला होता. ह्या मुराररावानें दक्षिणेंतील हिंदूंचीं देवस्थानें फोडून गोवळकोंड्यास लूट आणिली असें म्हणतात. ही गोष्ट शहास पसंत पडली नाहीं. पुढें त्याची प्रकृति बिघडली, आणि तो सन १५८०त आपल्या वयाच्या ५१ वे वर्षी मरण पावला. त्यास एकंदर ३० मुलें झालीं, त्यांतून ८ मुलगे व १३ मुली त्याच्या मरणसमयीं जिवंत होत्या.

इब्राहीम कुत्व्‌शहास लढाईंत कधींही अपजय आला नाहीं. मोहि-मेवर असतांना सुद्धां तो कायदे करण्यासंबंधानें विद्वानांशीं संभाषण करी. त्याच्या राज्यांत सर्वोत्कृष्ट बंदोबस्त होता. गोवळकोंड्याहून कोण-त्याही दिशेस एखाद्या दुर्बळ बाईनेंही सोन्याचें भांडें डोकीवर घेऊन जावें. प्रसिद्ध तैलंगी चोरांवर तर त्यानें विलक्षण वचक बसविला. त्याच्या राज्यविस्तारांत कासीमकोंडा, राजमहेंद्री, कोंडबीड हे प्रदेश मुख्य होते. त्यानें अनेक सुंदर व भव्य इमारती बांधिल्या. गोवळकों-ड्याची तटबंदी, इब्राहीमबाग, फुलबाग, भिक्षागृहें, इब्राहीमपत्तनचा तलाव, हुसेनसागर तलाव, वडवळ येथील बांध आणि पुष्कळ मशिदी व

पाठशाळा इब्राहीमच्या कार्किर्दीत तयार होऊन त्याच्या राज्याची कीर्ति चहूंकडे पसरली. गोवळकोंडयास व्यापाराची भरभराट होऊन आरबस्तान, इराण, तुर्कस्तान वगैरे अनेक देशांतील व्यापारी इकडील माल खरेदी करून बाहेर नेत. तसेंच परदेशांतील पाहिजे ती चीज गोवळकोंडयास मिळे. ह्या कार्किर्दीत प्रजेची दाद जितकी लागत असे, तितकी लवकर दुसऱ्या कोणत्याही मुसलमानी राजाच्या कार्किर्दीत दुसऱ्या कोठें लागत नसे. न्यायान्यायाच्या कामीं शहा अत्यंत दक्ष असे. अधिकारमदानें धुंद न होतां परमेश्वरानें हवालीं केलेल्या लक्षावधि लोकांच्या हिताकडे तो चांगलें लक्ष पुरवी. अन्यायाचरण करीत नसे.

५. **महंमद कुली कुत्बशहा,** (सन १५८०–१६११ ).—महंमद ह्या इब्राहीमचा तिसरा मुलगा. प्रथमारंभींच हिंदु राजांबरोबर त्यास लढाई चालवावी लागली. विजयनगरच्या वंशजांनीं आतां पेनकोंडयास जाऊन आपल्या राज्याची स्थापना केली होती. तें राज्य बुडविण्याचे पुष्कळ यत्न महंमद कुलीनें केले. पण एकंदरींत त्यास विशेष यश आलें नाहीं. विजापूरच्या राजाचें महंमदाच्या बहिणीशीं मोठ्या थाटानें लग्न होऊन, ह्या दोघां मुसलमानी राजांचें आजवर एकमेकांशीं असलेलें वैर मिटलें.

अलीकडे गोवळकोंड्याची वस्ती फार दाट होऊन हवा खराब झाली होती, आणि शहरास पाण्याचा पुरवठा केलेला नव्हता. तेथून पांच कोसांवर मुशी नदीच्या कांठीं एक स्थळ पाहून सन १५८९ त महंमदशहानें एका नवीन शहराची स्थापना केली. ह्या राजाची भागावती नामक एक आवडती बायको होती. तिच्या स्मरणार्थ ह्या शहरास त्यानें भागानगरी असें नांव दिलें. महंमदाचा पुत्र हैदर ह्याच्या नांवावरून त्याच शहरास पुढें हैदराबाद असें नांव पडलें. आरंभींच सरळ व रुंद रस्ते आंखून नंतर महंमदशहानें तेथें सुरेख घरें बांधिलीं. रस्त्यांच्या दुतर्फा झाडांच्या रांगा लाविल्या. गोवळकोंड्याचे वर नदीस बांध घालून नळानें भागानगरांत पाणी आणून खेळविलें. तेव्हांपासून त्या शहरीं पाण्याचा पुरवठा उत्तम होऊन अद्यापि तसाच चालत आहे. पुष्कळ भव्य इमारतींनीं तें शहर शोभिवंत दिसूं लागलें. जुम्मा मशीद, चारमिनार, खेरीज पुष्कळ वाडे, दवाखाने, हमामखाने, पाठशाळा व भिक्षागृहें हीं त्याच्याच वेळीं ह्या नवीन शहरीं बांधली गेलीं, तीं आज

तागाईत चांगल्या स्थितींत आहेत. दवाखाने व हमामखाने चालण्या-साठीं शहानें मोठमोठ्या नेमणुका करून दिल्या. शहाचा कित्ता दरबा-रच्या लोकांनींही उचलिला. त्यास बागबगिच्यांची पुष्कळ आवड होती; आणि सर्वांनीं चढाओढीनें पुष्कळ उपवनें तयार केलीं. वस्ती वाढल्यामुळें शहराच्या जागेस किंमतही भारी पडूं लागली. एकंदरींत महंमदशहाची कार्कीर्द चांगली झाली. हिंदूंशीं कित्येक युद्धें झालीं, पण स्वतः होऊन शहानें कधीं कोणाची कुरापत काढिली नाहीं. राजधानींत राहून लोकसुखाची वृद्धि करण्यांत त्यानें आपला कालक्षेप केला. सर्व राज्यांत शेतकीकरितां त्यानें पाण्याची सोय केली. राज-धानींतचसें काय, पण सर्व राज्यांत मशिदी, वाडे वगैरे इमारती इतक्या तयार झाल्या, कीं दक्षिणेंतील कोणत्याही मुसलमानी राज्याच्या कार्कि-र्दींत तशा झाल्या नाहींत.

ह्या कार्किर्दींत अनेक हिंदु राजे व सरदार यांजबरोबर महंमद कुलीची फौज लढत होती. पण कृष्णानदीच्या पलीकडे महंमदशहाचा अंमल फ़ारसा गेला नाहीं. इराणच्या शहाकडून भागानगरास एक वकील राहत असे; आणि इकडचा वकील इराणांत राहत असे. सन १६०७ ह्या वर्षी शहरांत मोठा दंगा झाला. त्यास परदेशी व दक्षणी लोकांचें भांडण कारण होतें. अमीर उल्मुल्क् किंवा मीर जुम्ला हा शहाचा पुष्कळ दिवस दिवाण होता. हा फार हुशार व पराक्रमी होता. हा पूर्वी जवाहिऱ्या होता.

सन १६११ त महंमदशहा एकाएकीं आजारी पडून मरण पावला. त्या वेळीं त्याचें वय ४९ वर्षांचें असून त्यानें ३४ वर्षें राज्य केलें होतें. त्याच्या कार्किर्दींत एकंदर ७८ लाख होन लोकोपयोगी कामांकडे खर्च झाले. दरसाल ६० हजार होनांचा भिकाऱ्यांस धर्म होत असे.

६. **अब्दुल्ला हुसेन कुत्बशहा,** ( सन १६११–१६५८ ).—हा महं-मद कुली कुत्बशहाचा पुत्र. ह्यानेंही पुष्कळ दिवस शांततेनें राज्य केलें. जहांगीरचा पुत्र शहाजहान ह्यानें अहंमदनगरचें राज्य बुडविलें, आणि विजापूरचे राजापासून खंडणी घेण्याचा ठराव केला. तेव्हांच अब्दुल्ला कुत्बशहानेंही त्यास खंडणी देण्याचें कबूल केल्यामुळें शहाजहानशीं त्याचा

स्नेह कायम राहिला. अब्दुल्लाचा मुख्य वजीर मीर जुम्ला हा होता. त्याची प्रख्याति सर्व दक्षिणेंत झाली होती. राज्यकारभार हाकण्यांत तरबेज म्हणून जे मुत्सद्दी हिंदुस्थानांत नामांकित झाले, त्यांत मीर जुम्ला याचें नांव प्रसिद्ध आहे. औरंगजेब सन १६५३ त दक्षिणचा सुभेदार झाला, तेव्हांपासून मीर जुम्लानें त्याजशीं स्नेह संपादिला. मीर जुम्ला ह्याचा मुलगा महंमद अमीन हा वाईट चालीचा होता. मीर जुम्ला तैलंगणांत गेला असतां, कुत्बशहास राग येण्याजोगें कृत्य अमीननें केल्यावरून शहानें त्यास कैद केलें. स्वारीहून परत आल्यावर मीर जुम्लानें आपल्या मुलास सोडविण्याविषयीं पुष्कळ खटपट केली, पण ती व्यर्थ गेली. तेव्हां मीर जुम्ला कुत्बशहास सोडून औरंगजेबास जाऊन मिळाला. औरंगजेब तरी पहिल्यापासून मसलती असून परराज्यांत शिरकाव करण्यास टपला होता. मीर जुम्ला याच्या मुलास सोडण्याबद्दल औरंगजेबानें शहाजहानचा हुकूम आणून कुत्बशहास पाठविला. या गोष्टीनें आपल्या स्वातंत्र्यावर घाला आला असें पाहून, कुत्बशहास अधिकच क्रोध आला. त्यानें अहंमद अमीन याची कैद अधिक सक्तीची करून मीर जुम्लाची सर्व मालमत्ता हिरावून घेतली. त्यावरून शहाजहाननें कुत्बशहाशीं युद्ध करण्याचा हुकूम औरंगजेबास पाठविला. त्याप्रमाणें औरंगजेबानें गोवळकोंड्यावर स्वारी केली, तेव्हां शहा अबदुल्ला मोगलांस शरण गेला, आणि मीर जुम्लाची मालमत्ता परत देऊन व त्याच्या मुलास मोकळें करून, मोगलांस सालीना एक कोट रुपये खंडणी देण्याचें त्यास कबूल करावें लागलें. ह्या वेळेपासून कुत्बशहा मोगलांचा ताबेदार झाला. त्यानें मरेपर्यंत मोगलांस नियमानें खंडणी दिली. त्यास सोडून मीर जुम्ला मोगलांच्या चाकरीस राहिला; आणि औरंगजेबानें राज्यप्राप्तीविषयीं जे पुढें विश्वासघाताचे अनेक उद्योग केले, त्यांत त्यास ह्या मीर जुम्लाचीच मुख्यतः मदत होती. औरंगजेबास दिल्लीपद प्राप्त झालें, त्याच वर्षी अब्दुल्ला कुत्बशहा मरण पावला.

७. **अबू हसन कुत्बशहा**, (सन १६५८-१६८७).—हा अब्दुल्लाचा जांवई त्याच्या पश्चात् गोवळकोंड्याच्या तख्तावर बसला. हा आळशी व विलासी होता. तरी राज्य चांगलें चालवून रयतेस सुख देण्याचे कामीं तो नेहमीं तत्पर असे, त्यामुळें त्याजवर लोकांची प्रीति होती.

१९-७९१-२०००

त्यानें मदनपंत नामक एका ब्राह्मणास आपली वजिरी दिली. मदनपंतानें महसुलाचा व इतर बाबतींचा बंदोबस्त फार चांगला ठेविला. शहाचा त्याजवर पूर्ण विश्वास असे. त्याच्या विरुद्ध मुसलमानांनीं केलेल्या कागाळ्या शहा ऐकत नसे. त्या मंडळींत शहाचा सेनापति सामील होता. त्यास मदनपंताचें दरबारांतलें वजन सहन होईना. इकडे स. १६८३त औरंगजेबानें दक्षिणेवर स्वारी केली, त्या वेळीं संभाजी भोसले याजबरोबर कुत्ब्शहानें परस्परांच्या बचावाचा एक तह केला. त्याजवरून औरंगजेबास राग येऊन, त्यानें आपला मुलगा मुअज्जम व खानजहान यांजबरोबर गोवळकोंड्यावर फौज पाठविली. ही फौज आली, तेव्हां सेनापति इब्राहीमखान विश्वासघात करून मोगलांस जाऊन मिळाला. त्या वेळीं शहरांत जी गडबड झाली तींत मदनपंत मारला गेला. अबू हसननें दोन कोट रुपये खंडणी व पुष्कळ द्रव्य देऊन मोगलांशीं तह केला, ( स. १६८६ ). पण हा तह फार दिवस टिकला नाहीं. विजापूरचें राज्य रसातळास गेल्यावर औरंगजेब हा जिसुदुराज साधूच्या कबरेचें दर्शन घेण्यासाटीं म्हणून कलबुर्ग्यास जाण्यास निघाला. बिचारा अबू हसन औरंगजेबाची मर्जी प्रसन्न करण्यासाठीं नानातऱ्हा करीत होता. नजीक आल्यावर औरंगजेबानें कुत्ब्शहास कळविलें, कीं ' तुम्हीं ब्राह्मण दिवाण नेमिला, परधर्मी संभाजी राजाशीं दोस्ती केली, आणि स्वतः बदफैली वर्तन सुरू ठेविलें, म्हणून आम्ही तुम्हांशीं लढाई करणार. ' कुत्ब्शहाचे कामदार औरंगजेबानें फितूर केले; आणि गोवळकोंड्यास वेढा घातला. सात महिने कुत्ब्शहानें टिकाव धरिला. पुढें सन १६८७त औरंगजेबानें अबू हसनास पदच्युत करून दौलताबादच्या किल्ल्यावर ठेविलें, आणि त्याचें सर्व राज्य खालसा करून आपल्या राज्यास जोडिलें. अबू हसनासाठीं त्याची प्रजा फार हळहळली. त्याच्या सैन्याच्या व शौर्याच्या शेंकडो गोष्टी लोकांच्या तोंडीं अद्यापि त्या प्रांतीं ऐकूं येतात. त्यास कवितेचा मोठा नाद होता.

येणेंप्रमाणें कुत्ब्शाही घराण्याची समाप्ति झाली. या घराण्यानें इ. स. १५१२ पासून सन १६८७ पर्यंत, फक्त सहा सुलतानांनीं, १७५ वर्षें गोवळकोंड्यास राज्य केलें. त्यांनीं बांधिलेल्या इमारती व केलेलीं इतर सार्वजनिक कामें अजून मागें राहिलीं आहेत; तीं त्यांच्या वैभवाची साक्ष

हल्लीं देतात. बहामनी राज्य किंवा त्याच्या शाखा यांजमध्यें जे एकंदर राजे झाले, त्यांत कुत्बशाही घराण्यांतील राजे सर्व चांगले व रयतेच्या सुखाची काळजी बाळगणारे असे होते. तसेंच प्रत्येकानें पुष्कळ दिवस राज्यपद भोगिलें. दंगेधोपे, मारामाऱ्या व खून हे त्यांच्या वेळेस फारसे झाले नाहींत. सहा पिढ्यांपर्यंत एकसारखे एका घराण्यांतील सहा पुरुष सर्व चांगले कर्तृत्ववान व पुष्कळ वर्षें राज्य करणारे असे निघाल्याचें, कुत्बशाहीसारखें उदाहरण इतिहासांत अत्यंत दुर्मिळ होय.

येथें बहामनी राज्य व त्याच्या शाखा यांचा इतिहास संपला. महाराष्ट्रांत कोठेंही गेलें तरी ह्या राज्याच्या खुणा अद्यापि दृष्टीस पडतात. मुसलमानांस इमारतींची आवड विशेष; तिचे परिणाम ठिकठिकाणीं दिसून येतात. विजापूरच्या इमारती प्रत्येकानें एकवार तरी पाहण्या लायक आहेत. त्या बांधणारांचें कसब पाहून मोठमोठे पाश्चात्य एंजिनियर्सही थक्क होतात. अहंमदनगर, गोवळकोंडा, व कलबुर्गा येथेंही प्रेक्षणीय इमारती आहेत. महाराष्ट्रांतील मुसलमानांची बहुतेक लोकसंख्या बहामनी राज्याच्या वेळची असून, त्या वेळचीं अनेक घराणीं ठिकठिकाणीं हयात आहेत. हिंदूंचीं मात्र पुरातन व पिढीजाद घराणीं फारच थोडीं राहिलीं आहेत. ह्या काळांत हिंदुधर्माची व समाजाची अवनतीच होत होती.

बहामनी राज्यें जरी मुसलमानी होतीं, तरी त्यांत बहुतेक हिंदूंचेंच वजन ज्यास्त होतें. उत्तरेंत जसा देवालयांचा व हिंदु चालीरीतींचा विध्वंस झाला, तसा दक्षिणेंत होऊं शकला नाहीं. उलट पक्षीं हिंदूंच्याच तंत्रानें येथें त्यांस वागावें लागलें. ही स्वराज्याची इच्छा दक्षिणेंत विशेष प्रबल असल्यामुळें, मुसलमानी राज्यास अटकाव करण्याच्या हेतूनें विजयनगरास, बहामनी राज्याच्या समकालीन, एक नवीन हिंदु राज्य स्थापन झालें. ह्या विजयनगरचा इतिहास बहामनी राज्याच्या इतिहासांत अतिशय गुंतलेला आहे. ह्या कारणास्तव, हिंदुस्थानच्या इतर भागांतील मुसलमानी राज्यांचे इतिहास देण्यापूर्वी, विजयनगरचाच इतिहास प्रथम पुढील प्रकरणीं दिला पाहिजे.

---

# प्रकरण सोळावें.

## विजयनगरचा इतिहास.*

### स. १३३६–१५६५.

१. विजयनगरचें महत्त्व.
२. विजयनगरची उत्पत्ति, (स. १३३६).
३. पहिला वंश, (स. १३४४–१४९०).
४. दुसरा वंश, (स.१४९०–१५६७).
५. तिसरा वंश, रामरायाचा उदय.
६. तालिकोटची लढाई,(जानेवारी,१५६५).
७. ह्या लढाईचे भयंकर परिणाम.
८. या हिंदु राज्याचें सिंहावलोकन.
(क) माधवाचार्यांची अपूर्व योजना.
(ख) नीतिमत्तेचा अभाव.
(ग) संपत्तीची विपुलता.
(घ) प्रवाश्यांच्या हकीकती.
९. दक्षिणच्या इतिहासाचें समालोचन.

**१. विजयनगरचें महत्त्व.**—दक्षिणदेशाचा मध्यकालीन इतिहास विजयनगरची हकीकत दिल्याशिवाय पूर्ण होत नाहीं. उत्तरेकडच्या भागांत मुसलमान लोक आपला अंमल बसवीत असतां, दक्षिणद्वीपकल्पांत विजयनगरचें प्रबळ हिंदु राज्य हयात होतें. माधवाचार्य, अप्पय्या दीक्षित वगैरे मोटमोठे मध्यकालीन पंडित ह्याच राज्यांत उदयास आले. हिंदूंच्या उत्कर्षास त्या वेळेस याखेरीज अन्यत्र योग्य जागा नव्हती. ह्या राज्याचा विस्तार कन्याकुमारीपासून जवळ जवळ बेळगांवपर्यंत होता. राज्य स्थापन झाल्यापासून ह्या हिंदु राजांशीं मुसलमानांचीं युद्धें अव्याहत चाललीं होतीं. ह्या राज्याचा समग्र इतिहास उपलब्ध नाहीं; पण शिलालेखांवरून वगैरे थोडी बहुत माहिती अलीकडे उपलब्ध झाली आहे.

विजयनगरचा इतिहास अनेक दृष्टींनीं मनोरंजक आहे. सन १५६५त तालिकोटच्या लढाईत विजयनगरचा पाडाव झाला; आणि त्याबरोबरच विजयनगरचा इतिहास पण संपला. त्या इतिहासाचें नांवही राहिलें नव्हतें; पण अलीकडे अनेक शोधक विद्वानांच्या प्रयत्नांनीं

* आधारभूत ग्रंथ. Robert Sewell's Forgotten Empire; B. Surya Narain Row's The never to be Forgotten Empire; &c. &c.

विजयनगरचा बराच इतिहास बाहेर आला आहे. हिंदूंनीं मुसलमानांच्या विरुद्ध टिकाव धरण्याचे कित्येक प्रयत्न केले, त्यांचा उल्लेख वर ठिकठिकाणीं आलाच आहे. त्यांचपैकीं देवगिरीचे यादव आणि विजयनगरचे राय ह्यांचे प्रयत्न होत. देवगिरीच्या यादवांचा इतिहास मराठी रियासतींत दिला आहे. पण विजयनगरचा इतिहास येथेंच देणें विहित आहे. हिंदूंच्या पाडावाची व मुसलमानांच्या उत्कर्षाची येथवर केलेली चर्चा विजयनगरच्या उदाहरणासही लागू पडत असल्याचें दिसून येईल. विजयनगरचा इतिहास जितका मनोवेधक तितका हृदयद्रावकही आहे; आणि कष्टमय परिस्थितींत राष्ट्राचे डोळे उघडण्यास त्याचा थोडाबहुत उपयोग होईल.

तेराव्या शतकाच्या अखेरीस मुसलमानांनीं नर्मदा नदी ओलांडून दक्षिणेंत प्रथम प्रवेश केला. सन १२९३, स. १३०६ व सन १३१८ ह्या तीन सालच्या स्वाऱ्यांत त्यांनीं देवगिरीच्या यादवांचा निःपात केला. सन १३०९ सालीं मलीक काफूरनें तेलंगणांतील वरंगळचें राज्य आणि इ. सन १३१०त म्हैसुरांतील होयसळबल्लाळांची द्वारसमुद्र राजधानी बुडविली. सन १३२६त वरंगळचा कायमचा पाडाव झाला. येणें-प्रमाणें तेराव्या शतकाच्या पहिल्या पंचविशींत सर्व हिंदुस्थान मुसलमान-मय झालें. जिकडे तिकडे हिंदूंचा पाडाव झाला. हिंदूंस वर डोकें काढण्याची कांहीं आशा राहिली नाहीं. पुरातन राज्यें लयास गेलीं. मोठमोठीं मंदिरें जमीनदोस्त झालीं. अपार संपत्ति दक्षिणेंतून उत्तरेंत चालून गेली; आणि दक्षिणच्या लोकांस प्राणांहून प्रिय जो धर्म तो साफ बुडण्याचा समय प्राप्त झाला. अशा संकटसमयीं सन १३४४ त एकाएकीं मुसलमानांच्या तीव्र शक्तीस एकदम मोठा अडथळा झाला; आणि पुढें अडीचशें वर्षें पर्यंत हिंदूंनीं आपलें डोकें पुनरपि वर काढून, देश जिंकण्याचा मुसलमानांचा उद्योग पुढें चालूं दिला नाहीं.

विजयनगर हें शहर तुंगभद्रेच्या दक्षिणतीरावर असून, उत्तरतीरावर अनागोंदी हें शहर होतें. त्या ठिकाणीं हल्लीं पुरातन काळचीं अनेक देवळें आहेत. वालीची किष्किंधा नगरी येथेंच होती असें म्हणतात. आरंभीं जे युरोपियन लोक येथें आले, त्यांनीं ह्या राज्यास नरसिंहरायाचें राज्य, आणि देशास नरसिंहदेश असें नांव दिलें. विजयनगर हें फार

दाटवस्तीचें व विस्तीर्ण शहर असून, तेथें परदेशच्या सर्व मालाची देवघेव होत असे. ह्या राज्यांत कृष्णा व तुंगभद्रा ह्या दोन नद्यांच्या दक्षिणेकडील सर्व मुलखाचा व मलबार प्रांताचा समावेश होत होता.

२. **विजयनगरची उत्पत्ति, ( स. १३३६ ).**—नकाशावर मुंबई-पासून मद्रासपर्यंत एक सरळ रेषा काढिली असतां तिच्या जवळ जवळ मध्य बिंदूवर तुंगभद्रा नदी येते. ही ईशान्यवाहिनी नदी कर्नूलच्या खालीं थोड्या अंतरावर कृष्णेस मिळते. मध्यंतरीं बल्लारीच्या वायव्येस सुमारें चाळीस मैलांवर ती नदी एका लहानशा खडकाळ प्रदेशांतून जाते. बल्लारीहून धारवाडास जाणाऱ्या आगगाडीच्या उत्तरभागीं हा प्रदेश आहे. वर सांगितलेल्या खडकाळ प्रदेशांत तुंगभद्रा नदीच्या उत्तरतीरावर अनागोंदी नांवाचें एक छोटेंसें तटबंदी केलेलें शहर होतें. ह्या ठिकाणीं एक लहानसा राजवंश बरेच दिवस राज्य करीत होता. पुष्कळ दिवस मेहेनत करून अनागोंदीचा किल्ला तेथील राजांनीं चांगला मजबूद केला होता. वर्षभर नदीचा प्रवाह जोरांत वाहत असल्यामुळें, खालीं वर लांब पर्यंत नदीस पायउतार नव्हता. वर्षाकालांत तर नदींत मोठमोठे धबधबे होऊन ती दुर्गम होते. अनागोंदीच्या राजवंशाची उत्पत्ति कोठून झाली, हें आज कळून येत नाहीं. पुष्कळ वर्षें ते द्वारसमुद्र येथील होयसळ बल्लाळांचे मांडलिक होते. फेरिस्ता म्हणतो, सन १३५० पूर्वीं सातशें वर्षें ह्या राजवंशाचा अंमल अनागोंदीस होता. हरि-हर व बुक्क असे दोन बंधु वरंगळच्या राजाचा पदरीं होते. सन १३२६ त वरंगळ पडल्यावर ते अनागोंदीच्या आश्रयास येऊन राहिले. तेथें एकास अनागोंदीची दिवाणगिरी व दुसऱ्यास खजीनदारी मिळून, त्यांचा लवकरच उदय झाला. सन १३३४ त दिल्लीचा सुलतान महंमद तुघ्लख ह्याचा पुतण्या बहुद्दीन बंड करून दक्षिणेंत आला; त्यास अनागोंदीच्या राजानें आश्रय दिला, तेव्हां सुलतान महंमदानें अना-गोंदीवर स्वारी केली; आणि तें शहर काबीज करून, तेथें मलीक नांवाचा आपला एक कारभारी नेमिला. अशी व्यवस्था करून सुलतान परत गेला. अनागोंदीचा पाडाव झाल्यावर हरिहर व बुक्क ह्यांनीं अनागोंदीच्याच समोर तुंगभद्रेच्या दक्षिणतीरावर माधवाचार्य ऊर्फ विद्यारण्य ह्या विद्वान साधूच्या शिकवणीनें एक नवीन शहर स्थापिलें, आणि त्याचें नांव विजय-

नगर असें टेविलें, ( स. १३३५ ). अनागोंदी येथें पाडाव झालेले सरदार व लोक ह्या नवीन शहरांत येऊन राहिले, आणि तें लवकरच भरभराटीस आलें. इकडे मलीकच्या हातून अनागोंदीचा बंदोबस्त होईना, तेव्हां सुलतान महंमदनें हरिहर ह्यासच अनागोंदीचें राज्य देऊन, बुक्क ह्यास त्याची दिवाणगिरी दिली, ( स. १३४४ ). अगोदरपासूनच हरिहर व बुक्क स्वतंत्र होण्याच्या तयारींत होते. त्यांनीं उत्तरेस व दक्षिणेस पुष्कळ मुलुख जिंकिला होता. सन १३४०त हरिहरानें बदामी येथें किल्ला बांधिला. हरिहर आपणास स्वतंत्र समजत नसे. तुघ्लख सुलतानाचा अंकित समजून, त्यानें राज्य केलें. सन १३४४त हरिहर मरण पावला. हल्लीं नदीच्या कांठीं हंपी म्हणून गांव आहे, त्याच ठिकाणीं विजयनगर शहराचे अवशेष दिसून येतात. हरिहरानें हंपी येथें सुंदर व भव्य मंदिर बांधिलें, तें अजून टिकलें आहे.

**३. पहिलावंश,** ( स. १३४४–१४९० ).—हरिहरनंतर त्याचा भाऊ बुक्क राज्यावर आला, ( स. १३३४–१३७९ ). त्यानें छत्तीस वर्षें राज्य करून, विंध्याद्रिपासूनचें सर्व हिंदुस्थान आपल्या ताब्यांत आणिलें. मुसलमानांची लाट मागें हटविणारा पहिला पुरुष हाच होय. त्यानें अवशिष्ट हिंदु राजांचें एकीकरण केलें. सन १३४४त वरंगळच्या प्रतापरुद्राचा मुलगा कृष्ण नाईक विजयनगरास बुक्क ह्याजपाशीं येऊन राहिला. त्या दोघांनीं द्वारसमुद्र येथील बल्लाळ राजासही आपणाकडे आणिलें; तसेंच दक्षिणेंतील दुसऱ्या सर्व हिंदु राजांशीं मिलाफ करून, फौज जमविली, आणि मुसलमानांशीं युद्ध सुरू केलें, (वर पृ. १५८ पहा). दिल्लीच्या गंगू ब्राह्मणाजवळ हुसेनखान नांवाचा एक मुसलमान गृहस्थ होता, त्यास महंमद तुघ्लखनें हिंदूंच्या ह्या बंडाचा बंदोबस्त करण्याकरितां दक्षिणेंत पाठविलें. तेव्हां हुसेनखान व बुक्क ह्यांचे झगडे सुरू होऊन, दोघांनींही दक्षिणेंत स्वतंत्र राज्यें स्थापन केलीं: पहिलें मुसलमानांचें कलबुर्गा येथील बहामनी, आणि दुसरें विजयनगर येथील हिंदूंचें. ह्या दोन राज्यांमध्यें एकसारखे वैरभाव व युद्धप्रसंग चालू होते. ह्याच युद्धप्रसंगांनीं दोघांचे इतिहास भरलेले आहेत. बहामनी सुलतानांचा पाडाव करण्याकरितां बुक्कानें दिल्लीचा सुलतान फिरोजशहा ह्याची मदत मागितली. पण फिरोजशहाला राज्यविस्तार नको होता, म्हणून त्यानें

मदत पाठविली नाहीं. ही गोष्ट बहामनी सुलतानांच्या पथ्यावर पडली. म्हणूनच त्यांस कृष्णेपर्यंतचा प्रदेश सहज काबीज करितां आला. पुढें बहामनी सुलतान व विजयनगरचे राजे ह्यांचा खरा झगडा सन १३६५ त सुरू झाला; आणि त्याची समाप्ति सन १५६५ त तालिकोट येथें झाली. फेरिस्ता म्हणतो, मुसलमानांच्या अंगीं शौर्य व प्रखर तेज होतें, म्हणूनच विजयनगरच्या सत्तेपुढें त्यांचा निभाव लागला. बाकी शक्ति, संपत्ति व राज्यविस्तार ह्या गोष्टींत विजय-नगरचें राज्य बहामनी राज्याहून फारच श्रेष्ठ होतें.

सन १३७९ त बुकराय मरण पावला. पश्चात् त्याची बायको गौरी हिच्या पोटीं जन्मलेला त्याचा मुलगा हरिहर ( दुसरा ) गादीवर बसला. त्यानें वीस वर्षे राज्य केलें, ( स. १३७९–१३९९ ). हरिहरानें महा-राजाधिराज ही पदवी धारण केली. त्यानें अनेक मंदिरें बांधून, त्यांस नेमणुका ठरवून दिल्या. माधवाचार्यांचा भाऊ सायणाचार्य हा हरि-हराचा दिवाण होता. मुद्द, इरुग, गुंड ह्या नांवाचे हरिहराचे सेनापति होते. मल्लादेवी ऊर्फ मल्लांबिका नांवाची हरिहराची पट्टराणी होती. तो स्वतः शंकरभक्त असून, इतर पंथांचा द्वेष करीत नसे. हरिहराचे शिलालेख हिंदुस्थानच्या दक्षिण टोंकापर्यंत सांपडलेले आहेत; आणि त्यांवरूनच त्याचा इतिहास उपलब्ध झाला आहे. सन १३९९ त हरि-हराचा मुलगा ( दुसरा ) बुक्क गादीवर बसला, ( स. १३९९–१४०६ ). नंतर बुक्काचा भाऊ देवराय ( पहिला ) ह्यानें सन १४०६ पासून १४१२ पर्यंत राज्य केलें. हा देवराय विषयी होता. मुद्गल येथील एका हिंदु शेतकऱ्याच्या सुरूप मुलीचा त्यानें अभिलाष धरिल्यामुळें, बहामनी सुलता-नाशीं युद्ध सुरू होऊन, विजयनगरचें राज्य त्याचे हातून जाण्याचा प्रसंग आला होता. अशा स्थितींत देवरायानें सुलतानास पुष्कळशी संपत्ति, बंकापूरचा किल्ला आणि आपली मुलगी देऊन, कसाबसा आपला बचाव करून घेतला. शेतकऱ्याच्या सुंदर मुलीनेंही सुलतानाच्या मुलाशीं लग्न केलें.

पहिला देवराय स. १४१२त मरण पावल्यावर त्याचा मुलगा वीरविजय ह्यानें स. १४१९ पर्यंत राज्य केलें. नंतर वीरविजयाचा वडील मुलगा दुसरा देवराय ह्यानें स. १४१९ पासून १४४४ पर्यंत राज्य केलें. ह्या कारकिर्दींत बहामनी सुलतानांशीं रायाचें एकसारखें युद्ध सुरू होतें.

नागण्णा नांवाचा देवरायाचा एक दिवाण असून, त्यास ' धननायक ' अशी पदवी होती. देवरायाच्या वेळेस विजयनगरची भरभराट कळसास पोंचली. देवराय मरण पावल्यावर सन १४४४ पासून १४४९ पर्यंत तिसरा देवराय नांवाचा एक राजा झाला असावा. पुढें देवरायाचे मुलगे मल्लिकार्जुन व विरूपाक्ष, आणि त्यांनंतर मल्लिकार्जुनाचे मुलगे राजशेखर व विरूपाक्ष इतक्या पुरुषांनीं मिळून स. १४४९ पासून स. १४८७ पर्यंत राज्य केलें. त्यांच्या कार्किर्दीचे सन अद्यापि निश्चित झालेले नाहींत. सन १४८७ च्या सुमारास राज्यक्रांति होऊन, नरसिंहराय नांवाच्या दुसऱ्या एका कुटुंबांतील पुरुषानें राज्यापहार केला; (स. १४९०). शेवटच्या चाळीस वर्षांत निकराचे युद्धप्रसंग फारसे झाले नाहींत. बहामनी राज्यांतही अंतःकलह व घोटाळे माजले होते. ह्याच वेळेस बहामनी राज्याचा कारभार प्रसिद्ध वजीर महंमद गवान ह्याच्या हातांत होता. येणेंप्रमाणें स. १३४४ पासून स. १४९० पर्यंत सुमारें दीडशें वर्षें ह्या पहिल्या राजवंशाकडे विजयनगरचें राज्य चाललें.

४. दुसरा वंश, (स. १४९०–१५६७), विरूपाक्षराय हा दुर्बल व दुर्वृत्त होता. त्याच्या वेळेस गोवा, चौल, दाभोळ वगैरे प्रांत मुसलमानांनीं काबीज केले. दरबारांत बंडें झालीं, त्यांत विरूपाक्ष व त्याचे मुलगे मारले गेले. त्याच्याच पदरीं शाल्ववंशी नरसिंहराय म्हणून एक शूर सरदार होता, त्यास दरबारच्या मंडळींनीं राज्यावर बसविलें. त्यास राज्यावर येण्यापूर्वी महामंडलेश्वर, मेदिनीश्वर वगैरे सेनापतीचे किताब होते. स. १४९५ तील एका शिलालेखांत त्यास महाराय अशी पदवी दिलेली आढळते, म्हणजे त्या वेळेस तो ' राजा ' असला पाहिजे. नरसिंहरायास राज्य प्राप्त झाल्यापासून मुसलमानांच्या स्वाऱ्यांचा बराच बंदोबस्त झाला, आणि विजयनगरचा प्रभाव पूर्ववत् चमकूं लागला. ह्या वेळच्या इतिहासाचे मुख्य आधार फेरिस्ता, व पोर्तुगीझ लोकांनीं लिहिलेले वृत्तांत आहेत. त्यांच्यामध्यें पुष्कळ तफावत आहे. नरसिंहरायाच्या वंशांत खालील पुरुष राज्यावर बसले. नरसिंह व वीरनरसिंह (स० १४९०–१५०९); कृष्णदेवराय (१५०९–१५३०), अच्युतराय, (१५३०–४२) आणि सदाशिवराय, (१५४२–१५६७).

न्यूनिझ नांवाचा एक पोर्तुगीझ गृहस्थ अच्युतरायाच्या वेळेस विजयनगरांत राहत होता. त्यानें आपला वृत्तांत स. १५३५च्या सुमारास लिहिला आहे. मुसलमान इतिहासकार फेरिस्ता अहंमदनगरास निजामशहाच्या पदरीं राहत होता, त्याचा वृत्तांत स. १६०७ च्या पुढें लिहिलेला आहे. अर्थात् फेरिस्त्यापेक्षां न्यूनिझचा वृत्तांत ज्यास्त विश्वसनीय आहे.

नरसिंहराय स. १४९० त राज्य करूं लागला, परंतु त्या पूर्वी ३०-४० वर्षें तो राज्याचा सर्व कारभार मुखत्यारीनें पाहत होता. स. १४९०च्या सुमारास बहामनी राज्याचे विभाग होऊन स्वतंत्र झालेले अंमलदार एकमेकांशीं झगडूं लागले. विजापूरच्या आदिलशहाचें व विजयनगरच्या राजांचें बहुतेक कायमचेंच युद्ध जुंपलें. बेदर येथें स्वतंत्र झालेला कासिम बेरीद ह्यानें यूसुफ् आदिलशहाची खोड मोडण्याकरितां नरसिंहरायाची मदत मागितली. नरसिंहरायानें आदिलशहावर स्वारी करून रायचूर व मुद्गल हीं दोन शहरें काबीज केलीं, (स. १४९३ ). नरसिंहरायानें राज्यास पुष्कळ बळकटी आणिली.

स. १५०९ त कृष्णदेवराय गादीवर बसला. विजयनगरच्या एकंदर राजांत ह्या कृष्णदेवाची कीर्ति फार मोठी आहे. एका पोर्तुगीझ गृहस्थानें त्याच्या दरबारीं राहून प्रत्यक्ष पाहिलेला वृत्तान्त लिहून ठेविला आहे. हरएक शारीरिक कसबांत कृष्णदेव प्रवीण होता. तसाच तो शूर व उदार होता. सर्व दक्षिणहिंदुस्थान त्याच्या ताब्यांत असून दुसरे पुष्कळ राजे त्यास करभार देत असत. त्याच्या कार्किर्दीत राज्याचा विस्तार फार झाला. प्रसिद्ध विद्वान् अप्पया दीक्षित कृष्णरायाचे पदरीं होता. हंपी येथील देवालयासमोर त्यानें बांधिलेले दोन मनोरे अद्यापि हयात आहेत. इंग्लंडचा राजा आठवा हेन्री हा त्याचा समकालीन असून अधिकार, ऐश्वर्य, स्वेच्छाचार इत्यादि बाबतींत दोघांचें बरेंच साम्य आहे. पोर्तुगीझ लोकांनीं आदिलशहापासून गोवें काबीज केलें, हें पाहून कृष्णरायास समाधान वाटलें. त्या वेळच्या विजयनगरच्या भरभराटीचें वर्णन अनेक पोर्तुगीझ गृहस्थांनीं केलें आहे. सर्व तेलंगणप्रांत त्यानें काबीज केला. कृष्णरायाच्या कार्किर्दीतील मोठी गोष्ट म्हणजे रायचूरची लढाई होय. रायचूर व मुद्गल हे परगणे कृष्णा व तुंगभद्रा यांच्या दुआबांत आहेत. या परगण्यांबद्दल मुसलमान व हिंदु यांचा नेहमीं वाद होता. स. १५२०च्या

मे महिन्यांत कृष्णदेवानें रायचूरवर स्वारी केली. त्याजबरोबर लढण्यास आदिलशहा मोठी फौज घेऊन आला. लढाई निकराची झाली. कृष्णदेवानें मोठ्या शिकस्तीनें मुसलमानांचा पराभव करून त्यांच्या सर्व फौजेचा फन्ना उडविला, आणि रायचूरचा किल्ला काबीज केला. ह्या विजयानें आदिलशहाची कंबर खचली आणि दक्षिणहिंदुस्थानांत आतां आपली धडगत नाहीं असें तेथील मुसलमानांस वाटूं लागलें. त्यामुळेंच ते सर्व मुसलमानांची एकी करण्याच्या उद्योगास लागले आणि तालिकोटचें अरिष्ट पुढें ओढवलें. इकडे विजयनगरचे लोक गर्वानें फुगून गेले आणि मुसलमानांस तुच्छ लेखूं लागले. ह्या गर्वाच्या योगानें त्यांना भावी संकटाचें भान राहिलें नाहीं. गोव्याच्या पोर्तुगीझ सत्तेचा अभ्युदयही विजयनगरच्या भरभराटीवर अवलंबून होता; आणि विजयनगरच्याच व्यापारावर गोव्याची भरभराट अवलंबून होती. विजयनगर पडल्याबरोबर गोव्याच्या भरभराटीचाही अंत झाला.

पराभव झाल्यावर कृष्णदेवानें आदिलशहाचा पुष्कळ अपमान केला, त्यामुळें मुसलमानांचीं मनें फार चिडून गेलीं. स. १५३०त कृष्णदेव वारला. कृष्णदेव राज्यावर असतांच दिल्लीस मोगलबादशाहीची स्थापना झाली. कृष्णदेवानें सन १५१३त कृष्णस्वामीचें मंदीर बांधिलें; हजाररामस्वामी नांवाचें दुसरें एक मंदीर सुरू केलें, आणि कित्येक मोठमोठे कालवे बांधून शेतीची सोय केली. विजयनगर येथें त्यानें मोठा तलाव बांधला. नागलादेवी नांवाची त्याची एक राणी होती, तिच्या स्मरणार्थ नागलापूर नांवाचा शहराचा एक नवीन भाग त्यानें विजयनगरास बांधिला. कृष्णस्वामीच्या देवळाजवळ नृसिंहाचा एक प्रचंड दगडी पुतळा हल्लीं दृष्टीस पडतो, तो त्यानेंच सन १५२८त कोरविला. तो संबंध एका दगडाचा कोरलेला असून सुमारें पंचवीस फूट उंच व १६।१७ फूट रुंद आहे. हल्लीं त्याचे हात वगैरे तुटलेले आहेत, ते मुसलमानांनीं विजयनगर काबीज केलें त्या वेळींच तोडले असावे. ह्या सर्व मंदिरांस त्यानें नेमणुका वगैरे करून दिलेल्या होत्या, असें उपलब्ध झालेल्या कृष्णदेवरायाच्या कोरीव लेखांवरून कळून येतें.

**५. तिसरा वंश, रामरायाचा उदय.**—रंगराय ऊर्फ तिम्मा किंवा तिमराज ह्या नांवाचा कृष्णरायाचा एक हुशार प्रधान होता. तिमराजानें विजापूरच्या आदिलशहाशीं पुष्कळ लढाया मारून विजयनगरची भर-

भराट केली. कृष्णदेवरायानंतर त्याचा भाऊ अच्युतराय गादीवर बसला. त्यानें सन १५३० ते १५४२ पर्यंत राज्य केलें. तो अगदीं भित्रा व राज्याला नालायक होता. त्याच्या वेळेस राज्यास उतरती कळा लागली. आरंभींच मुद्गल व रायचूर हे परगणे आदिलशहानें काबीज केले. ते पुनरपि हिंदूंच्या ताब्यांत कधींही आले नाहींत. अच्युतरायाच्या दुष्ट वर्तनानें त्याचे सर्व साह्यकर्ते नाखुष झाले. त्यामुळें त्यास इतके शत्रु उत्पन्न झाले, कीं त्यांच्या बंदोबस्तासाठीं त्यास आदिलशाहाची सुद्धां मदत मागावी लागली. सर्व सत्ता दिवाणाच्या हातांत होती. दिवाण तिम्मा ऊर्फ रंगराय यास तीन मुलगे होते. थोरला रामराय, दुसरा तिरुमल, व तिसरा व्यंकटाद्रि. वडील रामराय यास कृष्णदेवरायाची मुलगी तिरुमल्लम्मा ही दिलेली होती; आणि त्याची दुसरी मुलगी त्याचा भाऊ तिरुमल यास दिली होती. हा रामराय मोठा धूर्त होता आणि त्यानें आपणालाच राज्य मिळविण्याची खटपट सुरू केली. तींत त्याचा भाऊ तिरुमल याची त्यास मदत होती. या कामीं तिरुमलनें आदिलशहाची मदत मागितली; त्याप्रमाणें आदिलशहा विजयनगरास आला. तेव्हां त्यास पुष्कळ संपत्ति देऊन रामरायानें परत लाविलें, ( सन १५३६ ). ह्या वेळेस आदिलशहाचा वजीर आसदखान हा विजयनगरचें राज्य बुडविण्याविषयीं मोठी खटपट करीत होता. सन १५४२ सांत अच्युतराय मरण पावला; त्यास सदाशिवराय म्हणून एक पुतण्या होता. त्यास गादीवर स्थापून रामराय, तिरुमल व व्यंकटाद्रि यांनीं सर्व राज्य आपल्या हातांत घेतलें. अच्युतरायाच्या कार्किर्दींत, विठ्ठलस्वामीचें मंदिर पुरें झालें. इकडे पोर्तुगीझांची सत्ता वाढत चालली होती. विजयनगरशीं त्यांचें सख्य होतें. परंतु फायदा होण्याची वेळ आली म्हणजे पोर्तुगीझ लोक तह वगैरे सर्व गुंडाळून ठेवीत.

**६. तालिकोटची लढाई, ( सन १५६५, जानेवारी ता. २३ ).**— सदाशिवराय सन १५४२ पासून स. १५६७ पर्यंत गादीवर होता. पण त्याच्या हातांत काडीइतकी सत्ता नव्हती. तो बहुतेक बंदीवासांतल्यासारखा होता. तथापि कागदोपत्रीं मात्र त्याचें नांव चालत असे, आणि वर्षांतून एक दिवस तिघे प्रधानबंधु राजास जाऊन मुजरा करीत. मुसलमान सुलतानांचे व विजयनगरच्या अधिकाऱ्यांचे व्यवहार उत्तरोत्तर अ-

धिकाधिक चुरसीनें चालूं लागले. त्यांत रामरायाचें वर्तन अतिशय उद्दामपणाचें व मुसलमानांस चीड येण्यासारखें होऊं लागलें. रामराय मुसलमानांच्या मुलखावर हात मारूं लागला. दक्षिणेंतही त्यानें आपली सत्ता फार वाढविली. त्यानें पुष्कळ नवीन फौज चाकरीस ठेवून राज्यास बळकटी आणिली. बहामनी राज्याच्या अनेक शाखा होऊन त्यांच्यांत सदा वैरभाव चालत असल्यामुळें रामरायाचें चांगलें फावलें. दक्षिणचे सर्व मुसलमान राजे त्याच्या कुमकेची अपेक्षा करीत. त्याच्या साहाय्याशिवाय कांहीं चालेनासें झालें. अली आदिलशहास मदत करण्याकरितां ज्या दोन स्वाऱ्या रामरायानें महाराष्ट्रावर केल्या, त्यांत त्याचें वर्चस्व व हिंदु फौजेचें गर्विष्ठपणाचें आचरण एकंदर मुसलमानांस दुःसह वाटूं लागलें. सर्व मुसलमानी राजांचे वकील रामरायाचे पदरीं असत. त्यांना तो पूर्वीप्रमाणें सभ्यपणानें वागवीनासा झाला. तेव्हां त्या वकिलांनींही रामरायाविरुद्ध आपल्या धन्यांकडे तक्रारी केल्या. शिवाय अली आदिलशहा व कुत्बशहा ह्यांचीं राज्यें विजयनगरच्या सरहद्दीवर असल्यामुळें त्यांस रामरायाकडून नेहमीं उपद्रव पोंचे. रामरायाच्या या उपद्रवास अली आदिलशहा व त्याचा वजीर कीश्वरखान हे फारच कंटाळून गेले, आणि रामरायाचा नाश करण्याची त्यांनीं तोड काढिली. आदिलशहानें दरबार भरवून अमीरउमरावांना भाषण केलें, कीं ‘ हिंदु लोक अलीकडे गर्विष्ठ होऊन मुसलमानांची मानहानि करीत आहेत, म्हणून सर्वांनीं एकजुटीनें त्यांचें पारिपत्य करण्यास झटलें पाहिजे. यश आल्यास ठीकच. अपयश आल्यास धर्मसंरक्षणार्थ मृत्युमुखीं पडणें हेंही पुण्यच आहे.’ कीश्वरखानानें सुचविलें, कीं ‘ सर्व मुसलमान राजे एकचित्त झाल्याशिवाय रामरायाचा पाडाव होणें शक्य नाहीं. कारण विजयनगरचा अंमल तुंगभद्रेपासून तहत रामेश्वरापर्यंत असून मुलूख आबाद आहे. त्याच्या ताब्यांत शेंकडों बंदरें असून व्यापाराची घडामोड मोठी चालते. राज्याचा वसूल वीस कोटि आहे. तेव्हां अशा प्रबळ राजाचा नाश एकट्याच्या हातून होणें शक्य नाहीं.’ येणेंप्रमाणें वाटाघाट होऊन या कामांत सर्व मुसलमान राजांची मसलत घेण्याचें ठरलें.

कीश्वरखानानें कुत्बशहाकडे एक विश्वासु इसम पाठविला. कुत्बशहास हिंदूंपासून वारंवार उपद्रव होत असल्यामुळें, त्यानें वरील मस-

ल्तीस खुषीनें आपलें अनुमोदन देऊन, ह्या कामीं हुसेन निजामशहाचें साहाय्य मिळवून देण्याची खटपट आपण पत्करिली. हुसेन निजामशहाही लागलाच ह्या गोष्टीस कबूल झाला. सर्वांचीं मनें शुद्ध राहवीं ह्यासाठीं हुसेनशहानें आपली कन्या चांदबिबी अली आदिलशहास दिली. आदिलशहानें आपली बहीण हुसेनचा मुलगा मूर्तुजा यास दिली. अली बेरीदशहाही ह्या कटांत सामील झाला. हे चौघे राजे सन १५६४ सालीं आपापल्या फौजांसह विजापूर शहरांत एकत्र जमले.

युद्ध सुरू करण्यास कांहीं तरी निमित्त पाहिजे, म्हणून अली आदिलशहानें आपले वकील रामरायाकडे पाठवून मुद्गल, रायचूर व बागलकोट वगैरे किल्ल्यांची त्याजपाशीं मागणी केली. अगोदर भाकित केल्याप्रमाणें रामरायानें वकिलांस धिकारून परत लाविलें. तेव्हां सर्व मुसलमानी फौजा विजयनगरकडे चाल करून कृष्णानदीच्या कांठीं तालिकोटपर्यंत गेल्या. तालिकोट डोण नदीच्या कांठीं, ती नदी कृष्णेस मिळते त्याच्या वर साठ मैल, आहे.

रामरायास ह्या अरिष्टाची फारशी परवा वाटली नाहीं. दोनशें वर्षें हिंदूंचा पाडाव करण्याचे प्रयत्न चालले होते, ते सर्व निष्फळ झाले, हें लक्षांत आणून ह्या वेळीं सर्व हिंदु लोक अगदीं बेफिकीर होते. लोकांचे नेहमींचे व्यवसाय निर्धास्तपणें चालू होते. दरएक बंदरांतून बैलांचे तांडेच्या तांडे माल भरून विजयनगरास येत होते; आपणांस पुढें धोका आहे अशी त्यांस यत्किंचित् कल्पना नव्हती. राजा सदाशिवराय बिचारा आपल्या कोठडींत पडून होता. रामराय जरी बेफिकीर होता, तरी त्यास ह्या सर्व गोष्टींची खबर होतीच. तो स्वस्थ बसला नव्हता. त्यानें बिलकुल न डगमगतां आलेल्या संकटांतून पार पडण्याची कडेकोट तयारी चालविली. तिरुमलराय व व्यंकटाद्रि ह्या दोन शूर भावांच्या हाताखालीं त्यानें मोठमोठ्या फौजा देऊन स्वतः सेनाधिपत्य स्वीकारिलें. कृष्णानदीवरील मुसलमानांचा उतार बंद करण्यासाठीं त्यानें तिरुमलरायास मोठी फौज देऊन तेथें ठेविलें. पण मुसलमानांनीं त्यास फसवून एकच उतार होता तो स्वाधीन करून घेतला, आणि ते विजयनगरच्या मुलखांत शिरले. ह्या प्रसंगीं दोनही पक्षांच्या अगणित फौजा जमल्या होत्या. मुसलमान इतिहासकारांनीं दिलेले आंकडे अगदींच असंभवनीय आहेत, तरी

एकंदरींत दोनही बाजूंस अतिशय मोठी फौज होती, ह्यांत संशय नाहीं. मुसलमान लोक उत्तरेकडून हिंदुस्थानांत शिरल्यावर ते एकामागून एक प्रांत आक्रमीत चालले होते. दिल्लीचा अकबर बादशहा सर्व हिंदुस्थानांत एकछत्री मुसलमानी राज्य स्थापन करण्यास हरप्रयत्न करीत होता. नांव घेण्यासारखें विजयनगरचें हिंदु राज्य मात्र आजपर्यंत मुसलमानांशीं टक्कर देऊन राहिलें होतें. हिंदूंचा अभिमान जागृत राहण्यास त्यांचा कैवार घेणारें असें दुसरें राज्य ह्या वेळेस नव्हतें; आणि तेव्हांपासून आजमित्तीपर्यंत इतकें प्रबळ हिंदु राज्य मराठशाहीशिवाय दुसरें झालें नाहीं. राष्ट्राच्या इतिहासाचें स्वरूप बदलून टाकणारे असे अनेक घनघोर युद्ध-प्रसंग प्राचीन काळापासून जगांत होत आले आहेत. त्यांत तालिकोटच्या संग्रामाची गणना आहे. ह्या वेळीं धर्माभिमान व स्वराष्ट्राभिमान जागृत ठेवण्यास मुसलमान लोक कसे झटले हें चांगलें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

मंगळवार, ता. २३ जानेवारी स. १५६५ रोजीं दोनही फौजा लढाईस सज्ज होऊन उभ्या राहिल्या. ह्या युद्धांत दोनही पक्षांकडे पुष्कळ तोफा होत्या. मुसलमानांकडील तोफखानेवाला प्रसिद्ध चलीबी रुमीखान हा होता. उभयपक्षीं फौजेची व्यवस्था फार काळजीपूर्वक ठेविलेली होती. मुसलमानी सैन्य, उजव्या बाजूस अली आदिलशहा, डावे बाजूस अली बेरीदशहा व इब्राहीम कुत्बुशहा, आणि मध्यभागीं हुसेन निजामशहा, अशा व्यवस्थेनें उभें राहिलें. सर्वांच्या पुढें सांखळीनें बांधून तोफा उभ्या केल्या होत्या. इकडे हिंदूंच्या फौजेंत डाव्या म्हणजे पश्चिमबाजूस तिरुमल, उजव्या बाजूस व्यंकटाद्रि, आणि मध्यभागीं स्वतः वृद्ध रामराय होता. रामराय सर्वांच्या मागें पालखींत बसून लोकांस उत्तेजन देत होता. कांहीं वेळानें पालखींतून उतरून तो एका रत्नजडित आसनावर बसला, आणि समोर मोहोरा, रत्नें व रुपये ह्यांचे ढीग घालून, जे कोणी शिताफीनें लढतील त्यांस बक्षीस देण्यास मी येथें बसलों आहें, असें तोंडानें तो सर्वांस सांगत होता. लढाईत मुख्य सेनापतीनें असें पायीं राहणें अतिशय धोक्याचें असतें. कांहीं वेळ-पर्यंत दोनही पक्षांचें अगदीं कडाकडीचें युद्ध झालें. प्रथमतः मुसल-मानांची फार धांदल उडाली, पण हुसेन निजामशहा मध्यभागाची रामराजाची फळी फोडून त्यांच्या अंगावर धांवला. रामराय सत्तर

वर्षांचा होता. तो चटकन पालखींत चढला; पण निजामशहाचा एक मस्त हत्ती त्याच्या अंगावर धांवून जातांच भोई पालखी टाकून पळाले. नंतर रामराय घोड्यावर चढत असतां त्यास शत्रूंनीं पकडून तोफखान्याचा अधिकारी चलेबी रुमीखान याजकडे नेलें. रुमीखानानें त्यास निजामशहाकडे रवाना केलें. निजामशहानें त्याचें शिर कापून तें भाल्यास टोंचून शत्रूंस कळण्यासाठीं चोहोंकडे फिरविलें. हिंदूंनीं आपला राजा मेला असें पाहिलें, तेव्हां ते निराश होऊन लढाई टाकून पळाले. त्या वेळीं मुसलमानांनीं त्यांची अशी चंदी उडविली, कीं सर्व समरांगण व नदी रक्तानें भरून गेली. एकंदर एक लक्षावर हिंदु लोक मारले गेले.

एकदां हिंदु फौजा विसकळित झाल्याबरोबर त्यांची धांदल उडून त्या परत विजयनगरांत येऊन घुसल्या. जरा शांत वृत्ति कायम ठेवून त्या सर्वांस परत फिरवून पुनरपि मुसलमानांशीं सामना करण्याचा प्रयत्न कोणीं केला असता, तर पुढील भयंकर परिणाम पुष्कळ अंशीं टळले असते. पण इतकी व्यवस्था व लढाईची शिस्त हिंदूंच्या ठिकाणीं कधींच नव्हती, ती ह्या वेळेस कोठून असणार !

**७. लढाईचे भयंकर परिणाम.**—तालिकोटास घडलेल्या अनर्थाची बातमी राजधानीस पोंचण्यास विलंब लागला नाहीं. शहरच्या लोकांस त्याची कांहींएक कल्पना नव्हती. ते आपल्या नेहमींच्या व्यवसायांत निमग्न होते. पराभव झालेला ऐकून सुद्धां पुढें कांहीं विपरीत प्रकार होईल अशी कल्पनाही त्यांस शिवली नाहीं. नेहमींप्रमाणें मोठासा दंड घेऊन मुसलमान परत जातील, आणखी काय होणार, अशी त्यांस खात्री होती. सरकारी खजिना तुडुंब भरलेला होता. तेव्हां मुसलमान मागतील तो दंड देण्यास कांहीं अडचण नव्हती. परंतु ह्या भ्रमाचा लवकरच निरास झाला. पराभव पावलेले लोक घाबरून येऊन शहरांत घुसले. त्यांजबरोबर राजकुटुंबांतले पुरुषही पुष्कळ होते. त्यांनीं प्रथम त्वरा करून होती नव्हती तेवढी संपत्ति हत्तींवर लादून, स्त्रियांसह दक्षिणेकडे पलायन केलें. त्यांजबरोबर साडेपांचशें हत्ती संपत्तीनें भरून गेले. सदाशिवरायास बरोबर घेऊन तिरुमलही अशाच प्रकारें पळून गेला. ह्यामुळें गरीब बिचारी निरपराधी प्रजा शत्रूंच्या तावडींत आयतीच सांपडली. हा नुसता पराभवच नव्हे, हा सर्वस्वाचा संहार होय, आतां कोणी त्राता राहिला नाहीं,

पळून जाण्यास वाट नाहीं. सर्व रस्ते गोणीच्या बैलांनीं भरलेले होते. दुसऱ्या दिवशीं दरोडेखोरांच्या टोळ्या शहरांत घुसल्या, आणि भराभर लूट करूं लागल्या.

मुसलमानांच्या विजयी फौजा लगेच राजधानीवर आल्या नाहींत म्हणून बरें. एक दिवस विश्रांति घेऊन त्या तिसऱ्या दिवशीं शहरांत आल्या. त्या दिवसापासून पुढें पांच महिनेपर्यंत त्या दुर्दैवी शहराची विटंबना चालू होती. ह्या वेळीं मुसलमान लोक शहरांत कांहीं शिल्लक ठेवण्याकरितां आले नव्हते. त्यांनीं लोकांची साफ कत्तल केली; देवळें व वाडे पाडून जमीनदोस्त केले. एवढ्या सुंदर व विस्तीर्ण शहरापैकीं दगडांच्या राशी मात्र आज दिसून येतात, तसेंच नृसिंहाचा तो प्रचंड दगडी पुतळा हात वगैरे तुटलेला दिसून येतो. सुंदर व नकशीचें काम सर्व नाहींसें झालें. विठ्ठल-स्वामीच्या मंदिरांत त्यांनीं होम पेटवून दिला. अग्नि, तलवार, कुऱ्हाडी, पहारा इत्यादिकांचा प्रयोग सारखा चालू होता. जगाच्या इतिहासांत अशा भयंकर प्रळयाचें उदाहरण क्वचित्च सांपडेल. लूट किती मिळाली ह्याची तर गणतीच नाहीं. कित्येक शतकेंपावेतों जेवढी म्हणून संपत्ति विजयनगरास जमली होती, तेवढी सर्व मुसलमानांस मिळाली. चार ही मुसलमान सुलतानांच्या बरोबर जितके लोक लढाईस आले होते, त्यांतील प्रत्येक इसम मातबर होऊन त्याजपाशीं सोनें, रत्नें, सामान, तंबू, हत्यारें, घोडे व गुलाम ह्यांचा विपुल संचय झाला. लुटीपैकीं हत्तीमात्र सुलतानांनीं स्वतःकरितां घेतले, बाकी सर्व संपत्ति ज्याची त्यास दिली. आदिलशहास एक मोठा हिरा सांपडला, तो कोंबडीच्या अंड्याएवढा होता.

ह्याप्रमाणें विजयनगर शहर मुसलमानांनीं लुटून त्यांतील सर्व इमारती जमीनदोस्त केल्या. लोकांवर नानाप्रकारचे जुलूम केले. सर्व देश उजाड पाडिला. व्यंकटाद्रि पळून दूर एका अरण्यांत जाऊन लपून राहिला, तेथून त्यानें लढाई तहकूब करण्याविषयीं मुसलमानांस आग्रहपूर्वक विनंति केली. पुढें तोही मारला गेला. साऱ्या देशाची धूळ केल्यावर मुसलमान राजे रायचुरास एकत्र होऊन परत आपआपल्या देशीं गेले. तालिकोटच्या नैर्ऋत्येस सुमारें ३० मैलांवर वरील लढाई झाली; तरी तीस तालिकोटची लढाई असेंच म्हणतात.

२०-७९१-२०००

ह्या लढाईनें शेवटच्या हिंदु साम्राज्याचा शेवट झाला. विजयनगरच्या राजानें पुनः कधीं वर डोकें काढिलें नाहीं. शहराचा सर्वस्वी नाश होऊन लोक तें सोडून गेले. हल्लीं तेथें हजारों पडक्या इमारती मात्र पूर्वीच्या वैभवाची साक्ष देत आहेत. कांहीं दिवस तिरुमल पेनकोंड्यास एका लहानशा प्रदेशावर राज्य करून होता. तेथेंही त्यास मुसलमानांचा उपद्रव होऊं लागला, तेव्हां तेथून तो चंद्रगिरीस गेला, आणि इकडे विजयनगरचें राज्य मुसलमानांनीं वांटून घेतलें. सीझर फ्रेड्रिक नांवाचा एक इटालियन प्रवासी स. १५६७त विजयनगरास आला होता, तो म्हणतो, ' जिकडे तिकडे मोडकीं तोडकीं घरें वाटेल तितकीं रिकामीं पडलीं आहेत, त्यांत राहण्यास माणसें नाहींत, व्याघ्र वगैरे हिंस्र पशु त्यांत राहतात. ' तिरुमलरायनें पुनः शहर वसविण्याचा प्रयत्न केला, पण तो सफळ झाला नाहीं. पूर्वीच्या विजयनगरच्या स्थलावर हल्लीं लहान लहान खेडीं वसलीं असून, त्या वेळच्या कालव्यांवर लोकांनीं बागाईत व शेती केली आहे.

**प्रस्तुतचे वंशावशेष.**—सदाशिवराय व तिरुमल पेनकोंड्यास कांहीं दिवस राहिले. पण विजयनगरचे मोठमोठे सरदार त्यांस अनुकूल झाले नाहींत. ते आपापल्या जागीं संधि साधून स्वतंत्र कारभार करूं लागले. विजयनगर पडल्यामुळें पोर्तुगीझांचा व्यापार बसला. सन १५६७त सदाशिवरायाचा खून करून तिरुमल पेनकोंड्यास स्वतंत्र झाला. तेथें मुसलमानांनीं त्यास त्रास दिल्यामुळें तो चंद्रगिरीस गेला. तेथें त्याच्या वंशानें कांहीं दिवस राज्य केलें. चंद्रगिरीचा राजा सहावा रंगराय ह्यानें हल्लींच्या मद्रास शहराची जागा स. १६३९ त ई० इं० कंपनीस विकत दिली, (ब्रिटिश रियासत, पृ० ३१४). विजयनगरच्या ताब्यांत जहागीरदार होते, त्यांस नाईक असें म्हणत. मदूरा व तंजावर येथें ह्या नाइकांनीं कांहीं दिवस स्वतंत्र राज्यें केलीं. तेथील राजे ' नाईक ' ह्या नांवानें प्रसिद्ध आहेत. सन १७५६ सालीं तिरुमलराय अधिकारापन्न असतां त्याचा मुलूख हैदरअलीनें जिंकून घेतला, तो त्यानें पुनः परत मिळविला. टिपूचें राज्य इंग्रजांनीं घेतल्यावर तिरुमलरायाचा मुलूख कंपनी व निजाम ह्यांनीं वांटून घेतला, आणि तिरुमलरायास दरमहा १५०० रुपये नेमणूक करून दिली. तरी निजामानें आपणाकडे आलेल्या मुलखापैकीं अना-

गोंदा शहर व सभोंवतालचा कांहीं प्रदेश तिरुमलरायाकडे जहागिरीदाखल ठेविला. तिरुमलरायाचा पुत्र रामराय हा अल्पवयी असतां १८२९ सालीं मरण पावला, तेव्हां जहागीर व नेमणूक कमी झाली. हल्लीं पंपापतिराय व कुमारराघव असे तिरुमलरायाचे दोन वंशज अनागोंदीस असून, त्यांजपाशीं घराण्याच्या वंशावळी व कागदपत्र आहेत. हल्लीं ते हैदराबादच्या निजामाचे ताबेदार आहेत.

८. या हिंदु राज्याचें सिंहावलोकन. (क) माधवाचार्याची अपूर्व योजना.—विजयनगरच्या राज्यांत प्रधान, सेनापति वगैरे कामें केलेल्या अनेक पुरुषांचीं नांवें प्रसिद्ध आहेत. बसवय्या धन्नायक, मल्लापा वोडियार, माधव मंत्री, सायण्णा मंत्री, कंप मंत्री, दंडाधिपति गुंड, बचाप्पा, मल्लीनाथ, तिमराज ऊर्फ तिमण्णा इत्यादि पुष्कळ नांवें जागजागीं दिलेलीं आहेत; पण त्यांचें खुलासेवार इतिवृत्त सांपडत नाहीं. विजयनगर शहर स्थापण्याची खटपट करणारा माधवाचार्य ऊर्फ विद्यारण्य स्वामी ह्याची मात्र थोडीबहुत हकीकत सांपडते. हा माधवाचार्य पूर्वी राजा संगमाजवळ होता. संगमाचा मुलगा हरिहर याजकडून त्यानें विजयनगरची स्थापना करविली. त्याकामीं हरिहरास पैशाचें साह्यही माधवाचार्यानें केलें. ह्यावरून त्या प्रांतीं आचार्याचें वजन अतोनात असलें पाहिजे. भूगोलिक स्थितीवरून पाहतां, विजयनगरच्या स्थलाची जागा पसंत करण्यांत त्यानें आपल्या योजकतेची कमाल केली असें म्हणावें लागतें. शहरास इतकी उत्कृष्ट सोय बहुधा दुर्मिळ होय, असें तज्ज्ञ लोकांचें मत आहे. माधवानें अनेक हुशार गृहस्थांस स्वतः राजकीय धोरणें शिकवून हरिहराच्या नोकरींत ठेविलें. त्यानें अनेक कारस्थानें करून बुकाची सत्ता वाढविली आणि त्यास विजय संपादन करून दिले. ह्याच माधवाचार्याची शृंगेरी येथील शंकराचार्यांच्या गादीवर प्रथम स्थापना झालेली होती. तेव्हां त्यास विद्यारण्यस्वामी हें नांव मिळालेलें होतें. मुसलमानांकडून सर्व दक्षिणदेश जिंकला जाऊन शृंगेरीच्या मठाचा उच्छेद झाला, तेव्हां त्यांचा बंदोबस्त करण्याच्या हेतूनें नवीन हिंदुराज्य स्थापण्याची खटपट त्यानें केली. धर्म, नीति, तत्त्वशास्त्र, न्याय, व्याकरण, इत्यादि अनेक विषयांवर माधवाचार्यानें केलेले संस्कृत ग्रंथ, टीका व व्याख्यानें सर्वमान्य आहेत. माधवाचार्य नांवाचे दोन ग्रंथकार असावेत असा

कित्येकांचा समज आहे, पण त्याचा निश्चय झालेला नाहीं. माधवाचार्यांचा भाऊच सायणाचार्य होय. त्यानें वेद व उपनिषद् यांजवर उत्कृष्ट प्रचंड भाष्य लिहिलें आहे, त्यावरूनच वेदांचा अर्थ हल्लीं निश्चित होत असतो. सायणाचार्यही दुसऱ्या हरिहराच्या प्रधानकीचें काम पाहत होता.

एका विशिष्ट दृष्टीनें ह्या दोघां पुरुषांची कर्तबगारी हिंदुस्थानच्या इतिहासांत विशेष स्मरणीय आहे. धर्म व राज्य ह्या दोन बाबतींची सांगड घालून, आणि एकीचें साह्य दुसरीस घेऊन, मुसलमानांच्या वाढत्या शक्तीस आळा घालण्याचा जो हा प्रयत्न ह्या दोन पुरुषांनीं विजयनगरास केला. त्यावरून राज्यसंस्थापनेचें हृद्गत त्यांस कळलें होतें असें दिसतें. मुसलमानांनीं धर्म व राज्य ह्या दोहोंचा मिलाफ करून आपली उन्नति कशी केली, आणि हिंदुस्थान काबीज करण्यास ते कसे समर्थ झाले हें त्यांनीं समजून घेऊन, तोच प्रकार त्यांनीं आपल्या कर्तव्यांत स्वीकारिला. एका राजास हाताशीं धरून दक्षिण हिंदुस्थानांत मध्यवर्ती अशा मजबूद ठिकाणीं त्यांनीं नवीन राज्य-स्थापना केली, आणि शृंगेरीच्या मठाचा त्यास पाठिंबा देऊन मुसलमानांस मार्ग हटविण्याचा उपक्रम केला. आद्य शंकराचार्यांचे मनांत कदाचित् अशी योजना असेल, पण तिची खरी सांगता माधवाचार्यानें केली. युरोपांत तर राजकीय व धार्मिक सत्ता एकाच पुरुषाच्या हातांत असल्या-मुळें तिकडच्या राष्ट्रांस आपली उन्नति करून घेतां आली; हिंदुस्थानांतही पूर्वी तसा प्रकार होता, पण पुढें तो बंद झाल्यावर पुनरपि तो निर्माण करून स्वराज्याची जी योजना मधवाचार्यानें केली, ती प्रशंसनीय आहे ह्यांत संशय नाहीं. माधवाचार्यांच्या अनुगामी मुत्सद्यांनीं व विजय-नगरच्या अनुगामी राजपुरुषांनीं आरंभींचीं हीं धोरणें ध्यानांत धरिलीं नाहींत, म्हणून विजयनगरचा पाडाव झाला. पुढें शिवाजीनें जेव्हां महाराष्ट्रांत स्वराज्य संस्थापना केली, तेव्हां त्यास कदाचित् ह्या जुन्या विजयनगरच्या उदाहरणानें थोडीबहुत स्फूर्ति आली असण्याचा संभव आहे. विजयनगरचा इतिहास परंपरेनें महाराष्ट्रांतील मुत्सद्दीमंडळींत उतरत गेला असला पाहिजे. अनागोंदीस व इतरत्र कानडीभाषेंत विजय-नगरच्या राज्याचे पुष्कळ कागदपत्र आहेत असें कळतें, त्यांची चालना

करून एखादा विद्वान गृहस्थ त्या राज्याचा सुसंबद्ध इतिहास प्रसिद्ध करील, तर राष्ट्रावर त्याचे महदुपकार होतील.

**( ख ) नीतिमत्तेचा अभाव.**—आरंभींच्या शंभर दीडशें वर्षांत विजयनगरच्या राजांची सत्ता व ऐश्वर्य बहामनी राज्याच्या मानानें फारच मोठें होतें. पण ह्या हिंदु राज्यांच्या पायास न्याय व नीति ह्यांची भर नव्हती. पुष्कळसा धनसंचय करून ऐषआराम व चैन करावी इकडेच बहुतेक राजांची व दरबारी मंडळीची विशेष प्रवृत्ति होती. प्रजेच्या किंवा राष्ट्राच्या संबंधानें आपली असुक एक जबाबदारी आहे, आणि स्वतः त्रास व संकटें सोसून ती जबाबदारी आपण पार पाडिली पाहिजे; अशी भावना विजयनगरच्या राजकर्त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न झालेली दिसत नाहीं. सभोंवारची परिस्थिति ओळखून तदनुसार आपली राज्यव्यवस्था करण्यास लागणारी उदार व उच्चतर दृष्टि राज्यकर्त्यांपैकीं कोणाच्याच ठायीं असलेली दिसत नाहीं. बहुतेक राजे विषयी व स्त्रीलंपट होते. त्यांचें लक्ष सदा चैन करण्याकडे असे. प्रांतिक कामदारांस नेहमीं असे हुकूम दिलेले असत, कीं कोठेंही सुंदर किंवा विशेष देखणी मुलगी आढळून आली, कीं लगेच तिच्या आईबापांच्या संमतीनें ती राजाकडे पाठवून द्यावी. हा प्रघात राज्यांत विशेष जाचक झाला असेल हें सांगणें नकोच. राज्यांतील बऱ्याचशा लढाया व बहुतेक भानगडी अशा स्त्रीविषयक कारणांनीं उद्भवलेल्या आहेत. सोनाराच्या निहाल मुलीचें प्रकरण सुप्रसिद्धच आहे. तें प्रकरण आंवरतां आवरतां रायास पुरे पुरे झालें. निहाल तर गेलीच, पण शेवटीं स्वतःची तरुण मुलगी कलबुर्ग्यांच्या वृद्ध शहास देऊन स्वतःचा जीव बचावण्याची त्यास पाळी आली. अशा-प्रकारें स्वतःच्या जिवावर बेतली असतां, प्रत्यक्ष मुलामुलींचा अथवा बायकापोरांचा त्याग करण्यास रायांस दिक्कत वाटत नसे. अशी मानहानि सहन करण्यापेक्षां लढून जीव गेलेला बरा; अशा प्रकारची उत्तरेंतील रजपुतांची उच्च भावना दक्षिणेंतील ह्या राजांच्या मनास कधीं शिवली नाहीं. फार तर काय, पुष्कळसें द्रव्य दिलें म्हणजे आपणास पाहिजे ती गोष्ट अनुकूल करून घेतां येईल, अशीच त्यांची नेहमीं समजूत होती. म्हणूनच ते नेहमीं धनसंचय कर-ण्यांत दंग असत. विजयनगरच्या अफाट संपत्तीमुळेंच राज्यास एवढी

भरभराट आली होती. एवढ्या मोठ्या राज्यास नीतिमत्तेची जोड मिळाली असती तर त्याचा क्षणार्धांत असा चुराडा उडाला नसता. तालिकोटच्या पूर्वी एवढा मोठा मुसलमानांचा कट झाला, त्याचा प्रतिकार करण्याची कांहींएक तजवीज रायांनीं केली नाहीं. ते नुसत्या घमेंडींतच राहिले. फार तर मोठासा दंड द्यावा लागेल, ह्यापलीकडे आपलें नुकसान तें काय होणार, अशा समजुतीनें ते स्वस्थ बसले. त्या वेळीं मुसलमानांच्या मनाची स्थिति, रयतेची राजनिष्ठा, अगर आपली एकंदर परिस्थिति ह्यांचा विचार त्यांनीं शांतपणें मुळींच केला नाहीं. तालिकोट येथील पराजयानंतर जी धांदल उडाली तिजवरून राज्याच्या अंतर्गत दुर्बल स्थितीची चांगली कल्पना होते. सामान्य प्रजाजनांची भक्ति राजांवर कधींच बसली नव्हती. आपलें जीवित व मालमत्ता राज्यांत सुरक्षित राहतील अशी त्यांस कधींच खात्री वाटत नसे. राजांची लहर लागली म्हणजे लाखों लोकांचे प्राण ते बिनदिक्कत घेत. असा प्रकार असल्यामुळें रयतेची प्रीति स्वतःच्या हिंदु राजांपेक्षां शेजारच्या मुसलमान राजांवरच सामान्यतः ज्यास्त होती. कारण ते राजे धर्माच्या वगैरे बाबतींत कितीही आग्रही असले, तरी ते राज्यकर्त्यांचें कर्तव्य ओळखून असत; राज्यांत बंदोबस्त चांगला ठेवीत; आणि परक्या लोकांत येऊन पडल्यामुळें रयतेच्याच तंत्रानें त्यांस थोडेंबहुत वागावें लागे. मुसलमानांचे वसुलाचे व बंदोबस्ताचे नियम व्यवस्थित पद्धतीवर ठरविलेले होते, तसे हिंदूंचे नव्हते. प्रसंग आला तर हिंदु स्त्रियांस सुद्धां विजयनगरच्या राजांच्या जनानखान्यांत जाऊन पडण्यापेक्षां मुसलमानांच्या गोषांत जाण्यास खुशी वाटत असे. हिंदूंनीं स्वराज्य स्थापन करण्याचा मोठा प्रयत्न केला, त्याची स्थिति ही अशा प्रकारची आहे. बाकी विजयनगरच्या रायांच्या जनानखान्यांत बारा हजार स्त्रिया होत्या, म्हणून जें परकीयांनीं लिहिलें आहे, तें सर्व त्या अर्थानें खरें नाहीं. ह्या सर्व स्त्रिया म्हणजे रायांच्या बायका म्हणून नव्हता. बायका अशा चार-दोनच असत. बाकी वाड्यांतील सर्व नोकरचाकर मिळून बायकांची जी मोठी संख्या असे, तिचा समावेश जनानखान्यांत होऊं शकत नाहीं.

(ग) **संपत्तीची विपुलता.**—विजयनगरच्या राज्यांत हिऱ्यांच्या खाणी पुष्कळ होत्या. त्यांतील हिऱ्यांचा पुरवठा सर्व जगास होत असून,

इतक्या संपत्तिमान खाणी पृथ्वीवर त्या वेळीं दुसऱ्या कोठेंही नव्हत्या. त्या खाणींचा मक्ता व्यापाऱ्यांस दिलेला असे. पंचवीस कॅरटपेक्षां ज्यास्त वजनाचे जेवढे हिरे मिळतील, तेवढे रायास देण्याचा मक्तेदारांशीं ठराव केलेला असे. स. १६१४त चंद्रगिरीच्या रायाजवळ हिऱ्यांनीं भरलेल्या तीन मोठाल्या पेट्या होत्या, असें लिहिलेलें आहे. प्रत्येक प्रवाश्याच्या वर्णनांत ह्या हिऱ्यांची हकीकत आहे. सामान्यतः बऱ्याच लोकांजवळ असले लहान मोठे हिरे असत. बऱ्याच खाणी कृष्णा नदीच्या कांठीं कर्नूळ व अनंतापूर ह्या प्रांतांत असून, मुख्यतः वज्रकरूर येथें त्या विशेष चांगल्या होत्या. ह्या सर्वांस ' गोवळकोंड्याच्या खाणी ' अशी सामान्य संज्ञा ग्रंथकारांनीं वापरिली आहे. कोंबडीच्या अंड्याएवढा एक हिरा तालिकोटच्या लढाईनंतर विजयनगर येथें आदिलशहास मिळाला. रामरायाचे खास घोड्यावर हिरेमोत्यांचा तुरा असे, त्यांत हा मोठा हिरा खालीं बसविलेला होता. ह्याशिवाय आणखी कित्येक सुंदर हिरे होते, त्यांचीं नांवें व हकीकत डॉ. बॉलनें दिली आहे. ' कोंबडीचें अंडें ' व 'कोहिनूर' हे हिरे निरनिराळे होते. कोहिनूर हिरा स. १६५६त कृष्णेच्या कांठीं कोल्लूरच्या खाणींत मीरजुम्ला ह्यास सांपडला. त्या वेळीं त्याचें वजन ७'५६ इंग्लिश कॅरट्स् होतें. तो तसाच कापल्याशिवाय मीरजुम्लानें शहाजहान बादशहास नजर केला. पुढें तो दिल्लींतून नादिरशहानें इराणांत नेला, ( स. १६३८ ) आणि त्यास ' कोह्-इ-नूर ' ( तेजाचा पर्वत ) असें नांव दिलें. इराणांतून तो अहंमदशहा अब्दालीस मिळाला, ( स. १७५१ ), तेव्हांपासून तो काबुलास होता. स. १८०८त काबूलच्या शहासुजानें तो रणजितसिंगास दिला. रणजितसिंगाचा मुलगा धुलीपसिंग ह्यानें स. १८४९त पंजाबचा कारभारी सर जॉन लॉरेन्स ह्यास तो दिल्यावर त्यानें तो विलायतेस व्हिक्टोरिया राणीस नजर केला. इतक्या प्रचंड घालमेलींत त्याची अनेक वेळां छाटाछाट झाली. विलायतेंत स. १८५२त एका डच कारागिराकडून तो पुनः कापविण्यांत आला. हल्लीं त्याचें वजन १०६ कॅरट् आहे.

सारांश, ह्या हिऱ्यांच्या खाणी, पूर्वकिनाऱ्यावरील मोत्यांचे कारखानें, पश्चिमकिनाऱ्यावरील बंदरांतून चालणारा परदेशांतील व्यापार इत्यादिकांनीं विजयनगरांत अपार संपत्तीचा संचय झाला होता. प्रत्येक मंदिरांत

संपत्तीचे ढीगच्या ढीग भरलेले असत. सरदारांच्या व इतर गृहस्थांच्या घरीं सणावारांच्या व समारंभांच्या प्रसंगीं हजारों वर्षांपासून संचित असलेली संपत्ति लोकांच्या नजरेस पडत असे. ( Sewell's Forgotten Empire ).

**( घ ) प्रवाश्यांच्या हकीकती,—( स. १३४४–१४९० ).— निकोलो कोंटी** नांवाचा व्हेनिसचा एक गृहस्थ विजयनगरास आला होता. स. १४२०त व्हेनिस सोडून तो प्रवासास निघाला. तो हिंदुस्थानांत प्रथम खंबायतेस गेला. तेथून काहीं दिवसांनीं दक्षिणकिनाऱ्यानें खालीं येऊन तेथून पायरस्त्यानें तीनशें मैलांचा प्रवास करून विजयनगरास गेला. तेथें कांहीं वर्षें राहून व आणखी दुसरीकडे प्रवास करून तो स. १४४४त परत व्हेनिसला गेला. त्यानें प्रत्यक्ष पाहिलेली विजयनगरची पहिल्या राजवंशाच्या वेळची हकीकत लिहून ठेविली आहे. तो लिहितो. विजयनगर एका उंच डोंगराच्या पायथ्याशीं आहे. शहराचा घेर साठ मैल आहे. तटांच्या भिंती पर्वतांच्या रांगांइतक्या उंच असून त्या सर्व दऱ्यांना वेष्टून गेलेल्या आहेत. राज्यांत शहाण्णव हजार लोक लढाईच्या तयारींत आहेत. मोठमोठ्या लोकांचीं घरें व वाडे दगडी आहेत. शहरांत पाण्याचे कालवे आणिलेले असून, मोठमोठ्या बागा आहेत. ऊस व तांदूळ पुष्कळ पिकतो. जिकडे तिकडे सुंदर व विस्तीर्ण देवालयें असून, ब्राह्मणांच्या पाठशाळाही पुष्कळ आहेत. वाडे, मंदिरें, तट, गोपुरें वगैरेंनीं शहरास अवर्णनीय शोभा आली आहे. अनागोंदी व विजयनगर हीं नदीच्या दोन बाजूंचीं दोन शहरें मिळून एकच मोठें विस्तीर्ण शहर होतें, असें म्हटलें तरी हरकत नाहीं. शहराची दक्षिणोत्तर लांबी बारा मैल व पूर्वपश्चिम रुंदी सुमारें दहा मैल होती. त्या वेळचे कालवे अजून चालू आहेत; आणि त्यांच्या पाण्यावर तयार झालेलें बागाईत अद्यापि हयात आहे. मध्यभागीं मुख्य राजवाड्याचें आवार होतें. निकोलो म्हणतो, येथील लोकांना पाहिजे तितक्या बायका करण्याची मुभा आहे. नवरा मेल्यावर त्या सर्व सती जातात. राजाजवळ नेहमीं बारा हजार बायका तयार असतात; त्यांपैकीं चार हजार राजाबरोबर पायीं चालतात. चार हजार स्वयंपाकखान्यांत असून, त्या घोड्यावर जातात; आणि दोन तीन हजार जनानखान्यांत असून, त्या पालखींतून फिरतात. दरसाल देवाची स्वारी शहरांतून मिरवते.

शिवाय दुसरे सणवार पुष्कळ आहेत. कोंटी लिहितो, विजयनगरच्या उत्तरेस पंधरा मैलांवर एक हिऱ्याची खाण आहे. मार्को पोलोनें उल्लेख केलेल्या गोवळकोंड्याच्या खाणी त्या ह्याच होत.

अब्दुर्रझाक नांवाचा इराणचा एक वकील सन १४४३त विजयनगरास आला होता. इराणचा शहा शहारुख ह्यानें त्यास स. १४४१त आपल्या नोकरीस ठेविलें; आणि कित्येक महत्त्वाच्या कामांसाठीं आपला वकील म्हणून विजयनगरास पाठविलें. त्यानें आपल्या प्रवासाचें दिनवृत्त लिहून ठेविलें असून, त्यांत त्या वेळच्या स्थितीचें उत्कृष्ट चित्र आहे. स. १४४२च्या जानेवारींत तो हिरात सोडून निघाला, तेथून मस्कत येथें आला; तेथून जहाजानें कालिकोटास येऊन पुढें विजयनगरास गेला. त्यानें प्रत्यक्ष पाहिलेली हकीकत बरीच लिहून ठेविलेली आहे. त्याच्या लिहिण्याची शैली विशेष खुबीदार आहे. तो म्हणतो, 'रायाजवळ अकरा लाख फौज आहे; हिंदुस्थानांत इतका शक्तिमान राजा दुसरा नाहीं. शहरांत जिकडे तिकडे गुलाबाचीं फुलें विक्रीस आहेत. व्यापारांच्या पेठा अनेक आहेत. हिरे, माणकें, पाचू, मोत्यें इत्यादि जवाहिराच्या खरेदीविक्री करण्याच्याही पेठा आहेत. जिकडे तिकडे पाण्याचे पाट व कारंजांची मजा दिसते.' तेथें महानवमीचा उत्सव होत असे; तो पाहण्यास अब्दुर्रझाक हजर होता. ह्या उत्सवाचे प्रसंगीं सगळें शहर इतकें गजबजून गेलें होतें, कीं त्याचा देखावा एखाद्या महासागरासारखा दिसत होता. एकंदरींत विजयनगरचें वैभव अप्रतिम होतें, ह्यांत संशय नाहीं.

फेरिस्ता म्हणतो, 'स. १३६६त विजयनगरच्या रायांची सत्ता बहामनी सुलतानांपेक्षां फारच मोठी होती. सर्व दक्षिणहिंदुस्थान व ओरिसासुद्धां सर्व पूर्वकिनारा त्यांच्या ताब्यांत होता. गोवा वगैरे अनेक बंदरें त्यांच्या स्वाधीन होतीं. मंगलोर येथें त्यांचें एक मोठें आरमार होतें. सीलोन, तेनासरीम इत्यादि ठिकाणचे वकील मौल्यवान नजराणे घेऊन रायांकडे येत असत.

**९. दक्षिणच्या मध्यकालीन इतिहासाचें पर्यालोचन.**—( १ ) ज्या काळचा हा इतिहास आहे, त्या काळांत मुसलमान लोक हिंदूंचे देश एकामागून एक जिंकीत चालले होते. असें करण्यांत राज्यवृद्धि हा जरी त्यांचा उद्देश होता, तरी धर्मप्रसारानें त्यांना त्या कामीं विशेष

उत्साह प्राप्त होत असे. अनेक हिंदु लोकांस त्यांनीं मुसलमान केलें; आणि हिंदु स्त्रियांशीं लग्नें लाविलीं. असे प्रकार घडतांना बऱ्याच प्रसंगीं जरी जुल्म होत असे, तरी जुलमाशिवाय आपखुशीनेंही हिंदुमुसलमानांमध्यें लग्नादि संबंध घडत असत. इतकेंच नव्हे, तर सोनाराची मुलगी निहाल हिनें विजयनगरच्या राजपुत्रास न वरितां शहाजादा हसनखान ह्यास वरिलें हें वर सांगितलेंच आहे. अशीं उदाहरणें वारंवार घडत. इतिहासांत प्रसिद्ध झालेले पुष्कळ मुसलमान गृहस्थ हिंदु स्त्रियांच्या पोटीं जन्मलेले होते. कित्येक तर मूळचे ब्राह्मण असून जबरदस्तीनें मुसलमान झाले होते. उदाहरणेंच चाळून पाहिलीं असतां असें मानण्यास आधार दिसतो, कीं हिंदु स्त्रियांच्या पोटीं जन्मलेले पुरुष विशेष बुद्धिवान व पराक्रमी निपजत. पुष्कळ मुसलमानांस हिंदु स्त्रियांचीच आवड विशेष असे. राज्यकर्त्यांचे जातभाई असल्यामुळें मुसलमानांचा हिंदूंच्या सर्व वस्तींत स्वैर संचार चालू असे. हिंदु लोक परधर्मीयांस आपल्यांत घेत नसत. त्यामुळें वरच्याहून उलट प्रकार घडणें शक्य नव्हतें. तसा निर्बंध हिंदु धर्मांत नसता, तर ज्याप्रमाणें इंग्लंडांत सॅक्सन व नॉर्मन ह्या दोन जातींचा शें दोनशें वर्षांत एकजीव झाला, तसा हिंदुमुसलमानांचा येथेंही झाला असता. सारांश, ह्या काळांत दोनही धर्मांचे लोक बहुतकरून व्यवहारांत अभेदानें वागत असत, आणि उभयतांचें जें संघट्टण चालत आलें तें आजतागाईत अव्याहत तसेंच कायम आहे. अनेक हिंदु गृहस्थ जुलमानें अगर स्वेच्छेनें मुसलमानी धर्म स्वीकारीत, आणि त्यायोगें पुढें ते मोठ्या लौकिकास चढत. मोठेपणा मिळविण्यास मुसलमान होणें हें एक चांगलें साधन होतें. ह्या काळीं प्रसिद्धीस आलेल्या मुसलमानांत अस्सल मुसलमान थोडेच असतील.

( २ ) दुसरी अशी एक गोष्ट दिसून येते, कीं इराण, आरबस्तान, तुर्कस्तान वगैरे दूरदूरच्या देशांतून मोठमोठे व्यापारी, कवि, सौदागर, साधु व इतर सामान्य लोक एकसारखे दक्षिणेंत येत असत. त्यांस इकडे परदेशी म्हणत. अशा लोकांचा वर्ग इतका मोठा असे, कीं दरबारांत पुष्कळ वेळां दक्षणी लोकांस तो भारी होता. दक्षिणच्या राजांची कीर्ति दूरदूरच्या देशांत पसरली होती. तिकडच्या साधूंस व कवींस इकडून बक्षिसें, नजराणे वगैरे पाठविण्यांत येत असत. हे लोक बहुशः जलमार्गानें

दक्षिणेंत येऊन दाभोळ वगैरे बंदरीं उतरत. हिंदुस्थानाशीं त्या देशांचा व्यापार फारच भरभराटीचा होता. सारांश, देशपर्यटन हें एक विद्येचें मुख्य अंग आहे असें आज समजण्यांत येतें, तसें त्या वेळेसही तें लोकांस वाटत असे. सर्व देशांतील बुद्धिवान व साहसी लोकांस हा देश नांवलौकिक मिळविण्याचें एक उत्तम स्थळ झालें होतें.

( ३ ) इराण, आरबस्तान वगैरे देशांच्या मार्गानें युरोपाशींही हिंदुस्थानाचें दळणवळण पुष्कळ चालत असे. तुर्कस्तान, रोम, वगैरे राष्ट्रांतून कित्येक हुशार गृहस्थ मुद्दाम आणवून त्यांजकडून इकडचे राजे आपली फौज व तोफखाने तयार करवीत. हिंदुस्थानच्या वैभवाची खरी कल्पना युरोपियन लोकांस ह्या वेळेपासूनच होऊं लागली. पोर्तुगीझ लोकांनीं हिंदुस्थानांत येऊन प्रबळ मुसलमान राष्ट्रांशीं टकरा मारिल्या, आणि अनेक वेळां त्यांजवर विजय संपादिले, ह्यावरून तीं मुसलमानी राज्यें बरींच दुर्बल होतीं असें म्हणावें लागतें.

( ४ ) शिवाजीच्या पूर्वी दक्षिणहिंदुस्थानची स्थिति कशी होती, ह्याची कल्पना करण्यास हा मागचा इतिहास फार उपयोगाचा आहे. मराठ्यांस स्वतःचा अभिमान विशेष वाटत असे. आरंभीं मुसलमानांनीं त्यांस पुष्कळ जाच केला. त्यांच्या अफाट फौजेंत लहानशी सुद्धां नोकरी मराठ्यांस मिळत नसे. ह्या अन्यायाचा मोबदला देण्याची मराठे वाटच पाहत होते. मुसलमानांशीं समोर लढण्याची जरी त्यांस आरंभीं ताकद नव्हती, तरी त्यांना हार न जाणें, व त्यांस आपली जरूर भासविणें इतकीं कामें करून ते त्या वेळीं आपला बोज राखीत. अनेक नामांकित मराठे सरदारांचीं नांवें मागील इतिहासांत आलींच आहेत. या मुद्याचें विशेष विवेचन मराठी रियासतींत आलें आहे तें पाहवें, ( प्र. २ कलम २ )

मुसलमानांस हार जावयाचें नाहीं ही बुद्धि महाराष्ट्रांतील लोकांच्या अंगीं कायम होती. बहामनी राज्याशीं व मुसलमानांच्या वाढत्या शक्तीशीं टक्कर मारण्याकरितांच विजयनगरचा उदय झाला. पुढें विजयनगरचा पाडाव झाला तरी लोकांच्या अंगचें पाणी कमी झालें नाहीं. बहामनी राज्याच्या शाखांत तें दबून होतें, पण त्यास योग्य संधि सांपडतांच शिवाजीच्या मदतीनें तें पुनरपि उदयास आलें.

( ५ ) लोकांची राजकीय स्थिति हल्लींच्या स्थितीच्या मानानें समाधानकारक होती असें दिसत नाहीं. लोक आपले सार्वजनिक हक्क पाळण्याविषयीं दक्ष नसत; आणि राजे आपण होऊन त्यांस जसे वागवीत तसे ते वागवून घेत. गांवगन्ना रयतेस फारसा त्रास पोंचत नसे. ग्रामसंस्थांची पद्धति सर्वत्र चालू असल्यामुळें लोकांस अमुक नवीन राजा झाला, किंवा अमुक मरण पावला ह्याची परवा वाटत नसे. राजघराण्यांतील क्रूर प्रकार व इतर बाबतींसंबंधानें, महाराष्ट्रांतील मुसलमानी राजांची स्थिति पूर्वीं वर्णन केलेल्या दिल्लीदरबारच्या स्थितीहून फारशी भिन्न नव्हती. मराठ्यांच्या उदयासंबंधानें मात्र हा महाराष्ट्रांतील मुसलमानी राज्याचा इतिहास विशेष महत्त्वाचा आहे.

गुजराथ, महाराष्ट्र व दक्षिणहिंदुस्थान येथील स्वतंत्र राज्यांचे इतिहास जरा विस्तारानें दिले, ह्याचें कारण मराठीभाषेशीं ह्या प्रांतांचा विशेष संबंध आहे. चौदाव्या शतकांत मुसलमानांची स्वतंत्र राज्यें जशीं इकडे स्थापन झालीं, तशींच तीं हिंदुस्थानच्या इतर प्रांतांतही झालीं. त्यांचे कारणापुरते वृत्तान्त पुढील प्रकरणीं येतील.

---

# प्रकरण सतरावें.

## स्वतंत्र मुसलमानी राज्यें.

१. काश्मीर, (इसवी सन १३२६–१५८६).२. बंगाल, (१३४१–१५२३).
३. माळवा, (इसवी सन १३८७–१५२६).४. खानदेश, (१३७०–१५९९).
५. जोनपूरचें शर्की घराणें, (१३९४–१४९३).६. मुलतान, (१४४३–१५२४).
७. सिंध, (इ. स. १२१४–१५२३).

**१. काश्मीर,**—( सन १३२६–१५८६ ). कल्हण नांवाचा एक पंडित काश्मिरांत होता, त्यानें सन ११४८–४९त राजतरंगिणी नांवाचा एक ऐतिहासिक ग्रंथ लिहिला आहे. पूर्वींचे पुष्कळ ग्रंथ तपासून व दुसरी ऐतिहासिक माहिती मिळवून कल्हणानें आपला ग्रंथ लिहिला.

हिंदूनें लिहिलेला, इतिहास नांव शोभेल असा हा एकच उत्कृष्ट ग्रंथ आहे. आरबस्तानांत इस्लामाचा उदय होत असतां हिंदुस्थानांत दोन राज्यें सुव्यवस्थित व भरभराटींत होतीं; एक काश्मीरचें व दुसरें कनोजचें. इ. स. ६२७ पासून स. ८५५ पर्यंत नागवंशी राजे काश्मिरांत राज्य करीत होते. त्यांत दुर्लभ, ललितादित्य (स. ७२५–५२), व जयापीड (स. ७८०) हे राजे विशेष प्रसिद्ध झाले. ललितादित्यानें काश्मिरांतील प्रसिद्ध मार्तंडाचें मंदिर बांधिलें. त्यानें तुर्कस्तान, तिबेट, पंजाब वगैरे देश जिंकिले; आणि चीनदेशांत आपले वकील पाठविले. नागवंशानंतर उत्पल वंशानें स. ८३५ पासून स. ९३९ पर्यंत राज्य केलें, त्यांत अवंतिवर्मा (स. ८५५–८८३), व त्याचा मुलगा शंकरवर्मा (स. ८८३–९०२) हे राजे फार पराक्रमी होते. अवंतिवर्म्यानें काश्मिरांत अवंतिपूर शहर स्थापिलें, आणि तेथें दोन मंदिरें बांधिलीं तीं प्रसिद्ध आहेत. तसेंच त्यानें बांधिलेले कालवे पाहून हल्लींचे शास्त्रज्ञसुद्धां आश्चर्य करितात. शंकरवर्म्यानें ठरविलेली वसुलाची पद्धत गेल्या शतकापर्यंत काश्मिरांत चालू होती. पुढें राज्यास उतरती कळा लागली. तथापि हा प्रांत एका बाजूस असल्यामुळें पुष्कळ दिवसपर्यंत तेथें मुसलमानांचा शिरकाव झाला नाहीं.

सेनदेव नांवाचा राजा काश्मिरांत श्रीनगर येथें राज्य करीत असतां, त्यानें शहामीर नांवाच्या एका तुर्क मुसलमानास आपल्या नोकरींत ठेविलें. तो वाढतां वाढतां सेनदेवाचा मुलगा रणचंद्र ह्याचे कार्किर्दींत मुख्य प्रधान झाला. रणचंद्र मरण पावल्यावर काश्मीरची गादी काश्गरचा राजा आनंददेव ह्यानें बळकाविली. त्या आनंददेवानें सर्व मुसलमानांस नोकरींतून काढिलें. त्यामुळें चवताळून त्यांनीं बंडें केलीं. त्यांत राजाचा खून झाला, (सन १३२६). आनंददेवाची राणी कवलदेवी म्हणून होती, तिनें राज्यसंरक्षणार्थ कांहीं दिवस धडपड केली; पण शहामीर ह्यानें तिचा पराभव केला, आणि शम्सुद्दीन असें नांव धारण करून त्यानें काश्मिरांत मुसलमानी राज्य स्थापिलें. स. १३३४त कवलदेवीनें शम्सुद्दीनबरोबर लग्न लाविलें.

शम्सुद्दीननें राज्यापहार केला, तरी कारभारांत त्यानें चांगलें नांव मिळविलें. लोकांस त्रासदायक असे अनेक कर त्यानें माफ केले. तातार

लोक वरचेवर स्वाऱ्या करून मुलुखास उपद्रव देत, त्यांचा त्यानें चांगला बंदोबस्त केला. शम्सुद्दीननें सन १३४९ त आपल्या दोघां मुलांस राज्य सोंपून दिलें. पुढें कांहीं काळानें तो वृद्ध शहा मरण पावला.

जमशीद व शेरअली हे शम्सुद्दीनचे दोघे मुलगे. त्यांच्यांत राज्यप्राप्तीविषयीं कलह सुरू झाला. त्यांत जमशीदचा पाडाव होऊन शेरअलीस राज्य मिळालें. तो अलाउद्दीन हें नांव धारण करून राज्यावर बसला. सन १३६३ त तो मरण पावल्यावर त्याचा धाकटा भाऊ शहाबुद्दीन ह्या नांवानें राज्य करूं लागला. हा शूर व धाडसी होता. तलवारीच्या जोरावर त्यानें राज्याची मर्यादा दक्षिणेस लांबपर्यंत वाढविली. सिंधप्रांतांतील जामचा त्यानें पराभव केला. नगरकोटचे राजासही त्यानें जिंकून आपला मांडलिक केलें. शहाबुद्दीन सन १३८६ त मरण पावल्यावर त्याचा भाऊ हिंदाल हा कुत्बुद्दीन हें नांव धारण करून तख्तावर बसला. तो स. १३९६त मरण पावला. तेव्हां कुत्बुद्दीनचा मुलगा सिकंदर राज्यकारभार पाहूं लागला. त्यानें काश्मिरांतील अनेक हिंदु देवालयांचा विध्वंस करून बुत्शिकन (म्हणजे मूर्तिनाशक) असें पद आपल्या नांवास जोडिलें. ह्या कृत्यांत त्याच्या प्रधानानें त्यास चांगली मदत केली. हा प्रधान मूळचा ब्राह्मण असून मुसलमान झाला होता. हिंदु धर्माचा पाडाव केला, एवढ्या गोष्टीखेरीज इतर बाबतींत सिकंदरनें राज्य चांगलें चालविलें. ह्या कारकिर्दीत बहुतेक हिंदु लोक बाटून मुसलमान झाले. हल्लींही तेथें मुसलमानांचीच वस्ती ज्यास्त आहे. सिकंदर तयमूरलंगास शरण गेला, म्हणून तयमूरनें काश्मीरवर स्वारी केली नाहीं. तो सन १४१६त मरण पावला. त्यास तीन मुलगे होते. त्यांतील वडील अमीरखान हा पुढें गादीवर बसला. अमीरखानानें अलीशहा असा किताब धारण केला. हिंदुस्थानांत प्रवास करण्याचें मनांत येऊन त्यानें आपल्या भावास राज्याची व्यवस्था सांगितली आणि काश्मिरांतून दक्षिणेंत प्रयाण केलें. मागें त्याचा भाऊ शादीखान ह्यानें झैन्-उल्-अबिद्दीन असें नांव स्वीकारून राज्य बळकाविलें, (स. १४२२).

हा सुलतान विशेष चांगला निघाला. हिंदूंचा पाडाव करण्यासाठीं जेवढे नियम पूर्वीं राज्यांत चालू होते, ते सर्व त्यानें बंद केले, आणि

ब्राह्मण लोकांस परत येऊन आपलीं धर्मकर्मे पूर्ववत् करण्याची मोकळीक दिली. मागच्या राज्यकर्त्यांनीं पाडिलेलीं देवळें त्यानें पुनरपि बांधिलीं, आणि सर्व धर्मांच्या लोकांस सुखानें आपल्या राज्यांत नांदण्याची सोय करून दिली. त्यानें मशिदी, कालवे व तलाव बांधिले, आणि निष्पक्षपातानें व नीतीनें राज्यकारभार केला. काव्य, गायन, इत्यादि ललितकलांस त्यानें चांगलें उत्तेजन दिलें. घरगुती वर्तनांतही तो अगदीं चोख होता. वृद्धापकाळ झाला, तेव्हां त्याच्या मुलांत भांडणें लागलीं; आणि तीं चालू असतांच तो सन १४७२त मरण पावला.

झैन्-उल्-अबिद्दीनचे मागून त्याचा मुलगा हाजीखान ऊर्फ हैदर हा गादीवर बसला. तो दुर्वृत्त निघून एक वर्षांतच मारला गेला. नंतर त्याचा मुलगा हसन ह्यानें मोठ्या संकटानें तेरा वर्षे राज्य केलें. त्याचा महंमद म्हणून एक अल्पवयी मुलगा होता. त्यास गादीवर स्थापून ( सन १४८६ ), सय्यद हसन नामक प्रधानानें राज्यकारभार चालविला. हा प्रधान सय्यद जातीचा असून भारी महत्त्वाकांक्षी होता. त्यामुळें दरबारांत दोन तट पडले. सय्यदांच्या पक्षानें सुलतानास सर्वस्वी आपल्या ताब्यांत ठेविलें. शेवटीं दुसऱ्या पक्षाची सरशी होऊन त्यानें शहास सय्यदांच्या ताब्यांतून सोडवून राज्यावर बसविलें. पण त्याचा जम कधींच बसला नाहीं. झैन्-उल्-अबिद्दीनचा फत्तेखान नामक एक नातू होता, त्यानें महंमदबरोबर कलह करून राज्यापहार केला, (स. १४९६). फत्तेखानानें महंमदास कैद करून ठेविलें.

फत्तेखान राज्य करीत असतां महंमदास सोडविण्यासाठीं कित्येकांनीं खटपट केली. फत्तेखानाचा पराजय करून महंमदानें राज्य परत मिळविलें, परंतु पुनरपि फत्तेखानास यश मिळून महंमद दिल्लीस सिकंदर लोदीकडे मदत मागण्यास गेला. लोदीच्या मदतीनें महंमदानें आपलें राज्य जिंकून परत घेतलें. तेव्हां फत्तेखान हिंदुस्थानांत आला आणि इकडेच त्याचा अंत झाला, ( सन १५०७ ). महंमदास राज्य मिळालें, तरी त्याचें दुर्दैव कांहीं संपलें नव्हतें. त्याचे आप्त व प्रधान यांनीं त्याजविरुद्ध वारंवार खटपटी केल्या. तातार लोक उत्तरेकडून स्वाऱ्या करीतच होते. पन्नास वर्षेपर्यंत अनेक विपत्ति भोगून हा सुलतान सन १५३५ त मरण पावला. पुढें पन्नास वर्षे हें राज्य कसेंबसें चाललें.

गृहकलह व बंडें एकसारखीं चालू होतीं. नंतर अकबरानें इ. स. १५८६ सालीं काश्मीरच्या मुसलमानी वंशाची समाप्ति करून, तो प्रांत दिल्लीच्या सार्वभौम सत्तेखालीं आणिला, ती हकीकत पुढें येईल.

**२ बंगाल व बहार,** ( सन १३४१–१५२३ ).—बंगालप्रांतांत पूर्वी अनेक लहान लहान भाग होते. पूर्वेकडच्या आसामकडील भागास प्राग्ज्योतिष म्हणत. उत्तरेकडचा भाग पुंड्र, गंगेच्या दक्षिणेकडील वंग, आणि पश्चिमेकडील कर्णसुवर्ण, अंग व मगध असे भाग होते. ह्या भागांचा मध्यकालीन इतिहास अगदीं अप्रसिद्ध आहे. इ. स. ९००च्या सुमारास ह्या प्रांतांवर बुद्धधर्मी पाल वंशाचें राज्य सुरू झालें. त्याचा पहिला राजा गोपाल म्हणून होता. गोपालाची राणी देड्डादेवी म्हणून होती, तिच्या पोटीं मुलगा झाला त्याचें नांव धर्मपाल. धर्मपालानंतर देवपाल, वाक्पाल, जयपाल, महीपाल, नयपाल, विग्रहपाल, रामपाल, मदनपाल, नारायणपाल वगैरे पुरुष झाले. त्यांची राजधानी पाटलिपुत्र ऊर्फ पाटणा ही होती. हे राजे बुद्धधर्मी होते, तरी ते हिंदूंचा छळ करीत नसत. ह्या पालराजांचा इतिहास अलीकडे सांपडलेल्या शिला-लेखांवरून थोडासा उपलब्ध झाला आहे. वरील नांवांपैकीं महीपाल ( स. १०००–१३०५ ) व रामपाल ( स. १०७५ ) ह्यांनीं गौड येथें राज्य केल्याचा उल्लेख सांपडतो.

पण गौड येथें राज्य करणारा हिंदुवंश सेन राजांचा होय. सेनांचा उदय स. १०९५च्या सुमारास होऊन त्यांचा अंत स. ११९८त झाला. विजयसेनानें नदिया येथें सेन वंशाची स्थापना केली. स. ११९८त बख्त्यार खिलजीनें नदिया काबीज करून सेनवंशाची समाप्ति केली, ( पृष्ठ ९९ पहा ). सेनराजे हिंदु होते. त्यांनीं बुद्धधर्माचा पाडाव केला. सेनराजे क्षत्रिय असून ते मूळ कर्नाटकांतून बंगाल्यांत आले. बोपदेवाचें मुग्धबोध नांवाचें संस्कृत व्याकरण सेनवंशाबरोबरच बंगाल्यांत प्रचलित झालें. सेनांच्या वेळेस हिंदु शास्त्रविद्येचा बंगाल्यांत पुनरुद्धार झाला. ( अक्षयकुमार मित्र,–मॉडर्न रिव्यु ). जातिभेदाची दुर्भेद्य व्यवस्था ह्या सेनांनीं सुरू केली. बाराव्या शतकांत बल्लाळ सेन हा बंगाल्यांत पराक्रमी राजा झाला. (Imperial Gazetteer II).

बंगालप्रांत मुसलमानांनीं कसकसा जिंकिला त्याचें वर्णन मागें वेळोवेळीं आलें आहे. सन ११९८त बखत्यार खिलजीनें बंगालप्रांत जिंकिल्यापासून तेथचे अंमलदार बहुतेक स्वतंत्रतेनेंच कारभार करीत. त्यांचें पारिपत्य करण्यासाठीं दिल्लीच्या सुलतानांनीं बंगाल्यावर अनेक स्वाऱ्या केल्या, त्यांचें वर्णनही वर ठिकठिकाणीं आलेंच आहे. कांहीं काळपर्यंत बंगालच्या कारभाराचे दोन विभाग होते, पूर्वबंगालचा कारभार डाक्का नजीक सोनारगांव म्हणून आहे तेथून चाले; आणि पश्चिमबंगालचा हुगळी नजीकच्या सातगांवाहून चाले. महंमद तुघ्लख दिल्लीस राज्य करीत होता, तेव्हां कदरखान नामक सरदार बंगाल व बहार प्रांताचा सुभेदार होता. फकिरुद्दीन नामक दुसऱ्या एका गृहस्थानें बादशहाविरुद्ध बंड करून कदरखानास ठार मारून पूर्वेकडील प्रांतावर स्वतंत्र राज्य स्थापिलें, (स.१३४१). पण अडीच वर्षांनीं मलीक-अली-मुबारिक नामक सरदारानें फकिरुद्दीन यास ठार मारून तें राज्य आपण घेतलें. मलीकअलीही दोन वर्षांतच मारला गेला. नंतर हाजी-इल्यास ऊर्फ शम्सुद्दीन पूर्वी हा बंगालचा सुलतान झाला. हा आपल्या कामांत दक्ष असल्यामुळें महंमद तुघ्लखच्या हातून त्याचें पारिपत्य होईना. सन १३५१त फिरोज तुघ्लख जातीनिशीं त्याजबरोबर संग्राम करण्यास गेला. पण त्या प्रयत्नांत त्यास यश न येऊन इल्यासनें सोनारगांव व सातगांव येथील ठाणीं मोडून, लक्ष्मणावती ऊर्फ लखनौती येथें आपल्या लष्करचें ठाणें नेलें. लखनौतीस त्यानें गौड असें नांव दिलें. ह्याच शहरास पुढें कांहीं दिवस जन्नताबाद म्हणजे स्वर्ग-नगर असें नांव मिळालें होतें. पांडवा म्हणून दुसरें एक जुनें शहर होतें त्यास फिरोजशहानें फिरोजाबाद असें नांव दिलें. हेंच शहर बंगालच्या सुलतानांची राजधानी होतें.

शम्सुद्दीन पूर्वी सन १३५७त मरण पावला. शम्सुद्दीन भांग पीत असे, म्हणून त्यांस 'भांगरा' असें टोपणनांव मिळालें होतें. शम्सुद्दीननंतर त्याचा मुलगा सिकंदर ह्यानें दहा वर्षें राज्य केलें. ह्या अवधींत एकवार त्यास फिरोजशहाबरोबर लढावें लागलें. त्या वेळीं सिकंदरचा पराजय होऊन त्यानें फिरोजशहास नियमितपणें खंडणी पाठविण्याचें कबूल केलें.

बंगालच्या इतिहासाविषयीं मुसलमानी ग्रथांत फारच थोडा उल्लेख आहे. राज्यकर्त्यांचीं नांवें, आणि राज्यरोहणाचे व मरणाचे काल एवढें

२१-२८-६-७९१-२०००

मात्र दिलेलें आहे. सिकंदरचा मुलगा ग्यासुद्दीन पूर्वी सन १३६७त गादीवर बसला आणि सन १३७४ त मरण पावला. ग्यासुद्दीनचा मुलगा सुलतान-उस्-सलातीन ह्यानें नऊ वर्षें राज्य केलें. त्याचा मुलगा दुसरा शम्सुद्दीन हा दुर्वृत्त होता, तो तीन वर्षांतच मरण पावला, (स. १३८६). त्याचें राज्य कंस नामक एका हिंदु जमीनदारानें बळकाविलें. स. १३९२त कंस मरण पावल्यावर त्याचा मुलगा जितमल्ल ह्यास बंगालचें राज्य प्राप्त झालें. पण त्यास विपरीत बुद्धि आठवून त्यानें मुसलमानी धर्म स्वीकारिला आणि जलालुद्दीन असें नांव धारण करून राज्य करूं लागला. पुढें त्यानें सन १४०९ पर्यंत पराक्रमानें राज्य केलें. त्याचा मुलगा अहंमद ह्यानें त्याचे मागून अठरा वर्षें राज्योपभोग घेतला. अहंमदानंतर नासिरशहा नांवाचा सुलतान झाला, पण तो दोन वर्षांतच आटपल्यावर बूर्बक ह्यानें सतरा वर्षें शांततेनें राज्य केलें. तो सन १४५९त मरण पावल्यावर बारा वर्षें यूसुफ्शहा हा सुलतान होता. यूसुफ्शहानंतर चार वर्षें बऱ्याच घालमेली होऊन शेवटीं सन १४६१त, फिरोज पूर्वी नांवाचा सुलतान तख्तारूढ झाला. ह्यानें गौड राजधानींत सन १४९३ पर्यंत सुखानें राज्य केलें. त्याच्या पश्चात् कलह माजून सन १४९६त अलाउद्दीन पूर्वी ह्याच्या हातीं राज्यकारभार गेला. हा पराक्रमी व सज्जन निघाला, आणि मोठ्या ऐश्वर्यानें सन १५२३ पर्यंत राज्यकारभार हाकून अलाउद्दीन मरण पावला. त्याचा मुलगा नशीब हा राज्यकारभार चालवीत असतां, बंगाल व बहार ह्या प्रांतांचें राज्य शीरखान सूर यानें जिंकिलें, ती हकीकत मोगल बादशहांच्या कार्किर्दीत येईल. बंगालचे सुलतान बहुतेक तुर्क व अफगाण होते. कांहीं दिवस तेथील सर्व सत्ता आफ्रिकेंतून आलेल्या हबसी लोकांच्या हातीं होती. सुलतानांचा थाट मोठा असून, तेथील जुन्या इमारतींवरून त्यांच्या वैभवाची साक्ष अद्यापि पटते.

बंगालप्रांताचा वरील इतिहास अगदीं त्रोटक आहे, तरी तसल्या इतिहासावरून सुद्धां एक गोष्ट व्यक्त होते, ती अशी, कीं हा प्रांत धन-धान्यानें समृद्ध होता. गौड हें फार मातबर, विस्तीर्ण व शोभिवंत शहर होतें. हल्लीं तें शहर मोडून जाऊन त्याच्या ठिकाणीं मोठालीं अरण्यें वाढलीं आहेत. हें मालडाच्या आग्नेयीस सहा मैलांवर आहे. तेथें मुसलमानांनीं बांधिलेल्या मशीदी, वाडे वगैरे दृष्टीस पडतात. प्रत्येक सुलतानाचें कांहीं

तरी स्मारक तेथें आहे. मशीदींस संगमरवरी दगड लाविलेले आहेत, त्यांच्या आंतल्या बाजूस हिंदु देवतांच्या प्रतिमा आहेत, त्यावरून ते मूळ देवळांचे काढून घेतलेले आहेत, हें उघड होतें. अनेक मशीदींचे घाट सुद्धां हिंदु रीतीचे आहेत. बंगालप्रांताचा व्यापार पूर्वेस व पश्चिमेस फार दूरपर्यंत अतिशय चालत असल्यामुळें लोक पुष्कळ सधन होते. गुलाम हुसेन म्हणतो, बहुतेक सर्व श्रीमंत लोक सोन्याच्या ताटांत जेवीत असत. सन १५२७त शीरशहानें गौड शहर लुटलें, आणि सन १५७५त एक मोठा प्लेग येऊन पुष्कळ लोक मेले, तेव्हांपासून गौडचें वैभव लयास गेलें, तें त्यास पुनः प्राप्त झालें नाहीं. तेथील जुन्या मोठमोठ्या इमारती पडून गेल्या आहेत. त्यांचे दगड व चुना नेऊन विकण्याचा पुष्कळ दिवस एक धंदाच चालला होता. हा धंदा करण्याबद्दल सरकारांत दरसाल आठहजार रुपये वसूल येत असे.

**३. माळवा, ( सन १३८७–१५२६ ).**—दक्षिणेस नर्मदा नदी, उत्तरेस चंबळ, पश्चिमेस गुजराथ, आणि पूर्वेस बुंदेलखंड वगैरे प्रांत, ह्या माळवाप्रांताच्या चतुःसीमा पूर्वापार समजल्या जात आहेत. हा प्रदेश बऱ्याच अंशीं उंच सपाटीचा व सुपीक असून हवाही चांगली आहे. पौराणिक काळीं माळवाप्रांतावर राज्य करीत असलेले राजे सर्व भरतखंडांत नांवाजलेले होते. राजा विक्रमादित्य व राजा भोज हे त्यांपैकींच होत. अवंती ही त्या राजांची राजधानी होती. हिंदुस्थानच्या अत्यंत भरभराटीच्या काळांत उज्जनी शहराएवढें विद्या व कला यांनीं सुसंपन्न असें दुसरें शहर पृथ्वीच्या पाठीवर नव्हतें. हिंदुधर्माचें पुनरुज्जीवन ह्या माळवा प्रांतांत सुरू झालें. माळव्याच्या राजांच्याच आश्रयाखालीं संस्कृत भाषेचा बहुतेक विस्तीर्ण ग्रंथसंग्रह तयार झाला. आरंभींच्या मुसलमानांस माळवा प्रांतांत आपलें ठाणें बसविण्यास फारच प्रयास पडले. गुलामवंशी सुलतान अल्तमश ह्यानें सन १२२६त माळवाप्रांत जिंकून दिल्लीच्या अंमलाखालीं आणिला. सन १२३१त ग्वालेर व उज्जनी हीं दोन शहरें त्या सुलतानानें काबीज केलीं. त्या वेळेस उज्जनी शहरांतील सर्व पुरातन सुंदर मंदिरांचा व राजगृहांचा त्यानें विध्वंस केला. तेव्हांपासून माळवाप्रांताची व्यवस्था दिल्लीदरबारकडून होऊं लागली.

सन १३८७त दिलावरखान घोरी म्हणून फिरोज तुघ्लखच्या पदरीं एक सरदार होता, त्यास त्या सुलतानानें माळव्याच्या सुभेदारीवर नेमिलें. फिरोजच्या मरणानंतर दिल्लींत धामधूम उडाली, त्या अवधींत दिलावरखानानें दिल्लीचा ताबा झुगारून देऊन माळव्यांत स्वातंत्र्य धारण केलें. तो उज्जनींत न राहतां धार व मांडवगड येथें राहूं लागला. थोड्याच वर्षांनीं मांडवगड ही माळव्याच्या मुसलमानी सुलतानांची राजधानी झाली. मध्यहिंदुस्थानांत मांडवगडाइतका पुरातन व मजबूद किल्ला दुसरा नाहीं. सन १३९८त तयमूरलंगानें दिल्लीवर स्वारी केली, तेव्हां तेथचा सुलतान महंमूद तुघ्लख गुजराथेंत पळून आला. पण गुजराथच्या सुलतानानें त्यास आश्रय न दिल्यामुळें तो माळव्यांत दिलावरखानाकडे गेला. दिलावरखानानें त्यास तीन वर्षें सन्मानपूर्वक आपल्यापाशीं ठेवून घेतलें; आणि तो परत दिल्लीस गेल्यावर दिलावरखानानें आपल्या नांवाचें नाणें पाडून माळव्यांत स्वतंत्र राज्यकारभार सुरू केला, (स. १४०१ ). सन १४०५त दिलावरखान मरण पावला; आणि त्याचा मुलगा आलफ्खान हा सुलतान हुशंग घोरी असें नांव धारण करून मांडवगड येथें तख्तावर बसला. पण सरदार मंडळीस तो आवडत नसल्यामुळें त्यांच्या सल्ल्यानें गुजराथचा सुलतान मुज्फरशहा ह्यानें माळव्यावर स्वारी करून हुशंगास काढिलें, आणि तो प्रांत जिंकून आपला भाऊ नुसत ह्याच्या ताब्यांत दिला. पण नुसतखानानें तो प्रांत लवकरच सोडून दिल्यामुळें, हुशंगशहानें मुज्फरशहाशीं स्नेह करून माळव्याचें राज्य परत मिळविलें. सन १४१०त मुज्फरशहा मरण पावल्यावर गुजराथेंत भानगडी झाल्या, त्यांच्या योगानें हुशंगशहास पूर्वीच्या अपमानाचा सूड घेण्यास फावलें. त्यानें स. १४१८त गुजराथेवर स्वारी केली, पण तींत त्याचाच पराजय झाला. सन १४२८त महाराष्ट्राचा बहामनी सुलतान अहंमदशहा ह्यानें हुशंगशहाचा पूर्ण पराभव केला. तेव्हांपासून विपत्ति भोगून तो सन १४३२त मरण पावला. मांडवगडचा किल्ला हुशंगशहानें उत्कृष्ट रीतीनें बांधून मजबूद केला. त्या काळीं मांडवगडाइतके मजबूद किल्ले क्वचित्च होते. मांडवगड येथें हुशंगशहानें बांधिलेली जुम्मामशीद फार प्रेक्षणीय आहे. हुशंगशहाच्यानें शत्रूंपासून आपला बचाव करवला नाहीं, तरी तो आपल्या राज्यांत फार प्रिय

होता. हिंदु लोकांच्या देवळांस धक्का न लावितां, सर्वांस त्यानें ममतेनें व निष्पक्षपातानें वागविलें, त्याबद्दल माळव्यांतलि लोकांत अद्यापि त्याची आठवण निघते. त्यानेंच हुशंगाबाद शहर स्थापिलें.

हुशंगशहाच्या पश्चात् त्याचा मुलगा गज्नीखान तख्तनशीन झाला; पण त्यास वजीर महंमूदखान खिलजी ह्यानें ठार मारून माळव्याचें राज्यपद मिळविलें. तेव्हां माळव्याच्या घोरी वंशाची समाप्ति होऊन, खिलजी वंशाचा अंमल सुरू झाला, ( १४३५ ). सुलतान महंमूद खिलजी हा शूर व चतुर होता. परशत्रूंशीं लढण्यांत गुंतला असतां त्यानें अंतर्व्यवस्थेची हेळसांड केली नाहीं. मेवाडचा राणा कुंभ ह्याजबरोबर महंमूद शहाचें घनघोर युद्ध सुरू झालें. त्यांत कुंभ राण्यास जय मिळून त्यानें चितोड येथें विजयस्तंभ उभारिला, तो अद्यापि आहे, ( स. १४४० ). पुढें रजपुतांनीं अनेक विजय ह्या मुसलमानांवर मिळविले. सन १४५१त त्यानें गुजराथ प्रांतावर स्वारी केली, पण तींत त्यास यश आलें नाहीं. सभोंवारच्या रजपूत राजांशीं त्याचे झगडे अव्याहत चालू होते. सन १४५५त किरवली, अजमीर व रतनभोर येथील राजांस त्यानें जिंकिलें. एकदां त्यानें महाराष्ट्रावर स्वारी करून बहामनी सुलतानाचा प्रत्यक्ष बेदर राजधानींत पराजय केला; आणि इलिचपूरचा परगणा घेऊन तो परत आला. सन १४६९त सुलतान मरण पावला. त्याच्या कार्किर्दींतही मांडवगड येथें पुष्कळ इमारती झाल्या. हुशंगशहानें सुरू केलेली मशीद त्यानें पुरी केली, तीस ३६० कमानी व २०० घुमट आहेत. आपल्या राज्यांतलि हिंदु प्रजेस त्यानें त्रास दिला नाहीं. तो परराज्यांत स्वाऱ्या करी, त्या वेळेस मात्र त्यांला त्रास पोंचत असे.

महंमुदाचा पुत्र ग्यासुद्दीन हा त्याच्या मागून माळव्याचा सुलतान झाला. तो आपल्या बापाबरोबर हरएक प्रकारचीं कामें करून कसलेला होता. त्यानें पुष्कळ वर्षें शांततेनें राज्याचा उपभोग घेतला. त्यास छानछोकी फार आवडे. तरी राज्यकारभारांत दक्ष असल्यामुळें माळव्यांतील लोकांस त्याच्या कार्किर्दींत जितकें सुख मिळालें, तितकें अलीकडे पुष्कळ वर्षें त्यांस प्राप्त झालें नव्हतें. सन १५०० ह्या वर्षीं सुलतान ग्यासुद्दीन मरण पावला. पुढें त्याच्या पुत्रांत राज्यप्राप्तीविषयीं तंटे लागून सुलतान नासिरुद्दीन हा तख्तनशीन झाला. त्याच्या कारकिर्दींत महत्त्वाच्या

गोष्टी फारशा घडल्या नाहींत. चितोडवर स्वारी करून तेथील राजाचा त्यानें एकदां पराजय केला. सन १५१२त सुलतान नासिरुद्दीन मरण पावला. नासिरुद्दीनचा मुलगा महंमूद यास महाप्रयासानें तख्त प्राप्त झालें. त्यांत मेदिनीराय नांवाच्या एका रजपूत सरदाराची त्यास चांगली मदत होती. म्हणून पुढें सर्व अधिकार मेदिनीरायाच्या हातांत आला. रायानें जुने मुसलमान कामगार काढून टाकून राज्यांत हिंदूंचा पुष्कळ भरणा केला, तेव्हां त्याचें व सुलतानाचें वितुष्ट आलें. दोघांची हातघाई होऊन सुलतान गुजराथेंत पळून गेला. तेथून मुज्फरशहाची मदत घेऊन तो परत आला. मुज्फरशहानें सर्व रजपुतांस हांकून देऊन मांडवगड काबीज केला. मेदिनीराय पळून मेवाडच्या संग राण्याच्या आश्रयास जाऊन राहिला. तेव्हां अर्थात् संग राण्याशीं सुलतान महंमुदची लढाई जुंपली. लढाईंत रजपुतांनीं सुलतानास जेर करून, घायाळ झाला असतां जिवंत पकडिलें. संग राण्यानें मोठ्या काळजीनें सुलतान महंमुदाच्या सर्व जखमा बऱ्या केल्या आणि सर्व इतमामासह त्यास त्याच्या राजधानीस परत पाठवून दिलें. हाच जर संग राणा मुसलमानांचे हातांत सांपडता, तर त्याची त्यांनीं काय दशा केली असती ह्याची कल्पना वाचकांनींच करावी.

सन १५२५त गुजराथचा सुलतान मुज्फरशहा मरण पावल्यावर बहादूरशहाच्या विरुद्ध ज्या खटपटी झाल्या, त्यांत माळव्याच्या महंमूदशहाचें अंग होतें. म्हणून बहादूरशहानें माळव्यावर स्वारी करून मांडवगड राजधानी काबीज केली. पुढें सुलतान महंमूद यास कैद करून चांपानेरास पाठवीत असतां रस्त्यांत महंमुदाचा खून झाला, ( सन १५२६. ) ह्या वेळेपासून माळवा प्रांत गुजराथच्या राज्यास जोडला जाऊन तेथील स्वतंत्र राज्याची समाप्ति झाली. अकबर बादशहानें गुजराथप्रांत जिंकिला, तेव्हां माळवाही त्याच्या ताब्यांत गेला. त्यानें आपला मुलगा मुराद याजकडे माळव्याची व्यवस्था सांगितली, ती हकीकत पुढें येईल.

येणेंप्रमाणें इसवी सन १३८७ पासून सन १५२६ पर्यंत माळव्यांत घोरी व खिलजी ह्या दोन घराण्यांतील सुलतानांनीं १३९ वर्षे राज्य केलें. पैकीं सन १४३५पर्यंत घोरी सुलतानांचा अंमल होता. मांडवगड राजधानी प्रसिद्धीस येऊन कित्येक मोठमोठ्या इमारती बांधल्या गेल्या;

ह्यापलीकडे विशेष स्मरणीय गोष्टी ह्या राज्यांत फारशा घडल्या नाहींत. एकंदरींत माळव्याचे राज्यकर्ते प्रजेस त्रास देणारे नव्हते, आणि परशत्रूपासून राज्याचें संरक्षण करण्यांतच त्यांचा बहुतेक काल निघून गेल्यामुळें राज्याच्या अंतर्व्यवस्थेकडे लक्ष देण्यास त्यांस फुरसतच मिळाली नाहीं.

**४. खानदेश, ( सन १३५१–१५९९ ).**—पश्चिमेस गुजराथ, उत्तरेस माळवा, पूर्वेस वऱ्हाड व दक्षिणेस महाराष्ट्राची डोंगर सपाटी, ह्या चतुःसीमांमध्यें असलेल्या प्रदेशास खानदेश असें म्हणतात. ह्या देशांतून तापी नदी पूर्वपश्चिम वाहते. हा प्रांत सुपीक असून सुलतानांच्या वेळेस बागाइतानें भरलेला होता. मोगल बादशाहीच्या पडत्या काळांत या प्रांतांतील शेती बंद पडून तेथें जंगलें वाढलीं.

सन १३७०त दिल्लीचा सुलतान फिरोज तुघ्लख यानें मलीक राजी फरूकी ह्यास खानदेशचा सुभेदार नेमिलें. हा मूळचा उच्च घराण्यांतला असून प्रथम फिरोज तुघ्लखच्या खास पागेंत नोकर होता. एके दिवशीं शिकारींत चुकामुक होऊन सुलतान एकटाच एकीकडे गेला असतां, मलीक फरूकीनें त्याची चांगली शुश्रूषा केली. त्या वेळीं त्याची चलाखी पाहून सुलतानानें त्यास मोठ्या हुद्यास चढवून शेवटीं खानदेशच्या सुभेदारीवर नेमिलें. आपण खलीफा उमरचा बावीसावा वंशज आहों, असें तो म्हणे. त्या वेळच्या महत्त्वाकांक्षी व साहसी लोकांस अशा दूरच्या प्रांताचा स्वतंत्र कारभार प्राप्त होणें त्यांच्या फार फायद्याचें असे. मलीक फरूकीनें थोड्याच वेळांत आपल्या नांवाचा दरारा आसपासच्या प्रांतांवर उत्तम प्रकारें बसविला. सुलतान फिरोज मरण पावल्यावर, माळव्याचा सुभेदार दिलावर घोरी व गुजराथचा मुज्फरखान ह्यांचेंच अनुकरण फरूकीनें केलें. आपल्या पक्षास पुष्टि आणण्याकरितां त्यानें दिलावर घोरीच्या मुलीशीं लग्न केलें. गुजराथप्रांत मुज्फरशहाकडून जिंकण्याचें त्याच्या मनांत होतें. पण मुज्फरशहानेंच त्याचा पराजय केल्यावर तो आपल्या राज्यांत स्वस्थ बसला. त्यानें शेती सुधारून प्रजेचा चांगला परामर्ष घेतला, आणि भरभराटीस आणिलेलें राज्य वडील मुलगा मलीक नासीर ह्याचे स्वाधीन करून, आपण सन १३९९त मरण पावला. तालनेर ही त्यानें आपल्या राज्याची राजधानी केली.

खानदेशच्या आसपास जुनीं हिंदु राज्यें होतीं. अशीरगड, गावीलगड, नरनाळा वगैरे मोठमोठे किल्ले तेथील राजांनीं वऱ्हाडांत बांधिले होते. अश-अहीर म्हणून कोणी एक हिंदु राजा होता. त्यानें अशीरगडचा मजबूद किल्ला बांधिला. हा किल्ला मलीक नासीरनें फार कावेबाजपणानें घेतला. अशीरगडचा राजा मलीक फरूकीबरोबर फार स्नेहानें वागत असे. मलीक फरूकी मरण पावल्यावर त्याचा मुलगा नासीर ह्यानेंही बापाचा स्नेह पुढें चालविला. एकदां नासीरनें आपल्या बायकामुलांस राहण्यास अशीरगडच्या राजाजवळ त्या किल्ल्यांत जागा मागितली. राजानें ती विनंति खुशीनें मान्य केल्यावर नासीरनें हत्यारबंद शिपायांनीं भरलेल्या पडद्याच्या पालख्या अशीरगडावर पाठविल्या. राजानें त्यांस आंत येऊं दिलें. त्या हत्यारबंद शिपायांनीं राजाची व सर्व लोकांची कत्तल करून किल्ला नासीर याचे स्वाधीन केला. ह्या अद्‌भुत धाडसाबद्दल नासीर यास शाबासकी देण्यास झैन-उद्दीन व बुऱ्हाण-उद्दीन असे दोन साधु मुद्दाम दौलताबादेहून खानदेशांत आले. त्यांच्या सन्मानार्थ नासीर यानें दोन शहरें नवीन स्थापिलीं, तीं झैनाबाद व बुऱ्हाणपूर हीं होत. हीं शहरें तापीच्या दोन कांठावर समोरासमोर आहेत. बुऱ्हाणपूर शहर ह्या वेळेपासून खानदेशाची राजधानी झालें.

मलीक नासीर याची मुलगी बहामनी सुलतान अला-उद्दीन यास दिलेली होती. या कारणावरून उभयतांमध्यें कलह जुंपून युद्ध झालें, त्यांत नासीरचा पराजय झाला. त्यानेंच त्राखून, चाळीस वर्षें राज्य केल्यावर, तो सन १४३७त मरण पावला.

त्याच्या पश्चात् त्याचा पुत्र मीरन आदिलखान फरूकी हा तख्तनशीन झाला. पण तीन वर्षांच्या आंत त्याचा अशीरगडच्या किल्ल्यांत खून झाल्यावर त्याचा मुलगा मीरन मुबारिकखान फरूकी हा राज्य करूं लागला, ( स. १४४१ ). कोणत्याही युद्धप्रसंगांत न पडतां सतरा वर्षें शांततेनें प्रजेचें कल्याण करून तोही सन १४५७ त परलोकवासी झाला. त्याचा वडील मुलगा आदिलखान फरूकी हा राज्यकारभार पाहूं लागला. त्याजला गुजराथच्या सुलतानानें करभार देण्यास लाविलें. त्याप्रमाणें खंडणी भरून पुष्कळ वर्षें शांततेनें राज्य केल्यावर तो सन १५०३ त मरण पावला. त्याच्या वेळेस खानदेशचें राज्य अत्यंत भर-

भराटीस आलें. बुऱ्हाणपूर शहर त्यानें नानाप्रकारें सुशोभित केलें, आणि तें सर्व हिंदुस्थानांत प्रसिद्धीस आलें. आदिलखान फरूकीनें तापी नदीच्या कांठीं सुंदर वाडा बांधिला, त्याच्या खुणा अद्यापि दृष्टीस पडतात. ह्या वाड्यांतील हवा व उजेड येण्याच्या सोयी इतक्या उत्कृष्ट होत्या, कीं सर्व हिंदुस्थानांत त्या काळीं तशा कोठें नव्हत्या. बाजारांतील जुम्मा-मशीद, तट, उपवनगृहें, मृगयामंदिरें, मृगविहारवनें व नजीकच्या डोंग-रांतून नळानें बांधून आणिलेलें विपुल पाणी, ह्यांच्या योगानें बुऱ्हाणपूर शहरांत ह्या सुलतानानें आपलें नांव अजरामर करून ठेविलें आहे. हल्लींच्या पडक्या स्थितींत सुद्धां त्या शहरच्या तत्कालीन वैभवाची साक्ष मिळते. अशीरगड किल्ल्यास शहानें विशेष शोभा आणिली. हीं दोनही स्थळें फार प्रेक्षणीय आहेत. सोन्याचांदीचें काम, रेशमी वस्त्रें, मलमल वगैरे वीणकाम ह्या सुलतानाच्या वेळेस बऱ्हाणपुरांत अत्युत्कृष्ट होत असे. अशा कामांमुळें शहरांत फार भरभराटीचा व्यापार चाले, आणि लाखों लोकांचा निर्वाह होई. प्रस्तुत काळीं सुद्धां तितकें सुबक काम कोठें निघत नाहीं.

आदिलखानाच्या मागून त्याचा भाऊ दाऊद हा तख्तावर बसला. तो सन १५१० त मरण पावला. लगेच त्याच्या अल्पवयी मुलाचा खून होऊन फरूकी घराण्याचा शेवट झाला. तेव्हां गुजराथचा सुलतान महंमूदशहा बेगडा ह्यानें नासीरखान फरूकीचा नातू आदिल यास खान-देशच्या राज्यावर बसविलें. हा आदिल महंमूदशहाच्या मुलीचा मुलगा होता. आदिलशहानें गुजराथच्या मुजफरशहाच्या मुलीशीं लग्न केलें. थोडींच वर्षें शांततेनें राज्योपभोग घेऊन आदिलशहा स. १५२० त मरण पावला. नंतर त्याचा मुलगा मीरन महंमद हा तख्तारूढ झाला. सन १५३७त गुजराथचा बहादूरशहा मरण पावल्यावर दरबारच्या मंडळीनें खानदेशचा सुलतान मीरन महंमद ह्यास गुजराथचें राज्य दिलें. पण तेथें दोन महिन्यांच्या आंतच तो मरण पावला. मीरन बहादूरखान हा खानदेशचें राज्य करीत असतां, इसवी सन १५९९ ह्या वर्षी अकबर बादशहानें तें राज्य जिंकून मोगल अंमलाखालीं आणिलें.

ह्या खानदेशच्या राज्याची विशेष हकीकत देण्याजोगी नाहीं. एकं-दरींत राज्यकर्ते जुलमी नसून ते शेती व व्यापार यांस चांगलें उत्तेजन

देत, आणि प्रजेचा प्रतिपाल चांगला करीत. हिंदु लोकांवर त्यांनीं जुलूम केल्याचें दिसून येत नाहीं.

**५. जोनपूरचें शर्की घराणें,** ( सन १३९४–१४९३ ).—जोनपूर शहर बनारसच्या उत्तरेस सुमारें ५० मैलांवर गोमतीच्या कांठीं आहे. मुसलमानी अमलांत हें शहर फार भरभराटींत असून पूर्वेकडील प्रदेशाचें मुख्य ठिकाण होतें. उत्कृष्ट इमारती बांधण्यांत मुसलमानांची ख्याति आहेच; आणि हिंदुस्थानच्या प्रत्येक भागांत अशा इमारतींवरून मुसलमानी अमलाची साक्ष चांगलीच पटते. तथापि ह्या बांधकामांत जीं कित्येक स्थळें विशेष नांवाजलेलीं आहेत, त्यांत जोनपूरची गणना आहे. जोनपूर शहर स. १३५१ त फिरोजशहानें वसविलें. त्याचें मूळचें नांव राठगड असें असून, गोमतीच्या समोरच्या तीरावर जाफराबाद नांवाचें शहर आहे. अयोध्या प्रांत हा पूर्वापार हिंदूंच्या भरवस्तीचा व भरभराटीचा होता. त्या प्रांताच्या मध्यभागीं आपलें ठाणें असावें आणि तेथून सर्व प्रांताचा नकशा उतरावा ह्या हेतूनेंच हें शहर फेरोजशहानें वसविलें, आणि महंमद तुघ्लखच्या पूर्वीच्या ' जोना ' नांवावरून त्यास जोनपूर हें नांव दिलें. सर्वार नांवाचा एक इसम फिरोजच्या जनानखान्यावर होता, तो पुढें महंमूद तुघ्लखचा वजीर होऊन ख्वाजा जहान झाला. त्यास मलीक-उस्-शर्क असा किताब देऊन, सुलतानानें जोनपूरच्या सुभेदारीवर नेमिलें. शर्क शब्दाचा अर्थ आरबी भाषेत पूर्व असा आहे. महंमूद तुघ्लखच्या कार्किर्दींत जिकडे तिकडे धामधूम सुरू झाली, तेव्हां ह्या सुभेदारानें जोनपूर येथें स्वातंत्र्य धारण केलें, ( सन १३९४ ). तेव्हां ह्या वंशास शर्की हें आडनांव पडलें. सुलतान मलीक-उस्-शर्क हा सन १३९९त मरण पावला. त्याचा पुत्र मलीक खुर्रम् फाल ( कर्ण फल ? ) हा मुबारिकशहा शर्की ह्या नांवानें तख्तावर बसला. हें वर्तमान ऐकून दिल्लींतील वजीर मल्लू इक्बालखान ह्यानें जोनपुरावर स्वारी केली; पण तेथें तुघ्लखांच्या अमलाची स्थापना त्याच्या हातून झाली नाहीं. दिल्लीस अंदाधुंदी चालली असतां ह्या शहानें विद्येस उत्तेजन देऊन आणि इतर सत्कृत्यें करून चांगला लौकिक मिळविला. मुबारिकशहा सन १४०१त मरण पावल्यावर त्याचा मुलगा इब्राहीमशहा शर्की हा जोनपूरचा सुलतान झाला. महंमूद तुघ्लख व त्याचा वजीर इक्बालखान ह्यांनीं पुनरपि

पूर्वेकडील प्रांत परत मिळविण्याची खटपट बरेच वर्षे केली, पण तींत त्यांस यश आलें नाहीं. इक्बालखान १४०५ त मरण पावला, आणि महंमूद तुघ्लख कनोज येथें राहत होता, तो परत दिल्लीस आला. तेव्हां-पासून पुष्कळ वर्षेपर्यंत इब्राहीमशहानें शांतपणें राज्योपभोग घेतला. एकदोनदां दिल्लीचा सुलतान सय्यद मुबारिक व माळव्याचा सुलतान हुशंग याजबरोबर लढण्याचे त्यास प्रसंग आले. जोनपूरच्या राज्यांत ह्या सुलतानाचा लौकिक मोठा होता. एकदां त्यानें प्रत्यक्ष दिल्ली काबीज करण्याचाही प्रयत्न केला. सय्यद सुलतानांशीं त्याची लढाई झाली. पुढें तह होऊन दिल्लीच्या सुलतानानें आपली मुलगी जोनपूरच्या राज-पुत्रास दिली. एकंदरींत ह्या सुलतानाची कार्कीर्द जोनपूरच्या इतिहासांत विशेष स्मरणीय झाली. त्यानें विद्येस उत्तेजन दिलें. सन १४०८त त्यानें बांधिलेली अटाला मशीद फार प्रेक्षणीय असून, तींत हिंदुथाटाचें मिश्रण बिलकूल नाहीं. इब्राहीमशहा सन १४४०त मरण पावल्यावर त्याचा वडील मुलगा महंमूदशहा सुलतान झाला. त्यानें दिल्लीवर स्वारी करून बुह्लोल लोदीशीं युद्ध सुरू केलें. त्या युद्धाचा निकाल होण्यापूर्वी सन १४५७त तो मरण पावला. लालदरवाजा नांवाची एक सुंदर मशीद ह्यानेंही बांधिलेली आहे. नंतर त्याचा पुत्र महंमदशहा सुलतान झाला. तो शूर परंतु क्रूर असल्यामुळें सर्व रयतेस अप्रिय झाला, आणि त्याचा खून झाला. नाना तऱ्हेचे भयंकर प्रकार त्याच्या कार्किर्दींत चालू होते, तरी ती पांच महिन्यांहून ज्यास्त टिकली नाहीं. त्याचा भाऊ हुशेनशहा ह्याचे हातीं सुलतानपद आल्यावर त्यानें ओढ्याप्रांतावर स्वारी केली. त्या प्रांतावर कोणी हिंदु राजा राज्य करीत होता. हुसेनशहास तो प्रांत जिंकितां आला नाहीं. तेव्हां पुष्कळ लूट मिळवून तो परत आला. सन १४७३त दिल्लीचा सुलतान बुह्लोल लोदी मोठ्या फौजेनिशीं हुसेनशहावर चालून आला. त्या वेळीं तीन मोठे युद्धप्रसंग होऊन जोनपूरच्या फौजेचा पराभव झाला. सन १४७७त सिकंदर लोदीनें जोनपूरचें राज्य बुडवून दिल्लीच्या अमलाखालीं आणिलें. असा प्रकार झाल्यावर हुसेनशहा शर्की बंगालचा सुलतान अला-उद्दीन पूर्वी याजकडे जाऊन राहिला. हुसेनशहानें जामी-मशीद बांधिली, तिची वरच्या इतर सुंदर इमारतींमध्येंच गणना आहे. सिकंदर लोदीनें जोनपू-

रूच्या अनेक इमारतींचा विध्वंस केला. पुनरपि स. १४८८त त्यानें राज्य मिळविण्याचा प्रयत्न केला तो सिद्धीस गेला नाहीं. स. १४९३त शर्की राज्य लोदीनें कायमचें काबीज केलें.

६. मुलतान, (स. १४४३–१५२४ ).—कैक वर्षे मुलतान प्रांताचें स्वामित्व बदलत चाललें होतें. गज्नवी महंमुदाकडे तो प्रांत कांहीं दिवस होता. पुढें दिल्लीच्या सुलतानांचे सुभेदार त्याजवर कांहीं काल अंमल करीत होते. कांहीं वर्षे तर तेथें हिंदु राज्याची स्थापना झाली होती. दिल्लीस सुलतान सय्यद महंमद हा राज्य करीत असतां, सन १४४३त मुलतानच्या लोकांनीं त्रासून शेख यूसुफ यास आपला राजा निवडिलें. रायसिन्हा नांवाचा एक लंगा अफगाण जातीचा प्रमुख सरदार मुलतान येथें राहत होता. त्यानें युसुफ यास आपली मुलगी दिली. लग्न मोठ्या थाटानें झालें. पण रायसिन्हा याचे मनांत स्वतः राज्य घ्यावें असें येऊन त्यानें आपल्या जांवयास पकडिलें, आणि कुत्बुद्दीन असें नांव धारण करून, तो मुलतानास स्वतंत्रपणें राज्य करूं लागला, (स.१४४५). शेख यूसुफ हा दिल्लीस जाऊन राहिला. कुत्बुद्दीन लंगा ह्यानें सन १४६९ पर्यंत शांततेनें राज्य केलें.

त्याचा मुलगा हुसेनशहा सन १४६९त तख्तावर बसला. दिल्लीचा सुलतान बुहलोल लोदी ह्यानें मुलतानप्रांत परत घेण्याचा यत्न केला, पण तो सिद्धीस गेला नाहीं. हुसेनशहा स. १५०२ ह्या वर्षी वृद्धापकाळीं मरण पावला. हा विद्येचा मोठा पुरस्कर्ता असून त्यानें पुष्कळ पाठशाळा स्थापिल्या. त्याचा मुलगा महंमूद हा दुर्वृत्त असल्यामुळें वजीर जाम बायजीद यानें मुलतानचें बरेंच राज्य बळकाविलें. पंजाबचा सुभेदार दौलतलोदी ह्यानें रावीनदी ही मुलतानच्या राज्याची आपल्या बाजूची हद्द ठरविली. महंमूद लंगा सन १५२४त मरण पावल्यावर त्याचा मुलगा दुसरा हुशेनशहा तख्तावर असतां, बाबर बादशाहाच्या सांगीवरून पंजाबचा सुभेदार शहा हुसेन अर्घून यानें मुलतानचा किल्ला काबीज केला, आणि तें राज्य दिल्लीच्या अमलाखालीं आणिलें, ( सन १५२५ ). येणें प्रमाणें लंगा घराण्याची समाप्ति झाली.

७. सिंध, ( सन १२१४–१५२३ ).—सन ७११त महंमद कासीमनें स्वारी केल्यानंतर, सिंधप्रांत सुमेर नामक रजपुतांच्या ताब्यांत गेला,

हें मागें सांगण्यांत आलें आहे. घोरी व गुलाम सुलतानांनीं सिंधप्रांत जिंकण्याचे अनेक प्रयत्न केले, पण त्यांत त्यांस फारसें यश आलें नाहीं. सुमेरवंशी रजपुतांची हकीकत विशेष उपलब्ध नाहीं. गुलाम सुलतान कुत्बुद्दीन ह्याचा जांवई नासिरुद्दीन कुबाचा ह्यानें बरेच दिवस सिंध प्रांतावर स्वतंत्रपणें कारभार केला. ख्वारिज्मचा सुलतान जलालुद्दीन हा सिंधप्रांत जिंकण्याकरितां कुबाचाबरोबर पुष्कळ वर्षें झगडत होता. सन १२२४त सुलतान अल्तमश ह्यानें सिंध प्रांत जिंकण्यासाठीं फौज पाठविली. त्या झगड्यांत नासिरुद्दीन कुबाचा सिंधु नदींत बुडून मरण पावला. तेव्हांपासून सन १३२६ पर्यंत सिंधप्रांत दिल्लीच्या सुलतानाकडे होता. सन १३३६त जाम अफ्रा नामक सुमेरवंशी रजपूत राजानें दिल्लीचा ताबा झुगारून स्वातंत्र्य धारण केलें. तो सन १३३९त मरण पावल्यावर जाम चोभान गादीवर बसला. त्यास जिंकण्यासाठींच महंमद तुघ्लखनें गुजराथ व सिंध प्रांतांवर स्वारी केली होती. पण त्या स्वारींत तो सुलतान ठठ्ठा शहरीं मरण पावला. जाम चोभान सन १३५३ त मरण पावल्यावर जाम बनी हा सिंध प्रांताचा राजा झाला. हा वेळपर्यंत जाम राजे दिल्लीच्या सुलतानास खंडणी देत होते असें दिसतें. जाम बनी ह्यानें खंडणी पाठविण्याचें नाकबूल केल्यामुळें फिरोज तुघ्लखनें सिंधप्रांतावर स्वारी केली, (स. १३०७), आणि जाम बनी यास पकडून दिल्लीस नेलें; परंतु तेथें त्यास सत्कारानें वागवून स्वदेशीं परत पाठविलें. जाम बनी सन १३६७त मरण पावला. नंतर त्याचा भाऊ जाम तिमाजी ह्यानें सन १३८०पर्यंत राज्य केलें. ह्याच्या पुढच्या रजपूत राजानें मुसलमानी धर्म स्वीकारिला, तेव्हांपासून जाम म्हणजे मुसलमानी राजे असें समजलें जातें. ह्या जाम वंशाच्या केवळ नांवांशिवाय ज्यास्त माहिती मिळत नाहीं.

तिमाजीच्या पाठीमागून जाम सलातीन राज्य करूं लागला, तो सन १३९१त मरण पावला. नंतर जाम निजामुद्दीन सन १३९३त व जाम अली शेर १४०९त मरण पावले. पुढें जाम फत्तेखान गादीवर बसला, तो सन १४२३त मरण पावला. जाम तुघ्लखनें सन १४२३ पासून १४५० पर्यंत राज्य केलें. अशा प्रकारें केवळ नांवें देण्यांत अर्थ नाहीं. जाम निजामुद्दीन नंद हा राज्य करीत असतां सिंध प्रांताचा उत्तरभाग

व बकरचा मजबूत किल्ला कंदाहारच्या तुर्क लोकांनीं स्वारी करून काबीज केला. सन १५२०त मुलतानचा सुलतान शहाबेग अर्घून यानें जाम फिरोज याजपासून सिंध प्रांत जिंकून आपल्या राज्यास जोडिला. तेव्हां जाम फिरोज गुजराथच्या बहादूरशहाकडे जाऊन राहिला. त्याजबरोबरच जाम वंशाची समाप्ति झाली. सन १५२४त शहाबेग अर्घूनचा पुत्र शहा हुसेन अर्घून ह्यानें बाबरच्या सांगण्यावरून सर्व प्रांत जिंकला. यापुढची सिंध प्रांताची हकीकत मोगल बादशहांच्या कार्किर्दींत येईल.

स्वतंत्र झालेल्या मुसलमानी राज्यांचे वृत्तान्त येथें संपले. तरी मुसलमानांशिवाय रजपुतांचीं पुष्कळ राज्यें ठिकठिकाणीं होतीं. त्यांची हकीकत दिल्याशिवाय एकंदर हिंदुस्थानचा हा मध्यकालीन इतिहास पुरा होत नाहीं. शिवाय पुढें मोगलांचे व मराठ्यांचे बहुतेक मोठमोठे झगडे ह्या रजपूत राज्यांबरोबर झालेले आहेत. ते सर्व नीट कळण्यासाठीं तीन मुख्य रजपूत राज्यांची हकीकत पुढील प्रकरणीं देणें जरूर आहे.

---

# प्रकरण अठरावें.

## स्वतंत्र रजपूत राज्यें.

### इ. स. १०००—प्रस्तुतकालपर्यंत.

१. रजपुतांच्या इतिहासाचें स्वरूप. २. मेवाड,–राणासंग पर्यंत.
३. राणासंग पासून प्रतापसिंहापर्यंत. ४. प्रतापसिंहापासून आजतागाईत.
५. जयपूरचा इतिहास. ६. जोधपूरचा इतिहास.
७. रजपुतांच्या इतिहासाचें समालोचन.

**१. रजपुतांच्या इतिहासाचें स्वरूप.**—हिंदुस्थानच्या बहुतेक इंग्रजी ग्रंथांत रजपूत राज्यांच्या हकीकतींला स्वतंत्र स्थळ दिलेलें नाही. मुसलमानी रियासतीचा इतिहास रजपुतांच्या इतिहासाशिवाय पूर्ण होत नाहीं. रजपुतांचा इतिहास म्हणजे हिंदुस्थानचा राष्ट्रेतिहास होय. अठराव्या शतकांतील मराठ्यांचा इतिहास स्वराष्ट्राच्या दृष्टीनें विशेष उपयुक्त व प्रधान गणला जातो, त्याचप्रमाणें मुसलमानांच्या अव्वल कार्किर्दींत

रजपुतांचा इतिहास महत्त्वाचा व उपयुक्त आहे. 'इंग्रजांसारख्या परकीयांचा प्रवेश हिंदुस्थानांत होण्यास एकट्या मराठ्यांचाच कायतो अडथळा आहे,' असें अनेक मुत्सद्यांचें मत होतें. तद्वतच मुसलमानांचा प्रवेश हिंदुस्थानांत होण्यास जबरदस्त अडथळा रजपूत लोकांचाच होता. मुसलमानांचे सर्व मोठमोठे झगडे रजपुतांबरोबर झाले आहेत. वीर्यशाली रजपुतांच्या हस्तें मुसलमानांचा निःपात होण्याचे अनेक प्रसंग आले होते, परंतु रजपुतांस यश आलें नाहीं. बाबरच्या कार्किर्दीत संगराणा, व पुढील एकदोन कार्किर्दीत जयसिंह, अभयसिंह वगैरे एका हाताच्या बोटावर मोजतां येतील इतकीं नांवें फार तर विद्यार्थ्यांस माहीत होतात. अर्थात् रजपूत घराण्यांची संगतवार हकीकत आपणापुढें न आल्यानें राष्ट्रेतिहासाच्या एका मोठ्या भागास आपण मुकतों; आणि अनेक स्वराष्ट्रनिंदापर कल्पना विद्यार्थ्यांच्या डोक्यांत भरतात. बाबर आपला व संगराणा शत्रु असा विपर्यास घडतो. अर्थात् आमची आम्हांसच ओळख राहत नाहीं. शिंदेहोळकरांचा पाडाव करणारा वेल्स्ली व हिंदुस्थानदेश जिंकून इंग्लंडचे ताब्यांत देणारे दुसरे इंग्रज मुत्सद्दी यांजविषयींही आमच्या ऐतिहासिक कल्पना वरच्यांहून फारशा भिन्न नाहींत. हा विपर्यास समूळ काढून टाकण्यास इतिहासाचें स्वरूप सर्वांशीं निराळें करावें लागेल. मुसलमानांच्या उत्कर्षाचा इतिहास न देतां हिंदूंच्या अपकर्षाचा इतिहास असें त्यास नांव देऊन तदनुरूप सर्व फेरफार करावे लागतील. उत्कर्षाचा इतिहास जितका उपयुक्त, तितकाच, किंबहुना ज्यास्त, अपकर्षाचा इतिहास उपयुक्त असतो, हें ग्रीक, रोमन वगैरे राष्ट्रांच्या इतिहासांवरून व्यक्त होतें. तथापि हिंदुस्थानच्या इतिहासावरील अलीकडील पाश्चात्य ग्रंथांनीं आपल्या इतिहासाचें स्वरूप इतकें निश्चित करून ठेविलें आहे, कीं तें आतां बदलणें बहुतेक दुरापास्तच आहे. तथापि रजपूत राजांशीं मोगल बादशहांचे, त्यांच्या पश्चात् मराठ्यांचे व अंशतः इंग्रजांचे जे व्यवहार घडले, त्यांचें स्वरूप बरोबर समजण्याकरितां रजपुतान्यांतील तीन प्रमुख घराण्यांचे इतिहास अगदीं त्रोटकपणें येथें दिले आहेत. इतर घराण्यांशींही अनेक व्यवहार घडले, पण ते सर्व येथें देणें शक्य नाहीं. रजपुतांचा इतिहासकार कर्नल टॉड ह्याचा ग्रंथ

इतका विस्तृत, व रजपुतांच्या आख्यायिकांनीं इतका ओतप्रोत भरलेला आहे, कीं त्याचें नुसतें सार देण्याचा प्रयत्न केला तरी निराळाच ग्रंथ होईल, म्हणून परिशिष्टांत ज्या वंशावळी दिल्या आहेत, त्यांची स्पष्ट फोड करण्यापलीकडे ज्यास्त हकीकत प्रस्तुतस्थळीं देतां येत नाहीं. वरील तीन घराण्यांची हकीकत प्रस्तुत काळापर्यंत आणून पोंचविली आहे, कारण पुढील अनेक प्रकरणांत तिचा उपयोग पडणार आहे. मोगलबादशाहीच्या उतारवयांत, मराठ्यांच्या इतिहासांत व इंग्रजी राज्यस्थापनेच्या हकीकतींत ह्या घराण्यांचा उल्लेख वारंवार येईल. ज्या हकीकती विस्तारेंकरून इतरत्र यावयाच्या आहेत, त्यांचा ह्या प्रकरणांत समावेश केला नाहीं; पुढें न येणाऱ्या कित्येक गोष्टींचा करितां आला तितका विस्तृत उल्लेख येथें केला आहे.

रजपुतांचे अनेक वंश आहेत. त्यांपैकीं उदेपूर, डोंगरपूर, प्रतापगड, बांसवाडा वगैरे कित्येक संस्थानांतील राजे सूर्यवंशी सिसोदिया आडनांवाचे आहेत. जोधपूर, बिकानेर, ईडर, किशनगड, रतलाम, झभू वगैरे संस्थानचे राजे राठोडवंशाचे आहेत. बुंदेलखंडांतील ओर्च्छा, तेहेरी, दतिया, पन्ना, अजयगड, बिजावर, चर्खरी इत्यादि संस्थानिकांस बुंदेले रजपूत अशी संज्ञा आहे. रेवाचे महाराज आपणांस चालुक्यवंशी समजतात. बुंदी, कोटा, झालावाड, शिरोही येथचे संस्थानिक चव्हाणवंशी असून त्यांचें सरनांव ‘ हाडा ’ असें आहे. काठेवाडांतील कच्छ, नवानगर, गोंडळ, राजकोट, मोरवी हे चंद्रवंशीं यादव कुळांतील असून, त्यांचें नांव ‘ जाडेजा ’ असें आहे. जसलमीरचे चंद्रवंशी भट्टी व भावनगरचे चंद्रवंशी गोहेल होत. ध्रांगध्राचे राजे सूर्यवंशी ‘ झाला ’ आडनांवाचे आहेत. जयपूर व अलवार हे सूर्यवंशी असून त्यांचें नांव कच्छवाह असें आहे.

**२. मेवाड,–राणासंगपर्यंत, ( सन १५०९ ).**—मेवाड हा मध्यवाड म्हणजे मध्यदेश ह्या शब्दाचा अपभ्रंश आहे. सर्व रजपूत राजघराण्यांमध्यें मेवाडचा वंश फार प्राचीन व श्रेष्ठ आहे. तेथचे राज्यकर्ते सिसोदिया आडनांवाचे रजपूत आहेत. अयोध्येचा सूर्यवंशी राजा रामचंद्र याजपासून ते आपल्या घराण्याची उत्पत्ति मानितात. घेलोट हें त्यांचें मूळचें आडनांव आहे. घेलोट वंशांत कनकसेन

नांवाचा राजा पंजाबांत लाहोर* येथें राज्य करीत असून तो रामचंद्रापासून त्रेसष्टावा पुरुष होय. त्यानें पंजाबप्रांत सोडून सौराष्ट्र देश जिंकिला, आणि परमार राजांचा पाडाव करून इ. स. १४४च्या सुमारास वीसनगर शहर स्थापिलें. कनकसेनाच्या वंशजांनीं वल्लभीपूर नांवाचें शहर आपली राजधानी करून वल्लभी नांवांचा नवीन शक सुरू केला. हें शहर भावनगराजवळ होतें. ह्याच वंशांत पुढें शीलादित्य नांवाचा राजा झाला. तो गज्नीस राज्य करीत होता, आणि म्लेंच्छांकडून मारला गेला अशी आख्यायिका आहे. पुढें कांहीं दिवस ईडर येथें ह्या घेलोटवंशी राजांचा अंमल होता. ह्या राज्यांतील भिल्ल लोकांनीं घेलोट राजा ग्रहादित्य ह्यास ठार मारिलें. तेव्हां त्याच्या बाप्पू नामक अल्पवयी पुत्राचें अनेक साथीदारांनीं अरण्यांत संरक्षण केलें. त्या वेळीं मेवाडांत चितोडगडावर परमार राजे राज्य करीत होते, त्यांजपाशीं बाप्पू हा वयांत आल्यावर चाकरीस राहिला. एकलिंगजी नामक एक प्रसिद्ध देवालय उदेपुराजवळ आहे, त्या देवाचा बाप्पू हा निस्सीम उपासक होता. सोळंखी कुळांतील एका ठाकुराच्या मुलीबरोबर बाप्पूचें लग्न झालें होतें. परमार राजाची बाप्पूवर मोठी मर्जी असे. शेवटीं प्रबल होऊन बाप्पूनें धन्याचें राज्य बळकाविलें, (सन ७२८). बाप्पू हा रामचंद्रापासून ऐशींवा पुरुष असून चितोडच्या घराण्याचा मूळ पुरुष होय. ह्याच्याच वेळेस सिंध प्रांतावर महंमद कासीमनें स्वारी केली. पश्चिमेकडे इराणपर्यंत सर्व प्रदेश बाप्पू रावळानें जिंकिला होता, असें सांगतात.

बाप्पूरावळानंतर अठरावा पुरुष समरसिंह हा सन ११४०त चितोडच्या गादीवर बसला. दिल्लीचा पृथ्वीराज चव्हाण ह्याची बहीण पृथा समरसिंहास दिलेली होती. ह्या उभयतांचें चांगलें सख्य होतें. समरसिंह बलाढ्य, शूर, शांत व बुद्धिमान असा होता. त्या वेळचे कवि त्याचें फार वर्णन करितात. सन ११९३त स्थानेश्वरच्या घोर संग्रामांत पृथ्वीराजास मदत करण्याकरितां गेला असतां, समरसिंह धारातीर्थीं पतन पावला. त्याचा वडील मुलगा कल्याणरायही त्याच युद्धांत पडला.

---

* लहुकोट ऊर्फ लाहोर अशी 'लाहोर' शब्दाची उपपत्ति, रामचंद्राचा पुत्र लहु याच्या नांवावरून, समजतात.

२२-३०-६-७९१-२०००

नंतर समरसिंहाचा धाकटा मुलगा कर्ण हा राज्य करूं लागला. तो लहान असल्यामुळें त्याची आई करुणदेवी ही सर्व राज्याचा कारभार पाही. तिनें महंमद घोरीचा सरदार कुत्व्-उद्दीन ह्याचा अंबरनजीक पराजय करून आपल्या राज्यास बळकटी आणिली. कर्णापासूनच डोंगरपूरच्या घराण्याची उत्पत्ति आहे.

कर्णानंतर समरसिंहाच्या भावाचा नातू रहूप हा सन १२१० त चितोडास गादीवर बसला. रहूपानें मुसलमानांचा पराजय करून शहाणपणानें राज्य केलें. रहूपापासूनच ह्या घराण्याचीं घेलोट व रावळ हीं नांवें जाऊन, सिसोदे व राणा हीं नवीन नांवें मिळालीं. रहूपापासून नववा पुरुष राणा लक्ष्मणसिंह सन १२७५ त चितोडच्या गादीवर बसला. लक्ष्मणसिंहाचा चुलता भीमसिंह ह्यानें सिंहलद्वीपच्या राजा हमीर संक चव्हाण ह्याची लावण्यवती मुलगी पद्मिनी इजशीं लग्न लाविलें. तिच्या अभिलाषानें दिल्लीचा सुलतान अला-उद्दीन खिलजी ह्यानें चितोडगडावर स्वारी केली, तिचें वर्णन मागें आलेंच आहे, (पृ. १२९). सन १३०३त त्यानें पुनरपि चितोडवर स्वारी करून तें राज्य काबीज केलें. त्या प्रसंगीं राणा लक्ष्मणसिंह व त्याचे अकरा मुलगे लढून मेले. पुढें ह्या घराण्यांत हमीर नांवाचा एक विलक्षण पराक्रमी पुरुष निपजला, त्याच्या शौर्यामुळें मुसलमानांच्यानें चितोडच्या घराण्याचा निःपात करवला नाहीं. लक्ष्मणसिंहाचा नातू सुजनसिंह हा सातारकर भोसल्यांचा मूळ पुरुष असें म्हणतात.

उर्सिसिंह म्हणून लक्ष्मणसिंहाचा एक भाऊ होता. त्याचा पराक्रमी मुलगा हमीर हा लक्ष्मणसिंहाच्या पश्चात् रजपुतांचा पुढारी झाला. शिवाजी व हमीर ह्यांच्या आयुःक्रमांत पुष्कळ साम्य आहे. मुसलमानांनीं सर्व रजपुतांचा पाडाव केला असतां, पुनरपि आपलें स्वातंत्र्य परत मिळविण्याचें महाप्रयासाचें काम उभयतांनीं मोठ्या हिंमतीनें तडीस नेलें. हमीरसारखे वीर पुरुष ह्या देशांत शेंकडो निपजले असून, त्यांच्या पराक्रमवृत्तांनीं राष्ट्रेतिहासास रमणीय स्वरूप प्राप्त झालें आहे. अला-उद्दीननें चितोडचा कारभार मालदेव नामक एका रजपूत राजास दिला होता. त्याजकडून हमिरानें युक्तीनें चितोडचें राज्य परत घेतलें. पुढें अला-उद्दीनच्या फौजेचा पराभव करून त्याच्या मुलास आपल्याजवळ कैद

करून ठेविलें, ( सन १३१३ ), आणि मोठी खंडणी घेऊन त्यास सोडून दिलें. हमिरानें मेवाडचेंच राज्य ऊर्जित दशेस आणिलें असें नाहीं, तर सर्व रजपुतांची एकी करून मुसलमानांचा मोड केला. ह्याच्या कारकिर्दींत रजपुतांचें पुरातन वैभव पुनरपि झळकूं लागलें. सर्व हिंदु राजांत हमिराइतका बलिष्ठ राजा त्याच्या वेळेस दुसरा कोणी नव्हता. कलाकौशल्य व कारागिरी ह्यांस उत्तेजन देऊन आणि प्रजेचें योग्य संगोपन करून, त्यानें आपल्या राष्ट्रास भरभराटीस आणिलें. हा पराक्रमी पुरुष सन १३६५त मरण पावला. वनवीर व रणवीर असे हमिराचे दोन मेहुणे होते.

हमीरचा मुलगा खेतसिंह हा बापाप्रमाणेंच पराक्रमी होता. त्यानें आठ वर्षें राज्य केलें. बनोडा येथील संस्थानिकाशीं युद्ध करीत असतां तो मारला गेला, ( स. १३७३ ). नंतर खेतसिंहाचा मुलगा लक्ष्मणसिंह ऊर्फ लाखाराणा हा चितोडच्या गादीवर बसला. तो पराक्रमी, व नीतिमान होता. युद्धसंग्रामानें देशाची विनाकारण खराबी होते, हें जाणून त्यानें रयतेच्या निरंतरच्या कल्याणाकडे विशेष लक्ष पोंचविलें, आणि तलाव, मंदिरें, राजगृहें वगैरे पुष्कळ कामें नवीन केलीं. मारवाडचा राणा रणमल्ल याची मुलगी, जोधसिंहाची बहीण, लाखाराण्यास दिलेली होती. तिच्या पोटचा पुत्र मुकुलजी हा लाखाराणा मरण पावल्यावर चितोडच्या राज्याचा मालक झाला, ( सन १३९८ ). लाखाराण्याचा वडील मुलगा चंद्रसिंह उर्फ चोंडा ह्यानें आपखुशीनें राज्यावरचा हक्क सोडिला, आणि मुकुलजी लहान असतां त्याचा प्रतिपाळ केला. वयांत आल्यावर मुकुलजीनें आपल्या पूर्वजांप्रमाणेंच तलवार गाजविली. सन १४१९त मुकुलराण्याचा खून झाला.

नंतर मुकुलाचा मुलगा कुंभराणा गादीवर बसला. त्यानें पुष्कळ वर्षें फार हुशारीनें राज्य केलें. तो राजकार्यधुरंधर व हुशार होता. चितोडच्या घराण्यांत आजपर्यंत जे सन्माननीय पुरुष होऊन गेले, त्या सर्वांचे चांगले गुण कुंभराण्यांत उतरले होते. त्यानें आसपासच्या मुसलमान राजांचा पाडाव केला. माळव्याच्या सुलतानास युद्धांत पकडून आणिलें, पण खंडणी वगैरे न घेतां मोठ्या सन्मानानें त्यास नजराणे देऊन परत पाठविलें. कुंभराणा स्वतः कवि असून विद्येचा भोक्ता

होता. त्यानें बत्तीस नवीन किल्ले बांधिले. त्यांत कुंभेरचा किल्ला फार मजबूद होता. त्याची पत्नी मीनाबाई ही सौंदर्य व औदार्य ह्या गुणांनीं संपन्न असून कुंभराण्यास अनुरूप होती. कुंभराण्यानें पन्नास वर्षे राज्य करून मोठा लौकिक मिळविला. परंतु मोठ्या दुःखाची गोष्ट ही, कीं त्याच्याच राज्यलोभी मुलानें त्यास कपटानें ठार मारिलें, ( स. १४६९). त्या मुलाचें नांव उदयसिंह. उदयसिंहानें पांच वर्षें राज्य केलें, आणि वीजपडून सन १४७४त तो मरण पावला. उदयसिंहानें आपल्या दुर्वर्तनानें बापाच्या व एकंदर घराण्याच्या उज्वल कीर्तीस डाग लाविला.

उदयसिंहानंतर त्याचा भाऊ रायमल्ल गादीवर बसला, ( स. १४७४). हा चांगला पराक्रमी होता. दिल्ली व माळवा येथील सुलतानांचा त्यानें पराभव केला. गुजराथचा सुलतान मुजफरशहा ह्यास त्याचा मुलगा पृथ्वीराज ह्यानें कैद करून आणिलें, आणि खंडणी घेऊन सोडून दिलें. रायमल्लाची कारकीर्द फार नांवाजण्यासारखी झाली असती, पण त्याचे अनेक पुत्र होते त्यांत तंटे लागून त्याचे शेवटचे दिवस फार दुःखांत गेले. सन १५०९ ह्या वर्षी रायमल्ल मरण पावला, तेव्हां त्याचा वडील मुलगा संग्रामसिंह ऊर्फ संगराणा चितोडच्या गादीवर बसला.

**३. राणा संगपासून प्रतापसिंहापर्यंत, ( स. १५०९-१५९७).**— संगराणा फार पराक्रमी निघाला. त्याच्या कार्किर्दीत मेवाडच्या भाग्योदयाचा कळस झाला. सर्व रजपूत राजांपासून करभार घेऊन सार्वभौमाप्रमाणें त्यानें अनेक वर्षें वैभव भोगिलें. माळवा व दिल्ली येथील मुसलमानी फौजांचा त्यानें अनेक वेळां पराभव केला. मुसलमानांवर त्यानें एकंदर अठरा लढाया जिंकिल्या. त्याच्याच वेळेस बाबरानें मोगल बादशाहीची दिल्लीस स्थापन केली. त्यास अडथळा करण्याचें सामर्थ्य संगराण्याच्या मात्र अंगीं होतें. पण दुर्दैवानें फत्तेपूर शिक्रीच्या लढाईत त्याचा पराभव होऊन रजपुतांचें वर्चस्व बाबराच्या ताब्यांत गेलें. ही हकीकत बाबराच्या कार्किर्दीत येईल. संगराणा युद्धांतून निघून गेला, आणि बाबराचा सूड उगविण्याचा बेत करीत असतां अरण्यवासांत मरण पावला, ( सन १५३० ). संगराण्यानंतर मेवाडच्या राण्यांस मोगलांशीं अव्याहत झुंजावें लागलें. त्या झगड्यांत त्यांच्या अंगचें विलक्षण धैर्य व्यक्त झालें.

संगराण्याच्या पश्चात् त्याचा तरुण पुत्र रत्नसिंह राज्यावर बसला. त्याच्या अंगींही बापाचे शौर्यपराक्रमादि गुण होते. समरभूमि हीच आपलें वसतिस्थान करून चितोडचें महाद्वार नेहमीं उघडें ठेवण्याचा त्यानें हुकूम दिला. सारांश, मुसलमानांचा निःपात करीपर्यंत विश्रांति घ्यावयाची नाहीं असा त्याचा निश्चय होता. अशा निश्चयामुळेंच बाबरास शिक्रीच्या जयाचा फायदा घेतां आला नाहीं. बापाचें संपूर्ण राज्य रत्नसिंहाकडे राहिलें. एका क्षुल्लक प्रसंगीं बुंदीच्या राजाबरोबर द्वंदयुद्ध करीत असतां, रत्नसिंह गादीवर बसल्यापासून पांच वर्षांतच मरण पावला, ( सन १५३५ ).

रत्नसिंहानंतर त्याचा भाऊ विक्रमाजित चितोडचा राणा झाला. तो धाडसी होता; परंतु अंगीं शहाणपणा नसल्यामुळें त्यानें आपलें पुष्कळ वैभव गमाविलें. राज्यकारभाराकडे तो लक्ष देत नसे. त्यानें आपल्या फौजेंत नुसत्या पायदळाची भरती केली. तेथील अव्यवस्था ऐकून गुजराथच्या बहादूरशहानें चितोडगडावर स्वारी केली. चितोडबद्दल सर्व रजपुतांच्या मनांत पूज्यबुद्धि असल्यामुळें, ते बहादूरशहाशीं लढण्यास एकत्र झाले. तरी बहादूरशहाची तयारी जय्यत होती. त्याच्या तोफखान्यावर पोर्तुगीज अधिकारी होते. सर्व फौज कवाईत शिकलेली होती. त्यांनीं सुरुंग लावून किल्ल्याचा तट तेव्हांच उडवून दिला. राजपुतांचें कांहीं चालेना. तेव्हां सर्वांनीं आपल्या स्त्रियांस दारूच्या भडक्यांत उडवून देऊन शस्त्रास्त्रांसहित शत्रूवर चाल केली, आणि धारातीर्थीं आपले जीव बळी दिले, (स.१५३६). अशा निकराच्या प्रसंगास रजपूत लोक 'जोहार' असें म्हणतात. बहादूरशहास विजय प्राप्त झाल्यावर आंत येऊन पाहतो तों त्यास सर्व प्रेतमय दिसलें. जोहारानें चितोड राजधानीचा संहार झाल्याचा हा दुसरा प्रसंग. पहिला प्रसंग अला-उद्दीन खिलजीच्या वेळेस आला होता. बहादूरशहानें चितोड आपल्या ताब्यांत घेतलें, पण तें त्याजकडे फार दिवस राहिलें नाहीं. बाबराच्या मनांत संगराणा व त्याचे वंशज ह्यांजबद्दल विशेष पूज्यबुद्धि होती, तशीच हुमायूनचीही असे. उदयसिंह म्हणून संगराण्याचा एक लहान मुलगा होता. वरील जोहार झालें, तेव्हां दरबारमंडळीनें उदयसिंहास दूर निर्भय ठिकाणीं पाठवून दिलें. उदयसिंहाची आई ही जोहारांत मरून गेली. पण मरणापूर्वीं तिनें ' तुम्ही माझे

भाऊ आहांत, अशा प्रसंगीं साहाय्य करून अब्रू बचावा, ' असा निरोप हुमायुनास पाठविला आणि त्याबरोबर एक राखी पाठविली. अशी राखी रजपूत स्त्रीकडून आली म्हणजे ती स्वीकारून तिचें बंधुत्व पतकरण्याचा प्रघात रजपुतान्यांत आहे. हुमायूननें ' मी तुमचा राखीबंध भाई झालों ' असा निरोप पाठविला; आणि स्वतः फौज घेऊन बहादूरशहाशीं लढण्यास आला. तेव्हां चितोड सोडून बहादूरशहास परत जावें लागलें.

पण एवढ्या अरिष्टानें विक्रमाजिताचे डोळे उघडले नाहींत. नाखुष झालेल्या सरदारांनीं बंड करून त्यास ठार मारिलें आणि संगराण्याचा भाऊ पृथ्वीराज ह्याचा दासीपुत्र बनवीर ह्यास गादीवर स्थापिलें, ( सन १५३६ ). उदयसिंह मोठा होईपर्यंतच बनविरानें राज्यकारभार पाहवा असा त्यांचा विचार होता. पण उदयसिंहास ठार मारण्याचा बनविरानें बेत करितांच, पन्ना नांवाच्या दाईनें चमत्कारिक युक्तीनें स्वतःचा मुलगा बळी देऊन, उदयसिंहाचें रक्षण केलें, ती गोष्ट सुप्रसिद्ध आहे. उदयसिंहाचें संगोपन बाहेर झालें. बनविरानें कहर उसळून दिल्यामुळें तो सर्वांस अप्रिय झाला. शेवटीं सन १५४१ त उदयसिंहानें येऊन आपलें राज्य घेतलें. तेव्हां बनवीर निघून नागपुराकडे गेला, तोच तेथच्या भोसल्यांचा मूळपुरुष होय असें म्हणतात.

पुनः एकदांचें चितोडचें राज्य औरस संततीच्या ताब्यांत आलें. उदयसिंह एकंदरींत दुर्बल निघाला. परंतु हुमायूनचा पराभव होऊन दिल्लींत अस्वस्थता उत्पन्न झाल्यामुळें चितोडच्या वाटेस फारसें कोणी गेलें नाहीं. अकबर बादशहा सिंहासनावर बसल्यावर आपल्या हातीं साम्राज्यसत्ता आणण्याची त्याला आशा सुटली. रजपूत राजे मुसलमानांचे कदीम शत्रू, तशांत मारवाडच्या राजानें अकबराच्या बापास प्रत्यक्ष त्रास दिलेला; तेव्हां त्यानें हळू हळू रजपुतांस आपलें सार्वभौमत्व कबूल करण्यास लाविलें. जयपूरचा राजा बहारमल्ल ह्यानें आपलें दुर्बलत्व ओळखून अकबरास आपली मुलगी दिली आणि त्याजशीं स्नेहसंबंध जोडिला. सन १५६७ त अकबरानें चितोडावर स्वारी केली. त्या वेळीं उदयसिंहाच्या एका राखेच्या हातांत सर्व सत्ता होती. तिनें कांहीं वेळ नेटानें मोगलांशीं युद्ध केलें. उदयसिंह पळून गेला. पण इतर सर्व सरदारांनीं पलायन करून आपल्या पिढीजाद बाण्यास व्यत्यय आणिला नाहीं. ते चितोडच्या

बचावाकरितां आवेशानें लढले. बेदनूरचा ठाकूर जयमल्ल हा ह्या युद्धांत पुढारी होता. तो तोफेचा गोळा लागून पडला. तेव्हां आपणास जय येत नाहीं असें पाहून, सर्वांनीं आपला नेहमींचा जोहार करून रणांगणीं जीव दिले. हा चितोडचा तिसरा जोहार होय. अकबरानें शहरांत शिरून सर्व स्त्रीपुरुषांची कत्तल केली. तीस हजार लोक ह्या कत्तलींत मृत्युमुखीं पडले. नंतर त्यानें धर्माभिमानानें हिंदूंचीं देवळें, मंदिरें, राजवाडे वगैरे दरोबस्त जमीनदोस्त करून त्या त्या ठिकाणीं मशिदी वगैरे बांधिल्या. नगरदेवीच्या देवळाची वरच्याप्रमाणेंच स्थिति होऊन, तेथील नगारे, दिवे, नौबती, दागिने, दरवाजे वगैरे सर्व आग्र्यास रवाना झाले. उदयसिंह प्रथम राजपिंपळ्याच्या अरण्यांत आणि तेथून पुढें आरवलीच्या डोंगरांत पळून गेला, आणि पुढें चार वर्षांनीं राज्यभ्रंशजन्य दुःखानें मरण पावला, ( सन १५७२ ). मरणापूर्वी आरवली डोंगराच्या एका खोऱ्यांत त्यानें उदयसागर नांवाचा एक तलाव बांधिला, आणि त्याच ठिकाणीं त्यानें एक लहानसें खेडें वसविलें. पुढील पुरुषांनीं ह्या गांवास शोभा आणिली आणि तेथें राजधानी केली. तेंच हल्लींचें उदेपूर शहर होय. त्यावरूनच मेवाडच्या राण्यांस हल्लीं उदेपूरचे राणे असेंही म्हणतात.

उदयसिंहाचा मुलगा राणा प्रतापसिंह सन १५७२ त गादीवर बसला. हा शूर, शहाणा व पूर्वजांचें नांव राखणारा असा होता. अनेक यातना सोसून त्यानें रजपुतांचें धैर्य व उमेद खचूं दिली नाहीं. संकटकाळीं प्रतापराण्याला पुष्कळ साह्यकर्ते मिळाले. हळू हळू मुलूख कमावून राज्यांत त्यानें स्वस्थता केली. ह्या वेळीं बहुतेक राजांनीं मुसलमानांस आपल्या मुली देऊन अकबराचा स्नेह संपादिला होता, इतकेंच नव्हे, तर कित्येक रजपूत ठाकुरांनीं मुसलमानी धर्मही स्वीकारिला होता. ह्या गोष्टीविषयीं प्रतापसिंहाचे मनांत अत्यंत तिरस्कार उत्पन्न होऊन त्यानें एक असा जाहीर ठराव केला, कीं मुसलमानांबरोबर कन्याव्यवहार ठेवणाऱ्या रजपुतांशीं निष्कलंक राहिलेल्या कोणाही रजपुतानें सोईरगत करूं नये. हा ठराव उदेपूरच्या राण्यांनीं आजपर्यंत पाळिला आहे. जोधपूर व जयपूर येथील राजांस कृतकर्माचा पश्चात्ताप होऊन, आपणास शुद्ध करून घेण्याकरितां अनेक वेळ त्यांनीं उदेपूरच्या राण्यांची विनंति केली. दिल्लीची बादशाही बुडाल्यावर मुसलमानांस आपल्या मुली

देण्याचें इतर राजांनीं बंद केलें, तेव्हां अर्थात्. सर्व रजपूत पुनः एक झाले. प्रतापसिंहाची खबर अकबरास लागतांच अकबरानें त्याजवर आपली फौज रवाना केली. तिचें आधिपत्य शहाजादा सलीम याजकडे असून, शिवाय जयपूरचा राजा मानसिंह व संगराजिताचा बाटलेला मुलगा मोहबतखान हे सरदार बरोबर होते. त्यांजबरोबर प्रतापसिंह व त्याचे साथीदार ह्यांनीं मोठ्या निकरानें युद्ध केलें. लढाईत सलीम मरतां मरतां वांचला. मोगल फौजेपुढें प्रतापसिंहाचा टिकाव लागेना, तेव्हां तो पळूं लागला आणि मोगलांनीं त्याचा पाठलाग केला. अशा प्रकारें हें युद्ध पुष्कळ दिवस चाललें. प्रतापाचें धाडस व दृढनिश्चय पाहून त्याची दिल्लीस मोठी वाहवा झाली. पुढें प्रतापसिंह व अकबर ह्यांजमध्यें कांहीं दिवस पत्रव्यवहार चालला. तथापि सख्य झालें नाहीं. नंतर प्रतापसिंहानें लुटारूपणा चालविला, आणि अल्पावकाशांत सर्व मेवाड-प्रांत हस्तगत करून घेतला. परंतु चितोड त्याच्या हस्तगत झालें नाहीं. उदेपूरच्या इतिहासांत प्रतापसिंहाचें नांव अजरामर झालें आहे. एकाएकीं दुखणें लागून तो इ. स. १५९७ त मरण पावला.

४. प्रतापसिंहापासून आजतागाईत, ( इ. स. १५९७).—प्रतापसिंहाच्या पश्चात् त्याचा पुत्र अमरसिंह उदेपूर येथें गादीवर बसला. अमरसिंहाला स्वस्थता फार आवडत असे. तरी त्यानें पुष्कळ पराक्रमाचीं कृत्यें केलीं. सन १६०८ त त्यानें मोगल फौजेचा पराभव केला. मोगलांचा दिवाण खानखानान याचा भाऊ अब्दुल्ला हा त्या फौजेचा मुख्य होता. स. १६१० त त्यानें पुनः मोगलांच्या फौजेचा पराजय केला. सगराजित म्हणून राणा प्रतापसिंह ह्याचा एक भाऊ पूर्वींपासून मोगलांस मिळाला होता, त्यास जहांगीर बादशहानें चितोडगडावर राज्याभिषेक करून अमरसिंहास धाबरविण्याचा प्रयत्न केला. पण संगराजितास रजपुतान्यांत कोणींच जुमानिलें नाहीं. मोहबतखान नामक पुढें प्रसिद्धीस आलेला पराक्रमी सरदार ह्या संगराजिताचा मुलगा असून तो बाटून मुसलमान झाला होता. रजपुतान्यांतील ह्या सर्व मोहिमांत मोहबतखान पुढारी असे. सन १६११ सालीं अमरसिंहानें जहांगीरच्या फौजेची अशी दाणादाण उडविली, कीं तेणेंकरून त्या विलासी बादशहास पुढें काय करावें हें कांहींच सुचेना. शेवटीं बादशहानें शहाजहानच्या

हाताखालीं पुनरपि प्रचंड फौज देऊन त्यास राण्यावर पाठविलें. तेव्हां तिच्याशीं झगडण्यांत आपला निभाव लागणार नाहीं असें जाणून, अमरसिंह जहांगिरास शरण गेला. जहांगिरानें इतक्या दिवस झालेली खराबी मनांत आणून अमरसिंहास सन्मानानें वागविलें; आणि त्याचा मुलगा कर्ण यास आपल्या दरबारांत थोरपद दिलें. ह्याप्रमाणें उभयतांमध्यें सलोख्याचा तह ठरला. येणेंप्रमाणें ह्या प्रचंड युद्धाचा शेवट होऊन रजपुतांच्या अंगीं धैर्य व चिकटपणा किती आहे हें सर्वांस दिसून आलें. आपल्या देखत राजा कर्ण यास गादीवर स्थापून अमरसिंहानें वानप्रस्थाश्रम स्वीकारिला. तो १६२१ त मरण पावला.

राणा कर्ण हाही बापाप्रमाणेंच हुशार होता. चितोड येथील किल्ला दुरुस्त करून उदेपुरासही त्यानें नवीन किल्ला, तलाव व राजवाडे बांधिले. कर्णाचा भाऊ भीमसिंह यानें ठरलेल्या तहान्वयें एक हजार स्वारांनिशीं बादशहाची नोकरी पत्करिली. भीमसिंह व शहाजहान यांजमध्यें उत्तम प्रकारचा स्नेह होता. जहांगीरच्या मुलांत तंटे लागले, तेव्हां उदेपूरच्या फौजेनें शहाजहानास मदत केली. पुढें लढाई होऊन भीमसिंह मारला गेला आणि शहाजहानास उदेपुरास आश्रय मिळाला, तेथें तो घरच्याप्रमाणें सुखांत राहिला. राणा कर्णानें तरी ' शत्रुवरिही उपकार ' करून रजपुतांच्या मनाचा थोरपणा व्यक्त केला. ह्या कृत्यामुळें जहांगीरची राण्यावर इतराजी झाली होती; पण त्यामुळें राण्याचें कांहीं वांकडें झालें नाहीं. राणा कर्ण सन १६२८ त मरण पावला, आणि त्याचा मुलगा जगत्सिंह उदेपूरच्या गादीवर बसला.

जहांगीर बादशहा मरण पावल्याची बातमी राणा जगत्सिहानें शहाजहानास सुरतेस कळविली, आणि त्यास मोठ्या समारंभानें दिल्लीस पोंचतें केलें. ह्या उपकाराबद्दल शहाजहाननें राण्यास फार सन्मानानें वागविलें. त्यामुळें जगत्सिहाची कारकीर्द फार सुखाची व शांततेची गेली. जगत्सिहानें पुष्कळ इमारती व लोकोपयोगी कामें करून उदेपूर शहरास शोभा आणिली. हा राणा सन १६५४ त मरण पावला. पुढें त्याचा पुत्र राणा राजसिंह मेवाडच्या गादीवर बसला. शहाजहानच्या कारकिर्दीच्या अखेरीस मोगल राज्यांत कलह माजले, त्यांच्या योगानें रजपुतांचें चांगलेंच फावलें. राजसिंहानें दारा यास मदत केली. पुढें औरंगजेबानें रजपु-

तांबरोबर जें प्रचंड युद्ध केलें, त्यांत राजसिंह हा रजपुतांचा पुढारी होता. तो औरंगजेबाचा पक्का वैरी असून अनेक प्रसंगीं त्या हट्टी बादशहाचा ह्या बाणेदार रजपुतानें चांगलाच समाचार घेतला. मारवाडच्या घराण्याची एक शाखा रूपनगर येथें असून तेथच्या ठाकुराच्या कन्येची मागणी औरंगजेबानें केली, तेव्हां तिनें राजसिंहास पत्र लिहून आश्रय मागितला. त्यावरून राजसिंहानें मोठ्या शिकस्तीनें त्या कन्येस औरंगजेबाच्या तडाख्यांतून सोडवून आणून स्वतः वरिलें. राजसिंहाच्या वेळीं मारवाडांत जसवंतसिंह व अंभेर ( अंबर ) येथें जयसिंह हे पराक्रमी राजे राज्य करीत असून, तिघांचा एक विचार होता. जिझिया कर रजपुतांवर पुनः बसविण्यांत आला, तेव्हां राजसिंहानें औरंगजेबास कानउघाडणीचें एक खरमरीत पत्र लिहिलें तें वाचण्यालायक आहे.

ह्या पत्राचा गोषवारा रा. रा. हरि नारायण आपटेकृत रूपनगरची राजकन्या ह्या पुस्तकांतून उतरून घेऊन खालीं दिला आहे.

'धन्य त्या सर्वशक्तिमान प्रभूच्या शक्तीची आणि महाराजांच्या औदार्याची. यद्यपि हा महाराजांचा हितचिंतक आपल्या चरणांपासून दूर येऊन राहिला आहे, तथापि स्वामिभक्तीचें व आज्ञाधारकतेचें कोणतेंही काम करण्यास त्याची उत्सुकता यत्किंचित् कमी झालेली नाहीं. सर्व प्रकारच्या लोकांची भरभराट करण्याच्या कामीं माझी सोज्वल इच्छा व नौकरी वाहिलेली आहे. ही माझी इच्छा सर्वविश्रुत असून महाराजांसही त्याबद्दल यत्किंचित् शंका येणें नाहीं, म्हणूनच महाराजांच्या मेहेरबानीचा व आजवर बजाविलेल्या नौकरीचा विचार करून, मी कांहीं सार्वजनिक कल्याणाच्या गोष्टींचा हुजूरपुढें अर्ज करण्याचें धाष्टर्य करीत आहें.

'माझ्या ऐकण्यांत असें आलें आहे, कीं आपल्या ह्या हितचिंतकाविरुद्ध आपले बरेच बेत चालले असून, ते घडवून आणण्याच्या कामीं हजारों रुपयांचा चुराडा करण्यांत आला आहे. त्या कामीं रिकामा झालेला खजिना भरून काढण्याकरितां महाराजांनीं एक नवीन कर लादण्याचा हुकूम फर्माविला आहे.

'महाराज ! वैकुंठवासी बादशहा जलालुद्दीन अकबर, त्यांचे चिरंजीव नुरुद्दीन जहांगीर, व आपले वडील शहाजहान बादशहा ह्यांनीं कैक वर्षें दक्षतेनें प्रजापालन करून अमर कीर्ति संपादन केली आहे. त्यांच्या औ-

दार्यादि गुणांमुळें त्यांची अव्याहत भरभराट होत गेली, आणि पुष्कळ मुलूख व किल्ले त्यांच्या कबज्यांत आले. परंतु आपल्या कारकिर्दींत पुष्कळांचीं मनें बादशाहीच्या विरुद्ध बिघडून गेलीं आहेत; आणि नासधूस व लूटमार ह्यांचा फैलाव अशृंखल होत चालल्यामुळें, आपल्या हातचा पुष्कळ मुलूख जाऊन, आणखीही जाण्याचा समय आला आहे. आपल्या प्रजेची पायमल्ली होत आहे, आणि राज्यांतील प्रत्येक भाग भिकारी झाला आहे. लोक उदध्वस्त होत आहेत, आणि एकामागून एक अडचणी राज्यावर कोसळत आहेत. दारिद्र्याची मजल बादशहाच्या व राजेरजवाड्यांच्या घरापर्यंत जेथें पोंचली आहे, तेथें अमीरउमरावांची व सामान्य रयतेची काय स्थिति असेल बरें! सैन्याकडे पाहवें तर सर्व शिपाई लोक कुरकूर करीत आहेत; व्यापारी रडत आहेत; मुसलमान नाखुश, हिंदु निराश्रित, व लाखों लोक इतके कंगाल, कीं एक वेळ रात्रींचें जेवणही मिळण्याचें त्यांस मुष्किल झालें आहे. सर्व लोक दुःखानें, निराशेनें व त्वेषानें आपलीं डोकीं रात्रंदिवस पिटीत आहेत.

'अशा दुःस्थितीस पावलेल्या लोकांपासून जो राजा जबरदस्तीनें भारी कर उकळण्याकडे आपल्या शक्तीचा उपयोग करितो, त्याची महती कायम राहणें शक्य आहे काय ? या कठीण प्रसंगीं चोहोंकडे एकच वार्ता सांगण्यांत येत आहे, कीं हिंदुस्थानच्या बादशहास गरीब बिचाऱ्या हिंदु साधूंचा मत्सर वाटत असल्यामुळें, ब्राह्मण, वैरागी, वगैरे सर्वांपासून ते जबरदस्तीनें कर वसूल करणार आहेत. आपल्या मूर जातीच्या सुप्रसिद्ध नांवाकडे दुर्लक्ष करून, एकांतवासी, निरुपद्रवी साधुसंतांवर आपल्या शक्तीचा ते प्रयोग करणार आहेत. ईश्वरप्रणीत धर्मपुस्तकावर जर महाराजांचा कांहीं भरंवसा असेल, तर त्यावरून महाराजांस समजेल, कीं ईश्वर हा एकंदर सर्व मानवजातीचा देव आहे. केवळ मुसलमानांचाच नव्हे. त्याच्या दृष्टीनें मुसलमान व इतर धर्मांचे लोक सारखेच आहेत. रंगभेद त्याच्याच हुकमानें झाला आहे. सर्वांस तोच जीवित देतो. आपल्या मशिदींतून आपण नामघोष करून स्तवन करितां, तर ज्या आमच्या देवालयांत मूर्तींपुढें घंटा वाजविल्या जातात, तेथेंही त्याच प्रभूचें पूजन होतें. दुसऱ्या लोकांच्या धर्मास किंवा चालीरीतींस नांवें ठेवणें म्हणजे त्या सर्वशक्तिमान प्रभूच्या मर्जीस धाब्यावर बसविण्या-

सारखें आहे. एकाद्या चितार्‍याचें चित्र जर आपण बिघडविलें, तर आपणावर त्याचा साहजिक किती बरें राग होतो! म्हणूनच कवीनें म्हटलें आहे, कीं इश्वरानें जीं नानातर्‍हेचीं कामें निर्माण केलीं आहेत, त्यांस नांवें ठेवण्याचें धाष्टर्य करूं नका.

'सारांश, हिंदुलोकांवर जो महाराजांनीं कर लादला आहे, तो न्यायास अनुसरून नाहीं, त्यांत सुनीति नाहीं. एवढेंच नव्हे, तर त्यामुळें देशास दारिद्य प्राप्त होणार आहे. शिवाय हा अगदीं नवीनच प्रकार असून हिंदुस्थानच्या कायद्याचें यानें उल्लंघन होत आहे. स्वधर्माच्या कळकळीमुळें जर आपण असें करण्याचा निश्चय केला असेल, तर न्यायदृष्टीनें हिंदूंमध्यें श्रेष्ठ व प्रमुख म्हणून ज्यांची गणना आहे, त्या रामसिंगावर प्रथम मागणी व्हावयास पाहिजे होती. नंतर महाराजांनीं ह्या हितचिंतकाकडे वळावयाचें होतें. कारण मजपासून कराचा वसूल करण्यास महाराजांस तितकी अडचण पडणार नाहीं. गरीब मुंग्यामाशांस त्रास देणें आपल्यासारख्या शूर व उदार अंतःकरणास अयोग्य आहे. आपला न्याय व मरातब कशारीतीनें राखावा ह्या संबंधानें प्रधानमंडळीनें महाराजांस योग्य सल्ला देण्यांत हयगय केल्याबद्दल मला आश्चर्य वाटतें.'

ह्या पत्रानें चिडून जाऊन औरंगजेबानें आपल्या सर्व लष्करानिशीं मेवाडवर स्वारी केली. त्या वेळीं तीन चार प्रचंड लढाया होऊन औरंगजेबाचा पराजय झाला, आणि अत्यंत मानहानि व निरुपाय होऊन त्यास कसाबसा तह करून रजपुतान्यांतून आपला पाय माघारा घ्यावा लागला, ( स. १६८१ ). हिंदुस्थानांत मुसलमानांच्या विरुद्ध हिंदु राजांनीं अनेक कट केलेले इतिहासांत नमूद आहेत. महंमद तुघ्लखच्या विरुद्ध विजयनगरास झालेला कट, बाबराच्या विरुद्ध संगराण्यानें केलेला कट, तशाच तोडीचा, किंबहुना त्याहून ज्यास्त जोराचा हा रजपुतांचा औरंगजेबाविरुद्ध कट होता. परिणामावरून पाहतां ह्याच कटास ज्यास्त सिद्धि मिळाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. मोगल बादशाही ढांसळून पाडण्याची सुरुवात ह्या कटानें केली. त्याचें सर्व श्रेय राजसिंहास आहे. प्रत्यक्ष लढाईंत राजसिंहानें कावा लढविला म्हणूनच रजपुतांस जय आला. पराभव होऊन आपण पळून जात आहों, असें राजसिंहानें औरंगजेबास भासवून, त्याच्या फौजेस अडचणीच्या जागीं

आणिलें; आणि लगेच उलट खाऊन त्या फौजेचा फन्ना उडविला. म्हणून युद्धकलेच्या दृष्टीनें सुद्धां राजसिंहाचा हा पराक्रम हिंदुस्थानच्या इतिहासांत संस्मरणीय झाला आहे. राजसिंहाच्या पश्चात् त्याच्या तोडीचा पुढारी रजपुतांस मिळाला नाहीं, हें दुर्दैव होय.

राजसिंहानें उदेपुरास मोटमोठीं कामें केलीं. राजसमुद्र नांवाचा एक विस्तीर्ण तलाव बांधिला. भयंकर दुष्काळ पडला असतां रयतेचें पोषण चांगल्या रीतीनें केलें; औरंगजेब बादशहासारख्या क्रूर, कपटी व बलवान् पुरुषाशीं मोठ्या नेटानें टिकाव धरिला; आणि आपल्या पराक्रमानें मोगल बादशहास लाजविलें, असें मुसलमान इतिहासकारही कबूल करितात. सारांश, नांवाजलेल्या उत्तम राजमालिकेंतील हा राणा एक बहुमोल हिऱ्यासारखा मेवाडच्या इतिहासांत झळकत आहे, आणि त्यामुळें त्याचें सत्कुल अधिक सुशोभित व दीप्तिमान झालें आहे ह्यांत संशय नाहीं. हा थोर पुरुष सन १६८१त मरण पावला.

राजसिंहाच्या पश्चात् त्याचा पुत्र राणा जयसिंह गादीवर बसला. त्याला भीमसिंह नांवाचा दुसरा एक भाऊ होता. बापाच्या इच्छेस्तव भीमसिंहानें आपला गादीवरचा हक्क सोडून पुनः उदेपुरांत पाऊल ठेविलें नाहीं. दिलेरखानाच्या मध्यस्थीनें रजपूत व औरंगजेब ह्यांचा कायमचा तह ठरला. तरी अनेक वेळां राण्यास मोगलांशीं झगडावें लागलें. जयसमुद्र नांवाचा एक विस्तीर्ण तलाव ह्यानें बांधिला, त्याच्या पाण्यावर उत्तम शेती होते. जयसिंहाच्या कार्किर्दींत गृहकलह माजल्यामुळें मेवाडच्या वैभवास उतरती कळा लागली. दिवसेंदिवस जयसिंह विलासी व आळशी बनला.

सन १७०० ह्या वर्षी जयसिंह मरण पावल्यावर त्याचा पुत्र अमरसिंह (दुसरा) गादीवर बसला. पुढील इतिहासांत ह्या वेळच्या रजपुतांच्या भानगडी विशेष महत्त्वाच्या आहेत. मोगल बादशाहीस उतरती कळा लागली. उत्तरेस शीख लोक प्रबळ झाले. मराठे रजपुतांवर स्वाऱ्या करूं लागले. अखेरीस इंग्रजांनीं आपली सत्ता स्थापिली. असो, अमरसिंहाच्या कार्किर्दीतील मुख्य गोष्ट म्हटली म्हणजे त्यानें मुख्य मुख्य रजपूत घराण्यांमध्यें कित्येक अटी ठरवून स्नेह जोडिला, आणि सर्वांनीं एक विचारानें चालावें असें ठरविलें. ह्या ठरावानें रजपुतांनीं मोगलांशीं आपला संबंध

तोडिला. इतःपर मुसलमानांशीं कोणीही लग्नसंबंध करूं नये, व आपसांत बंद पडलेले संबंध पुनः चालू करावे असें ठरलें. ह्या ठरावामुळें पुढें कलह माजले असें कित्येकांचें मत आहे. जोधपूरचा राणा अजितसिंह ह्यानें आपली मुलगी फर्रुखसियर बादशहास देऊन वरील ठराव मोडिला, तेव्हां रजपुतांत पुनरपि कलह सुरू झाले. राणा अमरसिंह सन १७१६त मरण पावला. तो मोठा चपळ, स्वकार्यदक्ष व थोर मनाचा होता. त्यानें शेतकीला विशेष उत्तेजन देऊन कलाकौशल्याचें संरक्षण केलें. एकंदरींत त्यानें आपल्या राष्ट्राचा बोज चांगला राखिल्याबद्दल त्याची कीर्ति आहे.

अमरसिंहाच्या पश्चात् त्याचा पुत्र संग्रामसिंह उदेपूरच्या गादीवर बसला. ह्यास शांतता फार प्रिय असे. मोगल बादशाहीच्या पडत्या काळांत वाटेल तसा हात मारून, इतर रजपूत राजांनीं आपल्या राज्याचा विस्तार केला. पण संग्रामसिंह आपल्या राज्यांत प्रजा-हिताकडे लक्ष देत स्वस्थ बसला. न्याय व वसूल हीं खातीं त्यानें सुधारून रयतेचें कल्याण केलें. बिहारीदास पंचोली नांवाचा हुशार व प्रामाणिक दिवाण त्याजपाशीं होता. तो मोठा धोरणी व राजकार्यकुशल होता. संग्रामसिंह सन १७३४त मरण पावला. संग्रामसिंहाच्या पश्चात् उदेपूरच्या राज्यास उतरती कळा लागली.

संग्रामसिंहाचा पुत्र दुसरा जगत्सिंह गादीवर बसला. रजपुतांमध्यें झालेला एकोप्याचा तह मोडला होता, तो त्यानें पुनरपि अमलांत आणि-ला. त्याच्या कार्किर्दींत मराठ्यांनीं रजपुतांवर हल्ले सुरू केले. ह्याच वेळेस नादीरशहानें दिल्लीवर स्वारी करून बादशहाची उरलीसुरली शक्ति नाहींशी करून टाकिली. त्या वेळीं रजपुतांनीं बादशहास साह्य न करितां पूर्वीचें वैर उगवून घेतलें. परंतु इकडे मराठ्यांनीं रजपुतान्यांतून चौथाई वसूल केली. त्यांजपुढें राजस्थानांतील सर्व सरदार हतवीर्य व निस्तेज झाले. राणा जगत्सिंह सुखोपभोगांत निमग्न राहिला, आणि सन १७५२त वारला. मिजास, विलास व अश्लीलतेचे प्रकार उदेपुरांत दिसतात, त्यांचा उगम मुख्यतः जगत्सिंहाच्या कार्किर्दींत झाला.

जगत्सिंहानंतर त्याचा वडील पुत्र दुसरा प्रतापसिंह गादीवर बसला. शिंदे, होळकर व रघुनाथराव पेशवे ह्यांचे हल्ले एकसारखे रजपुतांवर चालू होते. सन १७५५त राजा प्रतापसिंह मरण पावला; आणि

त्याचा मुलगा राजसिंह ( दुसरा ) गादीवर बसला. मराठ्यांनीं राजस्थानावर तीन स्वाऱ्या केल्या, आणि त्या सर्वांचा खर्च उदेपूरच्या खजिन्यांतून त्यांनीं घेतला. एक पै सुद्धां राजासिंहाजवळ शिल्लक राहिली नाहीं. स्वतःच्या लग्नासाठींही त्यास कर्ज काढावें लागलें. सन १७६२त हा दुर्दैवी राणा मरण पावला, आणि त्याचा चुलता राणा उर्सिसिंह गादीवर बसला. उर्सिसिंह हा रागीट व हट्टी होता. त्यानें मोटमोठ्या सरदारांस फार अनुचित रीतीनें वागविलें. मेवाडांत भयंकर दुष्काळ पडला. एकंदरींत उर्सिसिंहाच्या योगानें मेवाडच्या गादीवर मोठें दुर्दैवच ओढवलें असें म्हणावें लागतें. रजपूत सरदारांनीं त्याजविरुद्ध कट केले. कोट्याचा रणशूर ठाकूर जालिमसिंह हा उर्सिसिंहाचे बाजूनें लढत होता. अशा प्रकारें भानगडी चालत असतां सन १७७२ ह्या वर्षी उर्सिसिंहाचा खून झाला. अमरचंद म्हणून त्याचा एक हुशार दिवाण होता. त्यानें बऱ्याच अंशीं या घराण्याची अब्रू बचाविली. ह्या राण्याचें बहुतेक राज्य लोकांनीं घेतलें. उर्सिसिंहानंतर त्याचा वडील मुलगा हमीर हा गादीवर बसला. ' उदेपूरचा राणा ' ह्या नावांत आतां फारसें महत्त्व राहिलें नव्हतें. अंतर्द्वेष फार वाढल्यामुळें चोहोंकडे शत्रु उत्पन्न झाले. हमीर हा फार लहान असल्यामुळें त्याची आई सर्व कारभार पाहत असे. राज्याचा आधारस्तंभ अमरचंद होता. त्याजविषयीं मनांत वैषम्य धरून तिनें त्याचें कांहीं चालूं दिलें नाहीं. पुढें लवकरच अमरचंद मरण पावला. त्याला राणीनें विषप्रयोग केला असा समज आहे. अमरचंदाची राजनिष्ठा, स्वदेशप्रीति व सचोटी ह्या गुणांवरून राजस्थानांत त्याचें नांव फार प्रसिद्ध आहे. राणा हमीर सन १७७८त मरण पावला.

हमीर नंतर त्याचा लहान भाऊ भीमसिंह सन १७७८त मेवाडच्या गादीवर बसला. तेव्हां त्याचें वय केवळ आठ वर्षांचें होतें. आपल्या भावाप्रमाणें तोही कांहीं दिवस आईच्या ताब्यांत होता. ह्या परवशतेमुळें त्याच्या स्वभावांत पुष्कळ प्रकारचे दोष उत्पन्न होऊन ते अखेरपर्यंत कायम राहिले. भीमसिंहानें पन्नास वर्षें राज्य केलें. एवढ्या अवकाशांत त्यानें जितके नशिबाचे खेळ पाहिले तितके दुसऱ्या कोणींही पाहिले नसतील. मराठ्यांनीं त्याच्या राज्यावर वारंवार स्वाऱ्या करून तें अगदीं उद्ध्वस्त करून टाकिलें. कृष्णाकुमारी म्हणून यास एक रूपवती मुलगी होती. तिच्याबद्दल सर्व

रजपूत राजांत तंटे लागून शेवटीं भीमसिंहानें तीस वीष देऊन ठार मारिलें. शिंद्याचा सरदार अंबाजी इंगळे यानें मेवाडांत आपलें ठाणें दिलें. ह्या गोष्टी मराठ्यांच्या इतिहासांत यावयाच्या आहेत. मराठ्यांशीं इंग्रजांचें दुसरें युद्ध संपल्यावर मराठ्यांच्या जाचांतून रजपूत सुटतील असें वाटत होतें, पण तसा प्रकार झाला नाहीं. कित्येक दिवस तर कोट्याचा जालिमसिंह याजकडून कांहीं नेमणूक घेऊन भीमसिंहास आपला निर्वाह करावा लागला. सन १८१७ मध्यें पेंढाऱ्यांशीं इंग्रजांचें युद्ध सुरू झालें, तेव्हां भीमसिंहानें इंग्रजांचें सार्वभौमत्व पत्करिलें. भीमसिंह सन १८२९ त मरण पावला. भीमसिंहानंतर त्याचा पुत्र जवानसिंह यानें सन १८२९ पासून १८३८ पर्यंत राज्य केलें. नंतर त्याचे मुलगे सरदारसिंह व सुरूपसिंह यांनीं अनुक्रमें १८३८ ते १८४२ व १८४२ ते १८५१ पर्यंत राज्य केलें. सुरूपसिंहाचा दत्तक मुलगा शंभुसिंह सन १८५१ पासून १८७४ पर्यंत गादीवर होता. शंभुसिंह फार लोकप्रिय होता. त्याच्या मरणाबद्दल लोकांस फार वाईट वाटलें. शंभुसिंहाचा दत्तक मुलगा सज्जनसिंह यानें दहा वर्षें राज्य केलं. हल्लीं महाराणा फत्तेसिंह सन १८८४ पासून उदेपूर येथें राज्य करीत आहे.

मेवाडची लोकसंख्या सुमारें आठरा लाख असून उत्पन्न सुमारें चाळीस लक्ष रुपये आहे. हे राणे सालीना अडीच लाख रुपये इंग्रजांस खंडणी देतात.

८. **जयपूरचा इतिहास.**—जयपूरच्या राजास अंबरचे राजे असेंही म्हणतात. अंबर हें जयपूरच्या नजीकचें एक शहर आहे. ती प्राचीन राजधानी होय. अठराव्या शतकांत जयसिंह नांवाच्या विख्यात राजानें अंबरनजीक नवीन शहराची स्थापना करून त्यास आपल्या नांवावरून जयपूर हें नांव दिलें. जयपूरचे राजे सूर्यवंशी कच्छवाह आडनांवाचे आहेत. श्रीरामचंद्राचा मुलगा कुश ह्यास कूर्म ऊर्फ कच्छ म्हणून पुत्र होता, त्यापासून ह्या घराण्याची उत्पत्ति असल्यामुळें, त्यास कच्छवाह हें नांव प्राप्त झालें. कुशाचा वंशज नळराजा नैषध देशावर राज्य करीत होता. नळापासून चवतिसावा पुरुष धवलराय हा कैक वर्षें यवनांबरोबर झगडत होता. त्या झगड्यांत पाडाव झाल्यामुळें तो नैषध देश सोडून बाहेर निघाला, आणि सन ९५७ त अंबर शहराची स्थापना करून धुंडार देशचा राजा ह्या नांवानें राज्य करूं लागला. धवलरायानें घेतलेला मुलूख

दिल्लीच्या रजपूत राजांचा होता. अजमीरच्या चव्हाण राजाची मुलगी धवलरायास दिलेली होती. धवलरायानंतर कंकल, मैदलराय, हूणदेव, कुंतल, व पंजून असे राजे गादीवर आले. पंजून हा शूर व पराक्रमी होता. त्यास दिल्लीच्या पृथ्वीराज चव्हाणाची बहीण दिलेली होती. पृथ्वीराजाच्या पदरीं हा एका तुकडीचा नायक होता. शहाबुद्दीन घोरीचा पराजय करून त्यास गज्नीपर्यंत पंजूननें हांकून लाविलें. पृथ्वीराजाकरितां संयुक्तेचें हरण करितांना लढाईंत पंजून मारला गेला. पंजूनपासून अकरावा पुरुष पृथुराज हा अंबर येथें पराक्रमी राजा झाला. सिंधुनदावर यात्रेकरितां गेला असतां पृथुराजास त्याचा मुलगा भीम ह्यानें ठार मारिलें. नंतर पृथुराजाचा पुत्र बिहारीमल्ल यास गादी मिळाली. बिहारीमल्लाच्या वेळेस बाबरानें हिंदुस्थानांत मोगलांची सत्ता स्थापन केली. प्रथम बिहारीमल्ल बाबराशीं लढण्यास तयार होता. पण अंबरचा मुलूख दिल्लीच्या नजीक असल्यामुळें मोगलांचे हल्ले वरचेवर येणार असें पाहून, त्यानें बाबरास करभार दिला, आणि त्याजशीं सख्य करून आपली नात, पुढें येणाऱ्या मानसिंहाची बहीण, हुमायून ह्यास दिली. मुसलमानांशीं शरीरसंबंध घडवून आणणारा पहिला रजपूत राजा हाच होय. हुमायून तख्तनशीन झल्यावर बिहारीमल्लास त्यानें अंबरचा महाराज अशी पदवी दिली. त्याजवर अकबर बादशहाचीही बहाल मर्जी होती. त्याच्या मुलीबरोबर स्वतः अकबरानें लग्न केलें, आणि त्याच्या सर्व मुलांस आपल्या फौजेंत सन्मानाच्या जागा दिल्या. बिहारीमल्लाच्या पश्चात् त्याचा पुत्र भगवानदास अंबरच्या राज्याचा धनी झाला. त्यानें आपली मुलगी अकबराचा पुत्र सलीम ह्यास दिली. तेणेंकरून व एकनिष्ठपणानें चाकरी केल्यामुळें अकबराजवळ त्याचें वजन फार होतें. पंजाब प्रांताची सुभेगिरी भगवानदासाकडे होती. लाहोरासच तो सन १५८९त मरण पावला. भगवानदास हा बुद्धिमान, शूर व शहाणा होता. त्याच्या मरणानें अकबरास फार दुःख झालें.

भगवानदासास मूल नव्हतें. त्यानें आपल्या भावाचा मुलगा मानसिंह ह्यास दत्तक घेतलें. अकबरच्या दरबारांत मानसिंहाची विशेष वडेजाव होती. त्याजवर मोठमोठीं जोखमाचीं कामें अकबरानें सोंपविलीं. ओढ्या व आसाम हे प्रांत मानसिंहानें जिंकून अकबराच्या राज्यास जोडले. अकबरानें ज्या एकंदर मोहिमा केल्या, त्यांपैकीं निदान निम्यांत मान-

सिंहाचें अंग होतें. मेवाडचा राणा प्रतापसिंह याजबरोबर मानसिंहाचें वांकडें होतें. त्याजबरोबर झालेल्या युद्धांत मानसिंहच पुढारी होता. मानसिंहाचा पुत्र भावसिंह याजकडे पंजाबच्या सुभेदारीचें काम होतें. मानसिंहाची बहीण सलीम ह्यास दिली होती, तिचा मुलगा खुस्रू म्हणून होता. खुस्रूचें व सलीमचें वांकडें होतें. त्या तंट्यांत खुस्रूच्या आईनें विष खाऊन जीव दिला. तेणेंकरून सलीम पुढें फारच चिडखोर झाला. अकबराच्या मरणासमयीं खुस्रूस राज्य मिळावें म्हणून मानसिंहानें खटपट केली, सबब त्याजवर सलीमाची पुढें गैरमर्जी झाली. परंतु मानसिंहासारखे सरदार प्रत्यक्ष बादशहासही भारी आहेत हें ओळखून, सलीमनें त्यास आपणाकडे वळवून घेतलें. मानसिंह सन १६१५त मरण पावला. मानसिंहाचा मुलगा भावसिंह हा बापासारखा शूर नव्हता. तो १६२१त मरण पावला. त्याचा मुलगा महासिंह हाही पराक्रमी नसल्यामुळें, मोगलांच्या दरबारीं जोधपूरवाल्याचें वजन वाढलें. पुढें मानसिंहाचा भाऊ जगत्सिंह ह्याचा नातू जयसिंह ह्यास जहांगीरनें, आपली राणी जोधाबाई इच्या सल्ल्यानें, अंबरच्या गादीवर स्थापन केलें. हा जयसिंह पुढें मीर्झा राजा ह्या नावानें प्रसिद्धीस आला. शहाजहान व औरंगजेब ह्यांच्या पदरीं जयसिंहाचें वजन विशेष होतें. शिवाजीस दिल्लीस नेण्याचें काम जयसिंहानें युक्तीनें बजाविलें. औरंगजेब बादशहानें सर्वच रजपुतांस वाईट रीतीनें वागविल्यामुळें त्याचें व ह्याचें वांकडें आलें, आणि रजपुतांच्या मोठ्या कटांत हा सामील झाला. जयसिंहाचा मुलगा कीरतसिंह ह्यानें औरंगजेबाच्या सांगणीवरून बापाचा खून केला. जयसिंहाचा मोठा मुलगा रामसिंह हा पुढें अंबरच्या राज्याचा धनी झाला. कांहीं दिवस राज्यांत अव्यवस्था चालू होती, आणि राज्याचा बहुतेक भाग मोगलांच्या स्वाधीन होता. सन १६९९त दुसरा जयसिंह गादीवर आला. ह्यास सवाई जयसिंह म्हणतात. हा फार विद्वान् होता. ह्यानें चवेचाळीस वर्षें राज्य केलें. ह्याच्या वेळेस मोगल बादशाही झपाट्यानें रसातळास चालली होती. चोहोंकडे बेबंदशाही सुरू असतां जयसिंहास युद्धप्रसंग करून रजपुतांचें शौर्य दाखविण्यास पुष्कळ जागा होती. तरी शांततेनें व शहाणपणानें लोकांच्या कल्याणार्थ झटण्यामध्यें जयसिंहाचें कर्तृत्व निमालें. ह्यानें राज्यास सुव्यवस्था लावून दिली.

चांगले चांगले कायदे केले. शास्त्राध्ययनास उत्तेजन दिलें. ह्यानेंच जयपूर शहराची हल्लींची बांधणी सिद्धीस नेली. ह्या शहराची सुंदर रचना आजपर्यंत हिंदुस्थानांत नांवाजली जात आहे. अंबरास लागूनच हें शहर आहे. ह्या शहरांत अनेक प्रकारच्या विद्या व कला झपाट्यानें उदयास आल्या. विद्याधर नांवाचा एक हुशार व विद्वान् बंगाली गृहस्थ जयसिंहापाशीं होता. त्याच्या साह्यानें ह्या सर्व गोष्टी जयसिंहानें तडीस नेल्या. दिल्ली, जयपूर, उज्जनी, बनारस, मथुरा इत्यादि ठिकाणीं त्यानें वेधशाळा व ज्योतिषशाळा स्थापिल्या. ग्रहांचे शोध लावण्याचीं नवीन नवीन यंत्रें त्यानें बनविलीं. पाश्चात्य ज्योतिषशास्त्राचा अभ्यास करण्यासाठीं इकडचे पंडित त्यानें युरोपास पाठविले. बिनचूक वेध घेऊन एक नवीन पंचांग जयसिंहानें चालू केलें. मुसलमानी पंचांग जयसिंहानें शुद्ध करून दिलें तें आजतागाईत चालत आहे. शास्त्रीय शोधांशिवाय रस्ते, धर्मशाळा वगैरे अनेक कामें प्रजेच्या हिताकरितां जयसिंहानें केलीं. त्यानें केलेल्या सर्व कृत्यांचें यथास्थित वर्णन ह्या संकुचित स्थळीं देणें अशक्य आहे. रक्तपात व कृष्ण कारस्थानें यांस अगदीं ऊत आलेल्या अशा त्या काळांत आपल्या आवडत्या विद्याव्यासंगांतच जयसिंहानें आपलें सर्व लक्ष घातलें. मोगलबादशाहीची जुनी पुराणी इमारत खिळखिळी होऊन जमीनदोस्त होण्याच्या बेतास आली, अशा प्रसंगीं आपली राज्यनौका हालूं न देतां, तिचें सुकाणूं संथपणें चालवून, आसपासच्या राज्यांपेक्षां आपल्या राज्याचें श्रेष्ठत्व लोकांच्या नजरेस त्यानें आणिलें, ही गोष्ट सामान्य नव्हे. जयसिंह लोकोत्तर राजा झाला असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. मोगल बादशाहीची धडगत नाहीं हें कळून चुकलें असतां, स्वराज्य सुरक्षित ठेवण्याच्या भरांत त्यानें धन्याशीं बेइमानगिरी केली नाहीं. फर्रुख्सेयर बादशहाच्या विरुद्ध कट चालले असतां, जयसिंहाची मोगल घराण्यावरील राजनिष्ठा कसास लागली आहे. तयमूरच्या वंशांतील संततीला योग्य अशा शौर्याचा एक कण जरी फर्रुख्सेयरच्या अंगीं असता, तरी जयसिंहाच्या स्वामिभक्तीचें चीज झालें असतें. महंमदशहा सन १७२०त तख्तनशीन झाला, तेव्हां जयसिंहास त्यानें माळव्याचा सुभेदार नेमिलें. त्या वेळीं त्यानें जाठ लोकांचा बंदोबस्त केला, आणि मुसलमानांकडून

हिंदूंवरचा जिझिया कर माफ करविला. मोगल बादशहाकडून प्रांतांचें रक्षण होणें दुर्घट आहे असें पाहून, त्यानें बादशहाकडून बाजीराव पेशव्याबरोबर तह करविला; आणि माळवाप्रांत मराठ्यांकडे दिला. नादीरशहानें स्वारी केली, तेव्हां आपल्या हातून संकट परिहार होणार नाहीं असें जाणून तो अगदीं तटस्थ राहिला. अशा रीतीनें पुष्कळ वर्षें लौकिक मिळवून जयसिंह सन १७४३त मरण पावला.

जयसिंहाचा वडील मुलगा ईश्वरसिंह अंबरच्या गादीवर बसला. त्याबरोबर रजपुतान्यांत युद्ध सुरू झालें. उदेपूरचा राणा अमरसिंह ह्याच्या वेळेस सर्व रजपूत राजांत असा एक ठराव झाला होता, कीं 'मेवाडच्या घराण्यांतील कन्या ज्या राज्यांत दिली असेल, त्यांत त्या कन्येचा मुलगा लहान किंवा मोठा कसाही असला, तरी तोच गादीचा वारस समजला जावा.' कित्येक रजपुतांनीं मोगलांचे घराण्यांत मुली दिल्यामुळें ते जातिभ्रष्ट झाले, असा समज झाला होता, तो दूर करण्याकरितां आणि सर्व रजपूत घराणीं पुनः शुद्ध होण्याकरितां वरील ठराव करण्यांत आला. मेवाडच्या राजकन्येचा मुलगा माधवसिंह हा लहान असतांही ह्या ठरावाप्रमाणें तो जयपूरच्या गादीस ज्यास्त हक्कदार होता. म्हणून मेवाडचा राणा जगत्सिंह ह्यानें माधवसिंहाचा हक्क स्थापन करण्याकरितां जयपूरशीं युद्ध सुरू केलें. घोर रणकंदन झालें. त्यांत जगत्सिंहाचा पराभव झाला. तेव्हां मल्हारराव होळकर यास कित्येक परगणे देऊन जगत्सिंहानें आपल्या मदतीस बोलाविलें. ही खबर ऐकून ईश्वरसिंहानें विष घेऊन प्राण दिला.

पुढें माधवसिंहास जयपूरचें राज्य प्राप्त झालें. तो विद्वान्, शूर व चतुर होता. परंतु जाट लोकांशीं सतत झगडावें लागल्यामुळें त्यास राज्यकारभाराकडे लक्ष देण्यास फुरसत मिळाली नाहीं. शिवाय तो अल्पवयी झाला. सन १७६३त तो वारल्यावर त्याचा पुत्र पृथुसिंह गादीवर बसला. तो वयानें लहान असल्यामुळें त्याच्या आईच्या हातीं राज्यकारभार होता. ही बाई दुराचारी व दुष्ट होती. तिच्या वेळेस राज्याची फार खराबी झाली. सन १७७८त पृथुसिंह घोड्यावरून पडून मरण पावला. नंतर पृथुसिंहाचा सावत्र भाऊ प्रतापसिंह गादीवर बसला. हा शूर व शहाणा होता. महादजी शिंदे याजबरोबर लढण्यांत हाच

प्रमुख होता. मराठ्यांशीं टक्कर देण्याकरितां त्यानें विलक्षण जमाव केला. प्रथम त्यास थोडासा जय प्राप्त झाला; पण अखेरीस शिंद्यानें सर्व रजपुतांची जूट मोडून त्यांजवर आपला पूर्ण ताबा बसविला. पुढें मरेपर्यंत त्यास मराठ्यांचा त्रास सहन करावा लागला. राणा प्रतापसिंह सन १८०३त मरण पावला. नंतर त्याचा पुत्र जगत्सिंह राज्याचा मालक झाला. हा अत्यंत हलकट संगतींत व नीच व्यसनांत सर्वकाळ निमग्न राही. रजपुतान्यांत ह्याचें नांव ऐकून लोक तिरस्कार व्यक्त करितात. सन १८०३त लॉर्ड लेक ह्याजबरोबर त्यानें तैनाती फौजेचा तह केला. पण लॉर्ड कॉर्नवॉलिस व त्यापुढचे गव्हर्नर्स् जनरल ह्यांनीं ही तैनाती फौजांची पद्धत पुढें चालू ठेविली नाहीं, म्हणून जयपूरचा प्रदेश पुनः शिंद्याचे तावडींत सांपडला. उदेपूरची राजपुत्री कृष्णाकुमारी इचा अभिलाष धरून जगत्सिंह व इतर रजपूत राजांनीं सर्वस्वाचें नुकसान करून घेतलें. पेंढाऱ्यांबरोबर सन १८१७त इंग्रजांनीं युद्ध सुरू केलें, त्या वेळीं पूर्वीचा तह पुनरपि इंग्रज सरकारानें अमलांत आणिला. दुसरे अनेक कडक करार राण्याबरोबर करण्यांत आले, त्यांचें वर्णन करण्याचें हें स्थळ नव्हे. राणा जगत्सिंह सन १८१८त मरण पावला. नंतर चार महिन्यांनीं त्यास एक पुत्र झाला, त्याचें नांव जयसिंह ठेवण्यांत येऊन तो गादीवर बसला. पुढें राज्यांत पुष्कळ गडबड चालू झाली. सन १८३५त राजा जयसिंह मरण पावल्यावर त्याचा पुत्र रामसिंह जयपुरास गादीवर बसला, तो सन १८८० सालीं वारला. तेव्हांपासून राणा माधवसिंह राज्य करीत आहे.

जयपूरची लोकसंख्या अठ्ठावीस लाख असून उत्पन्न सालीना सुमारें एक लाख रुपये आहे.

६. **जोधपूरचा इतिहास.**—हें राज्य मारवाड किंवा जोधपूर ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. येथील राज्यकर्ते चंद्रवंशी राठोड जातीचे असून त्यांना महाराजा अशी पदवी आहे कनोजचा राजा जयचंद राठोड हा, शहाबुद्दीन घोरीचा सरदार कुत्बुद्दीन याजबरोबर इटावानजीक चंदवाड येथें झालेल्या लढाईत, मारला गेला,(स.११९४). नंतर १८ वर्षांनीं त्याचे दोन नातू शिवजी व सैत्रम स्वदेश सोडून पश्चिमेस मारवाडप्रांतांत आले. तेथें त्यांनीं पराक्रम करून लहानसें राज्य स्थापन केलें. शिवजीच्या वंशजांनीं राज्याची

मर्यादा पुष्कळ वाढविली. पुढें विरमदेव म्हणून एक पराक्रमी राजा झाला. त्याचा मुलगा चांद ह्यानें मंदोड शहर जिंकून तेथें आपली राजधानी केली. चांद हा नागोर येथें सन १४०२त मारला गेला. त्याचा मुलगा रावरणमल्ल हा मेवाडच्या लाखा राण्याचा दोस्त होता. त्या दोघानीं अनेक पराक्रमाचीं कृत्यें केलीं. लाखा राणा मरण पावल्यावर मेवाडचें राज्य आपल्या राज्यास जोडण्याची रणमल्लास इच्छा उत्पन्न झाली. त्याची मुलगी लाखा राण्यास दिलेली होती. परंतु मेवाडच्या राण्याचें पाणी प्रखर होतें. राणा मुकुलजीचा भाऊ चंद्र ह्यानें रणमल्लास ठार मारिलें आणि सर्व कुटुंबाचा नाश केला. रणमल्लाचा मुलगा जोधसिंह मात्र सुटून गेला. त्यानें महाप्रयासानें राठोड वंश तारिला. बराच मुलूख उदेपूरवाल्यांस देऊन त्यानें त्यांजबरोबर सख्य केलें. जोधसिंह हा प्रतापी पुरुष होऊन गेला. त्यानें लढाईची भानगड सोडून देऊन राज्यांत शांतता केली. सन १४५९त त्यानें जोधपूर शहराची स्थापना केली. तेच शहर हल्लीं ह्या राजांची राजधानी आहे. जोधसिंह सन १४८९ त मरण पावला. त्याचा पुत्र सुरजमल्ल ह्यानें सत्तावीस वर्षे राज्य केलें. त्यानें राज्याची वृद्धि बरीच केली. सुरजमल्लानंतर त्याचा नातू गंग हा राज्य करीत असतां मोगलबादशाहीची स्थापना झाली. गंगानें मेवाडच्या संग राण्यास उत्तम प्रकारें साह्य करून रजपुतांचें स्वातंत्र्य कायम राखण्याचा प्रयत्न केला. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं, हें मागें सांगण्यांत आलेंच आहेच. गंग सन १५३२त मरण पावला. त्याचा मुलगा मालदेव हा राज्कारस्थानी व धूर्त होता. शीरशहा सूर यांजला पुष्कळ दिवसपर्यंत त्यानें धाब्यावर बसविलें. जोधपुरास उत्तम तटबंदी करून कोणत्याही शत्रूबरोबर लढण्याची त्यानें जय्यत तैयारी ठेविली. हुमायून बादशहा त्याजकडे आश्रय मागण्यास आला असतां त्यास त्यानें शत्रूप्रमाणें वागविलें. या अपराधाचें पूर्ण प्रायश्चित् त्यास भोगावें लागलें. अकबर दिलीच्या तख्तावर आला. त्यानें १५६१त मारवाडवर स्वारी केली, आणि मालदेवाचें बहुतेक राज्य दुसऱ्या एका इसमास दिलें. आठ वर्षांनंतर मालदेव अकबरास शरण गेला. तरी स्वतः तो दिल्लीस न गेल्यामुळें अकबराची मर्जी गेली. शेवटीं मालदेव सन १५७३त अपेष्टमध्यें मरण पावला. त्याचा मुलगा उदयसिंह ह्यानें

अकबराचें प्राबल्य जाणून सर्व झगडा सोडून मोगलांचें स्वामित्व कबूल केलें, आपली बहीण जोधाबाई अकबरास दिली, आणि बहुतेक मुलूख अकबरापासून परत मिळविला. अकबराच्या सरदारांत उदयसिंह हा विशेष नामांकित व शूर होता. त्याचा मुलगा सूरसिंह हाही अकबराच्या फौजेंत नोकरीवर होता.

उदयसिंह १५९५त मरण पावल्यावर त्याचा पुत्र सूरसिंह मंदोडच्या गादीवर बसला. त्यानें अकबराच्या हुकमानें धंधूका येथें गुजराथच्या सुलतानाचा पराजय केला. त्यानें जोधपूर शहरास पुष्कळ मजबुदी केली, आणि राज्यकारभार सुरळीत चालविला. मोगलांची नोकरी करण्यास लागल्यामुळें स्वतःच्या राज्यकारभारांत लक्ष देण्यास त्यास फुरसत मिळत नसे, म्हणून त्यास फार वाईट वाटे. जहांगीर बादशहास त्याची चांगली मदत होती. सूरसिंह १६२०त मरण पावल्यावर त्याचा पुत्र गजसिंह जोधपूरचा राजा झाला. त्याजकडे जहांगीरनें दक्षिणची सुभेदारी सांगितली. शहाजहानविरुद्ध त्यानें शहाजादा खुस्रू व बादशहा जहांगीर ह्यांस मदत केल्यामुळें शहाजहानची त्याजवर विशेष इतराजी झाली. गुजराथेंत लढत असतां सन १५३८त गजसिंह मारला गेला. गजसिंहाचा वडील मुलगा अमरसिंह ह्यास गादी मिळूं नये असें अगोदरच बापानें ठरविलें होतें. शहाजहानच्या दरबारांत असतां ह्या अमरसिंहाचा अंत झाला, तेव्हां दुसरा मुलगा जशवंतसिंह जोधपूरच्या गादीवर बसला. तो औरंगजेबाबरोबर दक्षिणेंत वीस वर्षें होता, (स. १६३८–१६५८). तेथें त्यानें मोठमोठे पराक्रम केले. पुढें शहाजहानच्या मुलांत तंटे लागले, तेव्हां जशवंतसिंहानें दाराचा पक्ष घेतला. पण त्याचा पराजय झाला. तरी जशवंतसिंहासारख्या पराक्रमी सरदारास दुखविणें औरंगजेबास हितकर वाटलें नाहीं. त्यास त्यानें जवळ बोलावून सन्मानानें वागविलें. पुनरपि तो दारा व सुजा यांस मिळाला; आणि पराभव पावून जोधपुरास गेला. परंतु औरंगजेबानें त्यास पुनः माफी करून आपला पुत्र मुअज्जम याजबरोबर दक्षिणेंत शिवाजीवर पाठविलें. तेथेंही त्याचा विश्वासघात दृष्टीस पडल्यावर त्यास औरंगजेबानें काबूलच्या सुभ्यावर पाठविलें, आणि इकडे त्याच्या सर्व कुटुंबाचा औरंगजेबानें अत्यंत दुष्टपणें घात केला; त्या दुःखानें शेवटीं काबुलांत हा शूर राजा मरण पावला, (स. १६७८).

जशवंतसिंहाचा सर्वच इतिहास फार मनोरम व उपयुक्त आहे, पण तो येथें न देतां औरंगजेबाचे प्रकरणीं दिला आहे. जशवंतसिंहाच्या मृत्यूनंतर त्याच्या बायकांमुलांची औरंगजेबानें वाताहत केल्यामुळें, सर्व रजपुतांच्या मनांत बादशहाविषयीं विलक्षण वैर उत्पन्न होऊन, निकराचें युद्ध झालें, त्यांत शेवटीं बादशहास माघार घ्यावी लागली.

जशवंतसिंहाचा बालपुत्र अजितसिंह जोधपूरचा राजा झाला. औरंगजेब मरण पावल्यावर त्यानें आपलें गेलेलें सर्व राज्य परत मिळविलें. त्रिवर्ग रजपूत राजांनीं मुसलमानांस रजपुतांच्या मुली देण्याचें बंद करून मोगलांविरुद्ध कट केला, त्यांत हा अजितसिंह सामील होता. बापाची जी वाताहत बादशहानें केली, तिचा भरपूर सूड घेऊन त्यानें बादशहाशीं अखेरपर्यंत वैर चालविलें; आणि आपलें स्वातंत्र्य चिरंतन करून, सन १७३१त दुष्ट पुत्राच्या हस्तें मारला गेला. हा पुत्र अभयसिंह होय. अभयसिंहाची कारकीर्द भाऊ बख्तसिंह ह्याजबरोबर लढण्यांत गेली. अभयसिंह दुष्ट, व्यसनी व विलासी होता. त्यानें कपटानें बराच मुलूख मिळविला. पण त्यायोगें रजपुतांत कलह माजले. तेव्हां त्याचा पुत्र रामसिंहानें गादीवर बसला. रामसिंह चुलता बख्तसिंह यास वाईट रीतीनें वागविल्यामुळें बख्तसिंहानें त्याचें राज्य घेतलें. बख्तसिंह हा राज्य करण्यास लायक होता, आणि बापास मारण्यांत त्याचें अंग नसतें तर जोधपूरच्या इतिहासांत त्याचें नांव फार पूज्य झालें असतें. तीन वर्षांनींच विषप्रयोगानें बख्तसिंह मरण पावला, ( स. १७५०–१७५३ ).

त्याचा पुत्र विजयसिंह गादीवर बसला. पण पूर्वी हद्दपार झालेल्या रामसिंहानें त्याजशीं लढून आपलें राज्य परत मिळविलें. ह्या दोघांच्या तंट्यांतच मराठ्यांचा जोधपुरांत शिरकाव झाला. त्याच्या राज्यांत जयाप्पा शिंद्याचा खून झाल्यामुळें सर्व मराठे चवताळून राज्यांत घुसले. रामसिंहास हरवून जोधपूरच्या राज्याची त्यांनीं वाट लाविली. रामसिंह जयपुरास सन १७७३त मरण पावला. तेव्हां पुनः विजयसिंहास मारवाडचें नामधारी स्वामित्व मिळालें.

विजयसिंहाची कारकीर्द धामधुमींत गेली. सर्व राज्य मराठ्यांच्या हातांत होतें. त्यानें हाताखालच्या प्रबळ झालेल्या सरदारांचा पाडाव केला, आणि मराठ्यांचा नाश करण्याकरितां जयपूरच्या प्रतापसिंहाबरोबर स्नेह जोडून महादजी शिंद्याशीं युद्ध सुरू केलें. आरंभीं थोडा

जय प्राप्त झाला, तरी शिंद्यानें अंतीं सर्व रजपुतांचा पाडाव करून अजमीर व दुसरे पुष्कळ प्रांत मिळविले; आणि सालीना साठ लक्ष खंडणी घेण्याचें ठरविलें. विजयसिंह १७९३त मरण पावला. त्याचा पुत्र भीमसिंह इतर भावांस ठार मारून गादीवर बसला. पण दहा वर्षे झगडून त्यानें आपलें राज्य घालविलें. सन १८०३त तो मरण पाव-ल्यानंतर त्याच्या भावाचा मुलगा मानसिंह गादीवर बसला, (स.१८०३). मराठ्यांच्या युद्धांत मानसिंहानें होळकरास मदत दिली; आणि तें युद्ध संपल्यावर अमीरखान पठाणानें जोधपूरच्या मुलखास पुष्कळ उपद्रव दिला उदेपूरची पुत्री कृष्णाकुमारी इची प्राप्ती करून घेण्याकरितां मानसिंहानें जयपूरच्या जगत्‌सिंहाबरोबर युद्ध सुरू केलें. ह्या युद्धामुळें अमीरखानासारख्यांचें रजपुतान्यांत चांगलेंच फावलें. सन १८१८त मानसिंहाचा मुलगा चतुर्सिंह ह्याजबरोबर इंग्रजांनीं तैनाती फौजेचा तह केला. पुढें चतुर्सिंह लवकरच मरण पावला. मानसिंहानें लवकरच राज्यकारभार हातीं घेऊन तह मोडिला, तेव्हां इंग्रज सरकाराशीं त्याच्या अनेक तक्रारी झाल्या. पुढें सन १८३९त इंग्रजांनीं जोधपूरच्या मुलखांत शिरून स्वस्थता केली. सन १८४३त राजा मानसिंह मरण पावला.

नंतर तख्तसिंह नामक एका दूरच्या वंशजास इंग्रजांनीं जोधपूरच्या गादीवर बसविलें. सन १८५७ सालच्या बंडांत ह्या राजाकडून इंग्रजांस चांगली मदत झाली. तरी त्यानें राज्यकारभार चांगल्या रीतीनें चाल-विला नाहीं. सन १८७३त तख्तसिंह स्वर्गवासी झाल्यावर त्याचा मुलगा जशवंतसिंह गादीवर बसला, तो स. १८९५त वारल्यावर, त्याचा मुलगा सरदारसिंह गादीवर बसला, तोच हल्लीं राज्य करीत आहे.

मारवाडच्या राज्याची वस्ती सुमारें तेवीस लाख असून, सालचें उत्पन्न अदमासें त्रेचाळीस लाख रुपये आहे.

**७. रजपुतांच्या इतिहासाचें समालोचन.**—रजपुतान्यांत लहान मोठीं पुष्कळ संस्थानें आहेत. त्यांत उदेपूर, जयपूर व जोधपूर हीं तीन ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचीं आहेत, म्हणून तेवढ्यांचाच त्रोटक इति-हास येथें दिला. थोड्या बहुत फरकानें सर्वांची स्थिति आज एकसारखीच झाली आहे, म्हणून ह्या एकुणिसाव्या शतकांतील रजपुतांच्या इतिहासांत

एक प्रकारचें शोचनीय मांद्य दृष्टीस पडतें. उदेपूरचें घराणें आज गरीबींत आहे, तरी तें फार प्राचीन व निष्कलंक आहे. इतिहासाचें शास्त्रीय अध्ययन करणारास ह्या घराण्यांत भरपूर साहित्य सांपडेल. राष्ट्राची उन्नति व अवनति कशी होते हें समजल्यानें जो बोध व्हावयाचा, तो एकट्या उदेपूरच्या इतिहासानें होण्यासारखा आहे. वरील हकीकती त्रोटक आहेत तरी पुढें त्यांतील उणेपणा अनेक ठिकाणीं भरून काढावा लागणार आहे. संगतवार गोष्टी डोळ्यांपुढें असल्या म्हणजे पुढील हकीकती चांगल्या समजतील, एवढ्याच करितां हा भाग स्वतंत्रतेनें दिला आहे.

रजपुतांत पराक्रमी राजे पुष्कळ झाले. एकट्या उदेपुरांतच सन १३०० पासून १८०० पर्यंत पांचशें वर्षांचा काळ गेला, तेवढ्या अवधींत नालायक राजा बहुधा कोणी निपजलाच नाहीं असें म्हटलें तरी चालेल. मात्र ही लायकीनालायकी रजपुतांच्याच दृष्टीनें ठरविली पाहिजे. जयपूरच्या राजांनीं गेल्या दोन शतकांत मिळविलेली कीर्ति इतकी उज्वल आहे, कीं ती कालासही पुसून टाकतां यावयाची नाहीं. जोधपुरांतही जसवंतसिंह व अजितसिंह ह्यांच्यासारखीं नररत्नें निपजलीं. ह्या सर्व राजांच्या मनांत प्रजेचें कल्याण करणें हाच मुख्य हेतु होता. उदेपूरच्या इतका सज्जन राज्यकर्त्यांचा लांबच्या लांब वंश दुसऱ्या कोठें सांपडेल कीं नाहीं ही शंका आहे. त्यांच्यावर शत्रूंनीं इतके आघात केले, कीं त्यांतून निभावल्याबद्दल त्यांची तारीफ केल्याशिवाय राहवत नाहीं. अलाउद्दीन, बाबर, अकबर, औरंगजेब वगैरे अनेक पराक्रमी पुरुषांनीं उदेपूरच्या राजपुरुषांपुढें अगदीं हात टेंकिले. सर्व राज्याचा नाश केलासें समजून ह्या पराक्रमी पुरुषांनां आपली पाठ फिरविली नाहीं, तोंच उदेपूरचें राज्य पूर्ववत् चालू आहे असें त्यांस दिसे. मुसलमानास हार जावयाचें नाहीं, व सत्य सोडावयाचें नाहीं, ह्या निर्धाराबद्दल त्यांस अनेक वेळां जोहार करावे लागले, राजधानीचीं शहरें बदलावीं लागलीं, आणि अनेक सकटें सहन करावीं लागलीं. सत्य सुटलें नाहीं, नीति सुटली नाहीं, सदाचरणाचा धोपट मार्ग सुटला नाहीं. अलाउद्दीन, तयमूरलंग, सय्यदलोदी वगैरेंच्या वावटळी जोरानें सभोंवार उठत असतां, चितोडच्या राण्यांनीं आपलें स्वातंत्र्य दुसऱ्यास दिलें नाहीं, आणि दुसऱ्याचें हरण केलें नाहीं, ही गोष्ट विशेष आहे.

रजपूत लोक विलक्षण हट्टी आहेत. क्षुल्लक मानपानार्थ ते वाटेल तो स्वार्थत्याग करितात. त्यांच्यांतील वरेच झगडे अशा मानपानांच्या कारणांवरून, किंवा स्त्रियांचें पातिव्रत्य व अब्रू रक्षण करण्याकरितां घडून आले आहेत. वीर, करुण, वगैरे रसांनीं परिप्लुत असे अनेक प्रकार त्यांच्यांत प्रत्यक्ष घडून आले आहेत.

वरील रजपूत घराण्यांच्या तोडीचीं मुसलमानांचीं घराणीं थोडींच आढळून येतात. कपट, विश्वासघात, क्रौर्य, हत्या, इत्यादि गोष्टींनीं मुसलमानांचे इतिहास परिपूर्ण आहेत. एक इसम गादीवर बसला कीं त्यानें आपल्या भावांस व इतरांस हालहाल करून ठार मारावें; तसेंच शेजारच्या राजाचा पडता काळ पाहून त्याजवर हात मारून आपला लाग साधून घ्यावा; हे प्रकार वारंवार घडत. रजपूत राजांमध्यें प्रसंगास सर्वांनीं एक होण्याजोगा मित्रभाव वसत होता. औरंगजेबाच्या जुलमास त्रासून पुनः मोगलांशीं सख्य करावयाचें नाहीं, असा त्रिवर्ग राजपुरुषांनीं निर्धार करून तो अखेरपर्यंत चालविला, हें प्रसिद्धच आहे. शत्रु कितीही बलाढ्य असो, आपण नीतीनें व नेटानें वागलें म्हणजे त्याच्या हातून आपलें कांहीं होत नाहीं, हें उदेपूर व अकबर ह्यांच्या संबंधावरून उघड होतें. अकबरानें होते तेवढे प्रयत्न केले, पण उदेपूरचे राणे त्यास वश झाले नाहींत.

मुसलमानांची खरी कर्तबगारी मोगल बादशाहींत दिसून येते. त्या भागास आतां सुरुवात करावयाची. पण त्यापूर्वी पांचशें वर्षांतील मुसलमानी अंमलाचें विहंगमदृष्टीनें विवेचन करणें जरूर आहे.

---

# प्रकरण एकोणिसावें.

## गतकालाचें पर्यालोचन.

### इ. स. १०००–१५००.

१. राज्यव्यवस्था व लोकस्थिति. २. दोनधर्मीलोकांचे एकमेकांवर परिणाम.
३. रजपुतांच्या पाडावाची मीमांसा.

(१) उत्पत्तीचा संघशक्तीला विरोध. (२) रजपूत बाण्याची बाधकता.
(३) उपाध्यायांचा राष्ट्रद्रोह. (४) आनुवंशिक वैरभाव.
(५) वेडगळ धर्मसमजुती. (६) युद्धकलेचें अज्ञान.
(७) प्रतिकूल सृष्टस्थिति. (८) वाटलेल्या हिंदूंचा उत्साह.
(९) मुसलमानांच्या परिस्थितीचा पेंच. (१०) 'लेन्पूल'नें केलेलें निदान.

४. स्वत्वरूपी भावनेचा अभाव. ५. आल्बेरूनीचें हिंदूंविषयीं मत.
६. ग्रंथसंपत्ति व हिंदूंची बौद्धिक सरशी. ७. मध्यकालीन इमारतींचें बांधकाम.
८. आशियायूरोपच्या तत्कालीन संस्कृतीची तुलना.

**१. राज्यव्यवस्था व लोकस्थिति.**—मुसलमान ग्रंथकारांनीं व अनेक प्रवाशांनीं गेल्या चारशें वर्षांतील हिंदुस्थानच्या अंतःस्थितीविषयीं बरीच माहिती लिहून ठेविली आहे. तिजवरून तत्कालीन स्थितीची कल्पना करितां येते.

सन १००१तील महंमुदाच्या पहिल्या स्वारीपासून स. १५२६त बाबरानें हिंदुस्थानांत मोगल बादशाहीची स्थापना केली, तेथपर्यंत एकंदर सव्वा-पांचशें वर्षांचा काल गेला. पण पहिलीं दोनशें वर्षें, म्हणजे महंमद घोरीनें रजपूत राज्यें जिंकिलीं तेथपर्यंत, मुसलमानांचा अंमल हिंदुस्थानांत होता असें म्हणतां येत नाहीं. सन ११९३त घोरीवंशाची स्थापना झाल्यापासून दिल्लीपदावर मुसलमान सुलतान कायम झाले. त्या वर्षा-पासून सन १५२६ तील पानिपतच्या लढाईपर्यंत ३३३ वर्षांपैकीं पहिल्या कांहीं वर्षेंपर्यंत मुसलमानी अंमलाचा विस्तार बराच संकुचित होता. अला-उद्दीन खिलजीपासून महंमद तुघ्लखपर्यंत मुसलमानी राज्याची

वृद्धि सामान्यत: सर्व हिंदुस्थानभर झाली. तथापि कृष्णेच्या दक्षिणेकडील प्रदेश ह्या काळांत बहुतेक हिंदूंच्याच ताब्यांत होता. महंमद तुघ्लखच्या वेळेपासून मुसलमानी राज्याचे अनेक विभाग झाले, त्यांची हकीकत मागें आलीच आहे.

आंकड्यांनीं ह्या काळाचें महत्त्व मापतां येण्याजोगें नाहीं. ३३३ वर्षे ही संख्या मोठी दिसते. पण युरोपांतल्याप्रमाणें राष्ट्रेतिहासांत नमूद करण्यासारख्या विशेष गोष्टी ह्या काळांत घडल्या नाहींत. हिंदु-मुसलमानांचे झगडे अव्याहत चालू होते. ह्या झगड्यांमध्येंच सर्व काळ निघून गेल्यामुळें दिल्लीच्या सुलतानांस जनहिताकडे लक्ष देण्याला फुरसत मिळाली नाहीं. किंवा अशा कृत्यास लागणारी योग्यताच बहुतेकांच्या अंगीं नव्हती. लाखों हिंदूंस मुसलमानांनीं आपल्या धर्मांत आणिलें. त्यांचीं देवालयें मोडून मूर्तींचा व अनेक नामांकित विद्यापीठांचा विध्वंस केला. मुसलमानांच्या जुलुमास न जुमानितां हिंदूंनीं आपले धर्माचार पूर्ववत्-किंबहुना ज्यास्तच निकरानें-पाळिले.

बराण म्हणून एक शहर होतें, त्यासच हल्लीं बुलंदशहर म्हणतात. त्याजवर स. १०१८त गज्नीच्या महंमुदानें स्वारी केली, त्या वेळीं तेथें हरदत्त नांवाचा राजा राज्य करीत होता. तो महंमुदास शरण गेला; आणि त्यानें आपल्या दहा हजार अनुयायांसह मुसलमानी धर्म स्वीकारिला, ( Vincent Smith ). अशा प्रकारें नाइलाज होऊन, जुलमानें, अगर जिजिया कर देण्यास ऐपत नसल्यामुळें, पुष्कळ हिंदु लोक मुसलमान होत असत. शेवटच्या कारणानें तर खालच्या वर्गांतील असंख्य लोक मुसलमान झाले. हिंदुस्थानांतील मुसलमानांची बरीचशी संख्या मूळच्या बाटलेल्या हिंदूंची आहे. कित्येक मोठमोठ्या लोकांचे मात्र उल्लेख ग्रंथांतरीं आहेत. सामान्य लोकांचा उल्लेख असणें शक्य नाहीं. सारांश, मुसलमानांच्या ह्या जबरदस्त तडाख्यांतून हिंदुलोक वांचले हेंच नवल.

मुसलमान राज्यकर्त्यांनीं हिंदूंचे कायदे मानिले नाहींत. न्यायाधीशाच्या कामांवर मुसलमान लोक नेमिलेले असल्यामुळें, त्यांस हिंदु कायदे समजत नसत; आणि समजले तरी त्यांप्रमाणें अंमलबजावणी करणें त्यांस अधर्म वाटे. म्हणून हिंदुधर्मशास्त्राचा उपयोग, फार तर चोरून मारून, मिळकतीचा वारसदार ठरविणें वगैरे प्रश्नांत, लोक आपसांत

करीत. हिंदूंमध्यें जातिभेद व त्यांचीं कर्तव्यें यांजबद्दल सक्त नियम असत. त्यांचें उल्लंघन मुसलमानांच्यानें होत नसे. दरबारच्या सर्व कामांत त्यांस हिंदूंची मदत अवश्य लागे, तरी मानाच्या व मोठाल्या अधिकाराच्या जागा हिंदूंस मिळत नसत. म्हणून राज्यकारभारांत हिंदूंचा हात बिलकुल नसे. रजपुतांचीं कित्येक राज्यें खेरीजकरून बाकीचीं पुरातन काळचीं सर्व हिंदु राज्यें मुसलमानांच्या ह्या रियासतींत लयास गेलीं, आणि जीं राहिलीं त्यांनीं मुसलमानांस खंडणी देऊन मांडलिकपणा पत्करिला. दक्षिणेंत विजयनगरचें राज्य भरभराटींत होतें, पण त्याचाही पुढें लवकरच अंत झाला. फिरोज तुघ्लख शिवाय करून इतरांनीं रयतेच्या कल्याणाचीं कोणतींही स्मरणीय कृत्यें केलीं नाहींत.

सरकारच्या उपयोगाकरितां घोड्याच्या व पायदळ टपालाची सोय केलेली असे. मुसलमानांनीं घातलेल्या पाठशाळा असत. पण त्यांत आरबी व फारसी ह्या भाषा मात्र शिकवीत. म्हणून सामान्य रयत लोकांस त्यांचा उपयोग होत नसे. शिवाय कित्येक धर्मपुस्तकांपलीकडे त्यांत कांहींच शिक्षण होत नसल्यामुळें, हिंदूंच्या प्रचंड ज्ञानभाण्डाराची त्यांच्यानें बरोबरी करवली नाहीं. पुष्कळ सुलतान विद्येचे आश्रयदाते असत असें लिहिलेलें आहे. ह्याचा अर्थ इतकाच, कीं सिरिया, आरबस्थान, इराण इत्यादि देशांतून अनेक पंडित आणवून त्यांस दिल्लीचे सुलतान आश्रय देत. पण अशा विद्वानांकडून देशोपयुक्त कांहीं कृत्य झाल्याचें दिसून येत नाहीं. तसा आश्रय हिंदु पंडितांस मिळाला नाहीं. राजाश्रय नसून हिंदूंनीं भाषेची केवढी कामगिरी केली हें निराळ्या कलमांत सांगितलें आहे. आश्रय असता तर ह्याहून प्रचंड उद्योग त्यांनीं केले असते. मुसलमान बादशहांनीं हिंदुशास्त्रांस मदत दिली असती, तर त्यांच्यांतूनच पाश्चात्य सुधारणेस पुरून उरणाऱ्या प्राच्य सुधारणेचा उद्भव होऊन, त्याचें श्रेय मुसलमानी राज्यकर्त्यांस मिळण्याचा संभव होता, असें अनेकांचें मत आहे. मध्ययुगांत पाश्चात्य राष्ट्रें अज्ञानसागरांत बुडालीं असतां, हिंदुस्थानांतील पूर्वीच्या अमदानींत लोकांस ज्ञानलाभासाठीं ह्या देशाच्या तोंडाकडे पाहवें लागे. पण हा मान ह्या देशास कायमचा मिळावा अशी व्यवस्था ठेवण्याची बुद्धि मुसलमान राज्यकर्त्यांस झाली नाहीं, आणि आमचें राष्ट्र दिवसेंदिवस अज्ञानपंकांत निमग्न होत गेलें. बगदाद, डमास्कस इत्यादि

ठिकाणीं आरबांनीं जशी ज्ञानज्योत पाजळिली, तशी तुर्कांनीं हिंदुस्थानांत पाजळिली नाहीं हें त्यांस मोठें लांच्छन आहे.

ह्या काळांत ' ऊर्दू ' भाषेची उत्पत्ति झाली. ' ऊर्दू ' हा शब्द मूळचा तुर्की भाषेंतला असून त्याचा अर्थ कँप म्हणजे छावणी असा आहे. ' होर्ड ' ( horde=फौजेचा जमाव ) म्हणून जो इंग्रजीभाषेंत शब्द आहे, तो ' ऊर्दू ' शब्दापासूनच निघालेला आहे. आरंभीं जे मुसलमान योद्धे स्वाऱ्या करीत या देशांत आले, त्यांस आपल्या छावणींत बसूनच दरबारचीं कामें करावीं लागत. त्यांची मूळची भाषा तुर्की अगर पर्शियन असून, हिंदुस्थानांत आल्यावर त्यांचे व्यवहार दिल्लीनजीकच्या पश्चिम-हिंदी भाषेंत घडूं लागले. ह्या कारणास्तव इराणी, तुर्की, आरबी वगैरे भाषांतील पुष्कळ शब्द व प्रयोग ह्यांचें हिंदीभाषेंत मिश्रण होऊन, मुसलमानांच्या छावणीची म्हणून एक नवीन भाषा बनली, तीच ऊर्दू होय. ( Vincent Smith ). राज्यकर्त्यांच्या भाषेवर हिंदूंनीं जो पगडा बसविला, त्याचा परिणाम ही भाषा आहे.

त्या वेळच्या हकीकतींवरून असें दिसून येतें, कीं मुसलमान राज्यकर्ते लोकांची भेट घेण्यास आळस करीत नसत. स्वतःच पुष्कळ कामकरीत आणि कुराणांतील नियमांनुसार वागून रयतेचा परामर्ष घेत. ते आपला स्वतःचा अधिकार प्रांतोप्रांतींच्या सुभेदारांस देत; आणि हे सुभेदार मर्जीस वाटल त्याप्रमाणें आपला अधिकार वापरीत. बादशाही लष्करास लोक पुरविण्याचें काम ह्या सुभेदारांचें असे. लष्करचे लोक कित्येक जन्मभर नोकरी करणारे असत आणि बाकीचे जहागीरदार लोकांनीं युद्धाचे प्रसंगीं पुरविण्याचा प्रघात असे. कुराण पढलेल्या काजींची न्याय देण्याच्या कामावर नेमणूक होत असे. त्यांच्या मदतीस दुसरे कामदार नेमिलेले असत. मौलवी किंवा मुल्ला या लोकांस पसंतीप्रमाणें न्याय-खात्यांत नोकरी मिळे. मुलकी कज्जे, सरकारच्या विरुद्ध केलेले गुन्हे व हिंदूंचे गुन्हे यांचा इनसाफ वर सांगितलेल्या कामदारांकडे सोंपविलेला असे, आणि दिवाणी व दुसरे गुन्हे काजीकडे पाठविण्यांत येत. हिंदु-धर्मास मात्र कोणत्याही प्रकारची मदत करण्यांत येत नसे मशिदी वगैरे मुसल्मानी देवस्थानांचे खर्च लोक खासगी रीतीनें संभाळीत.

एकंदरींत हिंदु लोकांस कोणी विचारीत नसे. त्यांजला जिझिया-कर द्यावा लागे खरा, पण खालच्या प्रतीच्या सरकारी नोकऱ्या त्यांस मिळत. मुलकी खात्यांत त्यांचा भरणा विशेष असे. व्यापार व उदीम मुख्यत्वेंकरून हिंदूंच्याच हातांत असे. आरंभींचे मुसलमान लोक धर्माचे बाबतींत विशेष कडवे होते, पण उत्तरोत्तर त्यांच्या अंगांतील कडवेपणा जिरत चालला, आणि हळूहळू हिंदूंचें मुसलमान होणें कमी होत गेलें.

मुसलमानी अमलाच्या ह्या चारशें वर्षांच्या काळांत लोकसौख्यवृद्धि-कारक राज्यकारभाराची उन्नति झाल्याचें दिसून येत नाहीं, ही शोचनीय गोष्ट आहे. प्राचीन हिंदु राज्यव्यवस्थेंत किंवा पश्चिमेकडे रोमन किंवा ग्रीक राष्ट्रांत राजनीतीचीं तत्त्वें दिवसेंदिवस दृढतर होत जाऊन लोकांस स्वातंत्र्य व सौख्य मिळत गेलें. पण हिंदुस्थानांत मुसलमानांच्या अमदानींत तसा कांहीं प्रकार घडला नाहीं. संग्रामपरंपरा, धामधूम व कडव्या लष्करी जोरावर एकामागून एक प्रदेश हस्तगत करणें, ह्यांपलीकडे इतिहासकारास क्षणभर आराम वाटणारी उच्चतर सुधारणेची गोष्ट नमूद करण्यासारखी मुसलमानांच्या ह्या अंमलात घडली नाहीं. सुलतानांचा अंमल अनियंत्रित असे. आपला खून किंवा बंड होऊन राज्य जाईल, ह्या भीतीनेंच तो अनियंत्रितपणा काय कमी होईल तेवढाच. राजवंशाची स्थापना किती क्षणभंगुर, आणि राज्यपदाची अदलाबदल किती सुलभ आहे, हें मात्र ह्या कालाच्या इतिहासावरून चांगलें व्यक्त होतें. राज्यकर्त्यांच्या स्वभावावर व लहरीवर प्रजेचें सुखदुःख सर्वस्वी अवलंबून असल्यामुळें, राज्यव्यवस्था ह्या क्षणीं सुखावह तर अन्यक्षणीं अत्यंत दुःसह होई. क्षणांत राज्यचक्र सर्व देशभर पसरे आणि क्षणांत त्याचा इतका संकोच होई कीं त्याचा मागमूस सांपडणेंही कठीण. एकंदरींत ह्या मुसलमानी राज्याला लष्करी जोराशिवाय चिरस्थायिकतेचें दुसरें बंधन नव्हतें. फार तर काय, चालू असलेल्या राज्यसत्तेस उतरती कळा लागून कालांतरानें ती विसकळीत होणें, म्हणजे मुख्य राज्य मोडून त्याचीं निरनिराळीं लहान स्वतंत्र राज्यें बनणें, नंतर एखादा पराक्रमी पुरुष पुढें येऊन त्यानें त्या सर्वांस जिंकून पुनः स्वतःची एकछत्री सत्ता स्थापन करणें, त्या सत्तेचाही पूर्ववत् लय व पुनरपि एकीकरण होणें, असा अव्याहत क्रम आज हिंदुस्थानच्या इतिहासांत कैक

वर्षे सारखा चाललेला आहे. पौराणिक कालापासून चालत आलेल्या हिंदु राजसत्तेस विसकळीत रूप प्राप्त होतांच, गज्नवी महंमूद, शहाबुद्दीन घोरी, व अलाउद्दीन खिलजी, अशा पराक्रमी वीरपुरुषांनीं एकछत्री मुसलमान बादशाहीची इमारत प्रथमतः उभी केली. महंमद तुघ्लखच्या वेडेपणानें ती इमारत लवकरच ढांसळली, आणि तिचे तुकडे देशभर स्वतंत्रपणें पसरले. काश्मीर, सिंध, जोनपूर, बंगाल, गुजराथ, माळवा, खानदेश, महराष्ट्र इत्यादि ठिकाणीं दिल्लीच्या सुलतानांचे सुभेदार धन्यांची सत्ता आपणच आपल्या हातीं बळकावून, स्वतंत्रतेनें राज्यकारभार करूं लागले. सुमारें दोनशें वर्षे अशाप्रकारें विसकळीत राज्यसत्ता चालल्यावर, अकबरासारख्या वीर्यशाली पुरुषानें ह्या स्वतंत्र सुभ्यांस पुनः स्वतःच्या एकछत्री अमलाखालीं आणिलें. पुनः दोनशें वर्षे लोटतात न लोटतात, तोंच ठिकठिकाणच्या मोगल सुभेदारांनीं आपल्या धन्याच्या सत्तेस धाब्यावर बसवून आपापल्या जागीं स्वतंत्रता धारण केली. त्यामुळेंच अयोध्या, बंगाल, अर्काट, हैदराबाद इत्यादि ठिकाणचे अंमलदार अव्वल इंग्रजींत स्वतंत्र असे फडकलेले दृष्टीस पडतात. फिरोज तुघ्लखनें शहाणपणा करून विभक्त झालेल्या कित्येक बादशाही अंमलदारांचें स्वातंत्र्य कबूल केलें.

पण सामान्यतः ह्या मानवसृष्टींत कोणतीच क्रान्ति एकदम घडून येत नाहीं. विशेषतः हिंदुस्थानांत तर मोठी क्रान्ति म्हणून क्वचित्च घडते असें म्हटलें तरी चालेल. हजारों वर्षे मुसलमानांचे हल्ले ह्या देशावर येत होते, तरी हिंदु लोकांच्या पूर्वजीवनक्रमांत फारसा फरक झाला नाहीं. हल्लीं सुद्धां इंग्रजी राज्याखालीं जुने प्रचार बरेच कायम आहेत. हिंदु व मुसलमान हीं दोन राष्ट्रें इतके दिवस एकेठिकाणीं राहून एकमेकांपासून इतकीं अलिप्त राहिल्याचें उत्कृष्ट उदाहरण भूतलावर हिंदुस्थानाशिवाय दुसरें नाहीं. इंग्लंडांत नार्मन व सॅक्सन ह्या दोघांचें संमिश्रण शंभर वर्षांच्या आंत झालें. म्हणून हिंदुस्थानच्या इतिहासांत मोठमोठ्या पराक्रमी पुरुषांच्या हालचालींपलीकडे अत्रस्थ लोकांच्या जीवनक्रमाचें वर्णन बहुधा येतच नाहीं. गज्नवी महंमूद, अला-उद्दीन खिलजी, बाबर, अकबर, औरंगजेब असल्या विख्यात मूर्तींनीं केलेल्या उलाढाली वर्णिल्या, कीं येथचा इतिहास संपला. अर्थात् हिंदुस्थानचा इतिहास राज्यकर्त्यांचा आहे, लोकांचा नव्हे. अशा दृष्टीनें पाहतां एकामागून एक अनेक राजवंश मुसलमानी अमलांत

२४-५-७-७९१-२०००

उदयास आले व लय पावले. त्यांच्याच भारूड कथांनीं हा मुसलमानांचा इतिहास भरलेला आहे. ह्याविषयीं गिबननें बांधिलेला सिद्धांत सर्वथैव खरा ठरतो. तो असा. ‘ आशियांतील राजवंशांचा इतिहास थोडक्यांत सांगावयाचा म्हणजे, एखाद्या वंशानें स्वपराक्रमानें महत्पदास चढणें, पुढें आपसांत कलह होऊन त्यास उतरती कळा लागणें, व शेवटीं त्याचा नाश होणें, अशा घडामोडींचें निरवधि वर्तुल होय. ’* हा क्रम हिंदुस्थानच्या इतिहासांत अव्याहत दिसून येत आहे.

तख्तनशीन झाल्याबरोबर कुटुंबांतील यच्चयावत् पुरुषांची व अनेक वेळां स्त्रियांची अत्यंत क्रूरतेनें दुर्दशा करणें,–त्यांस जन्मांध करून बंदिवासांत लोटणें,-शिरच्छेद करणें,–हा निंद्य प्रकार मुसलमानी रियासतीप्रमाणें इतरत्र फारसा आढळून येत नाहीं. अशा कृत्यांचा साहजिक परिणाम जो भयंकर सूड, तोही ह्या अमलांत भरपूर दृष्टीस पडतो. दैववशात् एखादा इसम राज्यपदापन्न नातेवाइकाच्या तावडींतून सुटला, तर त्याच्या पापाचें पुरेपूर प्रायश्चित्त तो त्यास देण्यास चुकत नाहीं. हाही आपली पाळी आली असें समजून नानातऱ्हेचीं अनुचित कृत्यें करितो. दरबारी लोक त्यास मदत करितात; आणि अशा राज्यक्रान्तीचा परिणाम राजधानी शहरापलीकडच्या लोकांस बहुधा भोंवत नाहीं.

दक्षिणेंत विजयनगरचें राज्य फार भरभराटींत होतें. त्या राज्यांत व्यापाराची घडामोड पुष्कळच चाले. गंगानदीवर बांबूचीं गलबतें चालत. ताडपत्रांचा उपयोग ग्रंथ लिहिण्याचे कामीं होई. तरी पुढें लवकरच कागदही इकडे तयार होऊं लागला. पोर्तुगीझ प्रवासी बार्बोझा, सोळाव्या शतकाच्या आरंभीं गुजराथेंत फिरत होता. तो सांगतो कीं गुजराथचे लोक एकंदरींत सुसंपन्न व विलासी होते. त्यांजला कपड्यालत्याची ददात नसून ऐषआराम उपभोगिण्याला पैसा उरत असे. तो प्रांत संपत्तिमान असल्यामुळें बाहेरच्या सर्व देशांतील लोक तेथें येऊन राहिले होते. बार्बोझा म्हणतो, ‘ गुजराथचा प्रदेश सुपीक आहे. घरें कौलारू व देखणीं

---

* ‘ Gibbon sums up the history of Asiatic dynasties as one unceasing round of valour, greatness, discord and decay.’ Lane-Poole.

आहेत. बागबगीचे व फळमळे विपुल आहेत. दिव येथें चणचणीचा उदीम चालतो. खंबायतेस सुती व रेशमी कापड अप्रतिम होतें; तेथचे कारागीर हस्तिदंत, चांदी, लांकूड ह्यांजवर नकशीचें उत्कृष्ट काम करितात. पश्चिम किनाऱ्यावर सुपारी, नारळ, मसाले व औषधी ह्यांचा व्यापार अतोनात आहे.'

हिंदुस्थानांत मुसलमान लोक शिरले, तेव्हांपासून त्यांनीं येथें अनेक वेळां लूट केलेली आहे. आरंभीं आरंभीं तर देवळें व शहरें लुटणें, मूर्ति फोडणें, घरें जाळणें व माणसांची कत्तल करणें, हे प्रकार बरेच वारंवार होत असत. गज्नवी महंमूद, महंमद घोरी, अलाउद्दीन खिलजी, तयमूरलंग, नादीरशहा, अहंमदशहा अब्दाली, इत्यादि पुरुषांनीं व त्यांच्या अनेक सरदारांनीं व प्रांतोप्रांतींच्या अमलदारांनीं अनेक शहरें व देवालयें लुटलीं आहेत. मुसलमान योध्यांची आरंभींची बरीच संपत्ति ह्या लुटीनें मिळविलेली होती ह्या लुटीपैकीं आरंभींचा बराच पैसा देशाबाहेर गेला, पण पुढें बादशहांनीं येथेंच कायमचें वास्तव्य केल्यामुळें लुटीचा पैसा देशांतच राहिला.

**२. दोनधर्मी लोकांचे एकमेकांवर परिणाम.**—मुसलमानांची ऐहिकसौख्यपरता व हिंदूंची पारमार्थिकसौख्यपरायणता–यांच्या कलहाचें पर्यवसान कसें झालें हें समजण्यास विशेष साधन नाहीं. बहुतेक हकीकती मुसलमानांनीं लिहिलेल्या अतएव एकतर्फी आहेत. परंतु हिंदु लोकांनीं आपलें स्वातंत्र्य परत मिळविण्यास केव्हां केव्हां खटपट केली, ही गोष्ट खुस्रूचें बंड व फिरोज तुघ्लखनें केलेला ब्राह्मणांचा छळ, अशा प्रकारांनीं चांगली व्यक्त होते. लष्करी जोरावर हिंदूंच्या भक्कम धर्माचा पाडाव करण्यास झटणें भ्रांतिमूलक होय, हें तत्त्व पांचशें वर्षांच्या अनुभवानें कां होईना, पण अकबरासारख्या सुजन राज्यकर्त्यास तेव्हांच कळून आलें होतें. म्हणूनच वैरभाव सोडून गोडीगुलाबाचा सौम्य मार्ग त्यानें स्वीकारिला, आणि हिंदूंशीं अनेक स्नेहसंबंध जोडिले. अंततः ह्या युक्तीचाही फारसा उपयोग झाला नाहीं हें इतिहासावरून स्पष्ट कळतें. तथापि कित्येक सद्गुणी राज्यकर्त्यांच्या चातुर्याचा व हिंदुधर्माच्या मुळाशीं असलेल्या उत्कृष्ट उदार तत्त्वांचा मात्र चांगला परिणाम झाला, तो असा. दोन धर्म भिन्न असले म्हणून ते एक ठिकाणीं सुखशांतीनें नांदू

शकणार नाहींत असें मानणें चुकीचें होय, हें हिंदुस्थानच्या इतिहासावरून जगाच्या निदर्शनास आलें आहे. दुसऱ्यांस उपसर्ग न देतां आपापले धर्म स्वतःच्या समजुतीप्रमाणें पाळण्यास तयार असल्यास, लोकांचे सामाजिक, राजकीय व इतर व्यवहार सुरळीत चालण्यास धर्माची हरकत येत नाहीं. दोन धर्मांच्या लोकांमध्यें नेहमींचे व्यवहार बिनतक्रार चालतात; हिंदु मुसलमानास जामीन राहतो; हिंदु शेतकरी मुसलमान जमीनदाराचें शेत लागवडीनें ठेवितो; अशा प्रकारचें ह्या दोन धर्मांचें सख्य हिंदुस्थानांत फार स्मरणीय झालें आहे.

मुसलमानांनीं हिंदुस्थान देश जिंकिला, तरी हिंदूंची उच्च संस्कृति त्यांच्यानें नष्ट करवली नाहीं. येथेंही रोमन व गाथ लोकांच्या अनुभवाची पुनरावृत्ति झाली. हिंदूंच्या बाह्य शक्तीवर मुसलमानांचा ताबा बसला, पण त्यांच्या सामाजिक, नैतिक व व्यावहारिक बाबतात हिंदूंनीच मुसलमानांस ग्रासून टाकिलें. व्यवहाराची प्रत्येक बाब हिंदूंच्या हातांत होती. हिंदूंच्या मदतीशिवाय मुसलमानांचें येथें क्षणभर चाललें नसतें. धर्मसंबंधांतही हिंदूंचा पगडा मुसलमानांवर बसला आहे, हें मागें पान १७ वर सांगितलेंच आहे. पण जेवणखाण, आहारविहार, सणवार, करमणुकी, पोशाख इत्यादि बाह्य बाबतींत, आणि बहुतेक बौद्धिक व नैतिक बाबतींत हिंदूंनीच मुसलमानांस जिंकिलें आहे, असें म्हणावें लागतें. आरबस्तानांत मुसलमानांचे जे मूळ धर्मसंस्कार होते, त्यांपैकीं येथें पाऊण हिस्सा नाहींसे होऊन, त्यांच्या बदलीं हिंदूंचे समारंभ त्यांनीं स्वीकारिले आहेत. साधूंची पूजा, मयतांचे उत्सव व श्राद्धें, इत्यादि अनेक बाबती हिंदूंपासून मुसलमानांनीं घेतल्या. मयतांचें स्मरण मागें जाग्रत ठेवणें, अथवा मयतांच्या आत्म्याच्या शांतीसाठीं प्रार्थना करणें ह्या गोष्टी कुराणांत मना केलेल्या आहेत. प्रत्येकानें ह्या आयुष्यांतच कायतो पुरुषार्थ साधून घ्यावा, मरणानंतर त्याची कांहींएक किंमत नाहीं; असें असतां, मेल्यानंतरही आपली योग्यता मोठी समजून ती कायम ठेवण्याचा प्रयत्न करणें निंद्य होय, असा पैगंबराचा उपदेश होता. प्रत्यक्ष महंमद पैगंबराची सुद्धां कबर नाहीं. त्याच्या उलट ताजमहालचें उदाहरण पहा. सारांश, ' हिंदुस्थानावर मुसलमानांनीं एकसारखे पांचशें वर्षे निकराचे हल्ले करून आर्यसुधारणा मागें हटविली आणि

तिजवर आपला पगडा बसविला. पण युरोपांत जो प्रकार मुसलमानांनीं केला, तो हिंदुस्थानांत होणें शक्य नव्हतें. मुसलमानांनीं हिंदुस्थान जिंकिलें, तथापि मुसलमानी छाप आर्य सुधारणेवर बसली नाहीं. उलट मुसलमानांनाच हिंदुलोकांनीं पुष्कळसें आपल्यासारखें बनविलें. युरोपियन सुधारणा मुसलमानांच्यापेक्षां हीन असल्यामुळें, युरोपांत जशी मुसलमानांनीं आपली छाप बसविली, तशी छाप हिंदुस्थानांत बसविणें शक्य नव्हतें.' ( Frazer's Literary History of India. )

'ह्या वेळीं सर्व हिंदुस्थानांत जिकडे तिकडे घोर रणें माजलीं होतीं. मुसलमान आले असें म्हटलें, कीं सर्वांच्या अंगावर थरारून कांटा उभा राही. जे शूर असत ते मुसलमानांस न जुमानतां त्यांजबरोबर संग्राम करण्यास प्रवृत्त होत. पण त्यांचा तरी नुसत्या शौर्यानें निभाव लागत नसे. मुसलमानांस न जुमानणारे थोडे असून त्यांना भिऊन लपून बसणारेच फार असत. त्यांमुळें अल्पसंख्य हिंदूंचा मुसलमानी सेनासागरापुढें निभाव लागत नसे. उलट अंगीं धैर्य असलेले लोक एकामागून एक रणांगणीं पडून मृत्युमुखीं जात. त्यामुळें दिवसेंदिवस क्षत्रियवर्गांतील शूर व कर्तबगार पुरुष नष्ट होत चालले. स्त्रिया शत्रुभयानें पातिव्रत्य रक्षणार्थ पटापट अग्निकाष्ठें भक्षण करण्याकरितां सतीची वाणें घेऊन बेधडक आपल्या पतींबरोबर चितांमध्यें प्रवेश करण्यास ज्यास्त ज्यास्त तत्पर होत चालल्या. मुलेंबाळें तरी सुरक्षित स्थळीं राहवीं, म्हणून त्यांस रानावनांत पोंचवून, आईबाप त्या अपत्यांचें वियोगजन्य दुःख सहन करण्यास निरढावून गेले. जवळ असलेली चीजवस्त व सोनेंनाणें, छपवून पुरून कोणाच्या दृष्टीस न पडे असें करावयाचें, आणि भांडीकुंडीं विहिरींत वगैरे टाकून ठेवावयाचीं, हा क्रम चालला. नेहमीं दर्शनीं गरिबी व हाय हाय दर्शविण्याचा प्रघात पडला, कीं आपल्याजवळ द्रव्य आहे असा कोणास वहीम सुद्धां येतां उपयोगी नाहीं. अशा लपवालपवीचा परिणाम एकंदर जनसमूहाच्या नीतिमत्तेवर कोणत्या प्रकारचा झाला असेल याची वाचकांस सहज कल्पना करितां येईल. जवळ पैसा, व कपडालत्ता असला तरी त्याचा उपभोग घेण्याची सर्वत्रांस चोरी वाटे. द्रव्याची मोजदाद करावयाची झाली तर ती अत्यंत गुप्तपणें, कोणाचे कानीं नाद जाणार नाहीं अशा रीतीनें, करावी लागे. सर्वच मन्वंतर फिरून जिकडे तिकडे

अस्वास्थ्य, क्षणभंगुरता, अस्थिरता मूर्तिमंत दिसूं लागल्या. चैन, विलास आराम व उपभोग जणुं काय हद्दपार होऊन, चिंता, हुरहुर, काळजी, उदासीनता व वैराग्य हीं मोठमोठ्या कुटुंबवत्सलगृहांमध्यें सुद्धां नांदूं लागलीं. व्यापारधंदा कोणास कांहीं सुचेनासा झाला. स्वकर्म व स्वधर्माचरण यांचा लोप झाला असें मुद्दाम दाखवावें लागे. रस्ते व वाटा बंद होऊन दळणवळण स्तब्ध झालें. शेतेंभातें ओसाड पडूं लागलीं. सुरक्षितता व संरक्षण नाहींसें होऊन पिकापाण्याची वाताहत झाली. कोणाचाच जोडा कोणाच्या पायीं राहीनासा झाला. शेतें केलीं तर त्यांतील पिकें जशींच्या तशीं मालकास मिळतील असा भरंवसा नव्हता. बरें, धान्य व दाणादुणा पिकविला तर त्याचा खप कसा करावा ही पंचाईत. दहादहा वीसवीस वर्षांचीं धान्यें घरांत पेवें भरून ठेवावीं लागलीं. ज्यास जसा संरक्षणाचा मार्ग सांपडे तसा तो करी. मोठमोठीं घरें बांधिलीं, तरी खिडक्या व बाऱ्या जितक्या कमी टेववतील तितक्या टेवावयाच्या; दारें व जिने आकुंचित व लहान करावयाचे; आणि घरांभोंवतीं व गांवाभोंवतीं मोठमोठ्या मजबूद गढ्या व कोट बांधून बंडखोरांचा उपद्रव कमी करावयाचा, ह्या तजविजीस जो तो लागला. आपला गांव सोडून दुसऱ्या गांवीं जावें लागलें तर तें महाप्रयासाचें व संकटाचें काम असे. एखादें लग्न शेजारच्या गांवीं जाणें म्हणजे मारामार पडे. यात्रा व जमाव स्वारशिबंदीशिवाय पार पडेनासे झाले. व्यापारी लोकांस आपला माल बाहेर नेणें झाल्यास ज्या ज्या राजांचे ताब्यांत चौक्या पहारे असतील त्यांचे परवाने घेऊन, आणि जकाती, दस्तुऱ्या वगैरेंचा अनेक प्रकारें खर्च करूनही, पुनः रस्यानें लुटालुटीचा उपद्रव व भीति असेच. सर्व विद्याकलांचा लोप होऊन ज्याला त्याला आपला जीव व अब्रू कशी बचावली जाईल ह्याची काळजी पडली. असा दारुण प्रसंग हिंदुस्थानांतील एका भागांत व एकाच ठिकाणीं नसून चोहोंकडे सर्वत्र एकसारखा प्राप्त झाला होता.'*

अशा विपत्काळीं एकमेकांस साह्य करण्यासाठीं लोकांत सहज ऐक्य उत्पन्न व्हावें तें झालें नाहीं. एवढी मात्र गोष्ट खरी, कीं मुसलमानांशीं आमचा परिचय विशेष होऊन ते व आम्ही एकत्र स्नेहभावानें

---

* लोकहितवादीकृत गुजराथचा इतिहास.

राहण्यास शिकलों. संघशक्तीनें सार्वजनिक कामें करण्याची बुद्धि जरी उत्पन्न झाली नाहीं, तरी व्यक्तिविषयक सांसारिक नैपुण्य लोकांत कांहीं कमी नव्हतें. प्रसंगाशीं झुंजण्यासाठीं प्रत्येक इसमास आपापली तयारी जय्यत ठेवावी लागे. घोड्यावर बसणें, शरीरकष्ट सोसणें, कसरत करून शरीर कंटक बनविणें, पळणें, पोहणें, शस्त्रास्त्रांचा उपयोग करणें ह्या व अशा प्रकारचे उद्योग बहुधा प्रत्येकास अवगत असावे लागत. बादशहापासून तों गरिबापर्यंत प्रत्येक इसम गंगेसारख्या नदींतील पुरांत उडी टाकून पोहून जाण्यास समर्थ असत. विद्येचा प्रकारही असाच होता, हें ह्या काळच्या वाङ्मयावरून कळून येईलच. अशा विपत्तींत लोकांनीं स्वसंरक्षणाचें काम आपलें आपण करण्याचें मनावर घेतलें पाहिजे असतें; पण राज्यकर्त्यांवर सर्वस्वी अवलंबून राहण्याची संवय झाल्यामुळें लोकसंस्था निर्माण झाल्या नाहींत.

हिंदुस्थानच्या लोकांस राजावर अवलंबून राहण्याची संवय होती, तथापि अला-उद्दीन खिलजी व फिरोझ तुघ्लख वगैरे एक दोन पुरुष खेरीजकरून बाकीच्या राज्यकर्त्यांच्या कृत्यांचा परिणाम हिंदुस्थानांत सामान्य जनसमूहावर विशेष घडला नाहीं. ह्याचें कारण हिंदुस्थानांतील प्रत्येक गांवांत आमच्या पूर्वजांनीं घालून दिलेली ग्रामसंस्था इतकी भक्कम बनली होती कीं, तिचीं मुळें खोदून नाहींशीं करण्यास बलाढ्य राज्यकर्त्यांचे शेकडों वर्षांचे अव्याहत परिश्रम अगदीं फुकट गेले. प्रत्येक गांव आपल्या हद्दींत एक लहानसें प्रजासत्ताक राज्य होतें. जो कोणी पुरुष नवीन स्वारी करून देश जिंकी त्याची बाधा फार तर राजधानीच्या शहरास पोंचे. तिच्या पलीकडे इतर लोकांचे व्यवहार अगदीं सुरळीत चालत. मुसलमानांचा जिझिया कर व सरकारचा सारा दिला, म्हणजे आपण सरकारचें कांहीं एक लागत नाहीं असें सर्व ग्रामस्थांस वाटे. आपलें संरक्षण करण्यास राजानें नेमिलल्या लष्कराची त्यांस जरूर पडत नसे. आपल्या फिर्यादींचा निकाल लावण्यास त्यांस राजानें नेमिलेला न्यायाधीश नको होता. मुसलमानांचा अंमल कितीही जुलमी झाला, तरी लोकांनीं आपल्या कामकाजांची व्यवस्था आपली आपण पाहणें ह्यांत जें एकप्रकारचें अमोल स्वातंत्र्य आहे, तें मुसलमानांस हिरावून घेतां आलें नाहीं. एखाद्या दुष्ट राजानें स्वारी केली असतां तो गांवचे गांव जाळून लूटून फस्त

करी, किंवा तेथच्या सर्व रहिवाशांस जुलमानें मुसलमान करी. त्यांच्या या जुलमाच्या आड येऊं पाहणाऱ्याचा मुसलमान लोक शिरच्छेद करीत; पण ह्याचा परिणाम फार तर तेवढीं गावें नष्ट होत, इतकाच. एकंदर देशाची त्यामुळें हानि होत नसे. ग्रामसंस्था हल्लीं नष्ट होत चालल्यामुळें दूरच्या खेड्यापाड्यांतील कोपऱ्यांत राहणाऱ्या माणसाचें सुद्धां सरकारी न्यायाधीशाशिवाय किंवा काळे डगल्याच्या पोलिसाशिवाय क्षणभर सुद्धां चालेनासें झालें आहे; किंवा पैपासून लाखापर्यंत केवढीही चोरी झाल्यास तिचा शोध लावण्याचें यत्किंचित् साधन लोकांच्या हातांत नाहीं. ग्रामसंस्थेच्या व्यवस्थेंत जनमताचा सर्व लोकांस केवढा तरी वचक वाटत असे.

आर्यांनीं प्रजेच्या चिरंतनकल्याणाच्या इच्छेनें ज्या कित्येक संस्था अमलांत आणिल्या, त्यांत ही ग्रामसंस्था महत्त्वाची समजली पाहिजे. रयतेच्या ताब्यांत जमिनी असून त्यांची ते लागवड करीत. पण अशा शेतकरी लोकांकरितां दुसऱ्या अनेक कारागीर लोकांच्या कामाची जरूर पडे. सुतार, लोहार, सोनार, कुंभार व असेच दुसरे धंदेवाले, यांच्या मदतीशिवाय शेतकऱ्यांच्या नेहमींच्या गरजा भागणें शक्य नाहीं. अशा सर्व लोकांची प्रत्येक गांवांत आर्यांनीं वसाहत केली. शेतांची कापणी झाल्यावर जें उत्पन्न होई, त्यांतील कांहीं अंश ज्याच्या त्याच्या उपयोगाच्या मानानें प्रत्येक कारागीरास दिला जाई. त्या उत्पन्नावर गांवातील सर्व लोकांचीं कामें त्या कारागीरास करावीं लागत. सर्वांची व्यवस्था पाहण्यासाठीं एक कामदार नेमिलेला असे, त्यालाही गांवच्या उत्पन्नाचा हिस्सा तोडून देण्यांत येई. सर्व लोकांचे अधिकार व कामें वंशपरंपरा चालत. गांवचा मुख्य, व इतर धंदेवाले वगैरे मंडळींची एक ‘ गांव पंचायत ’ नांवाची सभा असे. लोकांस जमीन विभागून देणें, त्यांच्या तक्रारींचा निकाल करणें, वसूल जमा करण्यास सरकारी कामदारांस मदत करणें, किंवा जमा झाल्यावर तो वसूल सरकारी तिजोरींत पाठविणें, वगैरे कामें ह्या पंचायतीकडून होत. लहानशा प्रजासत्ताक राज्याप्रमाणें प्रत्येक गांवची व्यवस्था असे. राज्यक्रान्तीचें वादळ परभारें वरच्यावर निघून जाई; तळाशीं बसलेल्या ह्या संस्थेस तिचा संपर्क पोंचत नसे सामाजिक व्यवहारांत ह्या पंचायतीचा उपयोग फार होई. सरकारचें देणें दिल्यावर प्रत्येक गांव आपापल्यापरी अगदीं स्वतंत्र असे. एखादा

जुलुमी राज्यकर्ता आला, म्हणजे तो फार तर जबरदस्त वसूल घेई. पण तो दिल्यावर त्यांचे स्वातंत्र्यास व्यत्यय येत नसे. राजा हिंदु किंवा मुसलमान कोणीही असला, तरी ग्रामसंस्थांच्या कामास हरकत पडत नसे. महंमद तुघ्लखसारखा क्रूर पुरुष गांवेंच्यागांवें ओसाड पाडी, पण एकदां त्याची वावटळ निघून गेली, म्हणजे लगेच सर्व पूर्ववत् शांत होई. मुसलमानांतील कित्येक जुलुमी राजे खेरीज करून इतरांनीं रयतेपासून ज्यास्त कर घेतले नाहींत. जिझिया कर मात्र बहुतेकांनीं वसूल केला. कित्येक जुलुमी राज्यकर्ते खेरीजकरून इतरांनीं रयतेवर कर वाढविले नाहींत. सरकार देणें धान्याच्या रूपानें न घेतां पैशानें वसूल करण्याची चाल मुसलमानांनीं घातली. हिंदु लोकांचा व्यापार बसला. असलेली सुधारणा नाहींशी करण्याची मेहनत घेऊन मुसलमानांनीं दुसरी सुधारणा सुरू करण्याचें श्रेय घेतलें नाहीं. वरिष्ठ सुधारणेचा पगडा हलक्या सुधारणेवर बसावयाचा, ह्या नियमास अनुसरून हिंदु लोकांच्या वरिष्ठ सुधारणेपुढें मुसलमानांच्या हीन सुधारणेस हार जावें लागलें. हिंदूंचाच संपर्क मुसलमानांस घडला.

हिंदूंच्या देवळांवर व मूर्तीवर तर मुसलमानांचा अतिशय कटाक्ष होता. पूर्वीचीं नामांकित मंदिरें पाडून तेथें मुसलमानांनीं आपल्या मशिदी उभ्या केल्या. बहुतेक ठिकाणच्या मुसलनांच्या इमारतींस देवालयांचेंच सामान वापरिलेलें असून, कित्येक ठिकाणीं तर मूळच्या इमारतींत फारच थोडा फरक केलेला आहे ( Imperial Gazette, II). अयोध्येस रामाच्या जन्मभूमीवर मशीद आहे, आणि मशिदीच्या आवारांतील एका कोपऱ्यांत रामजन्माचें लहानसें पत्र्याचें देऊळ आहे. हाच प्रकार बनारस, प्रयाग, जगन्नाथ, रामेश्वर इत्यादि ठिकाणीं झाला. सामान, जागा, मजूर, सर्व कांहीं तयार,–जुन्या इमारतींतील मूर्ति नाहींशा करून त्यांस नवीन स्वरूप दिलें, कीं झाली मशीद तयार. अशा आयत्या पायावर राज्य स्थापन करण्यास मुसलमानांस अवकाश लागला नाहीं.

तयमूरलंगाच्या स्वारीपासून दिल्लीचे नामधारी सुलतान; प्रसंगें पडेल तसें वागून वेळ मारून नेत होते. हिंदु राजे तरी प्रत्यक्ष अंगावर स्वारी आली म्हणजे तेवढ्या वेळेपुरते शरण जात; आणि सुलतानाची पाठ फिरल्याबरोबर पुनः स्वतंत्रपणें वागूं लागत. मुसलमानांची इतकी

हलक दशा होण्याचीं आणखीही पुष्कळ कारणें होतीं. हिंदुस्थानच्या उष्ण हवेंत व ऐषआरामांत राहून अलीकडचे तुर्क नामर्द बनले होते. त्यांचा नामर्दपणा पाहून हिंदुही त्यांस वेचकुल्या दाखवूं लागले. मुसलमानांचा अम्मल हिंदूंनीं आपखुशीनें असा कधींच पत्करिला नाहीं. संधि सांपडतांच ते विरुद्ध भाव दाखवीत. शिवाय अलीकडे बरेच दिवस मुसलमानांनीं हिंदु स्त्रियांचा स्वीकार केल्यामुळें, त्यांजपासून उत्पन्न झालेल्या नवीन पिढीच्या अंगांत बहुतांशीं हिंदु रक्तच खेळत होतें. त्याचप्रमाणें मुसलमानांनीं पुष्कळसे हिंदु लोक बाटवून आपल्या धर्मांत आणिले. त्यांचा मुसलमानांस थोडाबहुत उपयोग झाला, तरी बाटलेल्यांची संख्या जसजशी वाढत गेली, तसतसा हिंदूंचा मूळचा स्वभाव आपला प्रभाव दाखवूं लागला. त्यांचें लक्ष पुष्कळदां हिंदूंच्या बाजूस राहूं लागलें; आणि हिंदूंशींच त्यांचे व्यवहार घडूं लागल्यामुळें त्यांचें पहिलें मुसलमानी वारें लयास गेलें. ह्या कारणास्तव मध्य-आशियांतून नवीन अस्सल बाण्याची व जोराची मदत आल्याशिवाय हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांत एखाद्या नवीन वंशाची स्थापना कायम होणें शक्य नव्हतें. म्हणूनच पुढें लोदी घराण्याची समाप्ति होऊन बाबरास जय मिळत गेले. पंधराव्या शतकांतील सय्यद व लोदी घराण्यांच्या धडपडी व राज्य राखण्याचे प्रयत्न मूळच्या अस्सल तुर्की बाण्याचे नसून, ते सर्वथैव हिंदु धर्तीचे होते, हें सूक्ष्म विचारांतीं ध्यानीं येईल.

मुसलमानांनीं हिंदूंच्या धर्माचा उच्छेद केला, त्यांचीं देवळें पाडिलीं, मूर्ति फोडिल्या, संपत्ति हरण केली, इत्यादि अनेक दुष्ट प्रकार जरी घडून आले, तरी कित्येक बाबतींत त्या परकीय राज्यकर्त्यांचा जाच हिंदूंस झाला नाहीं. विशेषतः विद्याविषयक बाबतींत हिंदूंस पूर्ण स्वतंत्रता होती; आणि ठिकठिकाणीं हिंदूंचीं जीं विद्यापीठें होतीं, त्यांजकडून लोकशिक्षणाचें काम चांगल्या रीतीनें होत असे. संस्कृत व प्राकृत ग्रंथरचनेचा ओघ पूर्वीप्रमाणेंच या काळींही सुरू होता. कारागिरी, व उद्योगधंदे पूर्वीप्रमाणेंच लोकांच्या हातीं पूर्णपणें होते. उलट पक्षीं मुसलमानांच्या चैनी वाढत गेल्यामुळें कारागिरीस एक प्रकारचें उत्तेजनच मिळत गेलें. शेती व तत्संबंधीं सर्व धंदे हिंदूंचेच होते.

बंदरोबंदरीं चालणाऱ्या व्यापाराची नेआण हिंदूंच्याच हातीं होती, आणि गलबतांचा धंदाही पूर्वीप्रमाणें त्यांजकडेच होता. त्यांत मुसलमान राज्यकर्त्यांनीं स्वार्थदृष्टि कधीं ठेविली नाहीं. वसूल व फौज ह्या दोन बाबतींपलीकडे मुसलमानांकडून हिंदू प्रजेला प्रतिबंध झालेला दिसत नाहीं.

**३. रजपुतांच्या पाडावाची मीमांसा.**—रजपूत लोक हिंदुस्थानचे क्षत्रिय होत. त्यांच्याशींच मुसलमानांचे झगडे झाले. म्हणून रजपुतांचा पाडाव कोणत्या कारणांनीं झाला, हें समजून घेणें अगत्याचें आहे.

रजपुतांच्या उत्पत्तीसंबंधीं अनेक मतें प्रचलित आहेत. त्यांतील सत्यासत्य पाहण्याचें येथें प्रयोजन नाहीं. ' राजपुत्र ' या शब्दाचा अपभ्रंश होऊन ' रजपूत ' शब्द बनला आहे. महाभारतादि ग्रंथांत ' राजपुत्र ' नांवाचा एक स्वतंत्र वर्ग म्हणजे जात आहे, आणि त्याचा अर्थ सामान्यतः क्षत्रिय असा आहे. ' राजपुत्र ' किंवा ' राजन्य ' हे शब्द तेथें क्षत्रिय ह्या अर्थी पदोपदीं आढळतात. तेव्हां सामान्यतः हल्लींचे रजपूत पूर्वीच्या क्षत्रियांचेच वंशज होत असें मानण्यास हरकत नाहीं. रजपुतांचा मानी स्वभाव, त्यांचा उदात्त व शूर बाणा, आपल्या उच्च कुलाचा अभिमान इत्यादि गोष्टींवरूनही तेच आर्यावर्तांतले अस्सल क्षत्रिय होत असें म्हणावें लागतें.

**( १ ) संघशक्तीला उत्पत्तीचा विरोध.**—सर्व रजपूत वंशांचें मूळ एकच नव्हतें. आर्य लोक प्रथम ह्या देशांत आले, ते सर्व एकदांच आले असें नाहीं. निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या ठिकाणीं अनेक टोळ्या इकडे आल्या; आणि त्यांनीं ह्या देशांत निरनिराळ्या ठिकाणीं वास्तव्य केलें. पुढें त्या सर्वांस आर्य या नांवानें संबोधण्याचा प्रघात पडला. रा. ब. चिं. वि. वैद्य यांनीं ' एपिक इंडिया ' नांवाच्या आपल्या पुस्तकांत अशा दोन अडीचशें टोळ्यांचीं किंवा लोकांचीं नांवें दिलीं आहेत ह्या लोकांचें कालांतरानें झालेलें मिश्रण हल्लींच्या लोकसंख्येंत जरी दिसेनासें झालें, तरी त्यांच्या मूळच्या भेदांमुळें सर्व भारतवर्षाचा एक जीव होऊं शकला नाहीं. ह्यां बहुतेक लोकांचीं लहान लहान स्वतंत्र राज्यें होतीं. त्या सर्वांचा एक जीव होण्याचा योग आला नाहीं. त्यांतील एखादें राज्य पराक्रमी होऊन, त्याचें सार्वभौमत्व कांहीं काळ-

पर्यंत इतर राज्यांवर स्थापलें जाई; आणि तीं राज्येंही प्रसंग पडे त्याप्रमाणें दुसऱ्याचें मांडलीकत्व कबूल करीत. पण कालांतरानें त्या सार्वभौमाचा वंश सत्त्वहीन झाला, म्हणजे पुनरपि सर्व पहिल्याप्रमाणें विसकळीत होत; अगर दुसराच कोणीतरी सार्वभौम होई. पण लहान लहान राज्यें स्थापण्याकडे व आपला पृथग्भाव कायम राखण्याकडे सर्व आर्य कुळींचा मूळपासून ओढा होता. ज्या आर्यांनीं पश्चिमेकडे जाऊन ग्रीसदेशांत लहान लहान नगरराज्यें स्थापन केलीं, त्यांचेच जातभाई हिंदुस्थानांत आले असतां त्यांनीं सुद्धां आपापलीं स्वतंत्र राज्येंच येथें स्थापिलीं. एक मात्र मोठा फरक झाला तो हा, कीं ग्रीसदेशांत लोकसत्ताक राज्यपद्धति उत्पन्न झाली आणि आपल्या इकडे एकसत्ताक राज्य निर्माण झालें. ( ह्या मुद्याचा विचार रा. ब. वैद्य यांनीं आपल्या पुस्तकांत केला आहे. ) येथें आपणास इतकें समजणें पुरे आहे, कीं मूळपासूनच आपल्या देशांत अनेक राजवंश व नानाजातींचे लोक राहत आले आहेत. देशांत सुबत्ता असून, हवापाणी किंवा फुकट जागा मुबलक असल्यामुळें, निरनिराळ्या कुळींनीं एक व्हावें अशी स्फूर्ति उत्पन्न होण्याचें प्रयोजनच पडलें नाहीं. एकी होण्यास तरी कांहीं कारणांची जरूर आहेच. समान आपत्ति आली, किंवा समान अर्थ उत्पन्न झाला, कीं एकी होते. अशा प्रकारचा समान अर्थ किंवा समान आपत्ति मुसलमानांच्या स्वाऱ्यांपर्यंत ह्या देशांत निर्माण झाली नव्हती. शिवाय, हिंदुस्थानदेश एक आहे ही कल्पनाच मुळीं अगदीं अलीकडची आहे. हल्लींच्या एकछत्री अंमलानें ही कल्पना उत्पन्न झाली आहे. त्यापूर्वी हिंदुस्थान किंवा आर्यावर्त म्हणजे एक देश नसून, यूरोपसारखें एक खंड समजलें जात असे, हें प्राचीन ग्रंथांतील नानाविध देशांच्या व कुळींच्या नांवांवरून उघड होतें. तेव्हां एका खंडांतील सर्व राष्ट्रें आपत्काळीं एक झालीं नाहींत, ह्याचें नवल वाटावयास नको. अशा प्रकारच्या विवेचनांत आपली सामान्यतः चूक होत असते, ती अशी कीं सर्व हिंदुस्थान म्हणजे एक देश, सर्व रजपूत तितके एक जातीचे क्षत्रिय, आणि हिंदुस्थानचे यच्चयावत् सर्व लोक म्हणजे एक राष्ट्र, अशा गोष्टी अगोदर गृहीत धरून, मग अलेक्झांडरांशीं अगर गज्नवी महंमुदाशीं सामना करण्यास हे सर्व लोक एक कां झाले नाहींत, ह्याचा आपण तपास करूं लागतों.

वास्तविक प्रकार ह्याच्या उलट आहे. हिंदुस्थानांत आरंभापासून निरनिराळे लोक राहत आले असल्यामुळें, सर्व देशांत एक राष्ट्र असें नांदलेंच नाहीं. तसेंच आपलें स्वराज्य असावें, आणि आपल्या राष्ट्रानें स्वराज्याखालीं नांदावें, ही भावनाच ऐतिहासिक कालांत येथें वास करीत असलेली दिसून येत नाहीं. हिंदुस्थानांतील सर्व लोकांचें एक राष्ट्र होण्याची कल्पना अनेक कारणांच्या योगानें अलीकडे भासूं लागली आहे.

**( २ ) रजपूत बाण्याची बाधकता.**—पूर्वापर चालत आलेले रजपुतांचे शुद्ध संप्रदाय व वीर्यशालीपणाचे (Chivalry) संकेत अनेक वेळां त्यांसच बाधक झाले आहेत. असे संकेत लढणाऱ्या दोनही पक्षांनी पाळिले, तरच त्यांचा हेतु सफल होतो. नाहीं तर, एकट्यानेंच पाळिले असतां, ते पाळणारास बाधक होतात. उदाहरणार्थ, समरांगणीं पराभव झाला असतां, शत्रूस पाठ दाखवून परत यावयाचें नाहीं, अथवा शरण आलेल्या शत्रूचें पारिपत्य करावयाचें नाहीं, हे रजपुतांचे संकेत प्राचीन काळीं त्यांस कितीही सन्मान्य वाटले, तरी मुसलमानांशीं झगडण्यांत त्यांजपासून रजपुतांचें नुकसानच झालें आहे, हें जयपाळ, पृथ्वीराज इत्यादिकांच्या गोष्टींवरून व्यक्त होईल. एकवार पराभव झाला असतां गोंधळून न जातां व्यवस्थितपणें फौजेस परत आणून, पुनः युद्धाची सर्व तजवीज नीटपणें लावून, शत्रूस जिंकावें तें सोडून देऊन रजपुतांनीं आपल्या सन्मान्य संकेतांस अनुसरून अनेक प्रसंगीं बायकामुलांची कत्तल करून धारातीर्थी मोक्षपद मिळविलें आहे. पडता काळ आला असतां युक्तीनें स्वसंरक्षण करून कावेबाजपणानें शत्रूस जिंकण्याचा अवश्य मार्ग आरंभीं आरंभीं तरी रजपुतांनीं स्वीकारिला नाहीं. उदात्त व वीर्यशाली वर्तन, तशाच प्रकारचा सामनेवाला असेल तरच फायदेशीर होतें, नाहीं तर प्रसंग पडेल तशीच तजवीज ठेवणें भाग आहे. रणजितसिंगाचा एक सेनापति हरिसिंग ललवा अफगाणिस्तान जिंकण्यास गेला होता. शीख लोकांस गोमांस वर्ज्य असून डुकराचें मांस प्रिय असतें. अफगाणांनीं शिजविलेलें अन्न लुटून आणून त्याजवर हरिसिंगाची फौज आपला निर्वाह करीत असे. शीख लोक गोमांस खात नाहींत असें समजल्याबरोबर, अफगाणांनीं पुष्कळ गाई मारून त्यांचें मांस शिजवून तयार ठेविलें. पुढें तें लुटण्यास शीख लोक आले,

तेव्हां त्यांस कळलें, कीं हें गोमांस आहे. त्याबरोबर हरिसिंगानें एक डुकराचें हाड त्या मांसान्नांत घालून त्यानें तें सर्व गोमांस खूब ढवळिलें, आणि "वाः गुरुजीका खालसा, वाः गुरुजीका फत्ते" असा आपला मंत्र म्हणून, ' हें डुकराचें मांस आहे, खुशाल खा," असें त्यानें आपल्या शिपायांस सांगितलें. सारांश, जशास तसें वर्तन ठेवल्याशिवाय अशा कामीं निभावणूक नसते.

( ३ ) **उपाध्यायांचा राष्ट्रद्रोह.**—मुसलमानांनीं येथील लोक बाटविण्याचा जो सपाटा चालविला, त्याचा परिणाम हिंदूंच्या खालच्या जातींवर विशेष घडला. वरच्या जातींतले लोक फारसे बाटले नाहींत. परंतु जे खालच्या जातींचे लोक हजारों वर्षे वरच्यांचें दास्य करून एक प्रकारच्या गुलामगिरींत खितपत पडलेले होते, त्यांस मुसलमानी धर्म स्वीकारिल्यामुळें, आपल्या स्थितींत एकदम मोठा फरक झालेला दिसून आला. त्यांची परदास्यांतून एकदम सुटका होऊन मुसलमानराज्यकर्त्यांचे ते बरोबरीच्या नात्याचे जातभाई बनले. त्यांस ऐहिक संपत्ति प्राप्त झाली. हजारों वर्षांचें त्यांचें नष्टचर्य संपल्यासारखें झालें. त्यांचा नांवलौकिक व मानमरातब कल्पनातीत वाढला. एका वर्गानें दुसऱ्याला गुलामाप्रमाणें वागविल्यामुळें राष्ट्रास वरच्यासारखे अपाय घडल्याशिवाय राहत नाहींत. इराणदेश मुसलमानांच्या ताब्यांत सहज गेला, त्याचें कारण तरी इतिहासकारांच्या मतें, असेंच झालें. तेथें उपाध्याय वर्गाचें माहात्म्य अतिशय वाढून, खालचे सर्व लोक दास बनलेले होते. परमेश्वरी कृपेच्या व ऐहिक सुखोपभोगाच्या सर्व किल्ल्या ह्या उपाध्यायांच्या हातांत असून, इतर लोकांच्या हातांत काडीमात्र सत्ता नव्हती. अशा स्थितींत परचक्र आल्याबरोबर, ह्या उपाध्यायवर्गानें खालच्या लोकांस नशिबाच्या हवाली करून आपण पोबारा केला. त्या लोकांस मदत करून सर्वांनीं मिळून देशसंरक्षण करण्याचा विचार उपाध्यायांस शिवला सुद्धां नाहीं. येणेप्रमाणें दीन व निराश्रित झालेले कनिष्ठवर्गाचे सर्व लोक अनायासें मुसलमानांच्या तावडींत सांपडले; आणि स्वदेश किंवा स्वधर्म ह्यांचें संरक्षण करण्याचा कांहींच उपाय हातीं न राहिल्यामुळें, इराणी लोकांनीं मुसलमानी धर्म स्वीकारून आपला फायदा करून घेतला. हाच प्रकार थोडाबहुत हिंदुस्थानासही लागू पडतो. उपाध्याय व सुशिक्षितवर्ग यांजवर

राष्ट्रसंरक्षणाची जबाबदारी केवढी आहे हें ह्यावरून कळून येईल. शिवाजीनें ह्या गोष्टी ध्यानांत ठेवून काम सुरू केलें, आणि त्यावेळच्या लोकनायकांनीं धर्माची आडकाठी मनांत न आणितां प्रसंग पडेल तशी वागणूक सुरू केली, म्हणूनच त्यांस यश आलें.

( ४ ) आनुवंशिक वैरभाव.—रजपुतांचा समाज कधींही एक झालेला नसून, त्यांच्यांतील निरनिराळ्या कुळींमध्यें मानपानासंबंधानें, नेहेमीं वैरभाव असे. लग्नाच्या किंवा इतर मानापमानाच्या क्षुल्लक सबबीवरून सुद्धां त्यांच्यांत पिढ्यानुपिढ्या युद्धें चालत; आणि अर्थार्थी कांहीं एक प्राप्ति नसतां, ते सर्वस्वाचें नुकसान करून घेत. आनुवंशिक वैर कायमचें पुढें चालविण्यांत त्यांस अभिमान वाटे. धर्माच्या नांवानें सुद्धां ते कधीं एक झाले नाहींत. पृथ्वीराज चव्हाणासारखे कित्येक पुढारी कांहीं दिवस मुसलमानांशीं टक्कर देऊं शकले, पण त्याला सुद्धां रजपूतच शत्रु झाले.

( ५ ) वेडगळ धर्मसमजुती.—धर्माच्या नांवाखालीं अनेक वेडगळ समजुती त्यांच्या ठिकाणीं दृढ झालेल्या होत्या. शकुन किंवा प्रश्न पाहिल्यावांचून त्यांचें पाऊल पडत नसे. घुबड ओरडलें, उल्कापात, किंवा दुसरे अपशकुन झाले, म्हणजे त्यांचें धैर्य खचून जाई, आणि हातीं धरलेला उद्योग ते बेधडक सोडून देत. ह्याचीं उदाहरणें पदोपदीं आढळतील. मुसलमानांचा प्रकार ह्याहून भिन्न होता. कोणतीही अडचण आली, तरी अल्लाचें नांव घेऊन ते लढाईंत घुसत आणि त्यांस हटकून जय मिळे.

( ६ ) युद्धकलेचें अज्ञान.—त्या वेळच्या मानानें रजपुतांचें युद्धकलेचें ज्ञान परिपूर्ण नसून, त्यांनीं नवीन युक्त्या किंवा नवीन पद्धति स्वीकारल्या नाहींत. ते जुन्यांचाच आश्रय धरून राहिले. शस्त्रास्त्रांच्या व युद्धकौशल्याच्या बाबतींत ते मुसलमानांहून फार मागें होते. युक्तीचा किंवा काव्याचा ते आश्रय करीत नसत. युद्धाच्या वेळीं ऐनप्रसंगीं ते आळशी राहत. हेर पाठवून शत्रूंच्या हालचालीची बातमी आणून त्यांजवर नजर ठेवणें, रात्रीचे छापे घालणें, हुलकावणी दाखवून शत्रूस पेंचांत आणणें, असल्या गोष्टींचा त्यांनीं अवलंब केला नाहीं. तसेंच अनेक बारीक बाबतींची तज़वीज

आगाऊ लावून ठेवणें जरूर असतें. आयत्या वेळीं विपरीत प्रकार झाल्यास त्याच्या प्रतिकाराचा विचार आगाऊ ठरवून ठेवावा लागतो. हें काम हिंदूंनीं केल्याचें दिसत नाहीं. त्यांच्या फौजांत सर्वप्रकारचा गोंधळ व अव्यवस्था असे. गज्नवी महंमूद, महंमद घोरी, अलाउद्दीन खिलजी, तयमूरलंग, बाबर, हे सर्व कसलेले योद्धे असून, तत्कालीन युद्धकलेंत पूर्णपणें वाकब होते. त्यांच्या तोडीचा एकही पुरुष हिंदूंच्या बाजूस दिसून आला नाहीं. रजपुतांचें युद्धकलेचें ज्ञान हजारों वर्षांचें जीर्ण झालेलें होतें. आपसांतल्या युद्धांत त्यांस त्या ज्ञानाचा कितीही उपयोग होत असला, तरी परकीयांशीं त्यांचा सामना झाल्याबरोबर ते फिके पडले. युद्धकलेचा तरी वारंवार अनुभव पाहिजे. बाह्य जगाशीं वरचेवर युद्धप्रसंग येऊन राष्ट्र कसत गेलें पाहिजे. तसे प्रसंग हिंदुलोकांस पूर्वी फार दिवस आले नसल्यानें, मुसलमानांशीं त्यांची एकदम गांठ पडली, तेव्हां त्यांचा निभाव लागला नाहीं.

युद्धकलेसंबंधानें आणखी दुसरा एक मुद्दा असा आहे, कीं रजपुतांनीं केवळ स्वसंरक्षणापुरताच विचार पाहिला, आपण होऊन शत्रूंवर स्वाऱ्या करून त्यांस त्यांच्या मुलखांत जेरीस आणण्याचा प्रयत्नच कोणी केला नाहीं. संरक्षणात्मक व अभिघातात्मक अशीं युद्धाचीं दोन अंगें आहेत. एकदां युद्ध सुरू झाल्यावर जरुरीप्रमाणें ह्या दोनही अंगांचा अवलंब करावा लागतो. शत्रूंच्या मूळ ठिकाणावर प्रहार केल्याशिवाय त्याचा निःपात होत नाहीं. गज्नवी महंमूद किंवा महंमद घोरी ज्याप्रमाणें हिंदुस्थानावर स्वाऱ्या करीत होते, त्याचप्रमाणें, जयपाळ किंवा पृथ्वीराज ह्यांनीं अफगाणिस्तानावर स्वाऱ्या केल्या पाहिजे होत्या. त्यांनीं पुष्कळदां मोठमोठे जमाव करून मुसलमानांशीं टक्कर मारिली, पण किल्ल्यांचा आश्रय करून ते शत्रूंच्या हल्ल्यांची वाट पाहात स्वस्थ बसत. अशा पद्धतीनें मुसलमानांचें नुकसान होणारें नव्हतें. त्यांचा पराभव झाला, तरी डोंगरांपलीकडील त्यांचें स्वतःचें राज्य सुरक्षित असे. हिंदुस्थानांत इंग्रजांनीं आपली राज्यस्थापना ज्या पद्धतीवर केली, तिचें उदाहरण प्रस्तुत विवेचन करितांना ध्यानांत ठेवण्याजोगें आहे.

**( ७ ) प्रतिकूल सृष्टस्थिति.**—देशस्थितीच्या मानानें रजपूत लोक मुसल्मानांहून हीन होते. थंड व पहाडी प्रदेशांतले लोक मैदानांतील

गरम हवेंतल्या लोकांपेंक्षां चपळ, कणखर व जोरदार असावयाचे. तोच प्रकार रजपुतांचा व मुसलमानांचा झाला. ह्याच मुसलमानांस पुढें हिंदुस्थानांतील मैदानी हवा लागून चारदोनशें वर्षांनीं ते दक्षिणेंतील डोंगराळ मराठ्यांपुढें टेंकीस आले, हें महशूर आहेच.

(८) बाटलेल्या हिंदूंचा विशेष उत्साह.—हिंदुस्थानांतले बरेचसे मुसलमान मूळचे हिंदु असून पाठीमागून बाटून मुसलमान झालेले आहेत. अफगाण अंमलाच्या दोनतीनशें वर्षांतच कायते बरेचसे मुसलमान बाहेरून येथें आले, ते बहुतेक तुर्क पठाण होते. त्यांजबरोबर बायका तर फारशा आल्याच नाहींत. त्यांजला बहुतेक बायका आपल्या देशांतूनच मिळाल्या. त्यांजपासून जी संतति झाली, तिचा आमच्या धर्मानें अव्हेर केल्यामुळें, तिनें आयतीच मुसलमानांत भर पडली. ह्यांशिवाय आरंभीं बरेचसे लोक मुसलमानांनीं जुलूम करून बाटविले. हे बाटलेले मुसलमान, अस्सल मुसलमानांपेक्षां हिंदुस्थानास ज्यास्त जाचक झाले. मग ते जुलमानें बाटलेले असोत, वा आपखुशीनें बाटलेले असोत. एकदां परधर्मांत गेल्यावर पूर्वधर्माचा पाडाव करण्यास लोकांस विशेष स्फुरण येत असतें. त्यांस आमच्या लोकांचीं व्यंगें व राहणी सर्व ठाऊक असल्यामुळें, त्या माहितीचा उपयोग त्यांनीं मुसलमानांस करून दिला. देवालयांचा नाश करून तेथील संपत्तीचा अपहार करण्याचे कामीं मुसलमानांस ह्या बाटलेल्या हिंदूंचाच विशेष उपयोग झाला आहे. कोणती युक्ति केली असतां लढाईत हिंदूंचा पराभव होईल, हें मुसलमानांस बाटलेल्या हिंदूंकडून कळे. लढाई चालू असतां मध्यें गाई आणून उभ्या करणें, गाईचें रक्तमांस टाकून हिंदूंच्या विहिरी बाटविणें, इत्यादि युक्त्या मुसलमानांस ह्या हिंदूंकडून कळत. परधर्मी लोकांस शुद्ध करून परत आपल्या धर्मांत आणण्याची योजना हिंदुधर्मानें स्वीकारिली नाहीं, म्हणून देशाचें केवढें नुकसान झालें आहे, हें ह्यावरून स्पष्ट कळून येतें.

मुसलमानांच्या संख्येंत हिंदुधर्मांतून बाटलेल्या लोकांचा भरणा जसजसा ज्यास्त झाला, तसतसें त्यांच्या अंगचें तीव्र पाणी पुढें कमी होत गेलें. हा प्रकार जरी खरा आहे, तरी आरंभीं आरंभीं मुसलमानांच्या राज्यवृद्धीचें येथील बरेंचसें काम ह्या बाटलेल्या लोकांकडूनच झालेलें

२५-७-७-७९१-२०००

आहे. मुसलमानांस येथें भराभर जय मिळत गेलेले पाहून येथच्या पुष्कळ कर्तृत्ववान लोकांस असें वाटूं लागलें, कीं मुसलमानी धर्मांतच कांहीं-तरी जादू भरलेली आहे. आपला हिंदुधर्म हीन असल्यामुळें, त्यांतील लोकांच्या हातून पराक्रम होत नाहीं, अशी समजूत झालेले पुष्कळ लोक होते; आणि तदनुसार पुष्कळांनीं धर्मत्याग केलेला आहे. बंगा-लचा राजा जितमल्ल (पृ. ३०६) कोलिकोटचा सामुरी, केरलदेशचा राजा, सिंधचे सुमेरवंशी रजपूत जाम, वराणचा राजा हरदत्त व त्याचे दहा हजार अनुयायी (पृ.३६५) इत्यादिकांनीं आपण होऊन मुसलमानी धर्म स्वीकारिल्याचीं उदाहरणें आहेत. काश्मिरांतील सेनदेवाच्या राणीनें, सर्व प्रयत्न निष्फळ झाल्यावर, तेथील सुलतान शम्सुद्दीन ह्याजबरोबर लग्न लाविलें. ह्या गोष्टी प्रसंगोपात्त झाल्या. शिवाय ह्या दोन समाजांचें एकमेकांशीं जसजसें संघट्टन वाढत गेलें, तसतशी एकमेकांची एकमेकांस माहिती होऊन उभयतांतील सोयीरगती वाढत गेल्या. अर्थात् अशा रीतीनें मुसलमानांची संख्या वृद्धि पावली. त्या वेळच्या ह्या सामा-जिक व्यवहारांची माहिती उपलब्ध होणें शक्य नाहीं. तथापि बाटलेल्या गृहस्थांचीं कित्येक ठळक ठळक नांवें प्रसिद्ध आहेत, त्यांवरून धर्मांतर केल्याबरोबर हिंदूंच्या हातूनही मुसलमानांच्यासारखे, किंबहुना, ज्यास्तच पराक्रम घडून आल्याचें दिसून येतें.

मलीक काफूर व खुस्रू हे दोघेही मूळचे हिंदु असून मुसलमान झाले होते. अला-उद्दीनच्या राज्यवृद्धीचें अर्धें अधिक काम एकट्या मलीक काफूरनें केलेलें आहे. खुस्रूचे घाट काय होते याचें विवेचन वर आलेंच आहे. (पृ.१४८, व कलम १ पृ.२१६) लोदी घराण्यांतील सुलतान सिकंदर, अहंमदनगरची निजामशाही स्थापन करणारा निजामुल्मुल्क् बहिरी, गुजराथचें मुसलमानी राज्य स्थापन करणारा मुज्फरखान, इमादशाहीचा संस्थापक फत्ते-उल्ला, फिरोजशहाचा वजीर मक्बुलखान, जहांगीरचा सेनापति महाबत-खान इत्यादि अनेक पराक्रमी पुरुष मूळचे हिंदु असून बाटून मुसलमान झालेले होते. त्यांस हिंदूंच्या स्वभावाची खांचखोंच पूर्णपणें ठाऊक असल्यामुळें हिंदूंचा पाडाव करण्याचें काम त्यांस सहज करितां आलें; आणि नवीन स्वीकारिलेल्या धर्मानें त्यांच्या अंगीं एक प्रकारचा विशेष चेव उत्पन्न झाला. हीच मंडळी हिंदुधर्मांत असतां पराक्रमशून्य कां, आणि

धर्मांतर केल्याबरोबर त्यांच्या अंगीं कोणती नवीन शक्ति उत्पन्न झाली, ह्याचा विचार प्रत्येकानें शांतपणानें आपल्या मनाशीं अवश्य केला पाहिजे

ग्यासुद्दीन* व फिरोज तुघ्लख, जहांगीर व शहाजहान बादशहा, विजापूरचा दुसरा सुलतान इस्मईल आदिलशहा इत्यादि पुरुष हिंदु स्त्रियांच्या पोटीं जन्मलेले असून, त्या सर्वांच्या हातून लोकोत्तर कृत्यें घडलेलीं आहेत. प्रसंग आल्याशिवाय अंगचा पराक्रम दिसून येत नाहीं, हें म्हणणें कितपत खरें, तसेंच पराक्रमास धर्माचें पाठबळ कितपत पाहिजे, ह्या प्रश्नांचा विचार ज्याचा त्यानें करावा.

**(९) मुसलमानांच्या परिस्थितीचा पेंच.**—मुसलमान येथें परक्य देशांत येऊन पेंचांत सांपडल्यासारखे होते. सभोंवारच्या परधर्मी प्रचंड लोकसागरांतून त्यांस तरून जावयाचें होतें. मारावें किंवा मरावें ह्याशिवाय त्यांस अन्यगति नव्हती. जिवावर उदार होऊन चवताळून आलेले दहा इसम शांतवृत्तीच्या शंभर दोनशें इसमांस भारी होतात, हा नेहमींचा व्यवहारांतला अनुभव येथेंही थोडाबहुत लागू पडतो. म्हणून मुसलमानांच्या अंगचा जोर हिंदूंच्या अंगीं कधींच उत्पन्न झाला नाहीं. परंतु देवळें फोडिलीं, बायका पळवून नेल्या, घरेंदारें लुटलीं, फार तर काय, सरकारचे कामदार तोंडांत थुंकूं लागले तर आ करण्याची पाळी आली, तरी हिंदूंच्या अंगीं चेव आला नाहीं हें मात्र आश्चर्य आहे.

ह्या तुर्की अंमलांत अनेक राजवंश झाले. एक वंश जाऊन दुसरा स्थापन होण्याच्या वेळेस अतिशय अंदाधुंदी व अव्यवस्था चालू असे. मोगल बादशाही स्थापन होण्यापूर्वीच्या तीनशें वर्षांत दहा पांच प्रसंग तर असे आले होते, कीं त्यांत हिंदूंना आपलीं राज्यें सहज परत घेतां आलीं असतीं. तुघ्लखांच्या वेळेपासून तर अशीं अनेक राज्यें स्वतंत्र झालीं सुद्धां. पण तीं मुसलमानांचीं झालीं, हिंदूंचीं झालीं नाहींत. बंगाल, माळवा, जोनपूर, महाराष्ट्र इत्यादि ठिकाणीं जर मुसलमानांना स्वतंत्र राज्यें स्थापितां आलीं, तर हिंदूंनांही तशीं राज्यें स्थापन करण्यास विलंब लागला नसता. तयमूरलंग निघून गेल्यावर शंभर वर्षें सर्व देश मोकळा होता. एवढ्या अवधीचा हिंदूंस उपयोग करून घेतां आला नाहीं,

* तुघ्लख घराण्याचा संस्थापक ग्यासुद्दीन हा गुलाम-सुलतान बल्बन ह्याचा, जाठ स्त्रीच्या पोटीं जन्मलेला मुलगा होता. (Vincent Smith).

यावरून वरील सर्व कारणांपेक्षांही अत्यंत भयंकर असा कांहीं तरी विपरीत प्रकार हिंदूंच्या समाजांत अगदीं मुळाशी माजून राहिला होता, असें म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं. ह्याची थोडीबहुत मीमांसा खालील लेन्पूलच्या म्हणण्यांत दिसून येईल.

(१०) **'लेन्पूल'नें केलेलें निदान.**—अल्पसंख्य मुसलमानांना हिंदुस्थानांत थारा कसा मिळाला, ह्याविषयीं लेन्पूल म्हणतो. 'हिंदूंच्या जातिभेदांमुळें त्यांचा पाडाव झाला. एकमेकांविषयीं हिंदूंच्या मनांत कोणत्याही प्रकारचा ओढा नसल्यामुळें, त्यांच्यांत जेव्हां तुर्क येऊन घुसले, तेव्हां त्यांची तरी एक निराळी जातच बनली. परकीयांच्या अफाट लोकसमुदायावर ह्या मुसलमानांस आपला वर्चष्मा ठेवावयाचा होता. मुसलमानांची जूट बळकट होती. सर्व लोक बरोबरीच्या नात्यानें बंधूप्रमाणें वागत. जुलमानें अथवा युक्तीनें त्यांस आपली संख्या वाढवावी लागली. बाहेरच्या प्रदेशांतून नवीन ताज्या दमाच्या लोकांची भर त्यांच्यांत पडत असे; त्यायोगें त्यांचें तीव्र वारें कायम राही. धर्माचा कडवेपणा त्यांच्या उत्कृष्ट कामास आला. धर्मप्रसार करण्याचें तत्त्व त्यांच्या फार उपयोगी पडलें. सर्वांचा उद्देश एक, आचार एक, यथेच्छ आचाराची पूर्ण मुभा, निरर्थक सामाजिक बंधनांची अडचण नाहीं, सर्व असामी बंधुत्वाच्या भावनेनें, 'मारीन किंवा मरेन' अशा निकरानें पराक्रम करण्यासाठीं बाहेर पडलेले, अशा एकजुटीच्या लोकांपुढें आपसांत झगडणाऱ्या बेबंद लोकांचा निभाव कसा लागावा ! रजपूत राजे व क्षत्रिय सरदार पिढीजाद हाडवैरांनीं जखडलेले, मानापमानांच्या वेडगळ कल्पनांनीं, मागचा पुढचा विचार न पाहतां व ऐहिक स्वार्थावर नजर न देतां, वाटेल तसें वागणारे होते. त्यांच्या धर्माचा पाया जातीवर म्हणजे जन्मावर व कुलावर रचिलेला होता. परकीयांस ते आपल्या धर्मांत घेत नाहींत, म्हणून दुसऱ्यांस आपल्या धर्मांत ओढून आणितांना उत्पन्न होणारें तीव्र वारें हिंदूंच्या ठिकाणीं येणें शक्य नव्हतें. युद्धप्रसंगांत केवळ स्वसंरक्षणानें काम भागत नाहीं; शत्रूंच्या मुलखांत घुसून आघात करावा लागतो, तें रजपुतांनीं केलें नाहीं. मुसलमान परक्या देशांतून येथें येऊन कोंडले गेल्यामुळें, लढून जय तरी मिळवावा, नाहीं तर मरून तरी जावें, ह्यांशिवाय त्यांस मार्ग नव्हता. हिंदूंनीं प्रसंगा-

नुसार वर्तन ठेविलें नाहीं. क्षात्रधर्माच्या व अब्रूच्या बड्याबड्या कल्पनांचा निभाव प्रत्यक्ष व्यवहारांत लागत नसतो. जातिभेदानें कामांची वांटणी झाल्यामुळें, क्षत्रिय आपल्या कामांत कचरूं लागले तर त्यांच्या मदतीस इतर जाति येत नसत. राज्याच्या भानगडी करण्याचें काम केवळ क्षत्रियांचें आहे, असें म्हणून ब्राह्मणादि इतर वर्ग स्वस्थ बसले. तसेंच सार्वजनिक भूतदयेची कल्पना जातिभेदामुळें हिंदुलोकांत उत्पन्नच झाली नाहीं; आणि निंद्य प्रकारांबद्दल सार्वजनिक तिटकाराही त्यांच्यांत कधीं दिसून आला नाहीं. जो तो केवळ स्वतःपुरतें पाही.'

'मुसलमानांस आपला लष्करी पेशा कायम ठेवावा लागला. कोणतेंही ठिकाण जिंकिल्यावर ते तेथें लष्करी बंदोबस्तानें राहत. हिंदुस्थानांतील ऐष-आरामानें त्यांच्या ठिकाणीं शिथिलता आल्यावरोबर ताज्या दमाच्या नवीन झुंडी मध्यआशियांतून पुनः इकडे येत, आणि पूर्वीचा जोर कायम राखीत.' लेन्पूल म्हणतो, 'मुसलमानांचें ऐक्य, त्यांचा उत्साह व प्रसंगानुसार वर्तन ह्या बाबतींत हिंदुलोकांहून ते श्रेष्ठ होते; आणि व्यक्तिविषयक शौर्य जरी हिंदूंच्या ठिकाणीं कमी नसलें, तरी हिंदूंचे जातिभेद, एकमेकांशीं झगडणाऱ्या निरनिराळ्या सरदारांचे अंतःकलह, फूट पाडणाऱ्या वेडगळ धर्मसमजुती, परधर्मी लोकांस आपल्या धर्मांत ओढून आणण्याची मनाई, ह्या कारणांनीं हिंदुस्थानांत राष्ट्रीय अभिमान कसा तो उत्पन्न झालाच नाहीं. मुसलमानांचें साहस, लष्करी पेशा, धर्मद्वेष, व राज्यलोभ ह्यांमुळें हिंदूंस ते वरचढ झाले; आणि योग्य पुढारी मिळाल्यावरोबर त्यांचा उत्कर्ष होत गेला.'

ह्या सर्व विवेचनावरून मुसलमानांनीं हिंदुस्थानचा पाडाव कसा केला, ह्या प्रश्नाचा उलगडा सहज होतो. आरब, तुर्क, मोगल ह्यांजविषयीं मागें दिलेल्या हकीकती; इस्लामाच्या स्वरूपाचें खुलासेवार दिलेलें वर्णन; ईजिप्ट, इराण, पूर्वरोम इत्यादि देशांतील प्राचीन सुधारणांचा इस्लामापुढें झालेला नाश, हे प्रकार ध्यानांत आणिले म्हणजे हिंदुस्थानचा पाडाव झाला याचें आश्चर्य वाटणार नाहीं. तुर्कांनीं सतत तीनशें वर्षें प्रहार चालविले, तेव्हां अला-उद्दिनास यश मिळालें. घोरी व गुलाम वंशांनीं केलेल्या उद्योगाचा फायदा अला-उद्दिनास मिळाला. मोगल लोक तरी सारखे तीनशें वर्षें ह्या देशावर आघात करीत होते, तेव्हांच

पुढें बाबरास व अकबरास मोगलबादशाही स्थापन करितां आली. अशिक्षित व रानटी लोकांनीं प्राचीन व सुधारलेल्या पण निःसत्त्व राष्ट्रास जिंकिल्याचें हिंदुस्थानचें हें एकच उदाहरण इतिहासांत आहे असें नाहीं. युरोपांत सुद्धां सुधारलेल्या रोमन लोकांस रानटी गॉथ लोकांनींच जिंकिलें. सुधारलेल्या लोकांस जिवाची किंमत ज्यास्त वाटते. रानटी लोकांस मरणाचा बाऊ वाटत नाहीं. सुधारलेल्या लोकांस शांतता हवी असते. रानटी लोकांचें अस्तित्व धामधुमीवर अवलंबून असतें. इतिहासामध्यें हा प्रश्न महत्त्वाचा असून, ह्या मुसलमानी रियासतीचें तें सार आहे.

तरवारीच्या जोरावर म्हणजे करड्या अंमलानेंच हिंदुस्थानावर राज्य करणें शक्य आहे, असा मुसलमानी अंमलापासून अनेकांनीं निष्कर्ष काढिला आहे. लेन्पूल म्हणतो, राजानें कडकपणा किंवा जोर दाखविला कीं पुरे, त्याचें राज्य टिकावयाचें; पण त्यानें भ्याडपणा दाखविला, कीं तो राज्यास मुकला म्हणून समजावें. अर्थात् हिंदुस्थानच्या इतिहासांत मुख्य विषय म्हणजे धाडसी पुरुष व त्यांचे पराक्रम. खालच्या भारवाहक व सोशिक रयतेस विचारतो कोण ? ह्या लोकांचें वर्तन अगदीं प्राचीन काळापासून आहे तसें आहे. अनेक परकीय लोक स्वाऱ्या करून आले व गेले, त्यांच्यांतले कित्येक अपरिहार्य प्रकार हिंदवासीयांनीं आपल्या राहणींत स्वीकारले इतकेंच. आर्य, हूण, ग्रीक, पारसिक, तुर्क, अफगाण, मोगल व इंग्रज इत्यादिकांच्या अनेक स्वाऱ्या एकामागून एक हिंदुस्थानावर आल्या, पण लोकांच्या अंगीं मुरलेला सोशिकपणा, अद्याप आहे तो कायमच आहे. 'राजा चांगला असो कीं वाईट असो, त्याचें आपणास काय, ईश्वराची मर्जी असेल तसें होईल, असें म्हणून लोक स्वस्थ बसतात.'

**४. स्वत्वरूपी भावनेचा अभाव.**—मुसलमान लोक ह्या देशांतले प्रदेश एकामागून एक काबीज करीत चालले असतां, त्यांस मागें हटवून हिंदूंनीं आपलें स्वराज्य स्थापण्याचे प्रयत्न कां केले नाहींत, हा प्रश्न राहतो. गज्नवी महंमूद अथवा महंमद घोरी स्वाऱ्या करूं लागल्यानंतर, अथवा त्याचेही पुढें अनेक प्रसंगीं, मुसलमानांची दशा अगदीं निकृष्ट झालेली होती. गुजराथ, माळवा, बंगाल, दक्षिण वगैरे ठिकाणीं स्वतंत्र मुसलमानी राज्यें जर स्थापन झालीं, तर त्याच वेळेस हिंदूंनीं

आपापलीं राज्यें स्थापण्याचे प्रयत्न केले असते, तर विजयनगरप्रमाणें ते कदाचित् सिद्धीस गेले असते. असे प्रयत्न थोडेबहुत झाले, हिंदूंचीं ठिकठिकाणीं तुरळक बंडें झालीं, पण मुसलमानांचें राज्य आपणांस नको, अशी सर्वसाधारण भावना जनतेच्या ठिकाणीं उत्पन्न झाली नाहीं. उत्तरहिंदुस्थानांत तर अशी भावना कधींच झाली नाहीं. दक्षिणेंतील लोकांच्या अंतःकरणांत स्वत्वाची थोडीबहुत स्फूर्ति होती असें दिसतें. मलीक काफूर व महंमद तुघ्लख ह्यांनीं दक्षिणदेश काबीज केला, ही गोष्ट दक्षिणच्या हिंदूंस न आवडून त्यांच्या अवशिष्ट पुढाऱ्यांनीं एकमत करून विजयनगरची स्थापना केली. ( पृ. २९५ पहा ). त्याबरोबर हिंदु-मुसलमानांचा तीव्र झगडा दोन अडीचशें वर्षं दक्षिणेंत चालू झाला. त्या झगड्यांत शेवटीं विजयनगरचा पाडाव होऊन मुसलमानांची कांहीं दिवस सरशी झाली. तथापि मुसलमानांचें हें वर्चस्व बरेंच अस्थिर होतें. उत्तरेंत हिंदूंचें स्वत्व सर्वथैव नष्ट होऊन, त्यांचें मन पूर्णपणें मुसलमानांच्या कवज्यांत गेलें होतें, मोठमोठे मी मी म्हणणारे रजपूत सुद्धां मुसलमानांचेच अंकित होऊन बसले होते, तशांतलाच केवळ प्रकार दक्षिणेंत झाला नाहीं. विजयनगरचा पाडाव झाला, तरी अनेक हिंदु सरदार व पुढारी ठिकठिकाणीं जीव धरून होते; त्यांच्याच मदतीनें बहामनी राज्याचा कारभार चालला होता; त्यांची मनधरणी केल्याशिवाय मुसलमानांचें चालणारें नव्हतें. निजामशाही, कुत्बशाही, आदिलशाही इत्यादि राज्यांच्या कारभारांत हिंदु सरदारांचा व मुत्सद्यांचा भरणा विशेष होता. ( पहा, मराठी रियासत पृ. २७ ) ह्या सरदारांसच पुढें शिवाजी-सारखा पुढारी मिळाल्याबरोबर मराठशाहीची स्वतंत्र स्थापना झाली. पण असा प्रकार उत्तरेंत झाला नाहीं. पंजाब, दिल्ली, अयोध्या वगैरे ठिकाणचे लोक शक्तीनें कितीही बळकट असले, तरी परकीय हल्ल्यांपुढें त्यांचा निभाव कधींच लागला नाहीं. पंजाबच्या लोकांस तर परकीय हल्ले सोसण्याची संवय सिकंदर बादशहाच्या वेळेपासून लागलेली होती. ज्या लोकांस परकीयांचे आघात सोसण्याचे प्रसंग वारंवार येतात, त्यांच्या अंगीं त्या अघातांच्या योगानें एक प्रकारची विशेष बळकटी व चिकटपणा सामान्यतः उत्पन्न होत असतो. सभोंवार शत्रूंच्या कचाट्यांत सांपडलेल्या राष्ट्रांच्या अंगचें प्रखर तेज वाढत गेल्याचीं अनेक

उदाहरणें इतिहासांत आहेत. तसा प्रकार हिंदुस्थानांत पंजाब वगैरे उत्तरेकडील प्रांतांतील लोकांचा झालेला दिसत नाहीं. पंजाबप्रांत हजारों वर्षे गाढ निद्रेंत पडून होता, त्यास गुरु नानक व गुरु गोविंद ह्यांनीं जागें करून, आणि त्यांच्या धर्मसमजुतींस निराळें वळण लावून, शीखांचें पराक्रमी राष्ट्र बनविलें. तेव्हांच पंजाबांतील शीखांचा पुढें एवढा उदय झाला.

परकीयांच्या हल्ल्यांचा प्रतिकार हिंदु लोकांनीं कधींच केला नाहीं असें नाहीं. सिकंदर बादशहाच्या वेळेपासून परकीयांचे हल्ले हिंदुस्थानावर होऊं लागले. त्यापूर्वींच्या हल्ल्यांची ऐतिहासिक माहिती नाहीं. खरें म्हटलें म्हणजे हिंदुस्थानास संपूर्ण स्वतंत्रता कधीं असेल, तर ती सिकंदर बादशहा येण्याच्या पूर्वीं असेल. सिकंदरच्या वेळेपासून ग्रीक, सिथियन, शक, हूण व पुढें आरब, तुर्क, मोगल, आणि सरशेवटीं पाश्चात्य क्रिस्ती इत्यादि अनेक परकीय लोकांचे हल्ले आज दोनअडीच-हजार वर्षे हिंदुस्थानावर येत आहेत; आणि त्या सर्वांचा थोड्याबहुत अंशानें येथें रिघाव झाला आहे. तथापि त्यांचा प्रतिकारही वेळोवेळीं येथील लोकांकडून झालेला आहे, हें सहसा कोणाच्या लक्षांत येत नाहीं. 'सिकंदर बादशहाच्या स्वारीनंतर शहाबुद्दीन घोरीच्या स्वारीपर्यंत जीं पंधराशें वर्षे गेलीं, तेवढ्या काळांत ह्या देशावर परकीयांच्या स्वाऱ्या एकामागून एक येत होत्या; आणि तितक्यांस येथचे लोक मागें हटवून स्वतःची सत्ता स्थापन करीत होते. जगाच्या इतिहासांत इतके प्रचंड झगडे सांपडणें कठीण. सिकंदर बादशहाचें वास्तव्य येथें झालेंच नाहीं. त्याचे कांहीं लोक मागें राहिले, त्यांस चंद्रगुप्तानें घालवून दिलें. पुढें शंभर वर्षांनीं वायव्येकडील बॅक्ट्रिया देशांतून ग्रीक लोकांनीं पुनः हिंदुस्थानावर स्वारी केली, त्या वेळीं मगधदेशचा राजा पुष्यमित्र व त्याचे सेनापति ह्यांनीं इ. स. पू. १५० च्या सुमारास त्या यवनांस बाहेर घालवून दिलें. यवनांनंतर शक आले, त्यांनीं तक्षशिला व मथुरा येथें सुमारें शंभर वर्षे राज्य केलें. त्यांचा पाडाव इ. स. पू. ५७ च्या सुमारास उज्जनीच्या विक्रमादित्यानें केला. नंतर पश्चिमेकडून शकांची दुसरी एक टोळी आली, त्यांचा राजा नहपान याचा गौतमीपुत्र पुळुमायि शातकर्णी ह्यानें इ. स. १२६त

पराभव केला. त्यानंतर यूची नांवाचे लोक हिंदुस्थानावर आले. त्यांचे राजे कनिष्क, हविष्क, व वासुदेव ह्यांनीं शंभर वर्षेंपावेतों पंजाब व सभोंवारच्या प्रदेशावर राज्य केलें. त्यांचा पाडाव गुप्तवंशी प्रबल राजा समुद्रगुप्त ह्यानें चवथ्या शतकांत केला. पांचव्या शतकांत श्वेतहूण लोक हिंदुस्थानावर चालून आले; त्यांचा दुष्ट राजा मिहिरकुल ह्यास सहाव्या शतकांत यशोधर्मराजानें जिंकिलें. तरी सातव्या शतकांत पुनरपि हूण लोक हिंदुस्थानांत आले, त्यांस कनोजच्या श्रीहर्षानें कायमचें हांकून लाविलें. त्यानंतर सुमारें तीनशें वर्षेंपावेतों हिंदुस्थानावर परचक्र आलें नाहीं. पुढें सबक्तगीन व गज्नवी महमूद चालून आले; त्यांजपुढें हिंदु लोक हार पावले, तथापि त्यांनीं स्वराज्य घालविलें नाहीं. आणखी दोनशें वर्षें गेल्यावर महंमद घोरी हिंदुस्थानावर आला, त्याजला अडविणारा शेवटचा शूर वीर पृथ्वीराज होय. परंतु त्या सामन्यांत पृथ्वीराजाचा पाडाव होऊन बाराव्या शतकाचे आरंभीं हिंदुस्थानावर परराज्य स्थापन झालें.' (इंडियन रिव्ह्यू, डिसेंबर १९०९). वरील पंधराशें वर्षांतील प्रचंड व बहुविध झगड्यांत अनेक शूर पुरुषांचीं नांवें इतिहासांत चिरस्मरणीय झालीं आहेत. परंतु त्या पुरुषांचीं इतिवृत्तें आज समग्रतेनें उपलब्ध नसल्यामुळें त्यांचें आपणांस विस्मरण घडतें; दूरगत काळच्या हकीकती आपल्या मनांतून नाहींशा होतात; समीपकाळच्या घडामोडींस महत्व येतें. त्यायोगानें नवीन अपसंस्कार मनास जडतात, आणि आत्मप्रतीति बुजून जाऊन आपण सदैवच परचक्राखालीं लोळत आहों, अशी मनाची दृढ भावना होऊन बसते. सारांश, बाराव्या शतकाच्या अखेरीस पृथ्वीराजाचा पाडाव झाला तोंपावेतों, हिंदुस्थानांत आर्यांचेंच स्वतंत्र राज्य कायम होतें. तेराव्या शतकापासून मात्र हा देश परचक्राखालीं गेला आहे.

फार दिवसांच्या सहवासानें राष्ट्राच्या मनांत अशी एखादी भावना कायमची होऊन बसते; आणि अशी भावना एकदां कायम झाली, म्हणजे ती राष्ट्राच्या मनांतून सहसा जात नाहीं. तेराव्या शतकाच्या आरंभापासून पुढें कित्येक शतकें हिंदुस्थानावर मुसलमानांचेंच राज्य कायम राहिलें. तेवढ्या अवधींत हिंदुस्थानचे राज्यकर्ते मुसलमान होते. राज्य करण्याची योग्यता हिंदूंची नाहीं अशा प्रकारचा सामान्य जनांचा

ग्रह होऊन बसला. प्राचीन काळीं राज्य करण्याचें काम क्षत्रियांचें होय, असा समज दृढ होता. ह्या समजामुळेंच राज्याची जोखीम एकट्या क्षत्रियांच्या अंगावर येऊन पडली. इतर जातींनीं त्यांस साहाय्य केलें नाहीं. तशांलाच थोडाबहुत प्रकार पुढें मुसलमानांच्या संबंधानें झाला. राज्य करण्याचें काम मुसलमानांचें, ही गोष्ट एकदां ठरून चुकल्यामुळें हिंदूंना आपलें राज्य स्थापन करण्याची स्फूर्तिच झाली नाहीं. गंगु ब्राह्मणानें हुसेनखानास भर देऊन दक्षिणेस स्वतंत्र राज्य स्थापन करण्यास त्यास उत्तेजन दिलें, याची मीमांसा ह्या विचारसरणीवरच बसू शकते. नाहीं तर हुसेनखानाप्रमाणेंच एखाद्या पराक्रमी हिंदूस तशा प्रकारचें उत्तेजन देऊन गंगु ब्राम्हणाला स्वराज्य स्थापन करवितां आलें असतें.

महंमद तुघ्लखापाशीं ह्या ब्राह्मणाचें वजन चांगलें होतें. कदाचित् हिंदूंच्या चहाड्या सुलतानास सांगून तो सुलतानाच्या उपयोगीं पडत असेल. ह्या वजनाचा उपयोग करून गंगु ब्राह्मणानें दक्षिणेंत मुसलमानी राज्य स्थापविलें. ह्याचा अर्थ इतकाच, कीं जनतेच्या मनांत स्वराज्याची स्फूर्ति वागत नव्हती. तशी स्फूर्ति वागत असती, तर पंधराव्या शतकांत हिंदूंना स्वराज्य स्थापन करण्याचे वाटेल तितके प्रसंग उत्पन्न झालेले होते. बाबरासही अशाच एका प्रसंगाचा उपयोग झाला. गुजराथ, माळवा, महाराष्ट्र, बंगाल इत्यादि ठिकाणीं, स्वतंत्र राज्यें स्थापन होऊं शकलीं; यावरून त्या वेळीं नवीन राज्यस्थापनेला योग्य असे प्रसंग पुष्कळ आले हें उघड होतें. राजकीय व्यवहारांत राष्ट्राच्या या सामान्य भावनेचा उपयोग राज्यकर्त्यांस विशेष होत असतो. मोगल बादशाही स्थापन झाल्यावर, वर सांगितलेली राष्ट्रीय भावना ज्यास्तच दृढ होत गेली. 'दिल्ली राजधानी' व 'मोगल बादशहा' ह्या दोन कल्पनांचें साहचर्य लोकांच्या मनांत कायमचें बसून गेलें. इ. स. १७०७त औरंगजेब मृत्यु पावला, त्यानंतरच्या पांचपन्नास वर्षांत हिंदूंस नवीन राज्यस्थापना सहज करितां आली असती. मराठ्यांनीं तर तशा प्रकारचा प्रयत्न केलाही.

परंतु लोकसमूहाला हा प्रयत्न रुचला नाहीं. मोगल बादशहाला सिंहासनावरून दूर सारून त्या ठिकाणीं हिंदूंच्या चक्रवर्तीची स्थापना करणें ही कल्पनाच लोकांच्या मनांत येत नव्हती. पानपताच्या पूर्वी सदाशिवराव पेशव्यानें बादशहाच्या वाड्यांतील तख्त फोडलें त्या वेळेस लोकांनीं

केवढा गहजब केला, हें सुप्रसिद्धच आहे. मुसलमानांनीं हिंदुस्थानांत लाखों देवळांचा व मूर्तींचा विध्वंस करून संपत्ति हरण केली, ह्याची आठवण सुद्धां त्या लोकांस झाली नाहीं. उदेपूरचा राणा राजसिंग ह्यानें औरंगजेबास लिहिलेलें बाणेदार पत्र वर दिलेंच आहे. (पृ. ३४६). त्यांत सुद्धां तो शूर पुरुष मोगल बादशाही कायम राहवी, अशीच भावना व्यक्त करितो, आपण स्वतंत्र होण्याची धमकी देत नाहीं; स्वतंत्र होण्याच्या भावनेनें त्याच्या मनांस स्पर्शसुद्धां केला नाहीं. एवढा पराक्रमी महादजी शिंदे, ज्यानें सर्व उत्तरहिंदुस्थान हालवून सोडलें, त्यास मोगल बादशाही घशांत टाकण्यास यत्किंचित् विलंब लागला नसता. परंतु वृद्ध, अंध व नालायक बादशहाचें बाहुलें सिंहासनावर कायम ठेवून, त्याची हलकी नोकरी पत्करण्यांतच त्यास धन्यता वाटली, ह्यांतील बीज हेंच आहे. सत्तावनसालच्या बंडांत बंडवाल्यांनीं नामशेष बादशहालाच पुढाकार दिला. सारांश, एकदां पूर्वपरंपरेनें जनसमूहाची एकादी भावना दृढ झाली, म्हणजे ती सहसा नाहींशी होत नाहीं. या मुद्याची चर्चा महाभारतांत सुद्धां ठिकठिकाणीं केलेली आहे.

पुढें पुढें ह्या भावनेचा उपयोग मुसलमान राज्यकर्त्यांस चांगलाच झाला. राज्य परकीयांनीं करावें आणि आम्हीं त्यास सर्वस्वी मदत करावी असा समज कायमचा बनला. आमच्या बुद्धिशक्तीचा उपयोग परकीयांनीं करून घेतला. राज्यांतील वसुलाचें व व्यवस्थेचें कचें काम बहुधा हिंदूंच्याच हातीं होतें. बहामनी राज्यांत तर हिंदूंवरच सर्व भिस्त होती. फौजेंतील मोठमोठे सरदार व राज्यकारभार हांकणारे मोठमोठे कामदार बहुतेक हिंदु होते. हिंदूंचेंच वजन मुसलमानांवर पडलें होतें. हिंदूंच्या मदतीशिवाय मुसलमानांचें चालणारें नव्हतें.

५. आल्बेरुनीचें हिंदूंविषयीं मत.—खिवा येथील खानांच्या पदरीं आल्बेरुनी नांवाचा एक विद्वान् गृहस्थ राहत होता. त्याचा जन्म स. ९७३ त झाला. त्याचें नांव आबू रैहान असें असून, बेरुनी हें त्याचें आडनांव होय. लहानपणीं त्यास चांगलें शिक्षण मिळून भाषा व गणित विषयांत तो फार तरबेज झाला. इ. स. १०१७त गजनवी महंमुदानें खिवाप्रांत काबीज करून तेथील पुष्कळ लोकांस पकडून आणिलें. त्यांत आल्बेरुनी गज्नीच्या दरबाराशीं फार दिवस भांडत असल्यामुळें, त्याज-

वर महंमुदाची वक्रदृष्टि होती. बेरुनीस ज्योतिषशास्त्राची विशेष अभिरुचि असून आरब, ग्रीक व आर्य ज्योतिषांत त्याचा हात धरणारा कोणी नव्हता. पण महंमुदानें त्यास आश्रय दिला नाहीं; आणि महंमूद जिवंत असेपर्यंत त्याची ख्यातीही झाली नाहीं. पुढें मस्-ऊदच्या कारकिर्दीत त्यास आश्रय मिळाला. आल्बेरूनीनें पुढें हिंदुस्थानांत येऊन पुष्कळ प्रवास केला; आणि संस्कृतभाषेचा अभ्यास करून इकडील अनेक विद्या तो शिकला. मोठा ज्ञानसंपन्न तत्त्वज्ञ व बहुश्रुत पंडित अशी त्याची कीर्ति आहे. आमच्या धर्मशास्त्राचा अभ्यास त्यानें, प्लेटो व आरिस्टॉटल ह्यांच्या ग्रंथाइतकाच मोठ्या आस्थेनें केला. पुढें त्यानें आरबीभाषेंत अनेक ग्रंथ लिहिले, त्यांत 'प्राचीन राष्ट्रांचा कालक्रम' ( Chronology of Ancient nations ), 'ज्योतिषशास्त्र,' आणि 'इंडिया' हे मुख्य आहेत. ह्या ग्रंथांचीं इंग्रजींत भाषांतरें झालेलीं असून ते सर्व मोठ्या योग्यतेचे आहेत. हिंदुस्थानांत आल्यावर, येथील लोकांची निरनिराळ्या विषयांतली योग्यता पाहून, येथें आपणास पुष्कळ शिकण्यासारखें आहे, असें त्यास वाटलें. एकंदरींत हिंदुस्थान देशाबद्दल त्याच्या मनांत आदरबुद्धि वसत होती.

बेरुनीच्या लेखाचा एक मोठा गुण असा आहे कीं, तो अत्यंत निष्पक्षपात बुद्धि कायम ठेवून, आणि प्रत्येक गोष्ट मेहनतीनें समजून घेऊन मग काय लिहिणें तें निर्भीडपणें लिहितो. हिंदूंचें गणितशास्त्र, ज्योतिष, तत्त्वज्ञान, वैद्यक, संस्कृतभाषा व तिचा ग्रंथसंग्रह, हिंदूंच्या धर्मकल्पना इत्यादि हरएक विषयाचें वर्णन त्यानें लिहून ठेविलें आहे; आणि असें करतांना त्यानें हिंदुग्रंथांतून पुष्कळसे उतारे घेऊन त्यांजवर आपली टीका थोडक्यांत केली आहे. संस्कृतांतलें अगाध ग्रंथभांडार त्यानें बहुतेक समजून घेतलें होतें असें दिसतें. हिंदुस्थानांतल्या कितीतरी ग्रंथांचीं भाषांतरें मुसलमानी भाषांत होऊन त्यांचा बाहेर प्रसार झाला, ह्याची आपणास आज कल्पनाही नाहीं. आल्बेरुनीस ग्रीकभाषा सुद्धां अवगत होती, आणि प्रत्येक ठिकाणीं त्यानें आर्य व ग्रीक विचारांची तुलना करून दाखविली आहे. येथें त्याच्या लेखाचे उतारे देणें शक्य नाहीं. तथापि एक लहानसा उतारा देतों.

" हिंदूंच्या स्वभावांतील कित्येक ठळक गोष्टी उघड उघड दिसून येतात. मूर्खपणाला औषध नाहीं हेंच खरें. हिंदुलोकांना वाटतें, आपल्या देशासारखा देश नाहीं, आपल्या राष्ट्रासारखें राष्ट्र नाहीं, आपल्या राजांसारखे राजे नाहींत, आपल्या धर्मासारखा धर्म नाहीं, आणि आपल्या विद्येसारखी विद्या नाहीं. ते उद्दाम, गर्विष्ठ व मंद आहेत. आपली विद्या दुसऱ्यास देण्यास ते अतिशय नाखुष असतात. परक्यांस तर काय, पण आपसांत सुद्धां एका जातीचा गृहस्थ आपली विद्या दुसऱ्या जातीस देत नाहीं. त्यांना वाटतें, सगळ्या पृथ्वीवर देश काय तो आपला एकच आहे, दुसरे देशच नाहींत; आणि आपल्या विद्या दुसऱ्या कोणास यावयाच्याही नाहींत. मुसलमानांच्या देशांत एखादी विद्या आहे, किंवा तिकडे कोणी विद्वान् गृहस्थ आहेत असें सांगितलें तर, तें त्यास खरेंसुद्धां वाटत नाहीं. ते जर प्रवास वगैरे करून दुसऱ्या लोकांशीं मिसळतील तर त्यांचे अनेक मिथ्याग्रह आपोआप दूर होतील. त्यांचे पूर्वज कसेही असले तरी दुराग्रही व संकुचित मनाचे नव्हते. हिंदुस्थानांत येऊन तेथील विद्या शिकून घेण्यास मला किती प्रयास पडले, तें माझें मलाच ठाऊक! हिंदूंच्या सर्व विद्यांचा आज भयंकर गोंधळ झालेला आहे. कशास कांहीं ठिकाण नाहीं. उत्कृष्ट विद्या, अज्ञानी व मूर्ख लोकांच्या हातीं पडून त्यांचें मातेरें झाल्यामुळें, चांगलें कोणतें व वाईट कोणतें ह्याचा उलगडाच करितां येत नाहीं. उत्कृष्ट रत्नें उकिरड्यांत मिसळून जावीं, तशांतला प्रकार झालेला आहे." हा मजकूर सन १०४० च्या सुमारास लिहिलेला आहे; आणि तो आजही आपल्या आत्मनिरीक्षणास चांगला उपयोगी पडतो.

आल्बेरूनीला हिंदुस्थान जसें दिसलें तसें त्यानें त्याचें वर्णन केलें आहे. त्याला भेटलेल्या पंडितांपैकीं कांहींच्या ज्ञानाची त्यानें बरीच वाखाणणी केली आहे. परंतु सामान्य जनसमूहाची शारीरिक व मानसिक स्थिति अतिशय शोचनीय होती, असें त्यानें लिहिलें आहे. नैतिक आणि धार्मिक बाबतींत देखील सर्व तऱ्हेनें गांजलेले; अनाथ आणि पतित; सामाजिक, धार्मिक आणि राजकीय बाबतींमध्यें विभागलेले; धड नीट विचारदेखील न करतां येणारे; व्यसनांनीं शरीरें कमकुवत करून घेतलेले; आणि महंमद गज्नीच्या बरोबर दरवर्षी चाल करून येणाऱ्या मुसलमानांपुढें शिस्तीच्या अभावीं रजःकणाप्रमाणें उडून जाणारे कळपचे

कळप, असें त्यानें हिंदुलोकांचें वर्णन केलें आहे. बाबरानें देखील आपल्या चरित्रांत येथच्या लोकांविषयीं असा उल्लेख केला आहे, कीं हिंदुस्थानांतील लोकांना हरएक बाबतींत चातुर्य व कल्पकता हीं कांहींच नाहींत. वस्तुतः त्यांना उद्योगधंद्यांचा गंधही नाहीं, ललितकला नाहींत, शिल्पज्ञान नाहीं, बगीचे नाहींत, कालवे नाहींत, बंदुकीची दारूही नाहीं; मोकळेपणानें एकमेकांत त्यांना मिसळतांदेखील येत नाहीं, म्हणून बाबरानें त्यांचा धिक्कार केला आहे. आत्मश्लाघा व अतिशयोक्ति यांचा भाग असल्यास तो वगळून देखील वरील गोष्टींत बरेंच सत्य आहे, असें आपणांस मोठ्या कष्टानें कबूल करावें लागेल. हिंदुलोकांमध्यें दिसून येणाऱ्या व्यावहारिक ज्ञानाचा अभाव हेंच हिंदुस्थानच्या अवनतीचें कारण होय.

**६. ग्रंथसंपत्ति व हिंदूंची बौद्धिक सरशी.**—ह्या अमदानींत हिंदूंच्या बुद्धीचा प्रभाव सुरूच होता. त्यांची ग्रंथसंपत्ति अव्याहत वृद्धि पावत होती. बंगालप्रांतानें संस्कृत विद्येचें संरक्षण चांगल्या प्रकारें केलें. प्रसिद्ध साधु चैतन्य ज्यास केवळ बुद्धाचा द्वितीयावतार समजतात, तो बंगाल्यांतच पंधराव्या शतकांत निपजला. चौदाव्या शतकांत कुल्लुकभट्टानें काशी येथें मनुस्मृति वरील आपली सुंदर टीका लिहिली. त्यापूर्वीं पांचशें वर्षें म्हणजे नवव्या शतकांत मिथिला नगरींत मेधातिथीनें आपली मनुस्मृतीवरील टीका लिहिली होती. चौदाव्या शतकांत बंगाल्यांत ' जीमूतवाहना 'नें दायभाग नांवाचा हिंदुधर्मशास्त्रावरील उत्कृष्ट ग्रंथ लिहिला. त्यापूर्वीं म्हणजे अकराव्या शतकांत विज्ञानेश्वरानें बहारप्रांतांत याज्ञवल्क्य स्मृतीवरील मिताक्षरी नांवाची टीका लिहून आपलें नांव अजरामर करून ठेविलें.

बंगाल्यांतील उत्कृष्ट कवि जयदेव होय. हा बाराव्या शतकांतला आहे. जयदेवाचा गीतगोविंद ग्रंथ वाचून कोण तल्लीन होणार नाहीं? त्याच शतकांत शांडिल्यानें भक्तिसूत्र केलें. शंकराचार्य, रामानुज, रामानंद, मध्वाचार्य, बसव, वल्लभाचार्य, ह्यांनीं भक्तीच्या ह्या विषयाचें आपल्या अधिकारयुक्तवाणीनें जें निरूपण करून ठेविलें आहे, त्यामुळें संस्कृत वाङ्मयांत अत्युत्कृष्ट भर पडली असून, वरील थोर आचार्यांनीं ही भूमि पुनीत केली आहे. पश्चिमेकडे दिल्लीच्या बाजूस भयंकर रक्तपात व राजकीय उलाढाली चालू असतां पूर्वेकडे बंगाल्यांत रामानंदानें वैष्णव धर्माचा प्रचार सुरू केला, त्याचा अद्वितीय प्रभाव अद्यापि दिसून येतो. कबीर

हा रामानंदाचा शिष्य. कबिराची कीर्ति 'शब्दावली'नें अजरामर केली आहे. बहारप्रांतांत विद्यापति ठाकूर ह्यानें मैथिली भाषेंत राधाकृष्णांच्या प्रीतीवर उत्कृष्ट कवन केलें आहे. त्याच वेळेस बंगाल्यांत चण्डीदास निपजला. त्याची कविता लोक भक्तिपूर्वक वाचितात. पंधराव्या शतकांत मेवाडांत मिराबाई निपजली; तिनें उत्कृष्ट भक्तिपर कवनें लिहिलीं. पुढें वल्लभाचार्य व चैतन्य ह्यांनीं अनुक्रमें गुजराथेंत व बंगाल्यांत भक्तीचें माहात्म्य वाढविलें. वल्लभानें भागवतावर टीका लिहिली. चैतन्यास पूर्वेकडील ल्यूथर समजतात. चैतन्य, नदिया येथें स. १४८५त जन्मला, आणि स. १५२७त जगन्नाथपुरीनजीक मरण पावला. नदिया म्हणजे नवद्वीप येथेंच अठराव्या शतकांत रघुनाथभट्टानें न्यायशास्त्र शिकविण्याची एक पाठशाला काढिली, तिचा लौकिक पुढें फारच वाढला.

भट्टनारायणाचें वेणीसंहार नाटक व राजशेखराची विद्धशालभंजिका, बालरामायण व बालभारत हीं नाटकें नवव्या शतकांतील आहेत. कनोजच्या महीपाल राजाच्या पदरीं पंडित क्षेमेश्वर म्हणून होता, त्यानें दहाव्या शतकांत चंडकौशिक नाटक लिहिलें. संस्कृताचा जैन व्याकरणकार हेमचंद्र हाही दहाव्या शतकांतला.

भोजराजाच्या पदरचा 'हनुमान्' नाटककर्ता दामोदरमित्र, विक्रमांकदेवचरितकार बिल्हण, राजतरंगिणीकार कल्हण, काव्यप्रकाशकार मम्मट, नदियाचे गंगेश वगैरे नैय्यायिक, दक्षिणेंतले भट्टोजी दीक्षित, वगैरे वैय्याकरण, नैषधकार श्रीहर्ष, निर्णयसिंधु व स्मृतीवरील टीकाग्रंथ, काश्मीरचा सोमदेवकवीचा कथासरित्सागर (स. १०७०), क्षेमेंद्र, व्यासदासानें लिहिलेला बृहत्कथामंजरी, हलायुधाची अभिधानरत्नमाला व अमरसिंहाचा अमरकोश, इत्यादि ग्रंथ व ग्रंथकार इ. स. १०००च्या पुढचे आहेत. हेमाद्रीचा चतुर्वर्गचिंतामणि तेराव्या शतकांतला आहे. प्रसिद्ध ज्योतिषी भास्कराचार्य इ. स. १११४त होता. कृष्णमित्राचें प्रबोधचंद्रोदय नाटक बाराव्या शतकांतलें आहे. ह्यांशिवाय न्याय, वेदान्त व इतर अनेक विषयांवर ग्रंथ झालेले आहेत. जगन्नाथ पंडित अप्पया दीक्षित, सप्तशतीकार गोवर्धन इत्यादि कवीही ह्याच काळांतले आहेत. त्या काळीं हिंदुस्थानचा कांहीं भाग संस्कृत भाषेच्या संबंधानें निजून होता, तर कांहीं भाग देशी भाषेनें जागूं लागला होता.

काश्मीर, बंगाल, उत्तरहिंदुस्थान इत्यादि ठिकाणीं संस्कृताचाच अंमल दिसतो. मराठी, तेलंगी व तामील ह्या भाषांतही नामांकित ग्रंथकार ह्या काळीं निपजलेले आहेत. संस्कृतभाषा बहुधा ब्राह्मणांनींच प्रचारांत ठेविलेली दिसते. एकाददुसरा राजा संस्कृत जाणणारा झाला असल्यास नकळे. न्याय, व्याकरण, अलंकार व धर्मशास्त्र ह्या चार शास्त्रांवर जे ग्रंथ आज प्रचारांत आहेत, ते एकंदरींत इसवी सन १००० नंतरचे आहेत. तसेंच संस्कृत व पाली ह्या दोनही भाषांत बौद्ध ग्रंथही पुष्कळ झाले. जैनांचे ग्रंथ महाराष्ट्री व अर्धमागधी ह्या भाषांत झाले. जैनांनीं पुढें संस्कृताचा सुद्धां उपयोग केला. सारांश, देशांत युद्धें रक्तपात, राज्यक्रान्ती वगैरेंचा धडाका चालू असतां, विद्वानांचें ग्रंथलेखन शांतपणें अव्याहत चालूं होतें. संस्कृत भाषेप्रमाणें देशी भाषांचाही उत्कर्ष झाला. पण त्याचें विवेचन करण्यास येथें अवकाश नाहीं. ह्या ग्रंथसंग्रहानें लोकांत धर्मजागृति कायम राहिली.

' हिंदुस्थानांतील लोक निरनिराळ्या राष्ट्रांचे व धर्मपंथांचे असल्यामुळें, आणि सर्वांस एक छत्राखालीं दाबांत ठेवणारा असा एकच मध्यवर्ती राजा नसल्यामुळें मुसलमानांपासून हिंदुधर्माचा बचाव झाला. पूर्वी ह्या देशांत बौद्धांचा पाडाव होण्यास उशीर लागला नाहीं. बौद्ध साधु अविवाहित असत, त्यांस ठार मारून त्यांचे विहार मोडल्याबरोबर बुद्धधर्म संपला. परंतु हिंदूंचें तसें झालें नाहीं. मुसलमानांनीं त्यांचीं देवळें फोडलीं, मूर्ति फोडिल्या, मथुरा, कनोज, बनारस, सोमनाथ येथें ब्राह्मणांच्या कत्तली झाल्या, अपार संपत्ति घोर व गझ्नी येथें गेली, तथापि हिंदुधर्माचीं पाळेमुळें सामाजिक आचाराच्या बाबतींत व संस्कृत वाङ्मयांत फार खोल गेलेलीं असल्यामुळें, धर्माचा पाडाव झाला नाहीं. अगदीं दूरदूरचे प्रांत जिंकून ताब्यांत आणण्यासाठीं तीनशें वर्षें पावेतों मुसलमानांनीं आपली शिकस्त केली, तरी तें काम सिद्धीस गेलें नाहीं. आरंभीं जे मुसलमान सरदार हिंदुस्थानांत शिरले, त्यांचे हेतु दोन होते. एक येथील धर्माचा पाडाव करून मुसलमानी धर्म येथें स्थापावयाचा, व दुसरा येथील देवालयांची संपत्ति लुटून न्यावयाची. ह्या सरदारांत एकी नसल्यामुळें पुष्कळ वर्षेंपर्यंत सिंधुनदीच्या पूर्वेस त्यांस थारा मिळाला नाहीं. पुढें त्यांचा दाब हिंदु-

स्थानावर चांगला बसला, तरी सुद्धां मध्यआशियांतील लुटारू लोकांच्या झुंडी त्यांजवर येतच होत्या. ह्या परकीयांस घालवून देण्यासाठीं हिंदु-लोकांची मदत मुसलमान राज्यकर्त्यांस मिळणें शक्य नव्हतें. अकबराच्या वेळेपासून मात्र हा प्रकार बदलला, आणि रजपूतलोक आपलें सर्व वीर्य मुसलमानबादशाहीच्या प्रीत्यर्थ खर्चू लागले. अद्यापिही तीच गोष्ट ते ब्रिटिश बादशहासाठीं करीत आहेत.' ( Frazer's Literary History of India. )

७. मध्यकालीन इमारतींचें बांधकाम.—दिल्ली येथील अफगाण अमदानींत ओढ्याप्रांत बहुतेक स्वतंत्र होता. त्याजवर 'गंग' नामक राजवंशाचें राज्य होतें. त्या वंशाचा पहिला राजा अनंतवर्मा चोलगंग ह्यानें ओढ्या प्रांतावर ७१ वर्षें राज्य केलें, ( स. १०७६–११४७ ). जगन्नाथपुरीचें भव्य मंदीर त्यानेंच इ. स. ११०० च्या सुमारास बांधिलें. ओढ्याप्रांतांत अनेक भव्य मंदिरें आहेत, त्यांची बांधणी शुद्ध हिंदु तऱ्हेची आहे. कोणार्क नांवाचें सूर्यमंदीर तेराव्या शतकांत राजा नृसिंहानें ( इ. १२३८–६४ ) बांधिलें. तें व भुवनेश्वर येथील मंदिरसमूह हे ह्या शुद्ध हिंदुबांधणीचे उत्कृष्ट मासले होत.

हिंदुस्थानांत पुरातन काळचीं बांधकामें अतोनात आहेत. हिंदु, बौद्ध, जैन, व मुसलमान अशा चारधर्मी लोकांचीं कामें विद्यमान असून, अद्यापि पुष्कळांचे शोध लागत आहेत. ह्या शोधांत अनेक विद्वान गुंतलेले असून, त्यांच्याच प्रयत्नानें ह्या देशाचा प्राचीन इतिहास स्पष्ट होत आहे. हिंदूंचीं मुख्य कामें म्हणजे देवालयें, मूर्ति, तलाव, किल्ले वगैरे आहेत. जैनांचीं मंदिरें, वाडे वगैरे असून, बौद्धांचे विहार, व डोंगरांतील गुहा वगैरे आहेत. मुसलमानांच्या मशिदी, बागा, रस्ते, वाडे, विहिरी, सराया, मनोरे इत्यादि आहेत. कनोज, मथुरा, उज्जनी, जगन्नाथ, मदुरा, कांची, तंजावर, त्रिचनापल्ली इत्यादि शहरांतील कामें अवश्य प्रेक्षणीय असून, ह्यांशिवाय मुसलमानांच्या राजधानींची व शहरांची यादी वर ठिकठिकाणीं आलीच आहे.

नुसत्या इमारतींच्याच संबंधानें पाहिलें, तर हिंदुस्थानांत बांधणीचे जितके निरनिराळे प्रकार आहेत तितके बहुधा दुसऱ्या कोणत्याही देशांत सांपडावयाचे नाहींत. बांधणींतले फरकही तसेच बहुविध आहेत.

मुसलमानी अंमदानींतलीं हिंदुस्थानांतील बांधकामें पाश्चात्य कामांपेक्षां कोणत्याही बाबतींत कमी नसून, त्यांचे रचना, नकशी, सौंदर्य इत्यादि प्रकार खरोखरच वर्णनीय आहेत. ह्या बांधणींचे मासले हल्लीं अनेक मासिकांतून व इतरत्र प्रसिद्ध होत आहेत. 'ज्यांनीं ह्या इमारतींची रचना प्रथम कल्पनेनें बसविली, त्यांची कल्पकता अनुपमेय आहे; इमारती तयार करणारांचे परिश्रम केवळ निःसीम आहेत; अगदीं बारीक बारीक बाबतींत सुद्धां लक्ष घालण्याची त्यांची हौस पाहून धन्यता वाटते.' (Imperial Gazetteer, II). गुप्त राजांच्या अंमदानींतलीं कामें, दक्षिणहिंदुस्थानांतील तंजावर, मदुरा इत्यादि ठिकाणचीं प्रचंड देवालयें, कानडामुलुखांतील जैनांचीं मंदिरें, गोदावरीच्या थडींतील चालुक्यांच्या वेळच्या इमारती, हीं सर्व पाहिलीं असतां पूर्वी आपल्याकडे शिल्पकला किती पूर्ण होती हें कळून येतें.

मुसलमानांच्या इमारती म्हणजे मुख्यतः मशिदी आहेत. सामान्यतः मशीद नाहीं, असें शहर हिंदुस्थानांत सांपडणें कठीण. राजधानींच्या शहरांत वाडे, कोट, मनोरे, वगैरे आढळतात. दिल्लीची कुत्ब्-मशीद व कुत्ब्-मिनार हे अगदीं जुने आहेत. विजापूरच्या इमारतींत अस्सल मुसलमानी म्हणजे इराणी व शिया बांधणी दिसून येते. पण अहंमदाबादच्या इमारतींत हिंदुबांधणीचें मिश्रण अतिशय आहे; तें विजापुरांत नाहीं. शिल्पकला शहाजहानच्या वेळेस अगदीं पूर्णत्वास आली; आणि पुढें औरंगजेबाच्या वेळेस तिचा ऱ्हास झाला. औरंगजेबाच्या वेळच्या नांव घेण्यासारख्या इमारती मुळींच नाहींत. जैनपद्धतीचीं कामें गुजराथ व माळवा ह्या प्रांतांत दिसून येतात.

गज्नवी महंमुदानें आठवी स्वारी स. १०१४ त केली, त्या वेळीं त्यानें कांग्रा किल्ला काबीज केला. ह्याच ठिकाणास पूर्वी नगरकोट ऊर्फ भीमनगर अशीं नांवें होतीं. येथें महंमुदास अपार संपत्ति मिळाली, त्यांत एक चांदीचा बंगला होता. त्याची लांबी ९० फूट व रुंदी ४५ फूट होती. त्याची घडी करून तो वाटेल तेथें उभा करितां येत असे. Vincent Smith ).

जोनपूरचा लौकिक केवळ इमारतींच्या बांधकामापुरताच होता, नाहीं. तर तेथें आरबी व फारशी वाङ्मयास उत्तम प्रकारचें उत्तेजन

मिळून, इराणांत जसें शिराज हें कवींचें आगर, तसें हिंदुस्थानांत त्या वेळीं जोनपूर होतें. उत्कृष्ट कारागिरीच्या व बांधणीच्या संबंधानें गुजराथेंत अहंमदाबादचा लौकिक फार मोठा होता. अहंमदाबादच्या इतक्या सुंदर व सुशोभित इमारती त्या वेळीं दुसऱ्या कोठें नव्हत्या. ह्या बांधकामांत मुसलमानांनीं तरी, आपल्या पूर्वगामी हिंदु व जैन इमारतींचा कित्ता उचलिला. गुजराथेंतील चालुक्यवंशी सिद्धराज व कुमारपाल यांच्या वेळच्या इमारतींत अप्रतिम कौशल्य भरलेलें होतें, (Vincent Smith).

स. १५०५त एक मोठा धरणीकंप होऊन आग्र्याचा पुष्कळ नाश झाला. त्या वेळीं जगत्प्रलय होतो असें लोकांस वाटलें. दिल्ली सोडून आग्र्यास जाऊन राहणारा पहिला सुलतान सिकंदर लोदी होय. सिकंदरा म्हणून आग्र्याजवळ एक गांव आहे, तेथें अकबराची सुंदर कबर आहे. तें गांव व तेथील बारदारी हीं सिकंदर लोदीनें स. १४९५त बांधिलेलीं आहेत.

मुसलमानांचीं जीं बांधकामें सर्वत्र दिसून येतात, तीं केवळ राजेलोकांनींच केलेलीं आहेत असें नाहीं. तर बागा, वाडे, विहिरी, सराई वगैरे लोकोपयोगी कामें अनेक धनवान व परोपकारी लोकांनीं स्वतःच्या खासगी पैशानें केलेलीं आहेत.

**८. आशियायूरोपच्या तत्कालीन संस्कृतींची तुलना.**—आशियाखंडांतील लोकांविषयीं जी माहिती उपलब्ध आहे, ती बहुतेक मुसलमानांनीं व पाश्चात्यांनीं लिहिलेली असून, येथील लोकांविषयीं त्यांनीं पदोपदीं अनादर व्यक्त केला आहे. आशियांतील लोक अज्ञानांधकारांत निमग्न आहेत, राष्ट्राची सुधारणा म्हणजे काय व एकंदर जनहित कशांत आहे हें त्यांस कधींच कळलें नाहीं; तयमूरलंगासारखे पुरुष मानवजातीचे शत्रु होत; अशा प्रकारचे उद्गार आपण वारंवार ऐकितों. पण हीं मतें देतांना बाराव्या शतकांतील लोकांच्या गुणदोषांचें निरीक्षण आपण एकुणिसाव्या शतकांतील अत्यंत विभिन्न तुलनादृष्टीनें करितों हें विसरतां कामा नये. तयमूरलंग कितीही दुष्ट असला, तरी त्याच्या वेळच्या पाश्चत्य पुरुषांशीं त्याची तुलना केली असतां, ती खचित शोभण्यासारखी आहे. त्याची दरबारची टापटीप, त्याचे राज्यकारभार चालविण्याचे नियम, व त्याचा दरारा ह्या गोष्टी पाहूं गेलें असतां, त्यांत शहाणपणा व जन-

हितेच्छा नाहीं असें म्हणतां येत नाहीं. त्याचें खरें वैभव पाहवयाचें असेल तर प्राच्येतिहासकारांचेच ग्रंथ वाचले पाहिजेत. युरोपांतील अज्ञानरूपी महानिद्रेंतून युरोपीय राष्ट्रांस जागें करण्यास मुळारंभीं चंगीझखान व तयमूर ह्यांच्याच स्वाऱ्या कारण झाल्या आहेत. ह्यांनीं स्वाऱ्या करून जीवितादि सर्वस्वाचा विध्वंस केल्यामुळें, युरोपीय लोक दचकून जागे झाले; आणि स्वातंत्र्य, स्वराज्यभक्ति वगैरे पुढें कालांतरानें विकास पावलेल्या गुणसमुदायाची त्यांच्या ठिकाणीं प्रारंभीं प्रेरणा झाली. तयमूरचा नातू उलूघबेग ह्यानें सन १४३७त समर्कंद येथें एक ज्योतिषपाठशाला व वेधगृह स्थापिलें. एवढें अवाढव्य काम सर्व भूतलावर दुसरें कोठेंही नाहीं. प्रसिद्ध टायकोब्राही ह्यानें अशीच वेधशाळा डेन्मार्कांत स्थापिली, तेव्हां उलूघबेगची ज्योतिषशाला स्थापन होऊन १४० वर्षें झालीं होतीं. ग्रीक लोकांच्या वेळेस अलेक्झांड्रिया येथें गणितादि शास्त्रांचा उत्कर्ष झाला, त्यानंतर बगदाद, कोर्डोव्हा, सेव्हिल, तांजर्स आणि समर्कंद हीं ठिकाणें एकामागून एक विद्यासंपन्न होत गेलीं. टायकोब्राही जन्मास येण्यापूर्वीं ती विद्या पाश्चात्यांस लाभली नव्हती. मुसलमान लोकांत जे पुरुष विद्येनें लौकिकास चढले, त्यांतील उलूघबेग हा शेवटचा होय. ज्योतिषशास्त्राच्या अभ्यासाकरितां त्यानें अवाढव्य उपकरणें तयार केलीं; आणि त्यांच्या मदतीनें ग्रह व नक्षत्रें ह्यांच्या गतीचे वेध घेऊन ते प्रसिद्ध केले. उलूघबेगची वेधशाळा तीन मजल्यांची होती. समर्कंद शहरांतील इमारती व कलाकौशल्याचीं कामें तयमूरच्या वेळेस सर्व पृथ्वींत अग्रगण्य असून तें शहर फार नांवाजलेलें होतें. पृथ्वीच्या सर्व भागांतून तयमूरनें कारागीर आणविले होते. ज्योतिषशास्त्र, गणित, काव्य व त्या काळाला अनुरूप अशीं इतर विद्यांगें ह्यांची तेथें चांगलीच भरभराट होती. या गोष्टी ध्यानांत धरून मग तयमूरसारख्या पुरुषांविषयीं योग्य तें मत द्यावयास पाहिजे.

बारा, तेरा, व चौदा ह्या तीन शतकांत युरोपियन राष्ट्रांची अंतःस्थिति बरीच हीन होती. रस्ते, इमारती, गाड्या, कपडा, शिल्पकला, इत्यादि बाबतींत हिंदुस्थानदेश युरोपहून श्रेष्ठ होता. विजापूर, जोनपूर येथील उत्कृष्ट इमारती अद्यापि जर लोकांस थक्क करितात, तर त्या वेळचें काय वर्णन करावें ! भाषेचा, वाङ्मयाचा, किंवा व्याकरणाचा

युरोपांत उदय सुद्धां नव्हता, त्या वेळेस हिंदुस्थानांत उत्तमोत्तम कोश, व्याकरणें, नाटकें, काव्यें, व अलंकार, न्याय तर्क इत्यादिकांवर सर्वमान्य ग्रंथ होऊन चुकले होते. ही गोष्ट मनांत आणिली म्हणजे परकीय अंमलाखालीं सुद्धां वरील काळांत हिंदुस्थानची स्थिति बरीच समाधानकारक होती असें म्हणावें लागतें. युरोपांत अज्ञानांधकार भरला होता. इंग्लंडच्या उदयास आरंभ नव्हता; इटलीच्या पुनर्जन्माची वार्ता नव्हती. जर्मनी व फ्रान्स येथें बादशाही अंमल नांदत होता, तरी समाज एकंदरींत हीन स्थितींतच होता. पुस्तकें छापण्याच्या कलेस आरंभ होऊन ज्ञानवृद्धि होण्यास युरोपांत अजून अवकाश होता. तत्पूर्वी यूरोपचे लोक अज्ञानी असून हिंदुस्थानच्या मानानें फारच मागसलेले होते. अटलांटिक महासागरांत अगर आफ्रिकेच्या दक्षिणटोकापर्यंत सुद्धां जाण्याची यूरोपच्या खलाशांस छाती होत नसे अशा वेळीं, काठेवाडच्या खलाशांनीं पूर्वेस जावा, सुमात्रा, बोर्निओ व जपान, आणि पश्चिमेस आफ्रिकेच्या दक्षिणकिनाऱ्यापावेतों समुद्रप्रवास करून आपल्या वसाहती स्थापिल्या होत्या. व्यापाराच्या संबंधानें यूरोपखंड किती मागसलेलें होतें, याचें वर्णन ब्रिटिश रियासतींत पाहवें. अर्वाचीन युरोपांत मुत्सद्दी पुरुषाचें नांवही नव्हतें, अशा वेळीं हिंदुस्थानांत महंमद गवान, आसदखान, माधवाचार्य, विद्यारण्य, ह्यांच्यासारखे राज्यकरणकुशल पुरुष निपजले.

युरोपीय राष्ट्रें ह्या वेळेस नूतन ज्ञानाच्या बालार्कप्रकाशानें नुक्तींच कोठें जागीं होऊं लागलीं होतीं. पहिला मोगल बादशहा बाबर हा योग्यतेनें व ज्ञानानें ह्या पुनरुज्जीवनाच्या काळास शोभणारा असा होता. इंग्लंड व स्कॉटलंड ह्या दोन देशांमध्यें फ्लॉडनफील्ड येथें प्रचंड युद्ध होऊन स्कॉटलंडच्या मध्यकालीन सरदार लोकांचा पाडाव झाला. क्रिस्ती व मुसलमान यांच्यांत सारखे झगडे चालू होते. क्रिस्तीधर्माची भ्रष्टता जगास दाखविण्यासाठीं लूथरसारख्या माहात्म्यांनी जिवापाड मेहनत सुरू केली, तिच्या योगानें सर्व यूरोपखंडभर धर्मजागृति झाली. प्रसिद्ध चित्रकार मिकेल अँजेलो ह्यानें रोमशहरीं सेंटपीटर्स नांवाचें विख्यात मंदिर बांधण्याचें काम सुरू केलें. सन १४५३ त तुर्क लोकांनीं पूर्वरोमन बादशाहीचा पाडाव करून कान्स्टांटिनोपल ऊर्फ कुस्तंतुनिया हें शहर काबीज केलें, तेथें तुर्क

बादशहा आजतागाईत राज्य करीत आहे. होकायंत्राच्या शोधानें भूगोल-शास्त्रांत प्रगति होऊन कोलंबसासारख्या साहसी पुरुषांनीं अमेरिका खंड पाश्चात्यांचे आटोक्यांत आणून दिलें. हिंदुस्थानांत पोर्तुगीज लोकांचा प्रवेश झाला. इंग्लंडांत आठवा हेन्री, फ्रान्सावर पहिला फ्रान्सिस, जर्मनी व स्पेन येथें पांचवा चार्लस, असे पराक्रमी राजे युरोपांत राज्य करीत असतां, हिंदुस्थानांत मोगल बादशाहीची स्थापना झाली. युरोपांत अज्ञानांधकाराचा झपाट्यानें नाश होत चालला असतां, पूर्वेकडे हिंदुस्थानांत नवीन ज्ञानवृद्धि तर दूरच, पण असलेली सुधारणा व ज्ञान ह्यांचा तितक्याच झपाट्यानें ऱ्हास होत चालला होता. नाहीं म्हणण्यास मराठी भाषेस मात्र या काळीं नवीन चलन मिळूं लागलें. संस्कृत भाषेचा अभ्यास उत्तरोत्तर नष्ट होत चालल्यामुळें तींतील ज्ञानभांडाराचा लाभ बहुतेकांस दुर्मीळ झाला. तेव्हां ज्ञानदेवासारख्या पंडितांनीं संस्कृतांतील ज्ञानभांडार फोडून, आबालवृद्ध महाराष्ट्रीयांस तें लुटण्यास खुलें करून दिलें. ज्ञानदेवाचा हा कित्ता असाच वळविण्याचा प्रघात पडल्यामुळें मराठींत अनेक विद्वान् पंडित व संत-कवि निपजून, त्यांनीं संस्कृताच्या धर्तीवर मराठींत मोठमोठे ग्रंथ रचिले.

प्राचीन काळापासून देशोदेशचे प्रवासी निरनिराळ्या हेतूंनीं ह्या देशांत येऊन परत जात. अशा प्रवाशांस येथें जें कांहीं विशेष चमत्कारिक वाटलें, तें परत गेल्यावर त्यांनीं स्वभाषेंत लिहून ठेविलें. अशा प्रवासवृत्तांचीं अनेक पुस्तकें तर्जुम्याचे रूपानें बहुतेक पाश्चात्य भाषांत प्रसिद्ध झालीं आहेत. फा हियान नांवाचा बुद्धधर्मानुयायी चिनी प्रवासी त्या धर्माची प्रत्यक्ष माहिती घेण्याकरितां हिंदुस्थानांत आला होता. ह्या प्रवासांत इ. स. ३९९ पासून ४१४ पर्यंत त्याचीं पंधरा वर्षें गेलीं. त्याचें प्रवासवृत्त प्राचीन इतिहासांत येत असल्यामुळें तें येथें दाखल करण्याची जरूर नाहीं. त्याच्यानंतर इ. स. ६२९ पासून सन ६४५ पर्यंत हियौअन्त्संग नांवाचा दुसरा एक बुद्धधर्मी चिनी गृहस्थ या देशांत फिरत होता. त्याची निरीक्षणशक्ति विशेष तीव्र असल्यामुळें, त्याच्या हकीगतीवरून आपल्या देशांतील अनेक संशयप्रचुर प्रश्नांचा सुरेख उलगडा होतो. पण ह्याचेंही प्रवासवृत्त प्रस्तुत कार्यास उपयोगाचें नाहीं.

मार्को पोलो नांवाचा एक व्हेनिस शहरचा व्यापारी तेराव्या शतकांत ह्या देशांत प्रवास करीत होता, त्याचें वर्णन ब्रिटिश रियासतींत आलें आहे, (प्र. २, कलम ४). तो बहुतेक पश्चिम व पूर्वकिनाऱ्यांवरून फिरला. कन्याकुमारी येथें मुक्काम करून त्यानें आपलें प्रवासवृत्त लिहिलें. कुमारी या शब्दाचाच अपभ्रंश कामोरिन आहे. त्या ठिकाणास हें नांव पडण्याचें कारण असें आहे, कीं वसुदेवाची मुलगी माया कंसाच्या हातून सुटून गेली; तिचें देवालय कुमारी या नावानें त्या ठिकाणीं प्रसिद्ध आहे. मार्को पोलो असें वर्णन करितो, कीं कुमारीच्या आसपास एका विशिष्ट प्रकारचीं माकडें त्या वेळेस होतीं, तीं अगदीं मनुष्यांसारखीं दिसत. रामाची वानरसेना हीच नसेल ना? मार्को पोलोचें त्या वेळचें वर्णन हल्लींच्या वस्तुस्थितीशीं बहुतेक मिळतें आहे. दक्षिणद्वीपकल्पांत पांच राज्यें होतीं, त्यांचें वर्णन मागें आलेंच आहे. पूर्वकिनाऱ्यावर कायल नांवाच्या बंदरीं मोठा व्यापार चालत असे. विशेषतः इराणांतून व आरबस्तानांतून तेथें घोडे येत. चीनचे व्यापारी तेथें पुष्कळ माल आणीत. हल्लीं हें बंदर अगदीं अप्रसिद्ध आहे. मद्रासजवळ सेंट टॉमस साधूचें देवालय होतें. हा साधु क्रिस्ताच्या पहिल्या शतकांत इकडे आला, व त्यानें पुष्कळांस क्रिस्ती केलें. त्रावणकोरच्या राज्यांत पुष्कळ क्रिस्ती व ज्यू लोक राहत होते. क्किलोन हें त्रावणकोरांत भरभराटीचें बंदर होतें.

कोकणप्रांताचें मार्को पोलोनें केलेलें वर्णन फार मनोरम आहे. ' ह्या प्रांतांतलि ब्राह्मणांइतके हुशार व्यापारी सर्व जगांत मिळावयाचे नाहींत. केवढेंही संकट आलें, तरी ते खोटें बोलत नाहींत. मद्य व मांस ह्यांस ते शिवतसुद्धां नाहींत. ते यज्ञोपवीत धारण करितात. आपल्या बायकांशीं ते विशेष अनुरक्त आहेत. ते मूर्तिपूजक असून शकुनांवर भरंवसा ठेवितात. ताकभात खाऊन ते फार दिवस वांचतात. दीडशें दोनशें वर्षे कोंकणी लोक वांचल्याचीं उदाहरणें आहेत. कित्येक असामी अंगास भस्म फांसून साधुवृत्तीनें राहतात. लोक जेवणास केळीचीं पानें वापरितात. ते जीवजंतू मारीत नाहींत. ' असें या व्हेनीसच्या व्यापाऱ्यानें लिहून ठेविलें आहे.

हितेच्छा नाहीं असें म्हणतां येत नाहीं. त्याचें खरें वैभव पाहवयाचें असेल तर प्राच्येतिहासकारांचेच ग्रंथ वाचले पाहिजेत. युरोपांतील अज्ञानरूपी महानिद्रेंतून युरोपीय राष्ट्रांस जागें करण्यास मुळारंभीं चंगीझखान व तयमूर ह्यांच्याच स्वाऱ्या कारण झाल्या आहेत. ह्यांनीं स्वाऱ्या करून जीवितादि सर्वस्वाचा विध्वंस केल्यामुळें, युरोपीय लोक दचकून जागे झाले; आणि स्वातंत्र्य, स्वराज्यभक्ति वगैरे पुढें कालांतरानें विकास पावलेल्या गुणसमुदायाची त्यांच्या ठिकाणीं प्रारंभीं प्रेरणा झाली. तयमूरचा नातू उलूघबेग ह्यानें सन १४३७त समर्कंद येथें एक ज्योतिषपाठशाला व वेधगृह स्थापिलें. एवढें अवाढव्य काम सर्व भूतलावर दुसरें कोठेंही नाहीं. प्रसिद्ध टायकोब्राही ह्यानें अशीच वेधशाळा डेन्मार्कांत स्थापिली, तेव्हां उलूघबेगची ज्योतिषशाला स्थापन होऊन १५० वर्षे झालीं होतीं. ग्रीक लोकांच्या वेळेस अलेक्झांड्रिया येथें गणितादि शास्त्रांचा उत्कर्ष झाला, त्यानंतर बगदाद, कोर्डोव्हा, सेव्हिल, तांजर्स आणि समर्कंद हीं ठिकाणें एकामागून एक विद्यासंपन्न होत गेलीं. टायकोब्राही जन्मास येण्यापूर्वी ती विद्या पाश्चात्यांस लाभली नव्हती. मुसलमान लोकांत जे पुरुष विद्येनें लौकिकास चढले, त्यांतील उलूघबेग हा शेवटचा होय. ज्योतिषशास्त्राच्या अभ्यासाकरितां त्यानें अवाढव्य उपकरणें तयार केलीं; आणि त्यांच्या मदतीनें ग्रह व नक्षत्रें ह्यांच्या गतीचे वेध घेऊन ते प्रसिद्ध केले. उलूघबेगची वेधशाळा तीन मजल्यांची होती. समर्कंद शहरांतील इमारती व कलाकौशल्याचीं कामें तयमूरच्या वेळेस सर्व पृथ्वींत अग्रगण्य असून तें शहर फार नांवाजलेलें होतें. पृथ्वीच्या सर्व भागांतून तयमूरनें कारागीर आणविले होते. ज्योतिषशास्त्र, गणित, काव्य व त्या काळाला अनुरूप अशीं इतर विद्यांगें ह्यांची तेथें चांगलीच भरभराट होती. या गोष्टी ध्यानांत धरून मग तयमूरसारख्या पुरुषांविषयीं योग्य तें मत द्यावयास पाहिजे.

बारा, तेरा, व चौदा ह्या तीन शतकांत युरोपियन राष्ट्रांची अंतःस्थिति बरीच हीन होती. रस्ते, इमारती, गाड्या, कपडा, शिल्पकला, इत्यादि बाबतींत हिंदुस्थानदेश युरोपहून श्रेष्ठ होता. विजापूर, जोनपूर येथील उत्कृष्ट इमारती अद्यापि जर लोकांस थक्क करितात, तर त्या वेळचें काय वर्णन करावें ! भाषेचा, वाङ्मयाचा, किंवा व्याकरणाचा

युरोपांत उदय सुद्धां नव्हता, त्या वेळेस हिंदुस्थानांत उत्तमोत्तम कोश, व्याकरणें, नाटकें, काव्यें, व अलंकार, न्याय तर्क इत्यादिकांवर सर्वमान्य ग्रंथ होऊन चुकले होते. ही गोष्ट मनांत आणिली म्हणजे परकीय अंमलाखालीं सुद्धां वरील काळांत हिंदुस्थानची स्थिति बरीच समाधानकारक होती असें म्हणावें लागतें. युरोपांत अज्ञानांधकार भरला होता. इंग्लंडच्या उदयास आरंभ नव्हता; इटलीच्या पुनर्जन्माची वार्ता नव्हती. जर्मनी व फ्रान्स येथें बादशाही अंमल नांदत होता, तरी समाज एकंदरींत हीन स्थितींतच होता. पुस्तकें छापण्याच्या कलेस आरंभ होऊन ज्ञानवृद्धि होण्यास युरोपांत अजून अवकाश होता. तत्पूर्वी यूरोपचे लोक अज्ञानी असून हिंदुस्थानच्या मानानें फारच मागसलेले होते. अटलांटिक महासागरांत अगर आफ्रिकेच्या दक्षिण-टोकापर्यंत सुद्धां जाण्याची यूरोपच्या खलाशांस छाती होत नसे अशा वेळीं, काठेवाडच्या खलाशांनीं पूर्वेस जावा, सुमात्रा, बोर्निओ व जपान, आणि पश्चिमेस आफ्रिकेच्या दक्षिणकिनाऱ्यापावेतों समुद्रप्रवास करून आपल्या वसाहती स्थापिल्या होत्या. व्यापाराच्या संबंधानें यूरोपखंड किती मागसलेलें होतें, याचें वर्णन ब्रिटिश रियासतींत पाहवें. अर्वाचीन युरोपांत मुत्सद्दी पुरुषाचें नांवही नव्हतें, अशा वेळीं हिंदुस्थानांत महंमद गवान, आसदखान, माधवाचार्य, विद्यारण्य, ह्यांच्यासारखे राज्यकरणकुशल पुरुष निपजले.

युरोपीय राष्ट्रें ह्या वेळेस नूतन ज्ञानाच्या बालार्कप्रकाशानें नुक्तींच कोठें जागीं होऊं लागलीं होतीं. पहिला मोगल बादशहा बाबर हा योग्यतेनें व ज्ञानानें ह्या पुनरुज्जीवनाच्या काळास शोभणारा असा होता. इंग्लंड व स्कॉटलंड ह्या दोन देशांमध्यें फ्लॉडनफील्ड येथें प्रचंड युद्ध होऊन स्कॉटलंडच्या मध्यकालीन सरदार लोकांचा पाडाव झाला. क्रिस्ती व मुसलमान यांच्यांत सारखे झगडे चालू होते. क्रिस्तीधर्माची श्रेष्ठता जगास दाखविण्यासाठीं लूथरसारख्या माहात्म्यांनी जिवापाड मेहनत सुरू केली, तिच्या योगानें सर्व यूरोपखंडभर धर्मजागृति झाली. प्रसिद्ध चित्रकार मिकेल अँजेलो ह्यानें रोमशहरीं सेंटपीटर्स नांवाचें विख्यात मंदिर बांधण्याचें काम सुरू केलें. सन १४५३ त तुर्क लोकांनीं पूर्वरोमन बादशाहीचा पाडाव करून कान्स्टांटिनोपल ऊर्फ कुस्तंतुनिया हें शहर काबीज केलें, तेथें तुर्क

बादशहा आजतागाईत राज्य करीत आहे. होकायंत्राच्या शोधानें भूगोलशास्त्रांत प्रगति होऊन कोलंबसासारख्या साहसी पुरुषांनीं अमेरिका खंड पाश्चात्यांचे आटोक्यांत आणून दिलें. हिंदुस्थानांत पोर्तुगीज लोकांचा प्रवेश झाला. इंग्लंडांत आठवा हेन्री, फ्रान्सावर पहिला फ्रान्सिस, जर्मनी व स्पेन येथें पांचवा चार्लस, असे पराक्रमी राजे युरोपांत राज्य करीत असतां, हिंदुस्थानांत मोगल बादशाहीची स्थापना झाली. युरोपांत अज्ञानांधकाराचा झपाट्यानें नाश होत चालला असतां, पूर्वेकडे हिंदुस्थानांत नवीन ज्ञानवृद्धि तर दूरच, पण असलेली सुधारणा व ज्ञान ह्यांचा तितक्याच झपाट्यानें ऱ्हास होत चालला होता. नाहीं म्हणण्यास मराठी भाषेस मात्र या काळीं नवीन चलन मिळूं लागलें. संस्कृत भाषेचा अभ्यास उत्तरोत्तर नष्ट होत चालल्यामुळें तींतील ज्ञानभांडाराचा लाभ बहुतेकांस दुर्मीळ झाला. तेव्हां ज्ञानदेवासारख्या पंडितांनीं संस्कृतांतील ज्ञानभांडार फोडून, आबालवृद्ध महाराष्ट्रीयांस तें लुटण्यास खुलें करून दिलें. ज्ञानदेवाचा हा कित्ता असाच वळविण्याचा प्रघात पडल्यामुळें मराठींत अनेक विद्वान् पंडित व संत-कवि निपजून, त्यांनीं संस्कृताच्या धर्तीवर मराठींत मोठमोठे ग्रंथ रचिले.

प्राचीन काळापासून देशोदेशचे प्रवासी निरनिराळ्या हेतूंनीं ह्या देशांत येऊन परत जात. अशा प्रवाशांस येथें जें कांहीं विशेष चमत्कारिक वाटलें, तें परत गेल्यावर त्यांनीं स्वभाषेंत लिहून ठेविलें. अशा प्रवासवृत्तांचीं अनेक पुस्तकें तर्जुम्याचे रूपानें बहुतेक पाश्चात्य भाषांत प्रसिद्ध झालीं आहेत. फा हियान नांवाचा बुद्धधर्मानुयायी चिनी प्रवासी त्या धर्माची प्रत्यक्ष माहिती घेण्याकरितां हिंदुस्थानांत आला होता. ह्या प्रवासांत इ. स. ३९९ पासून ४१४ पर्यंत त्याचीं पंधरा वर्षें गेलीं. त्याचें प्रवासवृत्त प्राचीन इतिहासांत येत असल्यामुळें तें येथें दाखल करण्याची जरूर नाहीं. त्याच्यानंतर इ. स. ६२९ पासून सन ६४५ पर्यंत हियौअन्त्संग नांवाचा दुसरा एक बुद्धधर्मी चिनी गृहस्थ या देशांत फिरत होता. त्याची निरीक्षणशक्ति विशेष तीव्र असल्यामुळें, त्याच्या हकीगतीवरून आपल्या देशांतील अनेक संशयप्रचुर प्रश्नांचा सुरेख उलगडा होतो. पण ह्याचेंही प्रवासवृत्त प्रस्तुत कार्यास उपयोगाचें नाहीं.

मार्को पोलो नांवाचा एक व्हेनिस शहरचा व्यापारी तेराव्या शतकांत ह्या देशांत प्रवास करीत होता, त्याचें वर्णन ब्रिटिश रियासतींत आलें आहे, (प्र. २, कलम ४). तो बहुतेक पश्चिम व पूर्वकिनाऱ्यांवरून फिरला. कन्याकुमारी येथें मुक्काम करून त्यानें आपलें प्रवासवृत्त लिहिलें. कुमारी या शब्दाचाच अपभ्रंश कामोरिन आहे. त्या ठिकाणास हें नांव पडण्याचें कारण असें आहे, कीं वसुदेवाची मुलगी माया कंसाच्या हातून सुटून गेली; तिचें देवालय कुमारी या नावानें त्या ठिकाणीं प्रसिद्ध आहे. मार्को पोलो असें वर्णन करितो, कीं कुमारीच्या आसपास एका विशिष्ट प्रकारचीं माकडें त्या वेळेस होतीं, तीं अगदीं मनुष्यांसारखीं दिसत. रामाची वानरसेना हीच नसेल ना ? मार्को पोलोचें त्या वेळचें वर्णन हल्लींच्या वस्तुस्थितीशीं बहुतेक मिळतें आहे. दक्षिणद्वीपकल्पांत पांच राज्यें होतीं, त्यांचें वर्णन मागें आलेंच आहे. पूर्वकिनाऱ्यावर कायल नांवाच्या बंदरीं मोठा व्यापार चालत असे. विशेषतः इराणांतून व आरबस्तानांतून तेथें घोडे येत. चीनचे व्यापारी तेथें पुष्कळ माल आणीत. हल्लीं हें बंदर अगदीं अप्रसिद्ध आहे. मद्रासजवळ सेंट टॉमस साधूचें देवालय होतें. हा साधु क्रिस्ताच्या पहिल्या शतकांत इकडे आला, व त्यानें पुष्कळांस क्रिस्ती केलें. त्रावणकोरच्या राज्यांत पुष्कळ क्रिस्ती व ज्यू लोक राहत होते. क्विलोन हें त्रावणकोरांत भरभराटीचें बंदर होतें.

कोकणप्रांताचें मार्को पोलोनें केलेलें वर्णन फार मनोरम आहे. ‘ ह्या प्रांतांतील ब्राह्मणांइतके हुशार व्यापारी सर्व जगांत मिळावयाचे नाहींत. केवढेंही संकट आलें, तरी ते खोटें बोलत नाहींत. मद्य व मांस ह्यांस ते शिवतसुद्धां नाहींत. ते यज्ञोपवीत धारण करितात, आपल्या बायकांशीं ते विशेष अनुरक्त आहेत. ते मूर्तिपूजक असून शकुनांवर भरंवसा ठेवितात. ताकभात खाऊन ते फार दिवस वांचतात. दीडशें दोनशें वर्षें कोकणी लोक वांचल्याचीं उदाहरणें आहेत. कित्येक असामी अंगास भस्म फांसून साधुवृत्तीनें राहतात. लोक जेवणास केळीचीं पानें वापरितात. ते जीवजंतू मारीत नाहींत. ’ असें या व्हेनीसच्या व्यापाऱ्यानें लिहून ठेविलें आहे.

गुजराथेंत त्या वेळीं कातड्याचें काम, विणकाम व कशिद्याचें काम फार सुरेख होत असे. ठाणें, खंबायत, सोमनाथ हीं व्यापाराचीं प्रसिद्ध ठिकाणें होतीं.

मुसलमान व हिंदु अगदीं भावाभावांसारखे वागत. दोघांतलेही श्रीमंत व सरदार वगैरे लोक हरहंमेश एकमेकांच्या घरीं जात, एकमेकांच्या उपयोगी पडत, आणि एका कामांत संविभागी होत. समारंभ, उत्सव किंवा उरूस वारंवार होत, त्यांत दोनही लोक सामील होत. अशा प्रसंगीं सर्व प्रकारचे साधु, वैरागी, फकीर, व्यापारी व कामकरी लोक एकत्र जमत, निरनिराळ्या विषयांवर वादविवाद करीत, आणि अनेक प्रकारचे व्यवहार एकमेकांशीं करीत. अशा अर्थानें ह्या दोनही समाजांचा अगदीं एकजीव झाला होता असें म्हणण्यास हरकत नाहीं.

राज्यकारभारांत मुसलमानांनीं कितीही कुशलता दाखविली असली, तरी त्यांच्या कर्तबगारीचा एकंदरीनें विचार केला असतां, जिंकिलेल्या लोकांची स्थिति खरोखर सुधारून त्यांस उन्नत सुखावस्थेप्रत आणण्याचा प्रयत्न ह्या कालांत बहुधा कोणींही केलेला दिसत नाहीं. हा कष्टमय परिणाम मनांत आला म्हणजे ह्या मुसलमान राज्यकर्त्यांविषयीं मनांत खेद उत्पन्न होतो. रोमन किंवा इतर युरोपियन राष्ट्रांना अशा कामीं आपल्या कर्तव्याची जबाबदारी ज्यास्त वाटत होती, असें दिसून येतें. रोमन लोकांनीं जिंकलेल्या लोकांस सन्मार्गास लाविलें. त्याच्या उलट प्रकार येथें झाला. येथील रणशूर रजपुतांना नाहींसें करून, आणि त्यांच्यांत फाटाफूट पाडून, आपलें राज्य कायम ठेवण्याकडेच मुसलमान राज्यकर्त्यांची दृष्टि होती. ह्या परकी अंमलापासून हिंदुस्थानचा फायदा झालेला दिसत नाहीं. सारांश, पांचशें वर्षांच्या ह्या काळांतील हिंदुस्थानच्या स्थितीचा सामग्र्यानें विचार केला असतां, अनेक चमत्कारिक भावना मनांत उत्पन्न होतात, आणि विचारशक्ति अधिकाधिक गुंग होऊन जाते. किंबहुना, हिंदुस्थानदेशाचा एकंदर इतिहासच अशा प्रकारचा अक्कल गुंग करून टाकणारा आहे, असें वाटूं लागतें. पृथ्वीवरील सर्व राष्ट्रांस आजपर्यंत हिंदुस्थाननें नाचविलें आहे, आणि पुढेंही नाचवील असा संभव दिसतो. लॉर्ड कर्झनचे खालील उद्गार सर्वथैव खरे आहेत ह्यांत संशय नाहीं. ‘ हिंदु-

स्थानचा इतिहास, तेथील राज्यांच्या घडामोडी, व तेथचे प्रचंड उत्पात, ह्यांच्या योगानें एकंदर मनुष्यजातीवर जेवढा परिणाम घडला आहे, तेवढा बहुवा दुसऱ्या कशानेंही घडला नसेल.*

---

# प्रकरण विसावें.

## मोगलवंश.

## जहीरुद्दीन महंमद बाबर.

### इ. स. १५२६–१५३०.

१. पूर्ववृत्त, (ज. १४८३). २. मध्यआशियांतील नशिबाचे खेळ. ३. पानपतची लढाई व हिंदुस्थान कार्बाज. ४. शिक्रीची लढाई, राणासंगचा पाडाव. ५. इतर शत्रूंचा पाडाव व मृत्यु. ६. बाबराची योग्यता. ७. बाबराचें आत्मचरित्र.

**१. पूर्ववृत्त, (स. १४८३–९४).**—जहीरुद्दीन महंमद बाबर हा तयमूरलंगाचा सहावा वंशज होय. त्याचा आजा अबू सईद् मीर्झा हा तयमूरनें जिंकिलेल्या विस्तृत राज्याचा मालक होता. अबू सईद् यास अकरा मुलगे होते. त्या सर्वांनीं त्याच्या मरणानंतर तें राज्य वांटून घेतलें. चवथा मुलगा उमरशेख मीर्झा हा बाबरचा बाप होय. उमरशेख याजला प्रथम काबूलचें राज्य मिळालें होतें, परंतु तें त्याजकडून जाऊन सिरदर्या नदीच्या उगमाजवळील फरगाना प्रांत त्यास मिळाला. झगताई म्हणून चंगीझखानाचा एक मुलगा होता. हेंच नांव पुढें एका तुर्क टोळीस प्राप्त झालें. ह्या झगताईचा महंमूदखान म्हणून एक वंशज होता. त्याची बहीण उमरशेख याजला दिली होती. म्हणून बाबर हा आई-कडून चंगीझखानाचा व बापाकडून तयमूरलंगाचा वंशज होय. फर-गाना प्रांत म्हणजे कवि व विद्वज्जन यांचें आगर अशी ख्याति होती.

---

* 'The history, politics and apheavals of India have left a greater impress than almost any other, upon the history of mankind.' Lord Curzon's speech at Eton-Prize Essay, 1909.

उमरशेख मीर्झा हा विद्वान् असून कवींचा आश्रयदाता व महत्त्वाकांक्षी होता. तसाच तो उदार, शूर व न्यायदक्षही होता असें बाबरनें लिहिलें आहे.

फेब्रुवारी, ता. १४ स. १४८३ रोजीं बाबराचा जन्म झाला. बाबर हा बापाकडून तयमूरलंग तुर्कांचा व आईकडून चंगीझखान मोगलाचा वंशज होता. तयमूरलंग स. १४०५ त वारला, त्या वेळीं त्याचें राज्य जरी अफाट होतें, तरी त्याची व्यवस्थित जुळवाजुळव झालेली नव्हती; म्हणून लगेच त्याचे तुकडे होऊन त्याच्या वंशजांच्या हातांत मध्यआशियांतला ऑक्सस् ऊर्फ अमूदर्या व जक्झार्टस् ऊर्फ सिरदर्या ह्या दोन नद्यांच्या मधला प्रदेश होता. तयमूरचा वंशविस्तार मोठा असून, प्रत्येक वंशजाच्या हातीं कांहींना कांहीं कारभार होता. बाबरचा चुलता सुलतान अहंमद मीर्झा हा समर्कंद येथें राज्य करीत असे. पूर्वेस हिसार येथें त्याचा दुसरा चुलता महंमूद ह्याचें राज्य होतें. तिसरा चुलता उलूघबेग ह्याच्या ताब्यांत काबूल व गज्नी हे प्रांत होते; आणि बाबरचा बाप उमरशेख मीर्झा ह्याचा अंमल फरगाना प्रांतावर होता. हा प्रांत सिरदर्या नदीच्या उगमाशीं असून, त्यास हल्लीं खोकंद असें म्हणतात. ह्या प्रांताची राजधानी अंदिजान शहर असून, आक्शी म्हणून दुसरें एक मजबूद शहर त्या प्रांतांत होतें. हा सर्व प्रदेश डोंगराळ असून बराच बर्फाच्छादित असतो. बाबरचा बाप उमरशेख मीर्झा हा आक्शी येथें ता. ९ जून, १४९४ रोजीं डोंगरावरून खालीं घसरून मरण पावला. 'जून १४९४ त मला फरगाना प्रांताचें राज्य प्राप्त झालें,' हें बाबरच्या आत्मचरित्रांतलें पहिलें वाक्य आहे.

वर सांगितलेल्या तयमूरच्या वंशजांच्या राज्यापलीकडे, पूर्वेस व उत्तरेस, चंगीझखानाचे मोगल वंशज आपला आनुवंशिक लुटीचा धंदा करून राहत होते. त्यांत यूनसखान म्हणून एक बराच प्रसिद्ध पुरुष होता. बाबरचा आजा सुलतान अबू सईदमीर्झा ह्यानें यूनसखानास पुष्कळ साह्य केल्यामुळें, त्यानें आपल्या तीन मुली अबू सईद मीर्झाच्या तिघां मुलांस दिल्या; त्यांतील एक कुत्लक निगार खानम ही बाबरची आई होय. यूनसखानाची बायको इसान-दौलत बेगम ही बाबरची आजी पुढें बहुतेक त्याजपाशींच राहत असे. बाबर जन्मला, तेव्हां नांव ठेवण्याच्या समारंभास सत्तर वर्षांचा वृद्ध यूनसखान मुद्दाम अंदिजान येथें आला.

जहीरुद्दीन महंमद हें त्याचें आरबी नांव ठेवण्यांत आलें. पण यूनस-खानास तें परकी नांव चांगलेंसें उच्चारितां येईना, म्हणून त्यानें 'बाबर' हें दुसरें नांव स्वतः त्यास दिलें, त्याच नांवानें तो पुढें प्रसिद्धीस आला. बाबरचा अभ्यास लहानपणीं चांगलाच झाला असला पाहिजे. कारण बाप वारल्यावर त्याजवर ज्या आपत्ति कोसळल्या, त्यांमुळें विद्या शिकण्यास त्यास फुरसत मिळणें शक्य नव्हतें. हें त्याचें लहानपणचें शिक्षण - त्याची आई व आजी ह्यांनीं केलें. ह्या बायांच्या ठिकाणीं मोगलांचे कित्येक अस्सल गुण कायम होते; आणि अनेक संकटें आलीं असतांही ह्या बायांनीं त्यास कधीं सोडिलें नाहीं. त्याच्या आजीची योग्यता फार मोठी होती. 'तिचें शहाणपण व अक्कल कोणासही येणार नाहीं. ती मोठी धोरणी असून, पुढें काय प्रकार घडणार तें ती सहज ताडी. तिच्या सांगीवरून मीं अनेक मोठमोठीं कामें हातीं घेतलीं. एकदां तिच्या नव-ऱ्याला व तिला शत्रूंनीं पकडिलें, आणि तिला एका सरदाराच्या हवालीं केलें. पुढें तो सरदार तिच्याकडे आल्याबरोबर, तिनें खोलीचें दार लावून घेतलें, आणि आपल्या बायामंडळीकरवीं त्याचा खून कर-विला. हें पाहून तिचा शत्रु शेख जमाल ह्यास संताप आला. तेव्हां तिनें जबाब दिला, कीं 'मी यूनसखानाची बायको असतां, शेख जमालनें मला दुसऱ्यालाच देऊन टाकिलें, म्हणून मीं त्याचा प्राण घेतला. मर्जी असेल तर त्याबद्दल माझा जीव घ्या, मी तयार आहें.' हा रोखठोक जबाब ऐकून जमालखानानें तिला नवऱ्याकडे पोंचविलें. ह्या गोष्टीवरून तिचें प्रखर पाणी व्यक्त होतें. ह्या निर्धारी बाईचाच बाबरास हरएक अडचणींस विशेष उपयोग झाला.

सन १४९४ च्या जून महिन्यांत अंदिजानच्या किल्ल्यावर राज्याचें ओझें बाबराच्या अंगावर येऊन पडलें. त्याबरोबर अनेक शत्रूंनीं चहूं-कडून अंदिजानवर चाल केली; त्यांत त्याचा चुलता समर्कंदचा सुलतान अहंमद हा मुख्य होता. अंदिजानवर येण्यास मध्यें एक लहानशी नदी लागते, तिजवरील पुलावरून अहंमदचे लोक येत असतां, पूल कोसळून बरेच लोक मेले. तेव्हां हा अपशकून समजून अहंमद मीर्झा परत गेला. शिवाय चार वर्षांपूर्वीं ह्याच ठिकाणीं बाबरच्या बापानें अहंमदाच्या फौजेचा पराजय केला होता. ह्याच संधीस कांहीं एका भयंकर सांथीनें अहंमदाचे

पुष्कळ घोडे मेले. अशा अडचणींत बाबरशीं सलोखा करून अहंमदशहा परत गेला; आणि तेवढ्यापुरता बाबरचा बचाव झाला. तथापि बाबरच्या मनांत आपण समर्कंद येथें तयमूरच्या सिंहासनावर बसावें असें फार होतें. हा नाद त्यानें पंचवीस वर्षें एकसारखा चालविला होता. तीनदां समर्कंद राजधानी त्याच्या हातांत पडली, पण तीनदांही ती हातची गेली. त्यामुळें उद्विग्न होऊन शेवटीं त्यानें आपला मोर्चा हिंदुस्थानकडे फिरविला. ह्या पंचवीस वर्षांच्या युद्धप्रसंगांत व अडचणींत जें अमोलिक शिक्षण त्यास मिळालें, त्याच्या योगानें हिंदुस्थानांत नवीन राज्य कमावण्याची योग्यता त्याच्या अंगीं उत्पन्न झाली.

**२. मध्यआशियांतले नशिबाचे खेळ, (१४९४–१५१९).**—मध्यआशियांतील बाबराच्या झटापटी कल्पित कादंबरीलाही शोभण्यासारख्या आहेत. समर्कंद, बुखारा, बाल्क हीं शहरें शिकंदर बादशहाच्या वेळेपासून प्रसिद्धीस येऊन हजारों वर्षांच्या घडामोडींत संपन्न व सुंदर झालीं होतीं. तेथें अनेक विद्याकलांचा उत्कर्ष झाला होता. अमूदर्या व सिरदर्या ह्या दोन नद्यांच्यामधील प्रांत अत्यंत सुपीक व रमणीय आहे. त्यांच्या मुळाशीं वर फरगाना प्रांत आहे, त्यास एखाद्या उत्कृष्ट बागाची उपमा देतां येईल. ‘ द्राक्षें, डाळिंबें, खरबुजें, इत्यादि फळें अंदिजान व आक्शी येथें होतात तशीं दुसऱ्या कोठें होत नाहींत ’ असें बाबर म्हणतो. आक्शीच्या खरबुजांचें वर्णन तर पदोपदीं आढळतें. आपल्या नातेवाइकांचीं व तत्कालीन अनेक पुरुषांचीं वर्णनें बाबरनें आपल्या आत्मचरित्रांत दिलीं आहेत. त्याचे बरेच नातेवाईक व स्नेही त्याच्या अगदीं भजनीं असत. लहानपणापासून दुसऱ्याचें चित्त आपणाकडे आकर्षून घेण्याची कला बाबरास चांगली साधलेली होती. तथापि ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं अगदीं भरंवशाच्या लोकांनीं त्यास सोडून दिल्याचे प्रसंग कांहीं थोडेथोडके आले नाहींत. पुष्कळदां असा प्रकार घडावा, कीं आतां पुढें बाबरास कांहीं एक आशा उरलेली नाहीं. सर्वांनीं त्यास सोडून द्यावें. तथापि त्याचा स्वतःचा दम कधीं खचला नाहीं. आपण आपला भाग्योदय काढणार, ही त्याची निष्ठा अक्षय होती. ह्या निष्ठेच्या जोरावरच त्याचे बेत सिद्धीस गेले.

समर्केद येथें अहंमद मीर्झा राज्य करीत होता, तो मरण पावला, व बाबरचा दुसरा चुलता महंमूद मीर्झा ह्यास तें राज्य मिळालें. पण तोही स. १४९५ त मरण पावल्यावर अनेक असामी समर्केदवर चालून गेले, त्यांत बाबरही गेला. नोव्हेंबर स. १४९७ त समर्केद त्याच्या हातांत आलें. तयमूरच्या राजधानींत त्यास राज्याभिषेक झाला, आणि त्या ठिकाणीं आपला नीट बंदोबस्त करण्याच्या उद्योगास तो लागला. त्या वेळीं त्यानें आपल्या सरदारांस व फौजेस समर्केद शहरांत लूट करूं दिली नाहीं, म्हणून नाखूष होऊन एकामागून एक त्याचे लोक बाबरास सोडून गेले. अशा अडचणींत तो स्वतः अतिशय आजारी पडला. चार दिवसपर्यंत बोलणेंसुद्धां बंद होतें. ही बातमी अंदिजान येथें पोंचून त्या शहरावर शत्रु चाल करून आले, तेव्हां अंदिजानच्या बचावास त्वरा करून यावें, अशीं निकडीचीं पत्रें बाबरास येऊन, थोडा बरा झाल्यावर तो लगेच समर्केद सोडून निघाला. त्याबरोबर इकडे त्याचा चुलतभाऊ सुलतान अली ह्यानें समर्केद काबीज केलें, आणि तिकडे त्याचा भाऊ जहांगीर मीर्झा ह्यानें विश्वासघात करून लष्करास वश करून घेऊन अंदिजान घेतलें. समर्केद शहर चांगलें ताब्यांत आलें नव्हतें; तरी वडिलोपार्जित फरगाना प्रांतावर त्याची विशेष प्रीति असल्यामुळें तो एकदम आपल्या भावाची खोड मोडण्यास निघाला. रस्त्यांत त्यास अशी बातमी लागली, कीं आपण मेलों अशी गप्प उठवून जहांगीर मीर्झानें फरगाना प्रांताचें राज्य बळकाविलें. सारांश, समर्केदच्या नादांत, अंदिजानही जाऊन बाबरास वनवास पत्करावा लागला. समर्केद येथें त्याचा मुक्काम फक्त शंभर दिवस होता. चांगले चांगले सर्व लोक त्यास सोडून गेले. फार तर शेंदोनशें टाकाऊ लोक त्याजपाशीं राहिले. 'आतां मात्र माझा धीर अगदीं खचला. माझी चोहोंकडून निराशा झाली, आणि मी एकसारखा रडूं लागलों,' असें त्यानें आत्मचरित्रांत लिहिलें आहे. खोकंद येथें त्याची आई व आजी त्यास येऊन भेटल्या. तेव्हां नवीन हुरूप येऊन तो पुढील उद्योगास लागला. रानांतील नवीन लोकांच्या टोळ्या त्याच्या मदतीस आल्या; आणि लवकरच आक्शी व अंदिजान हीं दोनही शहरें त्याच्या हस्तगत झालीं, (जून, स. १४९९). इतक्यांत पुनरपि युद्धप्रसंग सुरू

होऊन त्याचा भाऊ जहांगीर ह्यास आक्शीचें ठिकाण देणें बाबरास भाग पडलें, (स. १५००); आणि दोघां भावांची गोडी झाली. दोघांनीं मिळून समर्कंद जिंकावें आणि मग फरगाना प्रांत जहांगिरास द्यावा अशी कबुली झाली होती. समर्कंद जिंकण्याची बाबरास फार उत्कंठा लागली होती, इतक्यांत तेथून त्यास बोलावणेंही आलें. स. १५००च्या जून महिन्यांत बाबर पुनः समर्कंदवर निघाला, आणि एके दिवशीं रात्रीं अनायासें बाबराचा शहरांत प्रवेश झाला. त्याबरोबर लोकांत जिकडे तिकडे आनंदी-आनंद झाला. त्याची आई व आजी त्यास येऊन भेटल्या. बाबरास अजून पुष्कळ बंदोबस्त करावयाचा होता. ऊझबेक मोगलांचा सरदार महंमद-शयबानीखान समर्कंद काबीज करण्यास टपला होता. चंगीझखानाचा नातू शयबान म्हणून होता, त्याचा हा वंशज असल्यामुळें, त्यानें शय-बानीखान असें नांव घेतलें. त्याजबरोबर बाबरची लढाई होऊन बाबरचा पुनरपि पराजय झाला. त्याचे सर्व लोक पळून गेले आणि दहापंधरा लोकां-निशीं घोड्यासकट कोहिक नदींतून पोहून तो परत समर्कंद येथें आला. शयबानीनें त्यास वेढा घातला, त्या वेढ्यांतून एके दिवशीं मध्यरात्रीं आपल्या आईआजींसह तो जीव घेऊन पळून गेला. त्या रात्रीच्या त्यांच्या हालांचें चित्तवेधक वर्णन त्यानें दिलें आहे. बरेच दिवस तो डोंगरांतून भटकत होता, त्या वेळीं एक फार वृद्ध बाई त्यास भेटली. तिनें तयमूर-लंगाच्या स्वारीच्या गोष्टी लहानपणीं ऐकिलेल्या होत्या, त्या बाबरास सांगून त्यास हिंदुस्थानवर स्वारी करण्याची भर दिली. पुढें कांहीं दिवस तो आपल्या मामाच्या आश्रयास ताश्कंद येथें गेला. इकडे शयबानी-खानानें आपलें राज्य पुष्कळ वाढविलें. त्यानें ताश्कंदही काबीज केलें, तेव्हां स. १५०३त आक्शी येथें पराभव होऊन, बाबर आपल्या भावासह पळून काबुलाकडे आला.

"अशा अनिश्चित स्थितीनें मी अगदीं कंटाळून गेलों. घर, नाहीं, दार नाहीं, अशा स्थितींत जगावें तरी कशाला! मी मनांत म्हटलें, असल्या हालअपेष्टेंत व विपत्तींत दिवस कंठण्यापेक्षां कोठें तरी एकांतांत जाऊन बसणें बरें. तेथें मला कोणी ओळखणार नाहीं व विचारणारही नाहीं. अशा अपमानांत लोकांस तोंड दाखविण्यापेक्षां मनुष्याचें दर्शन नाहीं अशा ठिकाणीं जिकडे पाय नेतील तिकडे पळून जावें. एकदां

मनांत वाटे चीन देशांत जावें. लहानपणापासून चीन देश पाहण्याची मला उत्कट इच्छा होती. पण मी राजा पडलों ना, राज्य सोडून जायचें कसें. शिवाय माझा गोतवळा व लवाजमा कोठें टाकून द्यायचा! आतां राज्य तर गेलें. तेव्हां एक अडचण दूर झाली. आईची व्यवस्था लागली आहे. तेव्हां आतां वाटेल तिकडे जाण्यास मला कसची आडकाठी!'

काबूल येथें बाबराचा चुलता उलूघबेग राज्य करीत होता, तो सन १५०१ त मरण पावला. त्याच्या अल्पवयी मुलाकडे कारभार आल्यामुळें वजीर सर्व अधिकार बळकावून बसला होता. हा वजीर लोकांस अप्रिय होऊन मारला गेला. अशा घालमेलींत बाबरानें जाऊन काबुलचें राज्य हरण केलें. नंतर थोड्याच दिवसांनीं त्यानें कंदाहार शहर घेतलें, (स. १५०४). ह्या वेळेपासून त्याच्या विचारास व उद्योगास निराळी दिशा लागली. समर्कंदहून काबूल व काबूलाहून दिल्ली असा पूर्वापारचा मार्ग चालत आलेला होता. बाबरनें बरेच लोक जमा केले. स. १५०४ च्या ऑक्टोबर महिन्यांत काबूल त्याच्या हातांत आलें. तेथें नवीन बागा वगैरे करून त्यानें आपली राहण्याची व्यवस्था केली. पुष्कळ नवीन फळांची त्यानें लागवड केली. त्या वेळीं काबूलचा वसूल सुमारें पांच लक्ष रुपये होता. काबूलप्रांत सृष्टिसौंदर्यासंबंधानें उत्कृष्ट होता. तथापि तेथें धान्यसामुग्रीचें सदा दुर्भिक्ष असे. तेव्हां कोठें तरी हात मारून बाहेरून संपत्ति आणण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. अर्थात् त्याची दृष्टि हिंदुस्थानाकडे वळली. त्यानें सिंधुनदीपर्यंत एक स्वारी केली. आणि चार महिन्यांत गज्नी काबीज करून परत आला, (स. १५०५, जानेवारी–मे). ह्याच सुमारास त्याची आई व आजी वारल्या. काबूल येथें बाबरचा चांगला जम बसला; तथापि समर्कंद काबीज करण्याची त्याची हुरहूर बंद पडली नाहीं. पुनः एकवार त्या बाजूनें प्रयत्न करण्याचा विचार करून, तो हिरात येथें गेला, (स. १५०५). हिरातप्रांत त्या वेळीं चांगला समृद्ध व विद्याकलांनीं नांवाजलेला होता. तेथील त्या वेळच्या अनेक विद्वान् व नामांकित पुरुषांची यादी बाबरनें दिली आहे. हिरात येथें त्याचे चुलतभाऊ होते, त्यांजपाशीं त्यानें वीस दिवस मोठ्या आनंदांत व चैनींत घालविले. ह्याप्रमाणें तिकडच्या प्रांताची माहिती

मिळवून व फौजेची वगैरे व्यवस्था करून, बाबर काबुलास परत आला. इतक्यांत शयबानीखानानें हिरात काबीज केल्याची बातमी आली. अर्थात् तयमूरच्या विस्तृत वंशांतला बाबर एवढा एकच गृहस्थ राज्यपदावर राहिला; आणि त्याचाही अंत शयबानीखान लवकरच करणार अशी भीति वाटूं लागली. बाबर आपलें राज्य मजबूद करण्याच्या उद्योगास लागला. ह्याच वेळीं त्यास मद्यप्राशनाचा विशेष नाद लागून तो चैनी बनला. स. १५०८ पासून १५१९ पर्यंतच्या काळाचें आत्मचरित्र लिहिलेलें नाहीं, तेव्हां त्यांत कोणते विशेष प्रसंग घडले हें सांगतां येत नाहीं. तथापि स. १५१०त त्यानें एकाएकीं समर्कंदवर स्वारी केली. त्यापूर्वीच इराणचा शहा इस्मईल सूफी ह्याज बरोबरच्या लढाईत शयबानीखान मारला गेला होता. त्याचे ऊझबेग सरदार बाबरशीं लढण्यास आले, त्यांचा त्यानें पराभव केला, आणि शहा इस्मईल सूफीच्या मदतीनें तिसऱ्यांदां समर्कंदचें तख्त मिळविलें, (स. १५११ ऑक्टोबर). त्याबरोबर एकदम सर्व मध्यआशियाचा तो बादशहा झाला. त्यानें काबूलचें राज्य भाऊ नासिर यास दिलें, आणि आपण समर्कंदासच राहण्याचा निश्चय केला. परंतु हा त्याचा विजय फार वेळ टिकला नाहीं. इराणच्या शहास खूश करण्याकरितां बाबरनें शियापंथाचा स्वीकार केला; त्यामुळें सर्व सुनी लोकांस वाईट वाटून ते त्यास सोडून गेले. पुनरपि ऊझबेग लोकांनीं त्याचा पराजय केला; म्हणून त्यास समर्कंद सोडून जावें लागलें. कित्येक दिवस असाच तो रानावनांत भटकत राहिला; आणि सन १५१४त काबुलांत गेला, तो पुनरपि कधीं परत वळला नाहीं. ऊझबेग मोगलांनीं समर्कंदचें राज्य घेतलें. बाबर तुर्क होता, आणि तो मोगलांचा अत्यंत द्वेष करी.

आजपर्यंत वीस वर्षें काबुलास बाबराचा अंमल होता, तितक्या अवकाशांत हिंदुस्थानाविषयीं त्यास बरेच वेळां लोभ सुटला. शिवाय आपली महत्त्वाकांक्षा पुरी करून घेण्यास त्यास उत्तरेकडे व पश्चिमेकडे मुळींच मार्ग उरला नव्हता. म्हणून तयमूरप्रमाणें राज्यवृद्धि केल्याची कीर्ति मिळविणें असेल, तर हिंदुस्थानदेशच जिंकून घेतला पाहिजे, अशी त्याची खात्री झाली. लोदी घराण्याचे अमलाखालीं हिंदुस्थानच्या राज्यव्यवस्थेंत कांहीं त्राण उरलें नव्हतें; सर्वत्र घालमेली सुरू असून दिल्लीच्या सार्वभौमाचा ताबा प्रत्यक्ष शहराबाहेर फारसा उरला नव्हता.

तेव्हां असला धनसंपन्न देश आपल्या हाताखालीं सहज घालतां येईल असें बाबरास वाटलें ह्यांत आश्चर्य नाहीं. वास्तविक म्हटलें तर वरील उद्देश पार पाडण्यास बाबरसारख्या शूर व चतुर पुरुषास इतका विलंब लागला हेंच आश्चर्य आहे. म्हणून यापुढें त्यानें आपली दृष्टि हिंदुस्थानाकडे वळविली. १५१९त त्यानें हिंदुस्थानावर स्वारी करून, बरीच लूट काबुलास नेली. सात वर्षांत त्यानें पांच स्वाऱ्या केल्या. पांचव्या स्वारींत त्यास हिंदुस्थानचें राज्य प्राप्त झालें. ह्या स्वाऱ्यांत त्यानें तोफांचा उपयोग केला. हिंदुस्थानांत पहिल्यानें तोफांचा उपयोग हाच होय.

**३. पानपतची लढाई व हिंदुस्थान काबीज, (एप्रिल २१, स. १५२६).**— सन १५१९त बाबरनें हिंदुस्थानवर पहिली स्वारी केली. पंजाबांत येऊन त्यानें इब्राहीम लोदी यास निरोप पाठविला, कीं 'पंजाबप्रांत तयमूरच्या वंशजांकडे चालत आला आहे, तो आपण परत द्यावा, नाहीं तर लढाईस सिद्ध व्हावें.' ह्या वेळीं चिनाबनदीपर्यंत जाऊन बाबर काबुलास परत गेला. त्याच वर्षी त्यानें हिंदुस्थानावर दुसरी स्वारी केली. परंतु काश्घरच्या राजानें बदक्शानप्रांतावर स्वारी केल्याचें ऐकून तो तसाच परत गेला. सन १५२०त सियालकोटपर्यंत तो आला असतां, पुनरपि पहिल्याप्रमाणें त्यास परत जावें लागलें. पंजाबचा सुभेदार दौलतखान लोदी स्वतंत्र कारभार करूं लागला होता, त्यानें दिल्लीच्या सुलतानाविरुद्ध लढण्यास सन १५२४त बाबरची मदत मागितली. बाबरास हेंच पाहिजे होतें. तो तत्काळ हिंदुस्थानांत आला व इब्राहीमखानाच्या फौजेबरोबर लढून त्यानें पंजाबप्रांत घेतला. हिंदुस्थानांतील अव्यवस्था ऐकून, तेथील राज्य काबीज करण्याची बाबरास अतिशय उत्कंठा लागली. त्याची तयारी उत्कृष्ट होती, आणि इब्राहीमलोदी त्याच्याशीं टक्कर देण्यास समर्थ नव्हता. दौलतखान लोदीस बाबरची ही मनीषा आवडली नाहीं. आपणास बाजूस सारून हाच हिंदुस्थानचें राज्य गट्ट करणार, हें पाहून दौलतखानलोदी बाबरास सोडून डोंगरी मुलखांत पळाला. अर्थात् दौलतखान विथरल्यानें बाबरचे बेत जरा थंड पडले. तथापि पंजाबांत अलाउद्दीन लोदीस बंदोबस्तास ठेवून आणि ठिकठिकाणीं आपलीं ठाणीं बसवून बाबर काबुलास परत गेला.

हा अलाउद्दीन लोदी इब्राहीम लोदीचा भाऊ असून रुसून बाबरकडे गेला होता. त्याबरोबर बाबरनें आपली फौज हिंदुस्थानांत पाठविली.

